# शक्तिपातयोगरहस्य

अर्थात्

# सिद्धमहायोगशास्त्र



लेखक

डॉ. केशव रामचंद्र जोशी

एम्.ए., पीएच. डी.

।। श्रीगुरुःशरणम् ।।

।। ॐ श्रीमद् अमृतमूर्तये शिववाम्नाय नमः ।।



# शक्तिपातयोगरहस्य

अर्थात्

# सिद्धमहायोगशास्त्र

शक्तिपात




-: लेखक :-

डॉ. केशव रामचंद्र जोशी

एम्. ए., पीएच्. डी.

★ **प्रकाशक :**
व्यवस्थापक,
सिद्धयोग प्रकाशन,
३ गौरिशंकर रेसिडेंसि,
स. नं. १४/२/३ वडगाव बुद्रुक
पुणे-४११०४१

★ **संगणकीय अक्षर जुळणी :-**
**संजीवनी,**
४ संजोग, राधा नगर,
तुळींज, नालासोपारा (पूर्व)
ता.वसई, जि.ठाणे.

★ **मुद्रक :-**
प्रसाद मुद्रणालय,
५०४ मनःशांती, मेहुणपुरा,
शनिवार पेठ,
पुणे ४११ ००२.

★ **प्रकाशनकाल :-**
प्रथमावृत्ती १९७३
द्वितीयावृत्ती १९९६
तृतीयावृत्ती १९९८
चतुर्थावृत्ती २००५

★ **मूल्य १०० रुपये**

# - अनुक्रमणिका -

क) श्रीगुरूंचे खरे स्वरूप व कार्य -
श्री) अनुग्रह करणे ना) आनंदाची मंगलमय अनुभूती
रा) योग्य शिष्याचा उद्धार व अयोग्याला योग्य करणे
य) समभावसंपन्नता णा) दुःखनिवृत्ती
य) शक्तिजागरण न) ज्ञानदान
मः) दिव्यचक्षूंचे उन्मीलन
ड) आदर्श श्रीगुरूंची लक्षणे
द) अनुभूतीची प्राप्ती त्त) विविध गुणलक्षणे
इ) सत् शिष्याची लक्षणे
रा) शरणागती म) विविधगुण
ई) श्रीगुरुभक्तीचा उच्च आदर्श
भ) श्रीगुरुपादुकापूजन वा) सेवा
नी) साधनरतता
उ) श्रीगुरुशिष्यसंबंधाची परिणती

४) साधन चतुष्टय :-
ए) नित्यानित्यवस्तुविवेक
ऐ) वैराग्य
ओ) शमदमादि षट्संपत्ती
श्री) शम कृ) दम ष्णा) उपरती
य) तितिक्षा न) श्रद्धा मः) समाधान
औ) मुमुक्षुता

५) यम व नियम :-
यम -
श्री) अहिंसा गो) सत्य पी) अस्तेय ज) आर्जव
न) क्षमा व) धृती ल) अपरिग्रह भा) दया
य) शौच न) आहार मः) ब्रह्मचर्य
नियम -
द) संतोष त्ता) तप त्रे) साधनाभ्यास य) ईश्वरप्रणिधान

## -: श्रीसदगुरुनाथमहाराजांचे आशिर्वाद :-

श्रीगुरुः शरणम्‌  चैत्र शुद्ध १ शके १८९५.

शक्तिपातानुसारेण शिष्योऽनुग्रहमर्हति ।
यत्र शक्तिर्न पतति तत्र सिद्धिर्न जायते ॥

चि. केशव रामचंद्र जोशी एम. ए. यानीं लिहिलेला शक्तिपातयोगरहस्य अर्थात सिद्ध महायोगशास्त्र हा समग्र ग्रंथ वाचून पाहिल्यावर मनाला परम संतोष झाला. आजपर्यंत सिद्धमहायोगशास्त्राच्या सर्व अंगांचे विवेचन करणारा ग्रंथ मराठी भाषेत झाला नव्हता. ती उणीव या ग्रंथानें भरून निघेल असा विश्वास वाटतो.

शक्तिपातयोगाचें साधन करणाऱ्या साधकांना हा ग्रंथ अत्यंत उपयोगी व मार्गदर्शक ठरेल. भारतीय संस्कृतीमध्ये परमेश्वरप्राप्ती साठी ज्या साधन-प्रणाली आहेत त्या मध्यें या शक्तिपातयोगाचे स्थान किती अनुपमेय आहे याची जाणीव हा ग्रंथ वाचून होईल. या ग्रंथाच्या लाभ सर्वांनी अगत्य घ्यावा. या ग्रंथाच्या वाचनानें परमकल्याण इच्छिणाऱ्या सर्व साधकांचे कल्याण होवो अशी श्री सद्गुरु-चरणी प्रार्थना आहे.

या ग्रंथाला माझे पूर्ण आशीर्वाद आहेत

वा. द. गुळवणी.

श्रीवासुदेव निवास
कोथरूड पुणे नं.४

## -: श्रीसद्गुरुचरणी नमन :-

आत्मरूप गणेशु केलिया स्मरण।
होय सकळ विद्यांचें अधिकरण।
तेचि वंदूं श्रीचरण। श्रीगुरूंचे।।श्रीज्ञानेश्वरी १३.१।।
जयांचेनि आठवें। शब्दसृष्टि आंगवे।
सारस्वत आघवें। जिव्हेसि ये।।२।।
वक्तृत्वा गोडपणें। अमृतातें पारुखें म्हणे।
रस होती वोळंगणे। अक्षरांसीं।।३।।
भावाचें अवतरण। अवतरविती खूण।
हातां चढे संपूर्ण। तत्त्वभेद।।४।।
श्रीगुरूंचे पाय। जैं हृदय गिंवसूनि ठाय।
तैं येवढें भाग्य होय। उन्मेखासी।।५।।
यालागीं आतां। स्तुति सांडूनि निवांता।
चरणीं ठेविजे माथा। हेंचि भलें।।१४.१५।।

## -: समर्पण :-

अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक भक्तवत्सल भक्ताभिमानी भक्तकामकल्पद्रुम भक्तहृदयनिवासी राजराजेश्वर श्रीवासुदेवस्वरूप श्रीमन् शक्तिपात-योगाचार्यवर्य महासिद्धयोगी श्रीयुक्त श्रीसमर्थ सकलसन्तश्रेष्ठ श्रीसद्गुरुनाथ श्रीवामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांच्या परमपवित्र व परमकोमल चरणी कोटी कोटी साष्टाङ्ग दण्डवत प्रणाम करून परमप्रेमपूर्वक व परमशरणागतीपूर्वक सादर समर्पण.

## ।। श्रीकुंडलिनी शक्तीची आरती ।।

सौम्यशब्दें ऊर्ध्वोंकार वाचें उच्चारा ।
भक्तिभावें विनवी शांतें चाल मंदिरा।।धृ०।।
नवखणांचा पलंग शांतें शोभतो बरा।
सुमनांचे शयनी शांतें शयन करा।।१।।
अष्टही भोग भोगुनि शांता पहुडली शेजे।
भक्तजनांची आज्ञा जाहली आतां चलावे सहजे।।२।।
मानस सुखी दशमस्थानें शांतें निद्रा हो केली।
रामदास म्हणे शांता ध्यानीं राहिली।।३।।

## -: दान :-

## श्रीसद्गुरुकृपा व शिष्यशरणागती

शक्तिपातयोगाच्या मार्गाला निरनिराळी नावे प्राप्त झाल्याने त्याचे बहिरंग विविध बनले असले; तरी त्याचे अंतरंग मात्र श्रीसद्गुरुकृपा व शिष्यशरणागती या एकाच प्रक्रियेत एकरसपरिपूर्ण झालेले दिसते. श्रीसद्गुरूंची कृपा व शिष्याची शरणागती या एकाच गोष्टीत शक्तिपात-योगाचे सर्व रहस्य सामाविलेले आहे. कृपा म्हणजे दान व शरणागती म्हणजेही दानच होय. कृपा म्हणजे श्रीसद्गुरूंनी शिष्याला अहेतुकपणे केलेले विभुत्वाचे किंवा शिवत्वाचे दान होय; तर शरणागती म्हणजे साधकाने श्रीसद्गुरूंना आपल्या अणुत्वाचे किंवा जीवत्वाचे निरहंकारित्वाने केलेले दान होय. असे जेव्हा उभयविध दान घडते तेव्हाच कृपेचा आविष्कार होतो व श्रीगुरुशिष्य दोघेही सुखानंदात निमग्न होतात.

## -: शक्तिपातयोगरहस्यसार :-

**"यहाँतक जो कुछ कहा गया है, उससे स्पष्ट जान पडता है कि शक्तिपात अथवा श्रीभगवान् की कृपा के बिना कोई जीव पूर्णत्व-लाभ नहीं कर सकता, - यहाँतक कि पूर्णत्व के मार्ग में भी प्रवेश नहीं कर सकता। शक्तिपात का तारतम्य जीव के आधार (धारणाशक्ति) के भेद से होता है। परन्तु यह भी सत्य है कि जीव चाहे कितने ही निम्न अधिकार का हो और कितना ही भोगाकांक्षायुक्त हो, एक बार शक्तिपात होने पर वह कभी न कभी परम पद में अवश्य पहुँच जायेगा। भोगाकांक्षादि अंतराय रहने से उसकी गति में विलंब होगा, नहीं तो शीघ्रातिशीघ्र-यहाँ तक कि क्षणमात्र में भी (जैसे तीव्र तीव्र की मात्रा में) हो सकता है। शक्तिपात के समय योग्यता का विचार नहीं होता, परन्तु स्वभावतः योग्यता के अनुसार ही शक्तिपात की मात्रा निर्दिष्ट होती है। परन्तु मात्रा कुछ भी हो, भगवत्-शक्ति की ऐसी ही महिमा है कि इसका एक बार पात होनेपर यह जीवको भगवद्धाम में पहुँचाये बिना शांत नहीं होती इसमे कोई संदेह नहीं।"**

येथपर्यंत जे काही सांगितले त्यावरून हे स्पष्ट होते की, शक्तिपाताशिवाय म्हणजे श्रीभगवंताची कृपा झाल्याशिवाय कोणताही जीव पूर्णत्व प्राप्त करू शकत नाही. इतकेच काय; पण तो पूर्णत्व प्राप्त करण्याच्या मार्गात देखील प्रवेश करू शकत नाही. जीवाच्या धारणाशक्तीच्या भेदानुसार शक्तिपाताचे कमी जास्त प्रमाण किंवा भिन्नता दिसून येते. मात्र हेही तितकेच खरे आहे की, जीव कितीही सामान्य कोटीतील असला आणि भोग, वासना आकांक्षा इत्यादींनी कितीही गुरफटलेला असला; तरी एकदा त्याच्यावर शक्तिपात झाला की, तो श्रेष्ठ अशा ब्रह्मपदाला अवश्य पोहोचतो. मात्र भोगाकांक्षादि विक्षेपांमुळे जीवाच्या परमपदाला जाण्याच्या गतीत अडथळा उत्पन्न होतो. जर शक्तिपाताची मात्रा तीव्रातितीव्र असेल व हे आडवे येणारे विक्षेप जर नसतील तर अत्यंत शीघ्रगतीने म्हणजे क्षणभरातसुद्धा जीव परमपदाला

जाऊ शकतो. शक्तिपातयोगदीक्षेच्या वेळी योग्या-योग्यतेचा विचार केला जात नाही; मात्र (जीवाच्या) मुळातील योग्यतेनुसारच शक्तिपाताचे प्रमाण स्वाभाविकपणे निश्चित होत जाते. परंतु प्रमाण काहीही असले; तरी श्रीभगवंताच्या शक्तीचा महिमा इतका मोठा आहे की, एकदा का होईना, (सिद्धगुरूंकडून) ही शक्ती साधकात संक्रमित झाली की, ती त्या जीवाला श्रीभगवंताच्या घरी (ब्रह्मपदाला) पोहोचविल्याशिवाय कधीही शांत होत नाही, हे अगदी निःसंशय सत्य आहे.

**म. म. श्रीगोपीनाथ कविराज**



# -: श्रीकुंडलिनी जगदंबा स्तुती :-

ते कुंडलिनी जगदंबा। जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा।
जया विश्वबीजाचिया कोंभा। साउली केली।।
श्रीज्ञानेश्वरी ६.२७२।।

जे शून्यलिंगाची पिंडी। जे परमात्मया शिवाची करंडी।
जे प्रणवाची उघडी।। जन्मभूमी ।।२७३।।

मूलपद्मे कुण्डलिनी यावन्निद्रायिता प्रभो।
तावत् किंचिन्न सिद्ध्येत मन्त्रयन्त्रार्चनादिकम्।।
गौतमीयतंत्र ३२.३।।

जागर्ति यदि सा देवी बहुभिः पुण्यसञ्चयैः।
तदा प्रसादमायान्ति मन्त्रयन्त्रार्चनानि च।। ४।।

मूलाधारे आत्मशक्तिः कुण्डलिनी परदेवता ।
शयिता भुजगाकारा सार्द्धत्रय वलयान्विता।।
घेरण्ड संहिता ३.४४।।

यावत्सा निद्रिता देहे तावज्जीवः पशुर्यथा।
ज्ञानं न जायते तावत् कोटियोगविधेरपि।। ५०।।

आधारशक्तिनिद्रायां विश्वं भवति निद्रया।
तस्यां शक्तिप्रबोधेन त्रैलोक्यं प्रतिबुध्यते।।
योगशिखोपनिषद् ६.२३-२४।।

सशैलवनधात्रीणां यथाधारोऽहिनायकः।
सर्वेषां योगतन्त्राणां तथाधारो हि कुण्डली।।
हठयोगप्रदीपिका-३.१।।

शक्तिपातानुसारेण शिष्योऽनुग्रमर्हति।
यत्र शक्तिर्न पतति तत्र सिद्धिर्न जायते।।
कुलार्णवतन्त्र १४.३८।।

आदिशक्ती कुंडलिनी जगदंबा ही चैतन्याचे चक्रवर्ती सम्राट् असलेल्या शिवाची शोभा आहे. अर्थात् ती चंद्र आणि त्याचे चांदणे किंवा प्रभा ही ज्या प्रमाणे एकरूप असतात त्याप्रमाणे शिवाशी एकरूप आहे. या शक्तीनेच विश्वबीजाच्या कोंभाला म्हणजेच जीवाला सावली केली आहे अर्थात् ही शक्तीच जीवरूप असून ती श्रीसद्गुरुकृपेने जागृत झाल्यावर शिवरूप होते.।। श्रीज्ञानेश्वरी ६.२७२।।

ही कुंडलिनी शक्ती निराकार अशा परमात्म्याची साकार मूर्तीच आहे. ती परब्रह्मरूपी शिवाची करंडी म्हणजे अखंड निवास करण्याचे स्थान आहे अर्थात् शिव व शक्ती हे दोघे अखंड सामरस्याने विराजमान झालेले असतात. ही शक्ती ॐकाराची जन्मभूमी आहे म्हणजे ॐकाराच्या साडेतीन मात्रांपैकी "अ" काररूपी सत्त्वात्मक इच्छाशक्तिरूप ब्रह्मा, "उ" काररूपी रजात्मक क्रियाशक्तिरूप विष्णू व "म" काररूपी तमात्मक ज्ञानशक्तिरूप शिव असून या दृष्टीनेच ही शक्ती जीव, जगत् व ईश्वराची निर्मिती, पालन व संहार करणारी आहे आणि ही शक्ती ॐकाराच्या अर्धमात्रारूपाने नाद, बिंदू व कलारूप असून तीच श्रीसद्गुरुकृपेने जागृत झाल्यावर आपल्या या अर्धमात्रात्मक स्वरूपाला भेदून साधकाला पलीकडे अर्थात् अमात्रक स्वरूपाला नेणारी अशी साधनरूप म्हणजे श्रीगुरुरूपच आहे.।।२७३।।

जोपर्यंत कुंडलिनी शक्ती मूलाधारात निद्रिस्त असते तोपर्यंत जप, तप, ध्यान, पाठ, पूजा, मंत्र, यंत्र इत्यादि कोणत्याही प्रकारच्या साधनाने साधकाला साधनामध्ये किंचित्ही सिद्धी म्हणजे ज्ञान प्राप्त होत नाही. परंतु जर पुष्कळ पुण्यसंचयामुळे सौभाग्याने श्रीसद्गुरूंची प्राप्ती होऊन त्यांनी शक्तिसंचारद्वारा केलेल्या शक्तिपाताच्या अर्थात् कृपेच्या प्रभावाने जर कुंडलिनी देवी जागृत झाली तर साधकाच्या जप, तप, ज्ञान, योग, मंत्र, तंत्र, पाठ, पूजा इत्यादि सर्व उपासना सिद्धीला जातात.।। गौतमीयतंत्र ३२.३,४।।

श्रीदेवी कुलकुंडलिनी ही परमश्रेष्ठ आत्मशक्तिरूप देवता मूलाधारात सर्पासारखा आकार धारण करून साडेतीन वेढे घालून झोपली आहे. जोपर्यंत ही शक्ती निद्रिस्त असते तोपर्यंत जीव हा पशूप्रमाणेच अज्ञानी

असतो. जोपर्यंत कुंडलिनी शक्ती जागृत होत नाही तोपर्यंत साधकाने कितीही जरी योगाभ्यास केला तरी त्याला ज्ञान प्राप्त होत नाही. ।। घेरंड संहिता ३.४४,५०।।

जोपर्यंत आधारशक्ती ही निद्रिस्त असते तोपर्यंत सर्व ब्रह्मांडही निद्रिस्त असते. मात्र ज्यावेळी ही अनादि निद्रिस्त आत्मशक्ती जागृत होते त्यावेळी सर्व त्रैलोक्य जागृत होते. याकरिता परमश्रेष्ठ कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय इतर सर्व साधने व्यर्थ व निष्फळ ठरतात.
।। योगशिखोपनिषद् ६.२३,२४।।

ज्याप्रमाणे वन, पर्वत, नदी, सरोवर आणि समुद्रवलयांकित पृथ्वीचा आधार सर्पांचा स्वामी शेषनाग अर्थात् ब्रह्मशक्ती आहे त्याप्रमाणे सर्व योगांचा व तंत्रांचा आधार कुंडलिनी शक्ती आहे.
।। हठयोगप्रदीपिका ३.१।।

शक्तिपातयोगांतर्गत अर्थात् सिद्धयोगांतर्गत शक्तिसंचाराच्या मात्रेनुसारच शिष्याला अनुग्रह मिळतो. जेथे शक्तिपात अर्थात् शक्ति-संचारात्मक कृपा होत नाही तेथे साधकाला सामरस्यात्मक अंतिम सिद्धी अर्थात् ज्ञान कधीही प्राप्त होत नाही.।। कुलार्णवतंत्र १४.३८।।



।। श्रीगुरुःशरणम् ।।

## ।। श्रीकुण्डलिनीस्तुतिस्तोत्र ।।

जन्मोद्धारनिरीक्षणीह तरुणी वेदादिबीजादिमा
नित्यं चेतसि भाव्यते भुवि कदा सद्वाक्यसञ्चारिणी ।
मां पातु प्रियदासभावकपदं सङ्घातये श्रीधरे !
धात्रि! त्वं स्वयमादिदेववनिता दीनातिदीनं पशुम् ।।१।।
रक्ताभामृतचन्द्रिका लिपिमयी सर्पाकृतिर्निद्रिता
जाग्रत्कूर्मसमाश्रिता भगवती त्वं मां समालोकय ।
मांसोद्गन्धकुगन्धदोषजडितं वेदादिकार्यान्वितं
स्वल्पस्वामलचन्द्रकोटिकिरणैर्नित्यं शरीरं कुरु ।।२।।
सिद्धार्थी निजदोषवित्स्थलगतिर्व्याजीयते विद्यया
कुण्डल्या कुलमार्गमुक्तनगरीमायाकुमार्गःश्रिया।
यद्येवं भजति प्रभातसमये मध्याह्नकालेऽथवा
नित्यं यः कुलकुण्डलीजपपदाम्भोजं स सिद्धो भवेत्।।३।।
वाय्वाकाशचतुर्दलेऽतिविमले वाञ्छाफलोन्मूलके
नित्यं सम्प्रति नित्यदेहघटिता साङ्केतिता भाविता ।
विद्या कुण्डलमानिनी स्वजननी माया क्रिया भाव्यते
यैस्तैः सिद्धकुलोद्भवैः प्रणतिभिः सत्स्तोत्रकैः शम्भुभिः।।४।।
वाताशङ्कविमोहिनीति बलवच्छायापटोद्गामिनी
संसारादिमहासुखप्रहरणी! तत्र स्थिता योगिनी।
सर्वग्रन्थिविभेदिनी स्वभुजगा सूक्ष्मातिसूक्ष्मा परा
ब्रह्मज्ञानविनोदिनी कुलकुटीराघातनी भाव्यते।।५।।
वन्दे श्रीकुलकुण्डलीं त्रिवलिभिः साङ्गैः स्वयम्भूप्रियां
प्रावेष्ट्याम्बरचित्तमध्यचपला बालाबलानिष्कलां।
या देवी परिभाति वेदवदना सम्भावनी तापिनी
इष्टानां शिरसि स्वयम्भुवनिता सम्भावयामि क्रियाम् ।।६।।
वाणीकोटिमृदङ्गनादमदनानिश्रेणिकोटिध्वनिः

प्राणेशी प्रियतामममूलकमनोल्लासैकपूर्णानना।
आषाढोद्भवमेघराजिजनितध्वान्ताननास्थायिनी
माता सा परिपातु सूक्ष्मपथगा! मां योगिनां शङ्करी।।७।।
त्वामाश्रित्य नरा व्रजन्ति सहसा वैकुण्ठकैलासयो-
रानन्दैकविलासिनीं शशिशतानन्दाननां कारणम्।
मातः श्रीकुलकुण्डली प्रियकले! काली कलोद्दीपने!
तत्स्थानं प्रणमामि भद्रवनिते! मामुद्धर त्वं पथे।।८।।
कुण्डलीशक्तिमार्गस्थं स्तोत्राष्टकमहाफलम्।
यः पठेत् प्रातरुत्थाय स योगी भवति ध्रुवम्।।९।।
क्षणादेव हि पाठेन कविनाथो भवेदिह।
पवित्रौ कुण्डली योगी ब्राह्मणीनो भवेन्महान्।।१०।।
इति ते कथितं नाथ! कुण्डलीकोमलं स्तवम्।।११।।
एतत्स्तोत्रप्रसादेन देवेषु गुरुगीष्पतिः।
सर्वे देवाः सिद्धियुता अस्याः स्तोत्रप्रसादतः।।१२।।
द्विपरार्धं चिरंजीवी ब्रह्मा सर्वसुरेश्वरः।।१३।।

**(रुद्रयामल-षष्ठ पटलः)**

**अर्थ :-** (श्रीकुलकुंडलिनी महादेवी) ही जन्म (आणि मृत्यू) यांच्या चक्रात अडकून पडून त्यातच सतत फिरत राहणाऱ्या आपल्या भक्तांचा कोणत्या प्रकाराने उद्धार करावा व त्यांना सामरस्याची अर्थात् मुक्तीची प्राप्ती कशी करून द्यावी (यासाठी उत्तम वेळेची) प्रतीक्षा करीत राहते. ही महाशक्ती तरुण अर्थात् नित्यनूतन आहे. ती वेदांची व अन्य सकल शास्त्रांची म्हणजे शब्दब्रह्माची अर्थात् सर्व सारस्वताची बीजभूत असलेली म्हणजे जिच्यापासून सर्व वाङ्मयाची निर्मिती होते अशी आदिकारणभूत शक्ती असून बीजाक्षरांची जननी आहे. या संसारात योगिसाधक आपल्या चित्तामध्ये या महान् शक्तीच्या जागृतीचा बोध प्राप्त करून घेतात. ही महाशक्ती नेहमीच सत्य बोलणारी किंवा सत्य भाषणाकडे प्रवृत्त करणारी आहे. ही श्रीकुंडलिनी महादेवी स्वतः आदिनाथ महादेवाची पत्नी आहे.

अशा प्रकारच्या हे शुभंकरी माते! हे धात्री!! हे दाई आणि आई!!! संसारबंधनात अडकलेला मी एक दीनातिदीन पशू अर्थात् जीव म्हणजे साधक असून तू माझे रक्षण कर. एवढेच नव्हे तर मी तुझ्याबरोबर दिव्य ऐक्य अगर समरसता प्राप्त करीन आणि स्वत: तुझा अत्यंत प्रिय असा सेवक होईन अशी तू माझ्यावर कृपा कर.।।१।।

**अर्थ :-** या श्रीकुलकुंडलिनी महाशक्तीची कांती रक्ताप्रमाणे लाल रंगाची आहे. ही दिव्यशक्ती चंद्राप्रमाणे अत्यंत शीतल आहे. या शक्तीचे शरीर लिपिमय म्हणजे मातृका अर्थात् अक्षर स्वरूपयुक्त किंवा वर्णसमूहयुक्त आहे म्हणजे ही शक्ती वर्णांच्या, अक्षरांच्या किंवा शब्दांच्या द्वारा आपले अव्यक्तस्वरूप व्यक्त करते. या शक्तीची आकृती सर्पाप्रमाणे असून ती सर्पाप्रमाणेच निद्रिस्त अवस्थेत असते. हे भगवती देवी! तू जागेपणी अर्थात् जागृत होऊन कूर्मदृष्टीचा अवलंब करून माझ्याकडे कृपादृष्टीने पाहा. अपार व निर्मल अशा कोट्यवधी चंद्रांच्या किरणांप्रमाणे उज्ज्वल कांती असलेल्या हे श्रीकुंडलिनी माते! मांसाच्या उग्र गंधाने व इतर शारीरिक दुर्गंधीने दूषित झालेले हे माझे शरीर वेदादि कार्याला अनुकूल आणि योग्य असे कर.।।२।।

**अर्थ :-** सिद्धी प्राप्त करण्याची इच्छा असणारा, आपले स्वत:चे दोष माहीत असणारा आणि शरीरातील स्थलांचे अर्थात् महत्त्वाच्या चक्रांच्या व ग्रंथींच्या स्थानांचे आणि त्यांच्या वैशिष्ट्यांचे ज्ञान असणारा साधक या भूतलावर श्रीकुंडलिनी विद्या संपादन करून विजयी होऊ शकतो. त्याचप्रमाणे तो मायेच्या खोट्या व फसव्या मार्गापासून स्वत:ची सुटका करून घेऊन श्रीकुंडलिनी विद्येच्या बळावर सर्व व्यवहार करीत कुलमार्गासारख्या अनभिज्ञ अर्थात् अनोळखी मार्गाचा आश्रय करून त्याच्या द्वारा मुक्तीच्या नगरात पोहोचतो. अशा प्रकारे जो साधक दररोज प्रात:काळी व मध्याह्नकाळी या श्रीकुलकुंडलिनीच्या जपरूप चरणांचा अर्थात् अनाहतनादरूपी मूर्धन्य साधनाचा नियमाने म्हणजे दीर्घकाल, निरंतर व श्रद्धा-भक्ति-सत्कार-भावपूर्वक आश्रय घेईल तो सिद्ध होईल.।।३।।

**अर्थ :-** ही श्रीकुलकुंडलिनी महाशक्ती आकाशरूप म्हणजे शब्दतत्त्वरूप आणि वायुरूप म्हणजे स्पर्शतत्त्वरूप अर्थात् अनुभूति-स्वरूप असलेल्या चार पाकळ्यांच्या कमळात म्हणजे मूलाधारचक्रात राहून देहाचा व्यवहार चालविते. तिचेच ध्यान योगिसाधक नेहमी करीत असतो. ही शक्ती अत्यंत निर्मल किंवा पवित्र अशी असून ती सांसारिक कामनांच्या फलप्राप्तीची वासना किंवा इच्छा मुळापासून नाहीशी करणारी आहे. (येथे "वाञ्छा-फलान्यालके" असा पाठभेद आहे. त्याचा अर्थ "ही शक्ती साधकयोग्याला इच्छित फल देणारी आहे" असा होतो.) ही श्रीकुंडलिनी शक्ती नित्य म्हणजे अविनाशी किंवा अजरामर शरीराची असून ती सांकेतिक तत्त्वांची किंवा स्वरूपाची अर्थात् ॐकार स्वरूप, सर्पाकार व साडेतीन वेढे घालून बसलेली आहे, अशी योगिसाधकांची सत्य धारणा आहे. अशा प्रकारे जे साधक श्रीकुंडलिनी विद्या ही ज्ञानरूपिणी असून "आपली आई आहे," अशा भावनेने पाहतात व ही महाशक्ती म्हणजेच मायाशक्ती व क्रियाशक्ती आहे, हे लक्षात घेऊन तिचे अनुसरण करतात अर्थात् सर्वभावाने तिला शरण जाऊन साधन करतात त्यांची सिद्धांचे समुदाय उत्तम स्तुती करून त्यांना नमस्कार करतात अर्थात् सिद्धांकडून अशा साधकांचा आदर होतो.।।४।।

**अर्थः-** मी श्रेष्ठ अशा श्रीकुंडलिनी देवीची भावना करतो म्हणजे साधना करताना ती तीव्रातितीव्र स्वरूपात जागृत होऊन शिवस्वरूप व्हावी म्हणून तिचा मोठा आदर करून तिच्याविषयी चिंतन इत्यादि करतो. ती शरीरात उत्पन्न होणाऱ्या वातादि सर्व दोषांच्या शंकांना निवृत्त करणारी आणि घोर अशा अज्ञानरूपी पडद्याला फाडून वर जाणारी आहे. (येथे "धाताशङ्करमोहिनी त्रिभुवन-च्छायापटोद्गामिनी" हा पाठ घेतल्यास "ही मूलाधारकमलात निवास करणारी महायोगिनी शक्ती ब्रह्मा आणि शिवालाही मोहित करते आणि त्रिभुवनात पसरलेल्या अज्ञानरूपी मायेच्या आवरणाला दूर करते" असा अर्थ होईल.) ती विशेष करून संसारादि महासुखाच्या ज्या ज्या म्हणून कल्पना आहेत त्या त्या सर्व कल्पना तोडून-मोडून छिन्नभिन्न

करणारी व त्यांना हाणून पाडण्यासाठी कटिबद्ध झालेली योगिनी आहे. ती ब्रह्मग्रंथी, विष्णुग्रंथी, रुद्रग्रंथी इत्यादि सर्व ग्रंथींचा भेद करणारी आहे. ती आपल्या स्वतःच्या भुजांनीच सरपटणारी म्हणजे स्वबलसंपन्न अर्थात् इतर कोणाच्याही बलाची अगर आधाराची अपेक्षा न बाळगणारी आहे. (ही श्रीकुंडलिनी महाशक्ती ) सूक्ष्माहूनही अत्यंत सूक्ष्मरूपाची अर्थात् अवाङ्मनसगोचर म्हणजे वाणी, मन इत्यादि कोणत्याही इंद्रियांना न दिसणारी व त्यांच्या आटोक्यात न येणारी अशी आहे. ती अत्यंत महान् व श्रेष्ठ असून ब्रह्मज्ञानाचा सहज लाभ करून देणारी आहे. (ही श्रीकुंडलिनी महामाया) कुलमार्गरूपी झोपडीला म्हणजे आपण आपल्या स्वतःच्याच शक्तीने उत्पन्न व स्थित केलेल्या पिंडब्रह्मांडादि समस्त त्रैलोक्याला नष्ट करणारी अर्थात् आभास, कल्पना किंवा विवर्तरूपाने उत्पन्न झालेल्या जगदाभासाला मावळून टाकणारी आहे. (ज्यावेळी महाशक्ती श्रीकुंडलिनी श्रीसद्गुरूंनी दिलेल्या शक्तिपातयोगदीक्षेमुळे उत्पन्न होणाऱ्या सहजयोगाच्या साधनाने सुषुम्णागामी होते त्यावेळीच उपरोक्त सर्व प्रक्रिया घडून त्याची फले मिळतात.)।।५।।

**अर्थ :-** तीन वेढ्यांनी किंवा वलयरूप अवयवांनी युक्त आणि परमेश्वराच्या अत्यंत आवडत्या असलेल्या अशा श्रीकुलकुंडलिनीदेवीला मी वंदन करतो. (ही महाशक्ती श्रीकुंडलिनी) मनोरूप आकाशात म्हणजे सहस्रारात विजेसारखी चपल असणारी, तळपणारी व चमचमाट करणारी अशी आहे. ती तरुण, बलवती म्हणजे श्रीसद्गुरुकृपेने जागृत झाल्यावर आपल्या बळाच्या जोरावर विश्वाला आत्मसात करणारी आणि कलारहित म्हणजे अंशहीन आहे. ती वेढा घालून बसलेली आहे म्हणजे संसारोन्मुख आहे अर्थात् ॐकाराच्या अ-उ-म या तीन मात्रा व चंद्रबिंदूची अर्धी मात्रा मिळून साडेतीन मात्रांनी युक्त अशी चक्राकार गती किंवा रूप धारण करून मूलाधारात सुप्तवत् पडून राहिली आहे. ही महाशक्ती दिव्य प्रकाशाने युक्त किंवा महाप्रकाशमान् असून वेदवदना म्हणजे ज्ञानमुखी अर्थात् ज्ञानाचे साक्षात् मुख असणारी किंवा जिच्यापासून पर-अपर विद्यांचे म्हणजे सकळ

भौतिक व पारमार्थिक विद्यांचे ज्ञान होते अशी आहे. इष्टप्राप्तीच्या म्हणजे शिवस्वरूप प्राप्तीच्या दृष्टीने ती साधनरूप असल्याने तीच देहाला प्रथम आपल्या अग्निस्वरूपाने किंवा सूर्यस्वरूपाने तप्त करणारी व मागाहून आपल्या चंद्रस्वरूपाने किंवा अमृतस्रावाने शांत करणारी आहे. आपल्या अभीष्ट गोष्टी साधण्यासाठी तिची मी अत्यंत श्रेष्ठ म्हणून संभावना करतो.।।६।।

**अर्थ :-** ही श्रीकुंडलिनी महाशक्ती अनंत मातृकारूप वाणीने युक्त आहे अर्थात् "अ" पासून "ह" पर्यंत जेवढ्या मातृका आहेत त्यांच्या संमीलनाने ती आपल्या अव्यक्त स्वरूपापासून व्यक्तस्वरूपाप्रत आली आहे; कारण या शक्तीचे अव्यक्त स्वरूप अवाङ्‌मनसगोचर असून व्यक्त स्वरूपच फक्त मनाच्या, बुद्धीच्या व ज्ञानाच्या कक्षेत येण्यासारखे आहे. ही महाशक्ती मृदंगनादाने हृष्ट अर्थात् विस्मित किंवा रोमांचित व आनंदोन्मत्त होणारी आहे म्हणजे ज्यावेळी ही महाशक्ती सुषुम्णागामी होऊन मृदंग, भेरी, वीणा इत्यादि दशविध नादात परिणत होऊन अनाहतनादाच्या साधनाने साधकाच्या ठिकाणी उपस्थित होते, त्यावेळी साधक निरतिशय आनंदात बुडून जातो. ही श्रीकुलकुंडलिनी श्रीशक्ती म्हणजे कोट्यवधी ध्वनींची मालिकाच आहे. अर्थात् ही शक्ती चैतन्ययुक्त, ध्वनियुक्त व स्पंदरूप आहे. ही प्राणांची स्वामिनी आहे अर्थात् हीच प्राणांची अधिष्ठात्री देवता आहे. या शक्तीचे मुख निश्चल मनाच्या उल्लासाने पूर्णपणे भरलेले आहे. (येथे "रसराशिमूलकमलोल्लासैक पूर्णानना" असा पाठ घेतला; तर "या शक्तीचे मुख अमृताच्या सागरात उमललेल्या कमलाप्रमाणे प्रफुल्लित दिसते," असा अर्थ होईल.) ही महाशक्ती श्रीकुंडलिनी आषाढातील मेघसमुदायाच्या काळ्याकुट्ट मुखात विजेप्रमाणे राहणारी व दिव्य प्रकाशमान अशी आहे. ही शक्ती योगिजनांचे कल्याण करणारी अर्थात् तिला शरण गेलेल्या सर्व साधकांना इष्ट देऊन पालन करणारी व अनिष्ट दूर करून रक्षण करणारी आहे. ही श्रीकुलकुंडलिनी महाशक्ती सूक्ष्ममार्गात म्हणजे सुषुम्णामार्गात गमन करणारी अर्थात् या मार्गाने जीवरूप साधकाला गुरुरूपाने मार्गदर्शन

करीत व त्याचा हात आपल्या हातात घेऊन सहस्त्रारात शिवाशी समरस होण्यासाठी जाणारी आहे. (अशा प्रकारचे वैशिष्ट्य किंवा सामर्थ्य असणारी) ही श्रीकुंडलिनी माता माझे रक्षण करो.।।७।।

**अर्थः-** हे श्रीकुलकुंडलिनी देवी! तुझा आधार घेऊन अर्थात् तुला पूर्णपणे शरणागत होऊन जे साधक रात्रंदिवस, दीर्घकाल, निरंतर व मोठ्या आदरसत्कारपूर्वक श्रीसद्गुरुकृपाप्राप्त शक्तिपातयोगाचे म्हणजे सिद्धयोगाचे किंवा महायोगाचे साधन करतात ते साधक योगी वैकुंठकैलासादि निरनिराळ्या नावांनी निर्दिष्ट होणाऱ्या सहस्त्रार नावाच्या एकाच ठिकाणी किंवा एकाच स्थानी एकदम अर्थात् त्वरित गतीने व सहज म्हणजे अनायासे जाऊन पोहोचतात. हे देवी! तू अखंड आनंदातच सतत विलास करणारी आहेस. तू सर्व कारणांचे कारण आहेस अर्थात् तू सर्वांचे मूल किंवा आदिकारण आहेस. तुझे मुखकमल शेकडोशे चंद्रांप्रमाणे अत्यंत आल्हाददायक असे आहे अर्थात् शेकडोशे चंद्रांच्या तेजाप्रमाणे तुझ्या मुखावर प्रसन्नता पसरलेली दिसते. हे श्रीकुलकुंडलिनी! हे प्रियकले!! हे काली अर्थात् भीतिप्रदे!!! हे कलोद्दीपन म्हणजे सकल कला उद्भूत करणाऱ्या माते!!!! हे कल्याणकारिणी स्त्रिये!!!! मी तुझ्या स्थानाला म्हणजे मूलाधाराला वंदन करतो. तुझ्या मार्गाने तू मला घेऊन जाऊन माझा उद्धार कर. (येथे "मामुद्धर त्वं पशुम्" असा पाठ घेतला; तर "संसारपाशामध्ये बांधला गेल्यामुळे पशूप्रमाणे असणाऱ्या माझा तू उद्धार कर," असा अर्थ होईल.)।।८।।

**अर्थः-** श्रीकुंडलिनीशक्तिमार्गातील अर्थात् सिद्धयोगसाधनमार्गातील जे साधक आहेत त्यांना हे आठ श्लोकांचे स्तोत्र महान् असे फल देणारे आहे. जो कोणी प्रातःकाली याचे पठण करील तो योगी होतोच हे निश्चित समजावे.।।९।।

**अर्थः-** या स्तोत्राचा पाठ करताक्षणीच साधकाला कविश्रेष्ठाची पदवी प्राप्त होते अर्थात् या स्तोत्राच्या पाठाने साधक क्षणमात्रात महाकवी होतो. या श्रीकुंडलिनीशक्तिमार्गाचा अर्थात् सिद्धयोग- साधनमार्गाचा अभ्यास करणारा

म्हणजे दीर्घकाल, निरंतर व मोठया श्रद्धाभक्तिपूर्वक आदराने साधन करणारा योगी पवित्र व महान् होतो आणि अशा साधकाला ब्राह्मणांमध्ये म्हणजे ब्रह्म जाणणाऱ्या सिद्धांमध्ये महत्त्वाचे स्थान मिळते. (येथे "ब्रह्मलीनो भवेन्महान्" असा पाठ घेतला; तर "श्रीकुंडलिनी योगाभ्यासी साधक पवित्र व महान् होऊन ब्रह्मैक्य प्राप्त करून घेतो," असा अर्थ होईल.)।।१०।।

**अर्थ :-** हे नाथपंथीय अर्थात् अनुपायप्रक्रियासंपन्न शक्तिपात- योगदीक्षाप्राप्त सहजयोगाच्या किंवा सिद्धयोगाच्या साधका ! हे कोमल कुंडलिनीस्तुतिस्तोत्र मी म्हणजे महाभैरवीने अर्थात् सिद्धयोग प्रवर्तक आदिनाथ श्रीशंकराशी अभिन्न असलेल्या महामाया आदिशक्तीने तुला सांगितले आहे.।।११।।

**अर्थ :-** या स्तोत्राच्या प्रसादाने बृहस्पती हा देवांचा गुरू झाला. या कोमलकुंडलिनीस्तोत्राच्या कृपाप्रसादाने सर्व देव सिद्धिसंपन्न झाले आणि देवाधिदेव ब्रह्मदेव हा दोन परार्ध आयुष्य प्राप्त होऊन चिरंजीव झाला.।।१२.१३।।

**(रुद्रयामल सहावे पटल)**



## परमपूजनीय प्रातःस्मरणीय कै. श्रीआत्मारामशास्त्री जेरे यांची प्रथमावृत्तीतील आशीर्वादात्मक प्रस्तावना.

।। श्रीगणेशदत्तगुरुभ्योनमः ।।

माझे स्नेही गुरुभक्त श्रीयुक्त केशवरावजी जोशी यांनी अभ्यास व स्वानुभवपूर्वक लिहिलेले **"शक्तिपातयोगरहस्य अर्थात् सिद्धमहायोग-शास्त्र"** हे पुस्तक धावत्या नजरेने आमूलाग्र पाहिले. पण त्याने सुद्धा चित्तास परम समाधान वाटले. परमपूज्य प्रातःस्मरणीय श्रीगुळवणी-महाराजांकडून परंपरेने आलेल्या दिव्य शक्तिपातयोगरहस्याचे शाब्दिक व प्रात्यक्षिक ज्ञान संपादन करून लिहिलेले हे पुस्तक आहे. शब्दब्रह्म व परब्रह्मनिष्णात आणि उपशमाश्रय अशा सद्गुरूंच्या कृपेकरिता आपले सर्व आयुष्य सद्गुरूंना समर्पण करणारे श्रीयुक्त सद्गुरुभक्त केशवराव म्हणजे श्रीगुरुमहाराजांचे एक स्थूल शरीरच आहेत असे म्हटले तर अत्युक्ती होणार नाही. श्रीगुरुमहाराजांशिवाय केशवराव व केशवरावांशिवाय श्रीगुरुमहाराज बहुतेक विभक्त नसतातच. **"यत्रसद्गुरुस्तत्रकेशवो-यत्रकेशवस्तत्रसद्गुरुः"** अशी समव्याप्ती या गुरुशिष्यांमध्ये मला नेहमी दिसून येते. **"सर्वहि अर्पी गुरूचे पायीं। जगीं तयाविण न दिसे कांहीं। एकचि निश्चय दुसरा नाहीं। गुरुसि वरारे। आपुलासा देव करारे। भाव धरारे। आपुलासा देव करारे।।"** असे एका संताच्या पदात कडवे आहे. इतके सद्गुरूंचे साहचर्य लाभल्यावर सद्गुरूंच्या चित्तातील शक्ती शिष्याच्या चित्तात येण्यास काय वेळ लागणार?" **स्वीयं साम्यं विधत्ते भवति निरुपमस्तेन वा लौकिकोपि"** सामान्य माणूसही सद्गुरूंच्या कृपेनें अलौकिक पुरुष होतो. हा सद्गुरूंचा महिमा शास्त्रकारांनी व भगवत्पादांसारख्या संतश्रेष्ठांनी वर्णिलेला आहे. यामुळे हा ग्रंथ किती श्रेष्ठ आहे हे निराळे सांगावयास नको.

या ग्रंथात शक्तिपातयोगाचे रहस्य सांगितले आहे. **"सूतसंहिता"** वगैरे संस्कृत ग्रंथात शक्तिपातयोगाचे सांगोपांग विवेचन आहे व इतरही संतांच्या ग्रंथात ठिकठिकाणी ते सांगितले आहे. या सर्वांचे संकलन किंवा मंथन

करून त्यांस सद्गुरूंच्या अनुभवाची जोड देऊन हा ग्रंथ लिहिला असल्याने तो सर्वोत्कृष्ट असाच आहे. याच्या आधाराने व सद्गुरूंच्या कृपाछत्राने यातील विषयाचे मनन व निदिध्यासन केल्यास साधकांचे अवश्य परमकल्याण होईल असे खात्रीलायक वाटते.

सर्व सुदृश्यमान जगत् व मी वासुदेवरूप आहे व वासुदेवाशिवाय जगात दुसरे काहीच नाही असा पक्का निश्चय झाला म्हणजे अधिकारी जीव "**कृतकृत्य व प्राप्तप्रापणीय**" म्हणजे जे करावयाचे ते मी केले व जे मिळवावयाचे ते मी मिळविले असा कृतार्थ होतो व असे कृतार्थ होण्याकरताच मनुष्य जन्म ईश्वराने जीवाला दिला आहे; मनुष्य जन्माचे दुसरे काहीच ध्येय नाही. मनुष्य जन्माच्या सर्व प्रयत्नांचे फळ हेच आहे. वास्तविक सर्वच जीव परब्रह्म-परमात्मा किंवा भगवत्स्वरूप आहेत, असे गुह्य तत्त्व भगवान् श्रीव्यास महर्षींनी वर्णिले आहे. ते भागवताच्या "**धर्मःप्रोझ्झित**" या दुसऱ्या श्लोकात वास्तव म्हणजे वस्तुसंबंधी अर्थात् ईश्वरासंबंधी मायाशक्ती-ईश्वरांश जीव व मायानिर्मित जगत् हे सर्व वस्तुस्वरूपच आहे असे "**वास्तवं वस्तु**" अशा शब्दाने खरे तत्त्व सांगितले आहे. "**प्रकट गुह्य बोले। विश्व ब्रह्मचि ठेले।।** या श्रीज्ञानेश्वरांच्या आरतीत श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा सिद्धान्तही असाच आहे, असे श्रीरामाजनार्दनांनी म्हटले आहे. "**सर्वं खल्विदं ब्रह्म**" या श्रुतीतही हेच सांगितले आहे. शेकडो, हजारो व लाखो वचनांनी श्रुतिस्मृतिपुराणसंतगाथेत हेच तत्त्व वर्णिलेले असून "**तुका म्हणे कैसे आंधळे हे जन। गेले विसरून खऱ्या देवा।**" या न्यायाने तत्त्व विसरल्यामुळे सर्व लोक आंधळे आहेत असे संतश्रेष्ठ श्रीतुकाराममहाराज म्हणतात. हा आंधळेपणा जाऊन डोळसपणा येण्याकरता सद्गुरू शिष्यावर "**शक्तिपात**" करीत असतात. भगवान् श्रीकृष्णांनी भक्तश्रेष्ठ अर्जुनावर, भगवान् श्रीवसिष्ठांनी श्रीरामचंद्रावर व श्रीमद्दत्तात्रेय भगवंतानी अलर्कावर याच शक्तिपाताचा प्रयोग केला होता असे इतिहासही सांगत आहे. शक्तिपाताचे विवेचन शास्त्रात फारच विस्तृत रूपाने केले आहे. ते सर्व लिहिण्याचे हे स्थळ नव्हे. हे केवळ प्रास्ताविक

आहे. संक्षेपत: शक्तिपाताचे निरूपण प्रकृतोपयोगी असल्याने येथे करीत आहे.

आगम शास्त्रकार "**अधर्म-धर्मयो: साम्ये जाते शक्ति: पतत्यसौ। ज्ञानात्मिका पराशक्तिः शम्भोर्यस्मिन्निपातिता।।** असे म्हणतात.

**आगतं पञ्चवक्त्रात्तु गतं च गिरिजानने। मतं च वासुदेवस्य तस्मादागममुच्यते।।** म्हणजे श्रीशंकरांपासून आले व श्रीपार्वतीच्या मुखात गेले आणि भगवान् श्रीवासुदेवाला जे संमत झाले अशा शास्त्राला आगम असे म्हणतात. वरील आगम शास्त्रात गुरू व शिष्य यांच्यामध्ये धर्म व अधर्म यांचे साम्य झाले असता शंभूची ज्ञानरूपिणी म्हणूनच श्रेष्ठ अशी शक्ती ज्या अधिकारी शिष्यावर पाडली जाते, चाक्षुष्य-स्पार्शन इत्यादि दीक्षेच्या योगाने शिष्याच्या ठिकाणी पेरली जाते, यालाच "शक्तिपात" असे म्हणतात. आता शक्तिपात येथे "शक्ती" या शब्दाचा अर्थ केवळ अद्वैत चिती म्हणजे "चैतन्य" असा जर घेतला तर ते शिष्याचे आपले स्वरूपच असल्याने व ते देश, काल, वस्तू या तिन्ही परिच्छेद म्हणजे मर्यादा यांनी रहित असल्याने त्याचा पात म्हणजे खाली पडणे किंवा शिष्यावर पडणे याचा संभवच नाही. वरून खाली पडणारा पदार्थ मूर्तिमान् असावा लागतो. चैतन्यशक्ती तशी नाही. जर शक्ती म्हणजे चैतन्याहून काही वेगळा पदार्थ असेल तर "ज्ञानात्मिका" "परा" अशी दोन विशेषणे शक्तीला लागू पडत नसल्याने ती दोन विशेषणे शक्तीला लावणे व्यर्थ आहे, अशी शंका करून येथे "पात" शब्दाचा अर्थ पडणे किंवा पाडणे असा न धरता त्याचा औपचारिक म्हणजे गौण अर्थच घेतला पाहिजे. जसे "गंगेवरती गौळवाडा," येथे गंगा शब्दाचा लाक्षणिक अर्थ "तीर" किंवा मनुष्याला लावलेला आहे. "सिंह" शब्दाचा अर्थ शूर असा गौण घ्यावा लागतो. तसाच येथे गौण अर्थ "पात" या शब्दाचा घेतला पाहिजे. श्रीविद्यारण्यांनी "पात" शब्दाचा गौण अर्थ घेऊन त्याचे विवेचन केले आहे. ते म्हणतात "पात" शब्दाचे रहस्य तुम्हाला सांगतो. ते ऐका. पराशक्ती परमेश्वर स्वरूपच असल्याने ती सर्व व्यापक आहे व शिष्यसुद्धा वास्तविक परमेश्वरस्वरूप असल्याने तो

शक्तिरूपच आहे. म्हणून आपणच आपल्यावर पडणे हे असंभवनीय आहे. आपल्या खांद्यावर जसे आपण बसू शकत नाही तसे आपणच आपल्यावर पडू शकत नाही. म्हणून "पात" शब्दाचा अर्थ येथे "पडणे" असा न धरता "आवृत" किंवा "आच्छादित" असा धरला पाहिजे. या शक्तीला म्हणजे शिष्यांतर्गत चैतन्याला कामक्रोधादि मल व पापपुण्यात्मक कर्मांनी अनादिकालापासून आच्छादित केले आहे. म्हणून ती शक्ती भस्माने आवृत अग्नीप्रमाणे काही काम करू शकत नाही. म्हणून ती भस्माच्छादित अग्नीप्रमाणे असून नसल्यासारखी झाली आहे. आचार्यांनी "दीक्षा" दिल्यानंतर शक्तीवरचे "मल" व पापपुण्यादि कर्मे नष्ट झाली असता ती शक्ती भस्मरहित अग्नीप्रमाणे प्रगट झाली म्हणजे "शक्तिपात झाला," "शक्तिपात झाला" असा व्यवहार होतो. अरणीतून "अग्नी पडला," "अग्नी पडला," इत्यादि व्यवहारासारखा हा व्यवहार आहे. अरणीत अग्नी पूर्वीपासूनच आहे. घर्षणाने उत्पन्न झाला नाही. तो अभिव्यक्त झाला. असेच शक्तिपातासंबंधी आहे असे समजावे. मग श्रीसद्गुरुमूर्तीने शक्तीला प्रगट केले म्हणजे शक्तीवर असलेले अज्ञानमूलक कामक्रोधादि मल, कर्तृत्व, भोक्तृत्वादि विपरीत धर्म व पाप पुण्यादि कर्मे यांचा नाश केला, असाच अर्थ झाला. म्हणजे जीवाचे खरे स्वरूप जे ईश्वर तेच श्रीगुरूंनी प्रकट केले असे म्हटले पाहिजे. मग "तत्त्वमसि" म्हणजे "तू ब्रह्म आहेस" असा श्रीसद्गुरूंनी उपदेश केला म्हणजेच त्या वाक्याने "मी ब्रह्म आहे" असा साक्षात्कार होतो व मग अज्ञानादिकांचा नाश होऊन जीव ब्रह्मभावाला प्राप्त होऊन कृतार्थ होतो, अशा सिद्धान्तास काहीच अर्थ नाही असे होणार नाही का? व **"गुरुबिन कौन बतावे बाट"** अशा कबीरादि संतांच्या वाक्यास तरी काय अर्थ राहिला! कारण "तू ब्रह्म आहेस" असे सांगणे हीच श्रीसद्गुरूंनी दाखविलेली वाट आहे. परंतु शक्तिपातात हे काहीच नाही. उपदेशाशिवाय एकदम ब्रह्म होऊन बसणे असा तुमचा मार्ग दिसतो व तो वर सांगितले तशा शास्त्राच्या विरुद्ध दिसतो. शास्त्रात प्रमाणजन्य ज्ञान हेच अज्ञानाचा नाश करून जीवाची प्रथमपासूनच असलेली परब्रह्मरूपता प्रकट करते असे म्हटले आहे, इत्यादि शंका करण्याचे येथे

कारण नाही. श्रीसद्गुरूंनी दीक्षाद्वारा शक्तिपात करणे म्हणजे ज्ञान उत्पन्न होण्याला जे प्रतिबंध आहेत ते दूर करणे एवढाच येथे शक्तिपात या शब्दाचा अर्थ आहे. ज्ञान उत्पन्न होण्यास काही प्रमाण पाहिजेच व ते प्रमाण म्हणजे तत्त्वमस्यादि वाक्येच आहेत. या वाक्यांचा अनुभव किंवा स्मरण होऊनच त्या वाक्यांनी तत्त्व साक्षात्कार होतो व जीव ज्ञानसंपन्न होऊन कृतार्थ होतो, म्हणूनच योगशास्त्राच्या अभ्यासाने निर्विकल्प समाधी सिद्ध होऊन स्वरूप साक्षात्कार झाला; तरी तो प्रमाणजन्य नसल्याने "मी कोण?" हे अज्ञान त्याने जात नाही. ते वेदान्त महावाक्यांनी झालेले ज्ञान नसल्याने "मी ब्रह्म आहे" असेच ज्ञान झाले पाहिजे व निर्विकल्प समाधी नंतर वेदान्त वाक्यजन्य साक्षात्कार झाला पाहिजे. तरच अज्ञान जाते. म्हणून योगशास्त्राला वेदान्तशास्त्राची जोड व वेदान्तशास्त्राला योगशास्त्राची जोड असा शास्त्रसिद्धान्त आहे. योगाशिवाय केवळ वेदान्तजन्य ज्ञान म्हणजे अनुभवाशिवाय प्रवचन व वेदान्तजन्य ज्ञानाशिवाय केवळ योग म्हणजे नुसती कसरत असे शहाणे संत म्हणत असतात तेच खरे.

**तदा शिष्यस्य चिद्रूपे कल्पिता मोहरूपिणी।**
**माया दग्धा भवेत्किञ्चित् तदा पतति विग्रहः।।**

त्यावेळी म्हणजे शक्तिपातानंतर शिष्याच्या चिद्रूपावर चिद्रूपाला आवरण करणारी म्हणजे हेयोपादेय विवेकज्ञानाला आच्छादित करणारी मोहरूप जी माया ती अभिव्यक्त झालेल्या परशक्तीच्या प्रसादाने किंचित् दूर होते व देह पडतो. म्हणजे मायासंबंधामुळे कर्तृत्व भोक्तृत्वादिसंबंध जो आलेला असतो, ज्यामुळे सुखदुःखाला कारण असणारी पापपुण्यात्मक कर्मे घडतात व बऱ्यावाईट शरीराचाही संबंध घडतो. हे सर्व शक्तिपाताने ढिले होते. मग देहाचाही अभिमान ढिला झाल्याने देहाचाही पात होतो. शक्तिपाताचे कार्य देहाभिमान ढिला होणे, देहाला कंप सुटणे, परमानंद होणे, हर्ष होणे, घाम येणे, रोमांच उभे राहणे, हे आहे व ही सर्व शक्तिपाताची लक्षणे आहेत. येथे घाबरू नये. शिष्याचा देह जमिनीवर पडला म्हणजे शंकराचा प्रसाद झाला असे समजावे. हा प्रसाद झाल्यावर वेदान्तवाक्यापासून "मी ब्रह्म आहे"

असे ज्ञान प्रमाणजन्य होते. मग सर्व अनर्थाला मूळ कारण असणारी अविद्या सूर्योदयानंतर अंधाराचा नाश जसा होतो तशी नष्ट होते. **"तस्य प्रसादयुक्तस्य विद्या वेदान्तवाक्यजा। दहत्य-विद्यामखिलां तमः सूर्योदयो यथा।।"** असे आगमप्रमाण याविषयी आहे. अहो! पण या वेदान्तवाक्यजन्य तत्त्वज्ञानाच्या उत्पत्तीच्या प्रतिबंधांचा म्हणजे मलकर्म इत्यादिकांचा नाश जर शक्तिपातानेच होत असला तर ज्या मुमुक्षूला अशा शक्तिपाताने पूर्ण अशा आचार्यांचा लाभ झाला नाही तर त्याची काय गती होईल? त्याने असेच बद्ध राहावे काय? अशी शंका घेऊ नये. कर्मानुष्ठान निष्कामपणे करून चित्तशुद्धीनंतर शमदमादि अंतरंग साधनानुष्ठान व श्रवणमनन निदिध्यासनादि अत्यंत अंतरंग साधनानुष्ठान श्रीगुरुभक्तिपूर्वक सतत केल्यास त्यांच्याही प्रतिबंधांचा क्षय होतो व मग तत्त्वमस्यादि वाक्यार्थाच्या अनुसंधानाने त्यालाही "अहं ब्रह्मास्मि" असा साक्षात्कार होऊन तोही मुक्त होतोच यात बिल्कुल शंका नाही. परंतु शक्तिपात झाल्याबरोबर लगेच प्रतिबंध क्षय होऊन "तत्त्वमसि" वाक्यजन्य अपरोक्ष "अहं ब्रह्मास्मि" असा साक्षात्कार होऊन तो तत्काळ कृतार्थ होतो एवढाच फरक आहे. दोन्हीही प्रकारची उदाहरणे आहेत.

**शक्तिपातविहीनोऽपि सत्यवाग्गुरुभक्तिमान्।**
**आचार्याच्छ्रुतवेदान्तः क्रमान्मुच्येत बन्धनात्।।**
**शक्तिपातेन संयुक्ता विद्या वेदान्तवाक्यजा।**
**यदा यस्य तदा तस्य विमुक्तिर्नात्र संशयः।। इति।।**

दृष्टिक्षेपरूप शक्तिपात केल्याबरोबर तत्काळ ज्ञानप्रतिबंधरूप आवरण नष्ट होऊन कृतार्थ होणारा श्रीदत्तमहाराजांचा लाडका शिष्य अलर्क राजा झाला. श्रीदत्तमहाराजांच्या भेटीला अलर्क आईच्या उपदेशाप्रमाणे गेला असता दर्शन झाल्याबरोबर त्याने श्रीदत्तमहाराजांना प्रश्न केला. **"म्हणे जी भक्तवत्सला। अपार दुःख झालें मला। अनुग्रह होतां आपुला। मी कुशला पावेन।।२६।। आपुली होतां कृपादृष्टी। दुःख राहील कीं पोटीं। म्हणूनी काढी हिंपुटी। म्हणे शेवटीं हेच पाय।।२७।। त्याचें**

**वचन ऐकून। मनीं म्हणे अत्रिनंदन। हे मदालसागर्भरत्न। येथें यत्न न लगेची।।२८।।** महाराज म्हणतात, "**अलर्का! दुःखाचें स्थान सांग। तयावरी देऊं डाग। आधीं तूं कोण सांग। वारूं मग दुःख तुझें।।३०।।"** अलर्काने आपल्याशी, आपला व दुःखस्थानाचा विचार केला व उत्तर दिले "**परक्याच्या दुःखें करून। मी कसा दुःखी होईन?। तेव्हां मीच केला प्रश्न। त्याचें प्रतिवचन मीच देतों ।। ६१।। सुखदुःख स्वप्नोपम। मन हें तयाचें धाम। मी असें आत्माराम। पूर्णकाम भूमरूप।।६२।।"** यानंतर श्रीदत्तमहाराजांनी त्याच्या दृढ निश्चयाची परीक्षा केली व म्हणाले "**असाच शिष्य मिळावा। दृष्टी पडतां कृतार्थ व्हावा। अन्यथा घ्यावया सेवा। गुरुशिष्य- भावा गणावें।।१०८।।** या सर्व एकतिसाव्या अध्यायातील श्रीदत्तमहात्म्याच्या ओव्यातून शक्तिपातजन्य तत्काळ प्रतिबंध नाहीसा करून "तत्त्वमसि" महावाक्याने एकदम मुक्त होणाऱ्या मुमुक्षूचे उदाहरण आहे व विक्रांतवर्मा, सुबाहू, अरिमर्दन इत्यादि अलर्काचे बंधू, मदालसेचे पुत्र व शिष्य आणि सहस्रार्जुनादि श्रीदत्तमहाराजांचे शिष्य हे क्रमाने मुक्त होणारे शिष्य अशी उदाहरणे आहेत.

शक्तिपाताचे प्रकार, परिणाम वगैरे बरेच विषय शास्त्रात आहेत व ते वाचनीय, मननीय व निदिध्यासनीय असे आहेत. ते मुमुक्षूने वाचले पाहिजेत. त्या करिताच मनुष्य जन्म आहे. "**मनुख जनम नहिं बार बार। करना हो सो करिये।"** असे संत सांगत आले आहेत. गुरुभक्त श्रीकेशवरांवानी अनुभवाने शास्त्र व संतवचनांनी मंडित असे हे पुस्तक लिहिले आहे. ते वाचल्यास शक्तिपाताचे ज्ञान होईल व अधिक जिज्ञासा निर्माण होऊन वाचक प्रयत्नाने कृतार्थ होतील व त्यांच्या मनुष्य जन्माचे सार्थक होईल. तरी आम्हा सर्वांचे श्रीगुरुमहाराजांच्या कृपेने परमकल्याण होवो अशी अखेर श्रीनामदेवांच्या शब्दात प्रार्थना करून विराम घेतो.

**आकल्प आयुष्य व्हावें तया कुळां।**
**माझिया सकळां हरिच्या दासा।।१।।**
**कल्पनेची बाधा न हो कोणें काळीं।**

ही संत मंडळी सुखी असो।।ध्रु०।।
अहंकाराचा वारा न लागो राजसा।
माझ्या विष्णुदासां भाविकांसी।।२।।
नामा म्हणे तया असावें कल्याण।
ज्या मुखीं निधान पांडुरंग।।३।।

श्रीगुरुदत्तार्पणमस्तु
पंडित आत्मारामशास्त्री जेरे



# राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे द्वितीय सरसंघचालक परमपूजनीय श्रीमाधवराव सदाशिवराव गोळवलकर ऊर्फ श्रीगुरुजी यांचा अभिप्राय

(श्रीगुरुजी समग्र दर्शन, खंड ७, या ग्रंथातील "आठवणी" या भागात परमपूजनीय श्रीगोळवलकर गुरुजी व श्री. माधवराव कृष्णराव घटाटे यांच्यातील एका संभाषणाचा वृत्तांत पृ.५९ ते ६१ वर आला आहे. तोच वृत्तांत श्रीगुरुजींचा अभिप्राय म्हणून येथे उद्धृत केला आहे.)

**कुंडलिनी जागृती :-**

मे १९७३ मध्ये प.पू.श्रीगुरुजींना पुण्याचे श्री. केशव रामचंद्र जोशी यांनी प.पू.श्रीगुळवणीमहाराजांच्या कुंडलिनी योगाबद्दलचे व शक्तिपाता-संबंधीचे **"शक्तिपातयोगरहस्य अर्थात् सिद्धमहायोगशास्त्र"** या नावाचे एक पुस्तक अर्पण केले. ते श्रीगुरुजींनी वाचले आणि मलाही दाखविले व ते म्हणाले - "यात श्रीगुलाबराव महाराजांचे "कुंडलिनी जगदंबा" नावाचे योगावरील एक प्रकरण पूर्णपणे उद्धृत केले आहे. तसेच उपनिषदादि अनेक योगग्रंथांतून-प्रमाणे घेऊन उत्तम रीतीने ग्रंथाची मांडणी केली आहे. एकूण हे पुस्तक लेखकाच्या बहुश्रुततेचा दाखलाच आहे."

पुस्तक श्रीगुरुजींना आवडले होते. नेहमी ते वाचीत आणि त्यासंबंधी माझ्याशी मधून मधून बोलत. मी देखील ते पुस्तक चाळले आणि श्रीगुरुजींना काही शंका विचारल्या.

**प्रश्न :-** गुरुजी! कुंडलिनीची जागृती गुरूच्या आशीर्वादाने होते ही गोष्ट खरी आहे. पण आजकाल कोणीही उठतो व म्हणतो, माझी कुंडलिनी जागृत झाली आहे. आजकालचे साधूदेखील कोणाच्याही डोक्यावर हात ठेवतात व शक्तिपाताने कुंडलिनीला जागृत करतात. या सर्वांचा ताळमेळ काही माझ्या लक्षात येत नाही. ही कुंडलिनीजागृतीची सामूहिक आणि सार्वजनिक भानगड आहे तरी काय? दुर्मिळ असलेली गोष्ट जेव्हा विपुल प्रमाणात सापडू लागते तेव्हा काही तरी घोटाळा असावा अशी शंका येते. आपले काय मत आहे?

श्रीगुरुजी क्षणभर थांबले आणि त्यांनी समजावून सांगितले.

**उत्तर :-** साधकाला समाधी साधण्यासाठी म्हणजे त्याच्या हृदयातील अज्ञानग्रंथीचा छेद होऊन जीवशिवांचे ऐक्य होण्यासाठी श्रीगुरूकडून शक्तिपात व्हायलाच हवा. विवेकसिंधूत वाचलेच असशील की, श्रीमुकुंदराजांनी एका राजाला त्याच्या घोड्यासकट समाधी लावून दिली. चाबकाचा एक फटकारा मारला आणि त्यासरशी राजा व घोडा दोघेही तीन दिवसपर्यंत समाधीत तटस्थ होऊन राहिले. हाच शक्तिपात होय. यानेच राजाच्या अज्ञानग्रंथीचा नाश झाला व राजा आत्मज्ञानसंपन्न झाला. प्रत्येक साधुपुरुषाच्या आयुष्यात त्याच्या साधनकालाची समाप्ती अशा शक्तिपातानेच होत असते. रामकृष्ण, विवेकानंद वगैरेंची उदाहरणे तुला माहीतच आहेत.

**प्रश्न :-** गुरुजी! आपले म्हणणे एका दृष्टीने बरोबर आहे. या सर्व महात्म्यांचे अज्ञान गुरुकृपेनेच नाहीसे झाले यात संशय नाही. परंतु आजकालचा परमार्थ तसा दिसत नाही. वैराग्यादि साधनसंपन्नता नसलेले, मॉडर्न सोसायटीच्या अवडंबराखाली वासनापूर्तीचे अविरत प्रयत्न करणारे लोक फॅशन म्हणून गुरूकडे जातात आणि त्यांचे गुरू त्या साधकांना मनाचा रोध कसा करावा हे शिकवीत नाहीत किंवा परपीडाजनक आणि तमोगुण वाढविणारे आहारविहार कमी करण्यासही सांगत नाहीत. उलट त्यांची कुंडलिनी जागृत करून देतात, यात कितपत तथ्य आहे? बरे, कुंडलिनी जागृत झाल्यानंतरही त्यांच्या वासनामय जीवनाला मर्यादा पडत नाही. हे लोक काही दिवस कुंडलिनी जागृत झाल्याचा डांगोरा पिटतात आणि नंतर पुन्हा पूर्वीप्रमाणेच अधर्माचरणात गोडी घेऊ लागतात. तेव्हा अशांची कुंडलिनी जागृत झाली या म्हणण्यात काही तरी चूक असावी असे वाटते.

**उत्तर :-** काही ठिकाणी अशी फसवाफसवी होते, यात संशय नाही. परंतु प.पू.गुळवणीमहाराजांसारख्या महात्म्यांच्या बाबतीत अशी शंका घेण्याचे कारण नाही. रामकृष्ण परमहंसदेखील भजन करीत असताना कोणाच्या छातीला हात लावून त्याला भावावस्थेत नेत असत. शक्तिपात करीत असत. असो. एकूण शक्तिपाताचे दोन प्रकार आहेत. एक म्हणजे पूर्वजन्मी

साधक असलेल्याला पुन्हा या जन्मात साधनमार्गाला लावून देणे आणि दुसरे जीवशिवांचे ऐक्य करून देणे. पैकी दुसरा प्रकार हा सर्वश्रेष्ठ असून तो हजारो साधकात एखाद्यालाच प्राप्त होत असतो. कुंडलिनी जागृत झाल्यानंतर जेव्हा शेवटी समाधीचा प्रसंग येतो तेव्हा श्रीगुरू त्याच्या डोक्यावर हात ठेवून त्याला कृतार्थ करीत असतात. ही योगवासिष्ठातील ज्ञानभूमिकेपैकी चवथी भूमीका असते - सत्त्वापत्ती नावाची.

सुरुवातीला मात्र जेव्हा सत्पुरुषांकडून सामान्य माणसाची कुंडलिनी जागृत केली जाते तेव्हा साधकाने (साऱ्या संसारावर तिलांजली देऊन म्हणजे) संसाराकडे फारसे लक्ष न देता आपली प्रगती करण्यासाठी सतत प्रयत्न केला पाहिजे. असा प्रयत्न मध्येच सोडणे हानिकारक असते. परंतु पुष्कळदा आपण पाहतो की, काही लोक एकाग्रतेचा अभ्यास करतात. त्यांना त्यातील चांगले अनुभवही येतात. पण मोहाच्या क्षणी ते स्वतःला आवरत नाहीत आणि त्यांचे पतन होते.

**"प्राप्तेही पुरुषें। इंद्रियें लाळावी ना कौतुकें।। श्रीज्ञानेश्वरी।।"**

गुरूने कुंडलिनी जागृत करून दिली तरी वैराग्य आणि मनोनाश यांचा साधकाने सतत अभ्यास केलाच पाहिजे, असा दंडक आहे.

**"ज्ञप्तेस्तु कारणं साक्षात् शिष्यप्रज्ञैव केवला।। योगवासिष्ठ।।"**

शिष्याला गुरूने मार्ग दाखविणे ही शास्त्रांनी केवळ व्यवस्था करून ठेवली आहे. आत्मज्ञान हे शिष्याच्या प्रज्ञेनीच त्याला होत असते. स्वतःच अतिशय प्रयत्न करावे लागतात. मार्ग गुरूंनी दाखविला तरी चालावे त्यालाच लागते.

मी मात्र अशा लोकांना मान देतो याचे कारण वेगळे आहे. सन्मार्गाला लागलेला सामान्य मनुष्य साधक झालाच आहे. पुढे केव्हातरी तो पूर्ण होणारच. या प्रदीर्घ वाटचालीत अनेक अडथळे येतात. साधकांच्या हातून चुका होतात. ते पडतात, झडतात, पुन्हा मार्ग चालू लागतात. त्यांना सन्मार्ग मिळालेला असतो. त्यांच्या परमार्थाच्या वाटचालीला सुरुवात झालेली असते.

**"अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम्।। ६.४५-गीता।।"**

अनेक जन्मांनंतर का होईना ते सिद्ध होणारच असतात. म्हणूनच या कुंडलिनीजागृतीच्या प्राथमिक अवस्थेला परमार्थाची सुरुवात म्हणून मी महत्त्व देत असतो. म्हणूनच अशाला मोठे समजून नमस्कारही करतो. त्या व्यक्तीचे ठिकाणी इतर दोष असले; तरी परमार्थाला उद्युक्त होणे हा खरोखरीच मोठा गुण आहे. हळूहळू इतर दोष कमी होतील आणि हा गुण वाढेल आणि पुढे जन्मजन्मांतरी केव्हातरी तो महात्मा होईलच. जसे, मुंबईच्या गाडीत बसलेला मनुष्य मुंबईला पोहोचणारच. म्हणून आपण त्याची आगगाडी सुटली की, तो मुंबईला गेल्याचे लोकांना सांगतो. हेच तत्त्व येथेही लागू होते.

**प्रश्न :-** गुरुजी! तुम्ही पुष्कळदा कोणाकोणाची परमार्थ दृष्टीने श्रेष्ठ म्हणून फार स्तुती करता. पण पुढे ते तसे नसल्याचे दिसून येते. असे कां?

**उत्तर :-** याही प्रश्नाचे उत्तर वरीलप्रमाणेच आहे. एकदा परमार्थाच्या मार्गाला लागला की, मी त्याला नमस्कारच करणार. शिपायाची राजा म्हणून स्तुती करता येते. पण राजाला शिपाई म्हणता येत नाही. तसेच हे लोक आज ना उद्या वर पोहोचणारच आहेत. म्हणून आपण त्यांना नमस्कार करावा. यातच आपले कल्याण आहे. चांगल्यासाठी नमस्कारच करावा आणि वाईटाकडे दुर्लक्ष करावे. आपल्या अंगी नम्रता बाणविण्याचा हा एक चांगला उपाय आहे.

अहंकार न येण्यासाठी तुकाराम महाराजांच्या म्हणण्याप्रमाणे वागावे.

**जग देव तरी पायांचि पडावे।**
**त्यांचिया स्वभावें काज नाहीं।।**

याप्रमाणे श्रीगुरुजींनी सुंदर रीतीने पटवून दिले. असा परमार्थाचा विषय निघाला की, श्रीगुरुजी न कंटाळता निरनिराळी उदाहरणे देऊन विषय समजावून देत. दुसरे कोणी येऊन त्यांना अडथळा आणल्याशिवाय ते थांबत नसत.



## - प्रथमावृत्तीची प्रस्तावना -

**रहस्योद्घाटनापूर्वी :-**

शक्तिपात म्हणजे सिद्धमहायोगशास्त्र हा भारतीय संस्कृतीचा अपूर्व व अलौकिक असा ठेवा आहे. आज शतकानुशतके या शक्तिपातयोगाचा प्रवाह वाहत आला आहे व महेशान्वयसंभूत म्हणजे आदिनाथ श्रीशंकरांच्या पासून चालत आलेला हा शिवसंप्रदाय पुढेही त्यांच्याच कृपेने चालत राहणार आहे असा विश्वास वाटतो. या विश्वासाचे खरे कारण या योगाच्या सामर्थ्यात अंतर्निहित आहे. शिवसंहिताकारांनी "**आलोक्य सर्व शास्त्राणि विचार्य च पुनः पुनः। इदमेकं सुनिष्पन्नं योगशास्त्रं परं मतम्।। १.१७।। यस्मिन् ज्ञाते सर्वमिदं ज्ञातं भवति निश्चितम्। तस्मिन् परिश्रमः कार्यः किमन्यत् शास्त्रभाषितम्।।१.१८।।**" असे म्हणून या शक्तिपात-योगशास्त्राच्यापुढे इतर सर्व शास्त्रे कशी फिकी आहेत, हे पटवून दिले आहे. सर्व शास्त्रांचे अध्ययन केल्यावर आणि पुनःपुन्हा विचार केल्यावर असे निश्चित वाटते की, योगशास्त्र हे सर्व शास्त्रात श्रेष्ठ आहे. या शक्तिपातयोगाने ज्ञानाचा लाभ होत असल्याने सर्व जगताचे निश्चित ज्ञान होते. यासाठी इतर दुसऱ्या कोणत्याही शास्त्रांचे अध्ययन करण्यापेक्षा या शास्त्राप्रमाणे योगाभ्यास करणे हेच.उचित आहे.

शक्तिपातयोग हे महान् शास्त्र आहे. ग्रंथग्रंथांतरी या शास्त्राचा पुरावा पाहावयास मिळतो. वेद, पुराणे, तंत्रग्रंथ, उपनिषदे, संतवाङ्मय इत्यादि ग्रंथातून या शक्तिपातयोगशास्त्राची प्रसंगानुसार संक्षेपाने व विस्ताराने चर्चा केलेली आढळून येते. मात्र वेदकालापासून अक्षुण्ण रीतीने प्रवाहित झालेला हा योग नानाविध नावांनी व पद्धतींनी नटलेला दिसून येतो. परंतु विविधतेने साकारलेले हे बहिरंग अभ्यासाने दृष्टिआड करून अंतरंगात बुडी मारली की, त्याची जी मौक्तिकरूप लक्षणे दृष्टीस पडतात ती मुळातील शक्तिपातयोगाच्या शास्त्राशी इतकी जुळून येतात की, त्यावेळी वस्तुतः भिन्न वाटणारे द्वैत हे खरे नसून ते आपाततः लेखकाच्या वैचारिक, पारंपारिक किंवा स्वाभाविक दृष्टिकोनामुळे उत्पन्न झाले असून, ते खरे नाही, याचे

प्रत्यंतर आल्याने आत्यंतिक आनंद होऊन मन प्रसन्नतेने भरून जाते. "**आकाशमार्गी गुप्तपंथ। जाणती योगिये समर्थ। समर्थांमध्ये समर्थ। योग हा।।१-९-५ व १।।**" असे म्हणून या योगमार्गाचे सामर्थ्य श्रीसमर्थ रामदास- स्वामीमहाराजांनी ग्रंथराज "**श्रीदासबोधात**" स्पष्ट केले आहे. तर "**पिंडे पिंडाचा ग्रासु। तो हा नाथसंकेतीचा दंशु। परि दाऊनि गेला उद्देशु। श्रीमहाविष्णू।। ६-२९१।।**" असे सांगून हा शक्तिपातयोगमार्ग म्हणजे आदिनाथ श्रीशिवांनी जीवांच्या कल्याणाकरिता प्रवर्तित केलेला अपूर्व मार्ग आहे असे श्रीसंतज्ञानेश्वमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीत**" आवर्जून सांगितले आहे. श्रीसंत एकनाथमहाराजांनीही "**भक्तियोगाचा योगमार्ग। समूळ सप्रेम शुद्ध सांग। स्वमुखें बोलिला श्रीरंग। तें उद्धवें चांग अवधारिलें।।२९.६४३।।**" असे सांगून शक्तिपातयोगमार्ग हा भक्तियोगाचा योगमार्ग आहे असे "**श्रीएकनाथी भागवतात**" निःसंदिग्धपणे स्पष्ट केले आहे.

मनुष्याच्या मनाची ठेवण, आवड व पात्रता भिन्न आहे हे सर्वांनी ओळखले होते. असे असल्यामुळे मनुष्य जेथे असेल तेथून त्याला वर काढण्यासाठी त्यांनी नानाविध नावांनी हाच मार्ग आपापल्या ग्रंथात सांगितला असून या सर्वांचा हेतू माणसाला खरे अंतरंग साधन मिळून तो या अनादि जन्ममरण परंपरेच्या अनर्थातून वाचावा हाच आहे.

शक्तिपातयोगाच्या मार्गाला निरनिराळी नावे प्राप्त झाल्याने त्याचे बहिरंग विविध बनले असले; तरी त्याचे अंतरंग मात्र श्रीसद्गुरुकृपा व शिष्यशरणागती या एकाच प्रक्रियेत एकरस व परिपूर्ण झालेले दिसते. श्रीसद्गुरूंची कृपा व शिष्याची शरणागती या एकाच गोष्टीत शक्तिपातयोगाचे सर्व रहस्य सामाविलेले आहे. कृपा म्हणजे दान व शरणागती म्हणजेही दानच होय. कृपा म्हणजे श्रीसद्गुरूंनी शिष्याला अहेतुकपणे केलेले विभुत्वाचे किंवा शिवत्वाचे दान होय; तर शरणागती म्हणजे साधकाने श्रीसद्गुरूंना आपल्या अणुत्वाचे किंवा जीवत्वाचे निरंहकारित्वाने केलेले दान होय. असे जेव्हा उभयविध दान घडते तेव्हाच कृपेचा आविष्कार होतो व गुरुशिष्य दोघेही सुखानंदात

निमग्न होतात. "**शिष्य साचार अनुभव लाहे। तेणें सद्गुरु सुखाचा मेरू होये।। २९.४९१।।**" या श्रीसंत एकनाथमहाराजांच्या "श्रीएकनाथी भागवतातील" म्हणण्यात हे रहस्य स्पष्टपणे प्रतीत होते.

अशा प्रकारे शक्तिपातयोग ही ज्ञानदानाची, भक्तिदानाची, अद्वैत बोधाची व आत्मानुभूतीच्या दानाची गोष्ट असल्याने ज्याच्या ठिकाणी अशा प्रकारचे दान करण्याची शक्ती असते तो खरा गुरू होय व हे दान स्वीकारण्याची ज्याची तयारी असते तो खरा शिष्य होय. ज्यावेळी गुरुशिष्यांचा अशा प्रकारे समसमासंयोग होतो त्यावेळी ही अद्वैतबोधाची अतुट परंपरा सिद्ध होऊन मुक्तीची मार्गप्रतीक्षा करणारे जीव कृतार्थतेला पात्र होतात. त्यामुळे या रीतीने चालत आलेल्या या अद्वैतबोधाच्या परंपरेचा लोप होऊ न देणे हे सर्व भारतीयांचे कर्तव्य आहे. या कर्तव्यातूनच या पुस्तकाचा प्रपंच झाला. याच विषयावरील "योगवाणी" या हिंदी पुस्तकातील प्रस्तावनेत असे म्हटले आहे की, "**इस कालमें इस बातकी बडी आवश्यकता है कि साधनसंपन्न योग्य जिज्ञासु इस विषय का अनुसंधान कर स्वयं अनुभवी एवं स्पर्शमणि बन जावें ताकि दुसरों को भी स्वर्ण बना सकें और इस प्रकार इस विद्याका लोप न होने पावे। इसका लोप न होने देना सारी भारतप्रजा का परम कर्तव्य है।**"

श्रीआदिनाथ शंकरांनी शक्तिपात-सिद्धमहायोग प्रवर्तित केला. त्या श्रीगंगेत स्नान करून बंगालमधील परमहंस परिव्राजकाचार्य श्रीगंगाधर-तीर्थस्वामीमहाराज यांनी त्यांच परमशिष्य प.प.श्रीनारायणतीर्थस्वामीमहाराज यांना असा उपदेश केला की, "ही ब्रह्मज्ञानप्राप्तीची दीक्षा असाधारण असून ती मी तुला दिली आहे. तुझ्या पदरात या दीक्षेच्या रूपाने दिव्य अग्नीच बांधून दिला आहे. त्याचा प्रसार तू भारतभर कर." प.प.श्रीनारायण-तीर्थस्वामीमहाराजांनी गुर्वाज्ञेप्रमाणे अनेकांना ही दीक्षा देऊन कृतार्थ केले. त्यात प.प.श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थस्वामीमहाराज यांना दीक्षागुरुत्वाचा अधिकार दिला. त्यांनी प.प.श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराजांना या ज्ञानदीक्षेचा अधिकार देऊन सर्वार्थाने कृतार्थ केले. त्यांच्याकडूनच माझे सद्गुरू श्रीसंत वामनरावजी

गुळवणीमहाराज यांना हा ठेवा मिळाला. त्यांनी या शक्तिपातयोगदीक्षेचा प्रसार आसेतुहिमाचल करून अनेक जीवांना मुक्तीच्या मार्गावर मार्गस्थ करून निरतिशय आनंदाचा ठेवा उपलब्ध करून दिला आहे. ज्या मार्गावरून आपण चाललो आहोत त्या मार्गाची आपल्याला आपल्या भाषेत माहिती वाचावयास मिळाली म्हणजे विषय अंतरंग होण्यास मदत होऊन शंकानिवृत्तीही त्वरित होते. त्यामुळे या परंपराप्राप्त साधनाची सर्वांना सुलभतेने प्राप्ती व्हावी म्हणून हा प्रपंच मराठीत ग्रंथ लिहून केला.

गेली बारा वर्षे हा ग्रंथ आकार घेत होता. अभ्यास चालू होता. यातील दुसरे व आठवे आधार या पूर्वीच "शक्तिपातयोगमाहात्म्य" व "शक्तिपातयोगाची दिव्य व अलौकिक वैदिक परंपरा" या छोट्या छोट्या पुस्तकांच्या रूपाने प्रकाशित झाले आहेत. ते या पुस्तकात कमी अधिक करून समाविष्ट केले आहेत. त्याचप्रमाणे श्रीदीपलक्ष्मी या मसिकात "शक्तिपातयोगाची साधनसंपत्ती" या आधारातील काही लेख प्रकाशित झाले होते. तेही त्या आधारात समाविष्ट केले आहेत.

शक्तिपातयोगाच्या शास्त्रावर मराठीत आजपर्यंत एकही समग्र ग्रंथ नव्हता. तो व्हावा अशी अनेकांची इच्छा होती. माझे सद्गुरू योगिराज श्रीसंत वामनरावजी गुळवणीमहाराज यांच्या चरणी जेव्हा या साधनमार्गाची दीक्षा मागण्यास साधक येतात तेव्हा मात्र त्यांना या विषयाची माहिती सुलभतेने व सहजतेने देता येईल असा एकही मराठी ग्रंथ नव्हता. ती अडचण या ग्रंथाने पुष्कळ अंशाने दूर होईल असा विश्वास वाटतो. ज्या ज्ञानसाधनशास्त्राच्या अपरंपार महतीचा महिमा सुदूरपर्यंत पसरला आहे त्या ज्ञानसाधनशास्त्रावर म्हणजे शक्तिपातयोगावर एक पुस्तक असावे अशी श्रीगुरुचरणांची तीव्र इच्छा होती. त्यांच्या इच्छेने "शक्तिपातयोगरहस्य" या शास्त्राने ग्रंथरूपाने आकार घेतला असे म्हटले तर सर्वार्थाने शोभून दिसेल. त्यांच्या इच्छेप्रमाणे हा ग्रंथ शक्तिपातयोगाचे किंवा सिद्धमहायोगशास्त्राचे साधन करणाऱ्या सर्व संप्रदायांना व साधकांना पोषक, आधारभूत व साहाय्यक ठरावा अशी श्रीसद्गुरुमहाराजांच्या चरणी प्रार्थना आहे.

* * * * *

"शक्तिपातयोगरहस्य" हा ग्रंथ हे श्रीसद्गुरुमहाराजांच्या कृपामृताचे फल आहे. त्यांची अपार कृपाच या ग्रंथरूपाने फलद्रूप झाली आहे. "**तुका म्हणे आले समर्थांच्या मना। तरी होय राणा रंक त्याचा।।**" असे श्रीसंत तुकाराममहाराजांनी म्हटले आहे. तेच या ग्रंथाबाबत खरे आहे. नाहीतर माझ्यासारख्या सामान्य माणसाचे हे काम नव्हे "**संतानीं सरता केलों तैशापरी। चंदनी ते बोरी व्यापियेली।**" हेच माझ्या बाबतीत खरे आहे. "**पायांच्या प्रसादें। कांहीं बोलिलों विनोदें।।१।। मज क्षमा करणें संतीं। नव्हे अंगभूत युक्ति।।२।। नव्हे हा उपदेश। तुमचें बडबडलों शेष।।३।। तुमचें कृपेचें पोसणें। जन्मोजन्मीं तुका म्हणे।।४।।** असे जे श्रीसंत तुकाराममहाराजांनी म्हटले आहे ते या ग्रंथाच्या बाबतीत अक्षरश: खरे आहे. इतकेच नव्हे; तर "**संताचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें।**" व "**फोडिलें भांडार धन्याचा हा माल। मी तव हमाल भारवाही।। आपुलिया बळें नाहीं मी बोलत। सखा कृपावंत वाचा त्याची।।**" हे या ग्रंथाचे खरे स्वरूप आहे, यात माझे काहीही नाही. "**काय मी पामर जाणे अर्थभेद। निमित मापासी बैसविलो आहे।**" अशी खरी स्थिती आहे.

शेवटी श्रीसद्गुरुमहाराजांच्या चरणी एकच प्रार्थना आहे की, "**पायीची वहाण पायीं बरी।**" अशी त्यांनी माझी वृत्ती सतत ठेवून पुढील प्रार्थना मान्य करून घ्यावी.

**पाईकीचें सुख पाईकासी ठावें। म्हणोनिया जीवें केली सांटी।।१।।**
**येतां गोळ्या बाण साहिले भडिमार। वर्षता अपार वृष्टी वरी।।२।।**
**स्वामीपुढे व्हावे पडतां भांडण। मग त्या मंडण शोभा दावी।।३।।**
**पाईकांनीं सुख भोगिलें अपार। शूर आणि धीर अंतर्बाहीं।।४।।**
**तुका म्हणे या सिद्धांताच्या खुणा। जाणे तो शहाणा करी तो भोगी।।५।।**

श्रीगुरुचरणंरजसेवक
**केशव रामचंद्र जोशी**



।। श्रीगुरुःशरणम् ।।

।। ॐ श्रीमद् अमृतमूर्तये श्रीशिववामनाय नमः।।

## - द्वितीयावृत्तीची प्रस्तावना -

जयजयाजी गुरुमूर्ती। तूंचि साधन परमार्थी।
मातें निरोपिलें प्रीती। तत्त्वबोध कृपेने।। गुरुचरित्र १६.१४१।।
गुरुकृपा होय ज्यासी। दैन्य दिसें कैंचें त्यासी।
समस्त देव त्याचे वंशीं। कळिकाळासीं जिंके नर।।२.२१।।

★ ★ ★

संतचरणरज लागतां सहज। वासनेचें बीज जळोनि जाय।।१।।
मग रामनामीं उपजे आवडी। सुख घडोघडीं वाढों लागे।।२।।
कंठीं प्रेम दाटे नयनीं नीर लोटे। हृदयीं प्रगटें नामरूप।।३।।
तुका म्हणे साधन सुलभ गोमटें। परि उपतिष्ठें पूर्वपुण्यें।।४।।

★ ★ ★

सद्गुरुवांचूनि सांपडेना सोय। धरावे ते पाय आधी आधी।।१।।
आपणासारिखें करिती तात्काळ। नाहीं काळवेळ तयालागीं।।२।।
लोह परिसाची न साहे उपमा। सद्गुरुमहिमा अगाधची।।३।।
तुका म्हणे कैंसें आंधळें हे जन। गेले विसरोन खऱ्या देवा।।४।।

★ ★ ★

शक्तिपाताचार्य महासिद्धयोगी संतश्रेष्ठ श्रीसमर्थ वामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज या माझ्या हृदयस्थ श्रीसद्गुरुनाथांच्या असीम व अपार

कृपाबलाने "शक्तिपातयोगरहस्य अर्थात् सिद्धमहायोगशास्त्र" या ग्रंथाची तेवीस वर्षांनंतर द्वितीय आवृत्ती प्रसिद्ध करण्याचा योग येत आहे, ही महद्भाग्याची गोष्ट आहे, यात तिलप्राय शंका नाही. श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी आसेतुहिमाचल पसरलेल्या आपल्या भारत-वर्षातील हजारोहजार साधकांना, भक्तांना, मुमुक्षूंना व जिज्ञासूंना शक्तिपातयोगाची अर्थात् सिद्धमहायोगाची दीक्षा देऊन सिद्धयोगसाधनगंगेचा जो प्रवाह प्रवाहित केला, ती सिद्धयोग अर्थात् शक्तिपातयोगसाधनगंगा परमहंस परिव्राजकाचार्य श्रीगंगाधरतीर्थ-स्वामीमहाराज, प.प.श्रीनारायणतीर्थदेवस्वामीमहाराज, प.प.श्रीशंकर-पुरुषोत्तमतीर्थ स्वामीमहाराज, प.प.श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराज, प्रातःस्मरणीय परमपूजनीय श्रीगुळवणीमहाराज यांच्यापासून संप्रदायक्रमाने व परंपरेने आजपर्यंत वाहत आली असून या परंपरेची अक्षुण्णधारा त्यांच्या अनुज्ञेनेच "**ना आदिगुरु शंकरा। लागोनि शिष्यपरंपरा। बोधाचा हा संसरा। जाला जो आमुते ।।१८.१७५९।। तो हा तूं घेऊनि आघवा। कळीं गिळितयां जिवां। सर्व प्रकारीं धांवा। करीं पां वेगीं।।१७६०।।**" या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "श्रीज्ञानेश्वरीत" सांगितलेल्या न्यायाने पुढेही साधनयोग्य अर्थात् कृतियोग्य (practical) रीतीने माझ्याकडून प्रवाहित होत असून, या साधनगंगेत अनेकानेक साधक-भक्त-मुमुक्षुजन सुस्नात होऊन आपले जीवन धन्य व कृतार्थ करण्यासाठी मार्गस्थ होत आहेत, ही परमभाग्याची गोष्ट आहे.

श्रीसद्गुरुनाथमहाराज ज्याप्रमाणे बोधाच्या अर्थात् दीक्षेच्या ऐश्वर्याचा विस्तार आपल्या अमोघ संकल्पाप्रमाणे माझ्याकडून करवून घेत आहेत त्याचप्रमाणे त्यांच्याच इच्छेने या संप्रदायसिद्धपरंपरेने विभूषित झालेल्या सिद्धयोगसाधनगंगेचे निखळ शास्त्रीय स्वरूप साधकांना व अभ्यासू वाचकांना उपलब्ध व्हावे म्हणून त्यांनी "**ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शन**" या ग्रंथात "**ज्ञानेश्वरीत शक्तिपाताशिवाय एकही शब्द नाही,**" हा अपूर्व सिद्धान्त प्रस्थापित करावयास लावून तो प्रसिद्ध करवून घेतला. त्याचप्रमाणे योगबीज,

स्पंदशास्त्र, ज्ञानसंकलिनीतंत्र, शिवसंहिता, श्रीललितासहस्त्रनामस्तोत्र, अमरौघशासन, अमरौघप्रबोध, अद्वयतारको- पनिषद्, अमृतबिन्दूपनिषद् अथवा ब्रह्मबिन्दूपनिषद्, सौभाग्यलक्ष्म्यु- पनिषद्, सिद्धसिद्धान्तसंग्रह, शक्तिसूत्रे, भक्तिसूत्रे इत्यादि विविध ग्रंथ मूळ संस्कृत श्लोक व सुबोध मराठी भाषांतरयुक्त विवरणासह प्रसिद्ध केले आहेत. त्याचप्रमाणे उपरोक्त प्रयोजनाची पूर्ती व्हावी म्हणूनच श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी मला "श्रीश्रीसद्गुरुसंग" हा "श्रीकुलदानन्द ब्रह्मचारी" यांनी आत्मानुभवपूर्वक लिहिलेल्या स्वात्मसाधन-चरित्रात्मक असा ग्रंथ सर्व साधकांना मराठी भाषेत उपलब्ध करून देण्याची प्रेरणा दिली. ते मला नेहमी असे म्हणत असत की, आपले शक्तिपातयोगाचे साधन करताना "श्रीकुलदानन्द ब्रह्मचारी" यांनी शारीरिक पीडेशी, रोगांशी व नाना प्रकारच्या मानसिक अवस्थांशी झगडा करून सिद्धी कशी मिळविली याचे उत्तम चित्रण "श्रीश्रीसद्गुरुसंग" या पुस्तकात त्यांनी स्वत:चे अनुभव लिहून केले आहे. नित्यनियमित साधन केल्याने सामान्य साधकाचाही सिद्ध कसा होतो, हे कळण्यासाठी तू हे सर्व खंड साधकांना उपलब्ध करून दे. "श्रीगुरुमहाराजांच्या या आज्ञेप्रमाणे या ग्रंथाचे आत्तापर्यंत आठ खंड प्रसिद्ध झाले असून उरलेले चार खंडही श्रीगुरुचरणांच्या असीम कृपेने क्रमशः प्रसिद्ध होतील. या सर्व पुस्तकांच्या प्रस्तावनांमधून शक्तिपातयोगाचे अर्थात् सिद्धमहायोगशास्त्राचे तात्त्विक सिद्धान्त किंवा प्रमेये (Theory) विस्तारपूर्वक मांडून या दृष्टीनेही सिद्धयोगाची गंगा समाजापर्यंत नेऊन पोहोचविण्याचा प्रयत्न केला आहे व तो पुढेही चालू राहील.

सिद्धयोगसाधनगंगेची जी परंपरा वर वर्णन केली आहे त्या प्रवाहाचे उत्तरदायित्व स्वीकारणारे पहिले चारही महापुरुष हे बंगाली असल्यामुळे "शक्तिपातयोग" ही काही परस्थ, तांत्रिक व बंगाली भानगड आहे अशी समजूत होण्याचा संभव आहे. हा अपसमज राहू नये व दैवी शक्तीच्या संक्रमणाने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षाद्वारा सिद्ध होणारी ही सिद्धयोगसाधनाची वेदोपनिषदकालापासून चालत आलेली अशी अनादिसिद्ध असलेली आणि

भारतीय साधन जीवनातील एक अपरिहार्य व अपूर्व अंग म्हणून सिद्ध झालेली साधनप्रणाली आहे, हे सिद्ध व्हावे याकरिता वेद, उपनिषदे, पुराणे, संहिता, संत वाङ्मय इत्यादि सर्व ग्रंथांतील प्रमाणे दिली आहेत.

वास्तविक रीतीने पाहिले; तर शक्तिपातयोग अर्थात सिद्धमहायोग हा सर्व संप्रदायांना व सर्व धर्मांना व्यापून असलेला असा विषय आहे. इतकेच नव्हे; तर राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे द्वितीय सरसंघचालक कै.प.पू. श्रीमाधवराव सदाशिवराव गोळवलकर, गुरुजी यांनी मला लिहिलेल्या एका पत्रात म्हटल्याप्रमाणे **"विषय कठीण, पण सर्व मार्गांच्या साधकांना शक्तिपाताशिवाय गत्यंतर नाही असा जिव्हाळ्याचा व महत्वाचा आहे."** मात्र या विषयाबद्दलची प्रत्येक संप्रदायाची व धर्ममार्गाची अर्थात् त्यातील संतांची, प्रणेत्यांची, प्रेषितांची अगर महात्म्यांची भाषा वेगळी असते असे दृष्टीस पडते. त्यामुळे या दृष्टीने पाहिल्यास सिद्धमहायोग-साधनगंगेचा प्रवाह भारतीयच नव्हे; तर जागतिक किंवा विश्वव्यापी आहे असे म्हणणेच अधिक शोभून दिसेल. या व्यापक दृष्टीने शक्तिपातयोगशास्त्राचे आलोडन केले; तर आपण सर्वच भारतीय किती संपन्न साधनाचे धनी आहोत याची जाणीव होईल. परंतु या जाणिवेबरोबर **"स कालेनेह महता योगो नष्टः परन्तप।। ४,२।।"** असे जे श्रीगोपालकृष्णनाथांनी "श्रीमद्भगवद्गीतेत" म्हटले आहे, त्याची समाजजीवनातील साक्ष पाहिली, म्हणजे काही संप्रदायातच ही शक्तिसंक्रमणाची प्रक्रिया, विद्या किंवा शक्तिपाताचे सामर्थ्य परंपरेने शिल्लक राहिले आहे, हे स्पष्टपणे दिसून येते. या दृष्टीने परमपूजनीय श्रीयोगेंद्र विज्ञानी यांनी महायोगी श्रीसमर्थ सद्गुरू गुळवणीमहाराज यांना दि.१४-३-१९५७ रोजी जे पत्र हृषिकेशहून पाठविले आहे त्यातील काही भाग पाहिला म्हणजे श्रीगुरुमहाराजांनी प्रवाहित केलेल्या सिद्धयोगसाधनगंगेचा महिमा प्रतीत होऊन त्याच्या आलोकात "शक्तिपातयोगरहस्य अर्थात् सिद्धमहायोगशास्त्र" हा ग्रंथ वाचला म्हणजे मन आनंदाने भरून येते. प.पू.श्रीयोगेंद्र विज्ञानी आपल्या पत्रात असे म्हणतात की -

(शक्तिपातयोग या सिद्धयोग से जागृत हुई) क्रियाशक्तिके दिव्य गुण देखकर हमें गुरु तथा परमेश्वरमें आत्यंतिक भक्ति होती हैं। हमारे द्वारा ऐसा होना श्रीशिवजीकी परम कृपाही समझना चाहिये। शक्ति उनकी है। हम तो निमित्तमात्र होते हैं।

जिस साधनको हम करते हैं और करवाते हैं; ऐसा सहजयोगसाधन हमारे योगिगुरुकी परंपरा हमारे बिना और किसीके भी पास नहीं है। इस साधनके विषयमें जब हम अपने शिष्योंके अनुभव देखते हैं, सुनतें हैं, तो हमें भी आश्चर्य होता हैं और हम गुरुशक्तिकी महिमा जानकर प्रसन्न होते हैं। इस दिव्य शक्तिसे होनेवाला योगसाधन कितना सहज और सुखसाध्य है, हमारे सभी शिष्य जानते हैं। इससे शारीरिक, मानसिक और आध्यात्मिक जो लाभ होता है, हुआ है, उसका अनुभव करनेवाले हमारे सैंकडो शिष्य है। ... यदि विचार करके देखा जाय तो वर्तमान में हमारे योगसाधनके सदृश प्रत्यक्ष तत्काल फलप्रदर्शन करानेवाला योगसाधन और किसीके पास नहीं है।"

अशी जरी वास्तविक स्थिती असली; तरी साधनाच्या क्रियात्मक व शास्त्रात्मक अशा परार्थ प्राप्तीसाठी साधकांनी सर्व प्रकारच्या आग्रही, संकुचित व संप्रदायिक दृष्टीचा त्याग करणे अत्यंत आवश्यक आहे; कारण की, हा ग्रंथ ज्या शक्तिपात म्हणजे श्रीगुरुकृपा या शास्त्रीय प्रक्रियेचे रूप घेऊन साकार झाला आहे, ती प्रक्रिया भारतातील सर्व संप्रदायांना स्थूल, सूक्ष्म व परभेदाने विभिन्न पातळीवर विभिन्न रीतीने अगर दृष्टीने व्यापून राहिलेली असून, ती कोणत्याही संप्रदाय-विशेषाची मिरासदारी नाही आणि आम्हीही कोणत्या एखाद्या संप्रदायाच्या किंवा दैवताच्या उपासनेचे आग्रही नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्याप्रमाणे सर्व संप्रदायांच्या पलीकडे जाऊन "श्रीमद्भगवद्गीतेचा" परार्थ "भावार्थ दीपिका" या नावाने प्रकट केला त्याप्रमाणेच या साधनाच्या साधकाला संप्रदायापलीकडे जाऊन जेव्हा या ग्रंथाकडे पाहण्याची दृष्टी येईल त्यावेळी त्याला श्रीगुरुकृपाबलाने या

ग्रंथाच्या अर्थांतरात प्रवेश करता येईल आणि सर्व धर्मांच्या, पंथांच्या, मार्गांच्या उपासकांना, साधकांना व मुमुक्षूंना हा ग्रंथ आपापल्या श्रीसद्गुरूंनी दाखविलेल्या मार्गावरून चालताना पथप्रदर्शक म्हणून अत्यंत उपयुक्त व अनिवार्य आहे, याची जाणीव झाल्याशिवाय राहणार नाही. श्रीयोगानंद विज्ञानी यांनी दि.२०-१०-१९४६ रोजी हृषिकेशहून परमाराध्य सद्गुरू श्रीसमर्थ महायोगी गुळवणीमहाराज यांना जे पत्र लिहिले आहे त्यातील काही भाग यादृष्टीने अत्यंत मननीय असा आहे. ते आपल्या पत्रात असे लिहितात की-

**हमारे परम आराध्य पूज्यपाद योगी गुरु नारायणतीर्थदेव आचार्य का कोई स्वतंत्र सम्प्रदाय नहीं है। न हम किसी सम्प्रदाय विशेषके अनुयायी हैं। परन्तु उनके प्रदत्त सिद्धशक्ति सामर्थ्य के प्रकाशक हैं।**

**श्रीमहेश्वरके अनुग्रहसे हम परम्परागत दैवी शक्तिके धारक एवं वाहक है। श्रीमन्ननारायणतीर्थ योगाचार्यकी कृपासे यह परमा शक्ति हमें प्राप्त होती आई है। इसीलिए इसको प्राप्त हम सभी उन्हीं योगी गुरुदेव की सन्तान हैं।**

**श्रीगुरुजीने अपना कोई स्वतंत्र सम्प्रदाय नहीं बनाया और नहीं वे किसी भी सम्प्रदायके पक्षपाती थे। केवल उदार वृत्तिसे योग्य अधिकारी को दीक्षाद्वारा शक्तिपात करके जिनपर वह परम कृपा करते थे उन्हें अपने तुल्य दिव्य स्पर्शमणि बना देते थे।**

**शक्तिपातके विषयमें जानने योग्य वैज्ञानिक परम तथ्य बहुत आश्चर्यजनक और प्रत्यक्ष, अभूतपूर्व व अलौकिक तत्त्व है। अध्यात्म ज्ञान तो इसका प्रत्यक्ष ही है। परन्तु भौतिक विषयरोग निवृत्ति के लिए भी यह शक्ति अमृतरूप है। जिन रोगिंयोंको डॉक्टर और वैद्योंने असाध्य और मरना निश्चित कह दिया था ऐसे मरणासन्न रोगी भी घण्टोंमे और कुछ दिनोंमें स्वस्थ हो गये हैं। इसकी महानताकी विषयमें यहाँ तक देखा गया है कि, लोगों के शरीरके कल्प बन गये हैं। सफेद बाल कालेही कर निकले। गमे हुए दांत**

**पुनः नये उत्पन्न निकले कई मास अन्न जल भी खाना नहीं पडा यहाँ तक की मृतक भी जीवित हो गये । अतएव इस शक्तिपातका रहस्य गुरुपरम्परा का है। अपने गुरुओं द्वारा हमें प्राप्त होता आया हैं।**

येथपर्यंत वर्णन केलेल्या विविध दृष्टीने सिद्धयोगाचे हे सहजसाधन समाजात पुन्हा दृढमूल होऊन "शक्तिपातयोगरहस्य अर्थात् सिद्धमहा-योगशास्त्र" हा ग्रंथ भारतवर्षातील समस्त संप्रदायांना पथप्रदर्शक व्हावा व अध्यात्मसंपन्न यौगिक भारताचे चित्र साकार व्हावे याच हेतूने या ग्रंथाचे लिखाण केले आहे. तो सफल व्हावा अशी श्रीगुरुचरणी प्रार्थना आहे.

अशा प्रकारचे हे या ग्रंथाचे स्वरूप असून हा ग्रंथ म्हणजे सिद्धयोगमार्गाने आत्मस्वरूपाची प्राप्ती कशी होते हे सांगणारा व तदंगभूत अनुभूती घ्यावयास शिकविणारा असा मार्गदर्शक साधनरूप ग्रंथराज आहे, हे विशेषत्वाने कथन करावयाचे आहे. याचा अर्थच असा आहे की, "शक्तिपातयोगरहस्य अर्थात् सिद्धमहायोगशास्त्र" हा ग्रंथ कृतियोग्यशास्त्र किंवा साधनशास्त्र म्हणजेच अनुभूती घेण्याचे शास्त्र अर्थात् Practical science आहे. असे असले; तरी सिद्धयोगशास्त्रात साध्यसाधनाची एकरूपता असल्यामुळे हा ग्रंथ म्हणजे साध्यस्वरूपाचेही वर्णन करणारा ग्रंथ आहे, हे लक्षात घेतले पाहिजे. सिद्धयोगाचे अंतिम साध्य सामरस्य हे असून, त्याची चर्चा होऊ शकत नसल्यामुळे आणि ते साध्य सर्व अवस्थांच्या, द्वंद्वांच्या, मनाच्या व शब्दमर्यादेच्या पलीकडे असल्यामुळे सिद्धयोगमार्गात चर्चा, वादविवाद, विवेचन, प्रवचन इत्यादि गोष्टींना काहीच महत्त्व नाही; कारण कोरडे ज्ञान किंवा अनुभूतिशून्य वेदान्ताची चर्चा ही निरुपयोगी ठरते. या साधनाची प्रत्यक्ष अनुभूती घेतली की, साधकांना हे पटू लागते. शब्द म्हणजे शक्तीचा शिवात लय झाल्याखेरीज अंतिम सामरस्यात्मक अवस्था साधकाला कधीही व कदापीही प्राप्त होत नसल्याने या साधनशास्त्रावर नुसते प्रवचन करावयाचे नाही किंवा त्याची फक्त चर्चाच करावयाची नसून त्याची अनुभूती घ्यावयाची आहे, हे लक्षात येते. या दृष्टीने श्रीगुरुकृपेचे म्हणजे शक्तिपाताचे माहात्म्य

व सिद्धयोगमार्गाच्या प्राप्तीचा महिमा किती अपार आहे, हे स्पष्ट होईल. हे सर्व "श्रीस्वात्मारामयोगींद्र" यांनी आपल्या "हठयोग-प्रदीपिका" या ग्रंथाच्या शेवटच्या श्लोकात कथन केले असून तोच या ग्रंथाचा म्हणजे "शक्तिपात-योगरहस्य अर्थात् सिद्धमहायोगशास्त्र" याचा आदिअंतीचा एकमात्र महासिद्धान्त आहे, असे म्हटले तर त्यात यत्किंचितही अतिशयोक्ती होणार नाही. ते असे म्हणतात की -

**यावन्नैव प्रविशति चरन्मारुतो मध्यमार्गे।**
**यावद्बिन्दुर्न भवति दृढप्राणवातप्रबन्धात्।।**
**यावद्ध्याने सहजसदृशं जायते नैव तत्त्वं।**
**तावज्ज्ञानं वदति तदिदं दम्भमिथ्याप्रलापः।।४.११४।।**

जोपर्यंत आत्मशक्ती कुंडलिनी श्रीसद्गुरुकृपेने जागृत होऊन शक्तिस्वरूप प्राणवायू सुषुम्णामार्गात प्रविष्ट होत नाही (व सुषुम्णामार्गात प्रविष्ट झालेली प्राणवायुरूप कुंडलिनी शक्ती ब्रह्मरंध्रात प्रविष्ट होऊन शिवाशी एकरूप न होता स्थिर होत नाही,) जोपर्यंत प्राणवायुरूप कुंडलिनी शक्तीचे दृढबंधन न होता बिंदू स्थिर होत नाही आणि जोपर्यंत चित्त म्हणजे कुंडलिनी शक्ती आपल्या ध्येयाशी म्हणजे शिवाशी एकरूप होऊन् सामरस्यात्मक अवस्था प्राप्त होत नाही अर्थात् सामरस्यात्मक सहजसदृश तत्त्व प्रकट होत नाही तोपर्यंत सर्व ज्ञान अर्थात् तत्प्राप्तीची सर्व साधने ही दंभकारक, खोटी व अवास्तव प्रलापासारखीच असतात.

सारांश, या प्रस्तावनेच्या सुरुवातीला श्रीगुरुचरित्रातील ज्या दोन ओव्या व श्रीसंततुकाराममहाराज यांचे जे दोन अभंग उद्धृत केले आहेत, त्यात या साधनमार्गाचे मूर्धन्य असे ज्ञानरूप रहस्य साठविलेले आहे, हे नितांत सत्य आहे.

श्रीसद्गुरुनाथमहाराजांना शक्तिपातयोगाचे अर्थात् सिद्ध महायोगाचे हे साधन सांख्यज्ञानयोगरूप व कर्मभक्तियोगरूप अशा द्विविध परंपरेने पुढीलप्रमाणे प्राप्त झाले होते.




परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमद्वासुदेवानंदसरस्वती टेम्बेस्वामीमहाराजांनी श्रीगुरुमहाराजांना शुद्धज्ञानमार्गाबरोबर उपासनामार्गही सांगितला होता. उपासना अथवा योगाभ्यासाशिवाय अपरोक्ष ज्ञानाचा लाभ होऊ शकत नसल्याने श्रीस्वामीमहाराजांनी विशेषेकरून शक्तिजागृतीद्वारा आत्मस्वरूपाची प्राप्ती व्हावी म्हणून त्यांना हठयोगाचा अभ्यास सांगितला होता. त्याचप्रमाणे परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमत् लोकनाथतीर्थस्वामीमहाराजांकडून त्यांना

सिद्धयोगांतर्गत शक्तिपातयोगाची दीक्षा मिळून अनुपायप्रक्रियासंपन्न अशा सुलभमहामार्गाची प्राप्ती झाली. पुढे ज्यावेळी ते ईश्वरी इच्छेने लोकसंग्रहाच्या अवतारकार्याला उद्युक्त झाले त्यावेळी त्यांनी सांख्यज्ञानयोगरूप अशा शक्तिपातयोगाच्या तीव्रतम साधनाला आवश्यक असलेल्या सबल देहाची अर्थात् आधाराची प्राप्ती जीवाला होत नसल्याचे लक्षात घेऊन "प्रत्यभिज्ञाहृदय" या ग्रंथात श्रीक्षेमराज यांनी म्हटल्याप्रमाणे "या संसारात जे भक्त सुकुमार मतीचे व तीक्ष्ण अर्थात् तीव्र तर्कशास्त्रात परिश्रम करू शकत नाहीत; परंतु ज्यांना शक्तिपातापासून उत्पन्न होणाऱ्या शिवैक्याची अर्थात् अपरोक्ष साक्षात्काराची इच्छा आहे," अशा साधकांसाठी त्यांनी प.प.श्रीलोकनाथ-तीर्थस्वामीमहाराजांकडून प्राप्त झालेल्या कर्मभक्तियोगरूप सिद्धयोगमार्गाचा अर्थात् अनुपायप्रक्रियेचा अवलंब करून साधक-भक्तजनांचा उद्धार केला. अशी वास्तविक स्थिती असली; तरी प.प.श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबेस्वामीमहाराजांनी द्रष्ट्यारूपाने प्रवर्तित केलेल्या "दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा" या महामंत्राची उपरोक्त प्रक्रियेशी सांगड घालून श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी स्थूल, सूक्ष्म व पर पातळीवर हे साधन प्रवर्तित करून साधकांचे इहपर अखंड कल्याण व्हावे म्हणून ते प्रवाहित केले. त्यांच्या या सामरस्यात्मक दिव्य दृष्टीचा व संकल्पाचा लाभ आपण सर्वजण घेत आहोत, हे त्रिकालाबाधित सत्य आहे. या आवृत्तीत "रुद्रयामलतंत्राच्या षष्ठ पटलातील" श्रीकुंडलिनीस्तुतिस्तोत्र हे सुबोध मराठी भाषांतरासह समाविष्ट केले असून त्याच्या नित्य पठनामुळे साधक-भक्तांना स्तोत्राच्या शेवटी कथन केलेल्या फलाची प्राप्ती झाल्याशिवाय राहणार नाही, अशी खात्री आहे.

त्याचप्रमाणे या दुसऱ्या आवृत्तीत प्रथमावृत्तीतील परमपूजनीय प्रातःस्मरणीय कै.श्रीआत्मारामशास्त्री जेरे यांची अभ्यासपूर्ण असलेली आशीर्वादात्मक प्रस्तावना व प्रस्तुत लेखकाची प्रथमावृत्तीची प्रस्तावनाही समाविष्ट केली आहे. त्याचप्रमाणे प्रथमावृत्तीच्या वेळी "या ग्रंथासाठी आणखी कोणाची प्रस्तावना घ्यावी?" असा प्रश्न श्रीगुरुमहाराजांशी चर्चा

करताना उपस्थित झाला होता. त्यावेळी श्रीसद्गुरुनाथमहाराज मला असे म्हणाले होते की, "श्रीगुरुजींना (राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे द्वितीय सरसंघचालक परमपूजनीय श्री.माधवराव सदशिवराव गोळवलकर यांना) पत्र व ग्रंथ (शक्तिपातयोगरहस्य अर्थात् सिद्धमहायोगशास्त्र) पाठवून प्रस्तावना लिहिण्यासंबंधी विनंती कर; कारण तेच समस्त भारतवर्षात आपल्या या विषयाचे उत्तम ज्ञाते असून मोठे अधिकारी पुरुष आहेत." श्रीसद्गुरुनाथ-महाराजांच्या आज्ञेप्रमाणे त्यांना पत्र व ग्रंथ पाठवून प्रस्तावना लिहिण्यासंबंधी प्रार्थना केली असता त्यांनी पत्रोत्तर पाठवून प्रकृती अस्वास्थ्यामुळे प्रस्तावना लिहू शकत नसल्याचे कळविले. मात्र हे लिहीत असताना त्यांनी या विषयाचा अपरंपार महिमा व्यक्त करताना असे लिहिले आहे की -

**या (आजारी) अवस्थेत "शक्तिपातयोगरहस्य (अर्थात् सिद्ध-महायोगशास्त्र) या ग्रंथाला प्रस्तावना कशी लिहू शकेन या विवंचनेत आहे. विषय कठीण, पण सर्व मार्गाच्या साधकांना शक्तिपाताशिवाय गत्यन्तर नाही, असा जिव्हाळ्याचा व महत्त्वाचा (आहे.) त्यासंबंधी काही त्रोटक लिहून भागण्यासारखे नाही."**

हे सर्व जरी खरे असले; तरी श्रीगुरुजींची प्रस्तावना या ग्रंथाला असावी ही श्रीगुरुचरणांची इच्छा या ग्रंथाच्या द्वितीय आवृत्तीच्या वेळी एका निराळ्या प्रकारानेच फलद्रूप होत आहे. श्रीगुरुजी समग्र दर्शन खंड ७, या ग्रंथातील "आठवणी" या भागात परमपूजनीय श्रीगोळवलकर गुरुजी व श्री.माधवराव कृष्णराव घटाटे यांच्यातील एका संभाषणाचा वृतांत पृ.५९ ते ६१ वर आला आहे. तोच वृत्तांत श्रीगुरुजींचा अभिप्राय म्हणून या दुसऱ्या आवृत्तीत उद्धृत केला आहे. श्रीगुरुजींना हा ग्रंथ अत्यंत आवडला होता. त्यांच्या शेवटच्या आजाराच्या काळात त्यांच्या जवळ सेवेत असलेल्या एका कार्यकर्त्याने मला असे सांगितले होते की, "शेवटच्या तीन-चार महिन्यात श्रीगुरुजी हाच ग्रंथ सतत वाचीत असत." "हा ग्रंथ अत्यंत सुंदर व अपूर्व असून मला तो फार आवडला आहे," असे ते नेहमी म्हणत असत.

या ग्रंथाच्या प्रथमावृत्तीच्या वेळी जेव्हा मी श्रीगुरुचरणी असे निवेदन केले की, "या ग्रंथात मी आपला व श्रीस्वामीमहाराजांचा (अर्थात् प.प.श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराज यांचा) फोटो छापणार आहे. तेव्हा श्रीगुरुमहाराज मला असे म्हणाले की, "ज्यावेळी मला श्रीबंगालीस्वामी-महाराजांकडून (अर्थात् प.प.श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराजांकडून) हुशंगाबादला दीक्षा झाली त्या वयातील माझा व त्यांचा फोटो छाप. "श्रीगुरुचरणांच्या इच्छेप्रमाणे या ग्रंथात हे दोन्ही फोटो छापले आहेत.

याशिवाय या ग्रंथाच्या शेवटी "Transmission of Spiritiual Power" या नावाने श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी लिहिलेल्या लेखाचे सविस्तर व सुबोध मराठी भाषांतर करून तो "दैवी शक्तीचे संक्रमण" या नावाने छापला आहे. त्यामुळे या लेखावरून साधकांना या साधनाची समग्र कल्पना येऊन त्याचे रहस्यही हाती येईल, यात काहीच शंका नाही.

या ग्रंथाच्या शेवटी संदर्भग्रंथांची यादी अभ्यासू वाचकांसाठी व साधकांसाठी मुद्दाम दिली आहे. ज्यांना या शास्त्राचा सखोल अभ्यास करावयाचा आहे त्यांना हे संदर्भग्रंथ उपयुक्त ठरतील.

आता या साधनशास्त्राच्या छपाईसाठी व प्रचारासाठी ज्यांचे साहाय्य झाले व होत आहे त्यांच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे माझे कर्तव्य आहे. श्री.बबनराव देवबा लांडगे, श्री.शिरीष इच्छाराम चौधरी, श्री.परमानंद नैलवाल, श्री.श्रीराम गोपाळराव खांडेकर, श्री.प्रभाकर नानाजी चौबळ, श्री.विजय प्रभाकर चौबळ, श्री.सुहास वासुदेवराव भारंबे, श्री.चंद्रकांत रघुनाथ पाटील, श्री.बालादत्त जोशी, श्री.मिलिंद पारनाईक या व इतरही सर्वांचे साहाय्य लाभले आहे व पुढे लाभेल अशी खात्री आहे.

इत्यलम्, श्रीगुरुचरणी अगत्य असू द्यावे. श्रीगुरुचरण विश्वात्मक व विश्वोत्तीर्णरूपाने स्थिरावले असल्यामुळे सकलसंतशिरोमणी श्रीज्ञानेश्वर-महाराज यांच्या शब्दात ही सद्भावांजली माझे परमाराध्य सद्गुरू श्रीसमर्थ योगिराज संतश्रेष्ठ महासिद्धयोगी गुळवणीमहाराज यांच्या चरणी अर्पण करतो.

**भरोनि सद्भावाची अंजुळी। मियां वोवियाफुलें मोकळीं।**
**अर्पिलीं अंघ्रियुगलीं। विश्वरूपाच्या।। श्रीज्ञानेश्वरी ११.७०८।।**

श्रीगुरुपादपद्मोपजीवी
**केशव रामचंद्र जोशी**



## ।। भगवान् श्रीदत्तात्रेय ।।



मालाकमण्डलुरधःकरपद्मयुग्मे । मध्यस्थपाणियुगले डमरुत्रिशूले ।
यस्यस्त ऊर्ध्वकरयोः शुभशंखचक्रे । वन्दे तमत्रिवरदं भुजषट्कयुक्तम् ।।

परमश्रेष्ठगुरू
शक्तिपाताचार्य महासिद्धयोगी
श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
श्रीश्रीनारायणतीर्थदेवस्वामीमहाराज



परात्परगुरू
शक्तिपाताचार्य महासिद्धयोगी
श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
श्रीश्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थस्वामी महाराज



परमगुरू
शक्तिपाताचार्य महासिद्धयोगी
श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
श्रीश्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराज



सिद्धयोगाचा उद्‌गाता । समाधिधनाचा दाता ।
कुंडलिनी जगदंबेचा त्राता । शांकर योगी ।।

## योगिराज सद्‌गुरू संतश्रेष्ठ श्रीवामनरावजी गुळवणीमहाराज



शक्तिपाताचा महामेरू । बहुत जनांसी आधारू ।
ब्रह्मस्थितीचा निर्धारू । शांभव योगी ।।

परमगुरू
श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
श्रीश्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराज



जन्म : वैशाख शुद्ध १२ शके १८१४, दि. ८/५/१८९२, श्रीक्षेत्र ढाका
समाधी : माघ वद्य ३ शके १८७७, दि. १०/२/१९५५, श्रीक्षेत्र काशी

सांख्यज्ञानरूपसिद्धयोगश्रेष्ठगुरू
श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य
श्रीवासुदेवानंदसरस्वतीटेंबेस्वामीमहाराज



जितेंद्रियांचा अग्रणी । सदा रत परब्रह्मणी ।
स्वयं श्रीदत्तशिरोमणी । तो हा यतिश्रेष्ठ श्रीवासुदेव ।।

योगिराज सद्गुरू संतश्रेष्ठ श्रीवामनरावजी गुळवणीमहाराज



जन्म : मार्गशीर्ष वद्य १३ शके १८०८, दि.२३/१२/१८८६, श्रीक्षेत्र कुडुत्री.
समाधी : पौष वद्य ८ शके १८९६, दि. १५/१/१९७४, श्रीक्षेत्र पुणे.

।। श्रीगुरु:शरणम्।।

।। ॐ श्रीमद् अमृतमूर्तये शिववामनाय नमः।।

ॐ

# शक्तिपातयोगरहस्य

## अर्थात्

# सिद्धमहायोगशास्त्र

★ ★ ★

## - आधार पहिला -

## ★ मनुष्य जन्माचे ध्येय ★

**१) प्रास्ताविक** **२) अभ्युदय व निःश्रेयस सुख**
**३) तत्त्वज्ञान म्हणजे काय ?** **४) जीवाचे स्वरूप**
**५) जगताचे स्वरूप** **६) ईश्वराचे स्वरूप**
**७) शक्तिजागृतीची आवश्यकता**

**प्रास्ताविक :-**

मनुष्य अनादि कालापासून संसारात सापडून एखाद्या धुळीच्या कणाप्रमाणे अणुरूपाने नानाविध शरीरे धारण करीत कालचक्रामध्ये फिरत असतो. ही गती थांबून ज्याप्रमाणे नदी सागराला मिळाल्यावर कृतार्थ होते त्याप्रमाणे या अविरत प्रवाहात वाहत असताना जीवाची सुटका होऊन त्याला आपले मूळचे स्वसंवेद्य व चैतन्ययुक्त आत्मस्वरूप प्राप्त होऊन चिरकाल आत्मशांती केव्हा प्राप्त होईल हे सांगणे व

जाणणे मोठे कठीण आहे.

मनुष्याचे बहिर्मुख चित्त आपापल्या पूर्व कर्माच्या संस्कारानुसार बाहेरील जगामध्ये सुखाचा शोध घेत भटकत असते. या प्रयत्नात त्याला पुन:पुन्हा अपयशच पदरी घ्यावे लागते. असे झाले तरी तो माघारी वळत नाही. त्यामुळे जन्मानंतर मृत्यू व मृत्यूनंतर जन्म याप्रमाणे जन्ममृत्यूच्या चक्रामध्ये विषयसुखाचा शोध घेत घेत त्याचे चित्त निरंतर भटकत राहते. यालाच प्रवृत्तीचा प्रवाह म्हणतात. जोपर्यंत या प्रवाहाचा वेग मंद होत नाही तोपर्यंत जीवाला या प्रवाहात वाहत जाणे भाग पडते.

जीवाच्या या अपरिहार्य गतीचे व त्याच्या अंतिम ध्येयाचे वर्णन करताना म.म.श्री.गोपीनाथ कविराज हे "**भारतीय संस्कृती और साधना" खंड २**, या ग्रंथातील "**मनुष्यत्व**" या लेखात असे म्हणातात की, "आत्माच संकुचित होऊन जीवाच्या रूपाने मनुष्य देह धारण करून जन्म घेतो. मग भोग घेता घेता भोगाकांक्षा वृद्धिंगत होत होत क्रमश: ती वाढत जाते. अशा प्रकारे अनेक जन्म गेल्यावर एक वेळ अशी येते की, ज्यावेळी भोगाकांक्षा हळूहळू शिथिल होत जाते. याचे खरे कारण असे आहे की, ज्यावेळी माणसाच्या हे लक्षात येते की, अनेकानेक प्रकारच्या भोग्यवस्तूंचा अनंत प्रकारे उपभोग घेऊनसुद्धा भोगाची इच्छा काही शमत नाही त्यावेळी मनामध्ये एक प्रकारची ग्लानी उत्पन्न होऊन अत्यंत अल्प प्रमाणात निर्वेद व वैराग्याचा भाव जागृत होतो. त्यावेळी प्रवृत्तीच्या गतीचा वेग हळूहळू कमी होऊ लागतो. मग चित्त निवृत्तीकडे वळून त्याच्या आश्रयाने क्रमश: अंतर्मुख होण्याची इच्छा करू लागते. कोणत्या जीवाला ही अवस्था केव्हा प्राप्त होईल हे सांगणे कठीण असले तरी ज्यावेळी ही अवस्था जीवाला प्राप्त होईल त्यावेळी त्याच्या अभिनव जीवनाचा सूत्रपात होतो यात शंकाच नाही.

असा सूत्रपात झाला की, विश्वाच्या आत व बाहेर एका महाशक्तीचे प्रचंड कार्य चालू आहे याची जाणीव जीवाला होऊ लागते. त्या

शक्तीलाच प्रकृती असे म्हणतात. या प्रकृतीमुळेच जगतातील सर्व कार्ये घडून येतात. प्रकृतीच्या जाळ्यात सापडल्यामुळे अविवेकाने आपणच या सर्व कार्यांचे कर्ते आहोत असे जीव समजू लागतो. मात्र त्यामुळे त्याला संसारी बनून नाना प्रकारची सुखदुःखे भोगावी लागतात. या सर्व गोष्टींचे ज्ञान कोणाकोणाला वैराग्याबरोबर आतूनच जागृती आल्याने आभासरूपाने होते. त्यावेळी जीवाला अशी पक्की जाणीव व खात्री होते की, या विराट विश्वाच्या अफाट चक्रामध्ये जन्मजन्मांतरी आपण आनंदाचा शोध घेत भटकत आहोत.

मात्र उपरोक्त आनंद कोणत्याही काळी, कोणत्याही देहात व कोणत्याही लोकलोकांतरामध्ये आपणास मिळणार नाही अशी माणसाची पक्की खात्री झाली की, या आनंदासाठी बाहेर फिरून दमून जाण्याची त्याची इच्छा नाहीशी होते. परंतु हा आनंद खरोखरच कोठे आहे याचा ठावठिकाणा मात्र त्याला माहीत नसतो. उपरोक्त विचारामुळे कालांतराने अत्यंत पुसटपणे या आनंदाचा संवाद त्याच्या हृदयात होऊ लागतो. अशा प्रकारे आनंद स्वतःमध्येच आहे याची जाणीव झाली तरी त्याच्या प्राप्ती करिता कोणता मार्ग स्वीकारावा व पुढे कसे जावे हे त्याला कळत नाही. त्यामुळे प्रत्येक दिवशी त्याची व्याकुळता वाढत जाते व वैराग्यही तीव्र होते. त्याबरोबरच या अखंड विश्वामध्ये आपले स्थान किती क्षुल्लक आहे याचाही त्याला अनुभव येतो. इतके झाले तरी जोपर्यंत मार्गाची उपलब्धी होत नाही तोपर्यंत जीव कोणत्याही प्रकारे पुढे सरकू शकत नाही."

हा आनंदच मनुष्याचे खरे स्वरूप आहे. तो प्राप्त करणे हेच त्याचे वास्तविक ध्येय आहे. त्याची प्राप्ती व्हावी म्हणून आपले सर्व जीवन त्यासाठी वेचले पाहिजे असे त्याला वाटू लागते.

जीवाच्या अशा या अद्भुत गतीचा अगदी असाच उल्लेख श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीच्या**" सहाव्या अध्यायात पुढील प्रमाणे केला आहे. ते असे म्हणतात की -

**पैं व्यामोहाचिये शेजे। बळिया अविद्या निद्रितु होईजे। ते वेळीं**

**दु:स्वप्न हा भोगिजे। जन्ममृत्यूंचा।।६८।। पाठी अवसांत ये चेवो। तैं ते अवघेंचि होय वावो। ऐसा उपजे नित्य सद्भावो। तोहि आपणपांचि।।६९।।**

मनुष्य भ्रांतिरूप शय्येवर प्रबळ अज्ञानामुळे गाढ झोपलेला असतो. त्यावेळी जन्ममरण परंपरेची दुष्ट स्वप्ने तो वारंवार भोगीत असतो. नंतर जेव्हा तो अकस्मात् जागा होतो तेव्हा ही जन्ममरणाची सर्वच स्वप्ने व्यर्थ होतात. मग आपणच नित्य, निरंतर, निरंजन, अमृतस्वरूप, अखंड, अद्वय, आनंदरूप व अमर आहोत असा सद्भाव त्याला स्वत:ला स्वत:च्या ठिकाणीच जाणवू लागतो. परंतु मिथ्या देहाभिमानामुळे जीवाला खरा मार्ग सापडत नाही. देहच मी आहे असे वाटत राहिल्याने जीव स्वत:चा घात करून घेतो.

जीवाच्या स्वस्वरूप विस्मरणामुळे तो भवनदीत गटांगळ्या कशा खातो व आपले ध्येय कसे विसरून जातो याचे **"श्रीज्ञानेश्वरीच्या"** नवव्या अध्यायात श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी अत्यंत काव्यमय वर्णन केले आहे. ते म्हणतात, "गाईच्या कासेमध्ये अत्यंत पवित्र व गोड असे दूध असते. परंतु कासेच्या त्वचेच्या पडद्याच्या आड दडलेले हे दूध सेवन न करता गोचीड रक्ताचेच सेवन करीत असतो. कमळाचा कांदा व बेडूक एकाच तळ्यात असले तरी बेडूक कधीही कमलकंदातील परागांचे सेवन करीत नाही. परंतु भ्रमर मात्र परागांचेच सेवन करतो आणि बेडूक चिखलातच लोळतो. दुर्दैवी पुरुषाच्या घरी हजारो मोहरा पुरलेल्या असल्या तरी त्याला त्यांचे नक्की ठिकाण माहीत नसल्यामुळे तो दारिद्र्यात दिवस काढून उपाशी राहतो. अगदी याचप्रमाणे मनुष्याला खऱ्या सुखाचा ठेवा माहीत नसल्यामुळे तो विषयसुखाच्या इच्छेने जन्ममरण परंपरा भोगीत असतो. वास्तविक सर्व सुखाचा ठेवा असलेला परमात्मा त्याच्या हृदयामध्ये निरंतर वास करीत असतो. परंतु त्याचे या ठेव्याकडे लक्षच जात नाही. अहंममता वृत्ती जीवाच्या ठिकाणी अखंड उठत राहत असल्याने जीव तेथेच तद्रूप होतो. त्यामुळे अंतर्यामी असलेल्या स्वसंवेद्य

सुखाला तो आचवतो. ही निद्रा त्याला खऱ्या आनंदापासून वंचित करते. **"देहयोगाद्वा सोऽपि" (ब्रह्मसूत्र ३-२-६)** या सूत्रावर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी असे म्हटले आहे की, जीव मुळात ब्रह्मस्वरूप म्हणजे ज्ञानऐश्वर्यादि संपन्न आहे; पण देह व इंद्रियादिकांचे ठिकाणी अत्यंत अहंकार व ममता असल्यामुळे त्याची ब्रह्मरूपता झाकली जाते. ही जीवाची अहंममतारूपी मुख्य उपाधी दूर झाली की, तो पूर्ण ब्रह्मरूप होतो. ही ब्रह्मस्वरूपता प्राप्त करणे हेच मनुष्य जन्माचे खरे ध्येय आहे.

**अभ्युदय व निःश्रेयस सुख :-**

सर्व प्राण्यात मानव हा श्रेष्ठ आहे; कारण त्याचे अंतिम ध्येय व त्याचे साधन शास्त्रांनी सांगितलेले असते. जन्मास आलेला प्रत्येक मनुष्य जन्मभर अहोरात्र सुखासाठी धडपड करीत असतो. त्यामुळे सर्व मनुष्यांचे अंतिम ध्येय सुख हेच असते. हे सुख कृमिकीटकांपासून सर्वश्रेष्ठ अशा सार्वभौम राजापर्यंत जसे त्याचे पुण्य असेल त्या प्रमाणात या लोकात मिळत असते. तसेच राजाच्या जीवापासून हिरण्यगर्भापर्यंतच्या जीवांना ते सुख त्यांच्या अधिकारानुरूप धर्माच्या तरतमतेमुळे परलोकात मिळते. या सुखास अभ्युदय असे नाव आहे.

अभ्युदय सुख हे वैषयिक असल्याने ते साधनपरतंत्र, क्षय पावणारे, मर्यादित व दुःखमिश्रित असे असते. हे अभ्युदय सुख जरी मिळाले तरी मानव हा कृतकृत्य होत नाही व पुढे काय? हा प्रश्नही सुटत नाही. याकरिताच विद्वान् लोक अभ्युदय सुखाचा दोषदृष्टीने त्याग करतात व यापेक्षा स्वयंसिद्ध, अविनाशी, निरतिशय व दुःखरहित अशा निःश्रेयस सुखासाठी म्हणजे मोक्षासाठी प्रयत्न करतात.

तत्त्वज्ञानाने मोक्ष प्राप्त होतो; कारण **"तत्त्वज्ञानान्निश्रेयसाधिगमः।"** असे शास्त्रवचन आहे. जीव हा मूळचा ब्रह्मस्वरूप आहे. पण त्याला आपल्या स्वरूपाचे अज्ञान झाल्याने तो जीवभावास प्राप्त होऊन बद्ध झाला आहे. त्या अज्ञानाची निवृत्ती स्वस्वरूपाचे अपरोक्षज्ञान झाल्याशिवाय इतर कोणत्याही उपायांनी होत नाही. अज्ञान हे तमोरूप

असल्याने ज्याप्रमाणे प्रकाशाशिवाय अंध:काराचा विनाश इतर कोणत्याही साधनांनी होत नाही त्याप्रमाणे तत्त्वज्ञानाशिवाय अज्ञानाची निवृत्ती होत नाही. सारांश, अज्ञानाच्या व पुनर्जन्माच्या फेऱ्यातून मुक्त होण्याकरिता जीवाला तत्त्वज्ञानप्राप्ती हा एकच उपाय आहे व हे सर्व जग परमात्मस्वरूप आहे अशी जाणीव होणे हेच त्या तत्त्वज्ञानाचे रूप आहे.

**तत्त्वज्ञान म्हणजे काय ? :-**

जीव, जगत् आणि ईश्वर यांचे खरे स्वरूप काय आहे हे कळून येणे याला तत्त्वज्ञान असे म्हणतात. ज्यावेळी श्रीसद्गुरुकृपेने शक्तिपात होऊन तत्त्वज्ञान प्राप्त होते त्यावेळी जीव, जगत् व ईश्वर ही भिन्न नसून एकरस व परिपूर्ण आहेत असा बोध होऊन द्वैत प्रपंचाचा बाध होतो. असे झाले म्हणजे ब्रह्म सत्य आहे, जगत् मिथ्या आहे व जीव आणि परमात्मा एक आहेत असा अनुभव येऊन वेदान्ताचा परम-सिद्धान्त सिद्ध होतो. शेवटी एक अद्वितीय, निष्प्रपंच व सच्चिदानंद अशी जी परब्रह्म वस्तू तीच शिल्लक राहते. यालाच अद्वैतावस्था असे म्हणतात.

**जीवाचे स्वरूप** :-

चैतन्य म्हणून सर्व ठिकाणी एकच आहे. या चैतन्याला आत्मा असे म्हणतात. या आत्म्याचे उपाधीच्या योगाने ईश्वर, जीव व साक्षी असे तीन प्रकार झाले आहेत. जेव्हा चैतन्याला पूर्व संस्कार चिकटतात तेव्हा त्याला जीव असे म्हणतात. चैतन्य हे व्यापक असल्यामुळे जीवही व्यापक असतो. परंतु अज्ञानामुळे आपण व्यापक आहोत हे जीव विसरून जातो. सुषुप्ती अवस्थेत असताना जीवाला प्राज्ञ असे नाव देतात. जेव्हा जीव अंतःकरण वगैरे उपाधींशी संयुक्त होऊन लिंग-शरीराचा अभिमान धरतो व स्वप्नावस्थेमध्ये संचार करतो तेव्हा त्या जीवाला तैजस असे म्हणतात. जेव्हा जीव स्थूलशरीररूप उपाधींशी संयुक्त होऊन जाग्रदावस्थेमध्ये संचार करतो तेव्हा त्याला विश्व असे म्हणतात. वरील सर्व उपाधी श्रीसद्गुरूंनी शक्तिपात केल्याने व कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर जेव्हा नाहीशा होतात तेव्हा जीव चैतन्यरूप होतो.

**जगताचे स्वरूप :-**

जगतातील सर्व वस्तूंना व्यवहारदृष्टीनेच खरेपणा आहे. परमार्थदृष्टीने नाही. परमार्थदृष्टीने खरेपणा एका ब्रह्मालाच आहे. ज्याप्रमाणे स्वप्नातील वस्तू स्वप्नात खऱ्या वाटतात; परंतु तो खरेपणा जागेपणी टिकत नाही त्याप्रमाणे या सर्व वस्तू व्यवहारात खऱ्या भासतात; परंतु तो खरेपणा आत्म्याचे तत्त्वज्ञान झाल्यावर टिकत नाही. सारांश, जड व विनाशी जग खोटेच आहे. त्याचा फक्त अज्ञानामुळे व कल्पनेमुळे भास होत असतो.

**ईश्वराचे स्वरूप :-**

सर्व जगाचे मूलकारण जे अज्ञान ते चैतन्यात शिरून आत्म्याला ईश्वर बनविते. सत्त्व, रज व तम या एकेक गुणाच्या प्राबल्याने या ईश्वरास अनुक्रमे ब्रह्मा, विष्णू आणि शंकर असे म्हणतात. ब्रह्मा जग उत्पन्न करतो. विष्णू त्याचे पालन करतो व शंकर ते लयास नेतो. मत्स्य, कूर्म वगैरे अवतार या ईश्वराचेच अवांतर भेद होत.

**शक्तिजागृतीची आवश्यकता :-**

सारांश, श्रीगुरुकृपेने तत्त्वज्ञानाची प्राप्ती करून घेऊन परिपूर्ण अद्वैत स्थिती व पूर्णत्व म्हणजेच मोक्ष प्राप्त करणे हेच मनुष्य जन्माचे ध्येय आहे. जीव, जगत् व ईश्वर या सर्व मिथ्याभूत पदार्थांची उभारणी झाल्याचा जो भास होतो किंवा जी कल्पना होते तिची संहारणी होऊन आपण चैतन्यरूप, आत्मरूप किंवा ब्रह्मरूप आहोत याची प्रचीती येणे हेच मनुष्याचे खरे कर्तव्य आहे. मात्र शक्तिपात होऊन कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय ब्रह्मप्राप्तीच्या महान् मार्गाच्या वाटचालीला सुरुवातही होत नाही व ब्रह्मस्वरूपाची प्रचीती घेणे कदापिही शक्य होत नाही. मग प्रत्यक्ष ब्रह्मज्ञानाची गोष्ट तर फार दूरची आहे. **"आतां ब्रह्मज्ञानाची किल्ली। सांगेन ऐक्याची बोली। जयांची कल्पना निमाली। ते प्राप्त पुरुष।।४२१।।"** असे जे श्रीसंत एकनाथमहाराजांनी **"स्वात्मसुख"** या प्रकरण ग्रंथात म्हटले आहे त्याचा अर्थच असा आहे की, आपण जन्माला आलो आहो,

मरणार आहो, जगत् सत्य आहे, पिंडब्रह्मांडादि अनंत विश्वरचना झाली आहे इत्यादि कल्पना ब्रह्मज्ञानाची किल्ली असलेला शक्तिपातयोग प्राप्त झाल्याशिवाय नाहीशा होत नाहीत. ही किल्ली प्राप्त झाली म्हणजे शक्ती जागृत झाली की, अद्वैत स्थिती प्राप्त होऊन साधकाला ब्रह्मप्राप्ती होते. यासाठी शक्ती जागृत होण्याला अग्रस्थान द्यावे लागते; कारण त्याशिवाय ब्रह्मप्राप्तीचे द्वार खुले होत नाही व वाट मोकळी होऊन मार्गही सुकर होत नाही.

ज्या शक्तीमुळे उपरोक्त नामरूपात्मक रचना झालेली दिसते व तशी जीवाची कल्पना होते ती शक्ती मुळातच चैतन्ययुक्त शिवस्वरूप आहे. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी **"चिन्मात्राश्रयमायाया: शक्त्याकारे द्विजोत्तमः। अनुप्रविष्टा या संवित् निर्विकल्पा स्वयंप्रभा।।"** असे जे म्हटले आहे त्याचा अर्थच असा आहे की, शक्तिस्फुरणात निर्विकल्प स्वयंप्रभा संवित् म्हणजे चैतन्यच असते. **"संविदेव पराशक्तिः"** संवित् किंवा चैतन्य हीच मूल शक्ती होय असे "**सूतसंहितेत**" म्हटले आहे. "**केनोपनिषदात**" **"विद्योमारूपिणी प्रादुरभूत् स्त्रीरूपा ।।३.१२।।"** असे म्हटले आहे. अर्थात् श्रीशंकराची शक्ती स्त्रीरूप उमा विद्यारूप म्हणजे चैतन्यरूपच मानली आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**अमृतानुभवात**" ज्ञानदृष्टीनेच शक्तीचे रूप वर्णन केले असल्यामुळे ज्ञानदृष्टी प्राप्त झालेल्या ज्ञानी पुरुषाला परमेश्वराची शक्ती विद्यारूप म्हणजे ज्ञानरूपच दिसते. "**श्रीदेवीभागवतातही**" देवीने आपले स्वरूप सांगताना **"रूपं मदीयं ब्रह्मैतत् सर्वकारणकारणम्। मायाधिष्ठानभूतं तु सर्वसाक्षि निरामयम्।।"** सर्व कारणाचे कारण जे सच्चिदानंद ब्रह्मस्वरूप तेच माझे स्वरूप होय. ते माझे स्वरूप शुद्ध साक्षिस्वरूप असून मायेला म्हणजे ज्ञानाने निवृत्त होणाऱ्या जीवाच्या विपरित कल्पनेला अधिष्ठानभूत आहे असे म्हटले आहे. म्हणजे माया व ब्रह्म किंवा शिव व शक्ती हे सच्चिदानंदरूप आहेत.

असे हे एकरूपत्व असले तरी ज्ञानरूप शिव जेव्हा विसरला जातो तेव्हा शक्तीला दोनपणा येतो व ती विश्वरूप संसार निर्माण

करते. हा संसार नाहीसा होऊन जीव ब्रह्मरूप व्हावा म्हणून शक्तीची जागृती हाच एकमात्र उपाय आहे हे सांगताना श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराज "**अनुभवामृतात**" असे म्हणतात की, "**जया दोघांमाजी एखादे। विपाये उमजले होय निदे। तरी घरवाते गिळोनी नुसुधे। कांही ना करी।।१.१४।।**" म्हणजे शिवशक्ती या दोघांमध्ये जर एकाची जागृती झाली तर प्रपंच गिळला जाऊन साधक ब्रह्मरूप होतो. एखादे म्हणजे जर व विपाये म्हणजे कदाचित् असा अर्थ आहे. मी म्हणजे वृत्तिरूपशक्तिस्फुरणाने आपले शुद्धज्ञानस्वरूप ओळखून आधारभूत शुद्ध ज्ञानस्वरूप शिवाशी ऐक्य करणे हे शक्तीचे जागे होणे होय. ही शक्ती जागी झाली म्हणजे शिवाशी तिचे ऐक्य होते. तेव्हा "**अहं ब्रह्मास्मि**" हा ऐक्यानुभव येतो आणि शिवाचे जागेपण म्हणजे "**ब्रह्मैवेदं सर्व**" आपले सर्वात्मत्व ओळखणे होय किंवा शिवाने शक्तीच्या सर्वरूप आविष्काराशी ऐक्य करणे ही शिवाची जागृती होय. असे दोघेही जण जागे झाले असता सर्व प्रपंचच गिळला जातो.

सारांश, शिव आणि शक्ती हे दोन्ही एकरूप असल्याने शक्ती जागृत झाली की, साधक आपोआप शिवरूप होतो. "**सदाकारा परानन्दा संसारोच्छेदकारिणी। सा शिवा परमादेवी शिवाभिन्ना शिवङ्करी।।**" म्हणजे शिवाची शक्ती शिवा ही परमदेवी असून ती सत्स्वरूप, परमानंदरूप, संसाराचा उच्छेद करणारी, शिवाशी एकरूप असणारी व आत्यंतिक कल्याण करणारी आहे. ज्याला ज्याला आपण शिवरूप व्हावे व जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून आपली सुटका होऊन आपणास कैवल्य प्राप्त व्हावे असे वाटते त्याने सर्व वासना निवृत्त करून कैवल्य प्राप्त करून देणाऱ्या शक्तिजागृतीला अग्रस्थान देऊन तोच एकमेव उद्देश डोळ्यापुढे ठेवला पाहिजे; कारण जोपर्यंत आपली भगवत्शक्ती पूर्णपणे जागृत होत नाही तोपर्यंत मनुष्य जीवनाचे खरे सार्थक होत नाही. कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय जड व चैतन्य यातील संघर्षही समाधानकारकपणे संपत नाही. इतर शेकडोशे साधने व यज्ञयागादि अनुष्ठाने यांचा परब्रह्मप्राप्तीसाठी काडीमात्र

उपयोग होत नाही. कारण कामनापूर्ती हे ध्येय जोपर्यंत असते तोपर्यंत अंतःकरण अंधकारमय राहते. शास्त्रीय ज्ञान, पांडित्य, तप, जप, इत्यादि सर्व गोष्टी वृत्ती जोपर्यंत बहिर्मुख आहे तोपर्यंत व्यर्थ ठरतात. त्यामुळे श्री.प.प.विष्णुतीर्थस्वामीमहाराज यांनी **"सौंदर्यलहरीच्या"** टीकेत असे म्हटले आहे की, "ज्यावेळी कुंडलिनी शक्ती जागृत होऊन सुषुम्णेच्या मार्गातील सहाही चक्रांचा भेद करीत करीत शिवसायुज्यपदावर आरूढ होण्यासाठी मार्गस्थ होते त्यावेळी ती प्रतिप्रसवक्रमाने सर्व इंद्रियांना अंतर्मुख करते. तिची गती ऊर्ध्व झाली की, ती मनाचे सर्व पडदे फाडून टाकते. बुद्धीच्या जगतासंबंधीच्या बाह्य चिंतनाला ती विश्रांती देते. तिच्या वाटचालीमुळे अंतरात्म्यरूपी सूर्याला झाकून टाकणारे ढग एक एक या क्रमाने आपोआप विलीन होऊ लागतात. हृदयाकाश स्वच्छ व निर्मल होते. ज्ञानाचा प्रकाश अंतरात्म्यामध्ये पूर्ण तेजाने भरून जाऊन चमकू लागतो. अविद्येचा दाट अंधकार दूर होतो. या अंधारात वास करणारी वासनेची गिधाडे किंवा कामक्रोधादि घुबडे यांना राहावयास स्थानच शिल्लक उरत नाही. इतकेच नव्हे; तर ते बसल्या बसल्याच ज्ञानरूपी सूर्याच्या तेजाने नाहीसे होऊन जातात. या अर्थानेच भगवान् पूज्यपाद श्रीमत् आद्य शंकराचार्यांनी असे म्हटले आहे की, भगवती कुंडलिनी शक्ती अविद्या अंधकार नाहीसा करण्यासाठी ज्ञानरूपी सूर्याला उद्दीपित करते. याचा दुसरा अर्थ असा आहे की, अधोमुखी सूर्यशक्ती जागृत होऊन उन्मुख झाल्यावर ती सूर्यमंडलात अमृताचा स्राव करू लागते. याचा परिणाम म्हणून बहिर्विषयांकडे धावणाऱ्या वासना आपोआप शांत होतात. याचे फळ असे मिळते की, कर्मानुष्ठानांमध्ये निमग्न असलेल्या व अविद्येच्या अंधकारामध्ये बुडून गेलेल्या कर्मकांडी लोकांना बाह्यानुष्ठानाचा तिरस्कार वाटू लागून ते अंतर्यागामध्ये निमग्न होतात. भगवती माँ कुंडलिनी शक्तीच्या चिन्मयी वाटिकेतील पुष्पातून प्रवाहित झालेल्या मधुर मकरंदाच्या स्रोतांचे झरे जड लोकांच्या जडतेला सुद्धा द्रविभूत करण्यास समर्थ असतात. भगवतीची चिन्मयी

सत्ता नाना प्रकारच्या भेदरूपी सृष्टीची स्थूल व सूक्ष्म जगताच्या रूपाने कल्पना करून उभारणी करते व संहारणीच्या वेळी सर्व नामरूपांना आपल्यामध्ये विलीन करून शिवाच्या निष्कल रूपाला सायुज्यतेचे आलिंगन देऊन स्वतः शिवस्वरूप होऊन जाते. जीवाचे जडत्व पाणी होऊन वाहून जाते व जीव चैतन्य गंगेमध्ये आनंदाने स्नान करू लागतो."



# - आधार दुसरा -

## ★पिंडब्रह्मांडाची उभारणी व संहारणी★

**१) विश्वाची उभारणी**

**२) विश्वाची संहारणी**

**३) उभारणीसंहारणीरहस्य**

मागील आधाराच्या शेवटी सांगितल्याप्रमाणे भगवतीची चिन्मयी सत्ता नाना प्रकारच्या भेदरूपी सृष्टीची स्थूल व सूक्ष्म जगताच्या रूपाने कल्पना करून उभारणी कशी करते व संहारणीच्या वेळी सर्व नामरूपांना आपल्यामध्ये विलीन करून ती शिवस्वरूप कशी होते याचा विचार आता करावयाचा आहे.

**विश्वाची उभारणी :-**

ब्रह्म सत्स्वरूप आहे. जगाच्या उत्पत्तीपूर्वी तेच एकमात्र ब्रह्म होते हे सांगताना "**छांदोग्य उपनिषदात**" असे म्हटले आहे की "**सदेव सोम्येदमग्र आसिदेकमेवाद्वितीयम्।।** (छां.६-२-१।।") जगाच्या उत्पत्तीच्या पूर्वी एक अद्वितीय असे सत् मात्र होते. "**तदैक्षत् बहु स्यां प्रजायेयेति ६-२-३।।**" त्या सत् ब्रह्माला मी अनेक व्हावे अशी इच्छा झाली. या इच्छेबरोबर ब्रह्माची सत् शक्ती प्रवृत्त होऊन विश्वाची उभारणी झाली.

परब्रह्म हे निष्कल, निष्क्रिय, शांत, निरंजन, अव्यय, अक्षर व स्पंदरहित आहे. परंतु धुराने आकाश आच्छादून गेल्यामुळे ज्याप्रमाणे मलीन दिसू लागते त्याप्रमाणे निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी सृष्टीच्या प्रारंभी मायेच्या तमोमयी मलीनतेचा प्रादुर्भाव होतो. या मायेला सत् शक्ती, अविद्याशक्ती, अज्ञानशक्ती, प्रकृती किंवा आकाश असे म्हणतात. ही माया परमेश्वराच्या स्वाधीन आहे. आकाशाला इयत्ता (दर्जा) नाही आणि अज्ञानरूप शक्तीलाही इयत्ता नाही. या सारखेपणामुळे या शक्तीला आकाश असे गौण रीतीने म्हटले जाते.

या अनादि अविद्येचे स्वरूप मोठे विलक्षण आहे. ज्याप्रमाणे

मायावी लोक आपल्या मायेच्या योगाने विचित्र वस्तू उत्पन्न करतात त्याप्रमाणे या अज्ञानरूप शक्तीच्या योगाने परमेश्वर हे विचित्र जग उत्पन्न करतो. म्हणून या शक्तीला माया असे म्हणतात. ही शक्ती ब्रह्मरूपच आहे; कारण कोणत्याही वस्तूची शक्ती त्या वस्तूहून निराळी आहे असे दृष्टोत्पत्तीस येत नाही. ज्याप्रमाणे पृथ्वीचा उदकामध्ये लय होतो त्याप्रमाणे या अव्यक्ताचा (मायेचा) ब्रह्मामध्ये लय होतो. अक्षर या शब्दाचा अर्थ अविनाशी असा आहे. ही अज्ञानशक्ती ज्ञान होईपर्यंत शिवस्वरूप होत नाही म्हणजेच तिचा नाश होत नाही. यामुळे त्या शक्तीला अक्षर असे म्हणतात. अक्षर म्हणजे अज्ञानरूपी बीजशक्ती होय. ती आकाश वगैरे सर्व प्रपंचाचे कारण असल्यामुळे ती आकाश वगैरेहून श्रेष्ठ आहे. तिच्याहून परमात्मा श्रेष्ठ आहे; कारण ती परमात्म्याच्या आधीन आहे. याचे वर्णन करताना भगवान् श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "**ब्रह्मसूत्र-शांकरभाष्याच्या**" अध्याय १ पाद ४ सूत्र ३ वर टीका करताना असे म्हटले आहे की "ही बीज-शक्ती अविद्यात्मक आहे. तिला अव्यक्त ही संज्ञा आहे. परमेश्वर हा तिचा आश्रय आहे. माया हे तिचे स्वरूप आहे. तिच्यामध्ये सर्व संसारी जीव आपले खरे स्वरूप काय आहे हे न समजता स्वस्थपणे घोरत पडतात. अशी ही महानिद्रा आहे."

या मायेपासून म्हणजे परमात्मशक्तीपासून मिथ्याभूत पदार्थांच्या उत्पत्तीचा भास होतो. सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांनी अविद्या त्रिगुणात्मक आहे. प्रलयकाल संपल्यानंतर अविद्या आणि जीवांनी केलेली पूर्व कर्मे यांच्या साहाय्याने अमुक प्रकारचे जग उत्पन्न करावे असा परमात्मा संकल्प करतो. त्या संकल्पानुसार परमात्मशक्ती प्रथम आकाश बनते. त्यानंतर आकाशापासून वायू, वायूपासून तेज, तेजापासून उदक व उदकापासून पृथ्वी अशा क्रमाने सूक्ष्म पंचमहाभूते उत्पन्न होतात. आकाशामध्ये शब्द; वायूमध्ये शब्द व स्पर्श; तेजामध्ये शब्द, स्पर्श व रूप; उदकामध्ये शब्द, स्पर्श, रूप व रस आणि पृथ्वीमध्ये शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध; असे वाढत्या प्रमाणाने गुण असतात.

या पंचमहाभूतांचे मूलकारण जी परमात्मशक्ती ती त्रिगुणात्मक असल्यामुळे ही भूतेही त्रिगुणात्मक आहेत. पंचमहाभूतांमध्ये असणारा सत्त्वगुण एकटवून त्यापासून एक वस्तू उत्पन्न होते. तिला मन, बुद्धी अहंकार आणि चित्त अशी नावे आहेत. आकाशाच्या सात्त्विकांशापासून श्रोत्रेंद्रिय आणि राजसांशापासून वागिंद्रिय, वायूच्या सात्त्विकांशापासून त्वगिंद्रिय आणि राजसांशापासून हस्तेंद्रिय, तेजाच्या सात्त्विकांशापासून चक्षुरिंद्रिय आणि राजसांशापासून पादेंद्रिय, जलाच्या सात्त्विकांशापासून रसनेंद्रिय आणि राजसांशापासून पाय्वेंद्रिय, पृथ्वीच्या सात्त्विकांशापासून घ्राणेंद्रिय आणि राजसांशापासून उपस्थेंद्रिय अशी निरनिराळी ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये उत्पन्न होतात. प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान असा पाच प्रकारचा वायू पंचमहाभूतांच्या रजोगुणापासून उत्पन्न होतो.

तमोगुणाने युक्त अशा त्या सूक्ष्म पंचमहाभूतांचे "पंचीकरण" झाले म्हणजे ती भूते स्थूल होतात. प्रत्येक महाभूताचे दोन भाग करून त्यापैकी एक भाग कायम ठेवावा व दुसऱ्या भागाचे चार भाग केल्यावर एक एक भाग इतर भूतांच्या कायम ठेवलेल्या भागामध्ये मिळवावा. या विधीला पंचीकरण असे म्हणतात. तमोगुणाने युक्त अशा स्थूल पंचमहाभूतांपासून हे सर्व ब्रह्मांड उत्पन्न होते. ब्रह्मांडामध्ये सात ऊर्ध्वलोक व सात अधोलोक असे एकंदर चौदा लोक आहेत. भूमी, अंतरिक्ष, स्वर्ग, मह, जन, तप, आणि सत्य हे सात ऊर्ध्वलोक आहेत. अतल, पाताल, वितल, सुतल, तलातल, रसातल आणि महातल हे सात अधोलोक होत. मनुष्य वगैरे प्राण्यांचे जरायुज शरीर, पक्षी वगैरेंचे अंडज शरीर, उवा, लिखा वगैरेंचे स्वेदज शरीर आणि लता, वृक्ष वगैरेंचे उद्भिज शरीर अशी चार प्रकारची शरीरे तमोगुणाने युक्त अशा स्थूल भूतांपासूनच होतात.

या सर्व प्रकारच्या शरीरांमध्ये प्रविष्ट झालेल्या चैतन्याला जीव असे म्हणतात. चैतन्य व्यापक असल्यामुळे जीवही अर्थात् व्यापकच असतो. जरी जीव सदोदित आत्मचैतन्यरूपीच असला तरी जेव्हा अज्ञानामुळे त्याला सुखदुःखांचा भास होतो तेव्हा त्याला बद्ध असे

म्हणतात. तो भास ज्ञानाच्या योगाने दूर झाला म्हणजे त्याला मुक्त असे म्हणतात. त्यामुळे मुक्ती हाच खरा परम पुरुषार्थ होय.

**विश्वाची संहारणी :-**

येथपर्यंत भगवतीची चिन्मयी सत्ता नाना प्रकारच्या भेदरूपी सृष्टीची स्थूल व सूक्ष्म जगताच्या रूपाने कल्पना करून उभारणी कशी करते हे पाहिले. ब्रह्मांडाची रचना केल्यावर जी अनंत शक्ती शिल्लक राहते ती अणुस्वरूप धारण करण्याकरिता जणू काही चक्राकार फिरू लागते. तिच्या चक्राकार स्वरूपामुळे तिला सर्पाची उपमा देण्यात येते. अथर्ववेदामध्ये या शक्तीला उच्छिष्ट ब्रह्म असे म्हटले आहे. या शक्तीलाच पुराणामध्ये नारायणाची शय्या तयार करणारी शक्ती या अर्थाने शेष असे म्हटले आहे. तिलाच अनंत या नावानेही संबोधले जाते. या शेष किंवा उच्छिष्ट शक्तीचा ब्रह्मांड धारण करण्याला उपयोग होतो. ती आपल्या हजार फण्यांवर ब्रह्मांडाला धारण करते.

ब्रह्मांडाप्रमाणेच पिंड शरीराची रचना केल्यावर जी शक्ती शिल्लक राहते ती मूलाधारात शरीराला धारण करीत निद्रा घेत पडून राहते. यामुळे या शक्तीला आधारशक्ती असेही म्हणतात. तिचे दुसरे नाव कुंडलिनी असे आहे. ही शक्ती जेव्हा गुरुकृपेने जागृत होते तेव्हा प्रतिप्रसवक्रमाला म्हणजे संहारणीला आरंभ होतो. जेथून तिने प्रारंभ केलेला असतो त्या आत्मतत्त्वात विलीन होऊन ती उपसंहार करते. म्हणजे ती सर्व तत्त्वांचा लय करून शेवटी ब्रह्मस्वरूप होऊन जाते.

भारतात प्राचीन कालापासून चालत आलेल्या सर्व संप्रदायांनी उपासना, कर्म, भक्ती, ज्ञान, जप, तप, नेम, यंत्र, मंत्र, तंत्र इत्यादि जे काही करावयास सांगितले आहे ते सर्व हा उपसंहार किंवा ही संहारणी सुलभतेने घडून येऊन ज्या मूल अज्ञानामुळे जीव सुखदुःखाच्या चक्रात सापडला आहे ते अज्ञान नाहीसे होऊन त्याला ज्ञान प्राप्ती होऊन तो ब्रह्मस्वरूप व्हावा म्हणून सांगितले आहे. मात्र कोणत्या सहज उपायाने किवा कोणत्या सुलभ मार्गाने ही संहारणी होईल हा खरा प्रश्न आहे.

**उभारणी संहारणी रहस्य :-**

श्रीसंत गुलाबराव महाराजांनी "**योगरहस्य**" या पुस्तकात "**कुंडलिनी जगदंबा**" हे प्रकरण लिहून कुंडलिनीमुळे विश्वाची उभारणी व संहारणी कशी होते याचे रहस्य पुढीलप्रमाणे सांगितले आहे. ते त्यांच्याच शब्दात पाहण्यासारखे आहे.

**आता सकल योगाधारु। जो शक्तिधरित्रीचा मेरु।**
**जो योगमंदिरमंदारु। गोपीकुचदुर्गविहारु हरी।।१।।**
**जो भुजगहारहृदयरत्न। जो फलीभूत निष्कंचनयत्न।**
**जो धैर्यशीलाचा प्रयत्न। श्रीभगवंत।।२।।**
**जो राधिकाहृदयपद्मभृंग। सकल सोडोनी उमारंग।**
**जेथ रंगवी अंतरंग। भक्तजनभवभंग जो।।३।।**
**जो वैकुंठविहारी करुणाकरु। जो वेदवेत्ता प्राचीन गुरु।**
**जो भक्तप्रतिपालन दुर्जनहरु। विश्वाकारु मन्मथा ।।४।।**
**तो सच्चिदानंद नारायण। पाहोनी अर्जुनाचे अंतःकरण।**
**योगरहस्य उघडोन। नेटके भाषण आरंभी।।५।।**
**सकल योगाचिया शक्ती। पार्था जेथ एकवटती।**
**जियेते ब्रह्मवेत्ते वेदान्ती। स्तवनें बोलती शुद्ध बुद्धी।।६।।**
**मांत्रिक बोलती अलौकिक शक्ती। जन्मसिद्ध अलोट बुद्धी म्हणती।**
**जी प्रणवाची जन्मदात्री। कुंडलिनी म्हणती योगी तिये ।।७।।**
**कुंडलाकार जिचे शयन। यालागी कुंडलिनी अभिधान।**
**कुंडल म्हणजे वर्तुळ पूर्ण। प्रणवाकार सिद्ध तो।।८।।**
**प्रणवाची आद्यरेषा। ती कुंडलाकार वीरेशा।**
**तेवीं कुंडलिनीचा ठसा। जाण विशेषा आदि पुरुषी।।९।।**
**प्राणप्रतिष्ठा करिता पूर्ती। जैसे देव आविर्भवती।**
**कीं शून्य दाखवावया निश्चितीं। बिंदु उपाधि करणे पडे।।१०।।**
**कीं रूप दाखवावया जाण। पदार्थाचा आकार पूर्ण।**
**उपाधि होय संपूर्ण। जया परी।।११।।**
**का शब्द जरी व्यक्त होवावा। तरी मुख उपाधि लागावा।**

उपाधीवांचोनी आघवा। शक्ती समुदायो व्यक्त नव्हे।।१२।।
कीं अग्नी जरी व्यक्त करणे। तरी इंधनाची उपाधी घेणें।
त्यावीण एवढा तेवढा म्हणणे। अग्निसी न लगे।।१३।।
तैसी हृदयाची सत्त्वशक्ती। ते सूक्ष्म असे निश्चिती।
ती आणावया अभिव्यक्ती। एका नाडीची आकृती घेतली।।१४।।
कंदावरी कुंडलाकार। नाडीचा असे आकार।
तोचि तेथ करूनि ज्ञानप्रकार। शक्ती साचार व्यक्त करिती।।१५।।
जैसे काष्ठ तव आधी श्वेत। परी अग्निसंगें होत आरक्त।
तेवी नाडीच पैं तें निश्चित। ध्यानसंगें कनकमय।।१६।।
जी नाडीमय होती पूर्वीची। ती ध्यानें जाहली सुवर्णाची।
सत्त्वगुणें चैतन्याची। अभिव्यक्ती ही।।१७।।
सूर्यकांता माझी जाण। प्रतिबिंबे अदितिनंदन।
तेवीं नाडीच सत्त्वमय होता जाण। श्रीपरमात्मा प्रतिबिंबे।।१८।।
पद-सुंदर कनकसमान। अंबा। सुंदर कनकसमान।। ध्रु०।।
योगी सांडुनि विषय कचाटें। ध्याती गत अभिमान।।अंबा।।
प्रणव जपुनि निज अंतरीं। मिळविति प्राणापान।।अंबा।।
माया कुंडलिनी ही नांवे। केवळ शब्द प्रमाण।।अंबा।।
ज्ञानेश्वरगुरुचरणप्रसादें। कीजे अमृतपान।।अंबा।।
दोहा :- हृदय-कमल अति पावूनी जपती सोहं ध्यान ।
वश करोनी निज शक्तितें पावती दक्षिण वाम ।।२।।
एवं आदि पुरुषाची माया। जिच्या योगें धनंजया।
तो अवतार घेवोनिया। जन उद्धरी।।१९।।
आतां पौराणिक मतें। जे पृथिवी शेषावरी वसते।
आणि पाहता ज्योतिषमतें। पृथिवी उभी आकाशीं।।२०।।
पृथिवीस धर्ता सहस्त्रफणी। ऐसें बोलिलें असे पुराणीं।
आणि सिद्धान्त शिरोमणी। नान्याधार म्हणोनि सांगे।।२१।।
येथें दोघांचा समन्वय। म्हणाल कोण्या रीति होय।
तरी ऐका तेही सोय। निश्चिंतपणे।।२२।।

कटीस्थानीं असे धरणी। कंदस्थानीं कुंडलिनी।
ती जेवीं का सहस्त्रफणी। तेवींच असे।।२३।।
म्हणोनि शेषावरी धरणी। ऐसें बोलिलें पुराणीं।
किंवा उपपत्ति व्याख्यानी। दुसरीही असे।।२४।।
व्यष्टि पृथ्वीचा शेष कुंडलिनी। समष्टि पृथिवीचा सहस्त्रफणी।
ती ही जाणिजे कुंडलिनी। महाशक्ती।।२५।।
व्यष्टि देहांत कुंडलिनी सर्पिणी।
विराट देहात कुंडलिनी सहस्त्रफणी।
एवं गुप्तरूपें ज्ञान पुराणीं।
दृश्य ज्ञान सिद्धान्त शिरोमणी बोलला।।२६।।
ऐशी ती कुंडलिनी विश्वजननी। विश्व बिजाचिया कडसणी।
विश्ववृक्षउभारणी। निकी करीं।।२७।।
परी विश्ववृक्ष हा अफाटु। फळांतूनि अमृताचा पाटु।
पुढले अध्यायी अचाटु। तोचि रस।।२८।।



# - आधार तिसरा -

## ★ पिंडब्रह्मांडाचे ऐक्य ★

**१) पिंडब्रह्मांडाची एकता**
**२) सुषुम्णा म्हणजे महातीर्थ**
**३) शक्तीची जागृती हाच सुलभ मार्ग**

**प्रास्ताविक :-**

अनादि अज्ञानाच्या निवृत्तीशिवाय व आत्मज्ञान झाल्याशिवाय मनुष्याला परमशांती कधीही मिळत नाही हे नितांत सत्य आहे. हे ज्ञान प्राप्त करण्याचे शरीर हे एक साधन असून ईश्वराने विश्वाची रचना करताना ब्रह्मांडाची प्रतिकृती किंवा नमुना म्हणून शरीराची रचना केली. एवढेच नव्हे; तर त्याने शरीरात ज्ञानाचा समावेशही करून ठेवला आहे. ज्यावेळी शक्तिपात दीक्षा होऊन श्रीगुरुकृपेने कुंडलिनी शक्ती जागृत होते तेव्हा हे अंतर्निहित ज्ञान जागृत होऊन साधकाचे सर्व अज्ञान, शुभाशुभकर्मे इत्यादि सर्व भस्म करून त्याला गंतव्य स्थानापर्यंत ती सहज पोहोचवून देते.

**पिंडब्रह्मांडाची एकता :-**

**"शिवसंहितेच्या"** द्वितीय पटलामध्ये पिडब्रह्मांडाची एकता पुढील प्रमाणे दाखविली आहे. श्रीमहेश्वर म्हणतात, "वेद, पुराणे इत्यादि शास्त्रांनी तीर्थांचे अत्यंत मोठे माहात्म्य सांगितले आहे. ही तीर्थे सर्व पापांपासून मनुष्याला मुक्त करतात. ती आपले आपले अभीष्ट जे धर्म, अर्थ, काम व मोक्ष ही प्राप्त करून देतात. त्या ठिकाणी साक्षात् परमेश्वर विराजमान असतो. असे ज्या तीर्थांचे माहात्म्य असते ती सर्व तीर्थस्थाने व ब्रह्मांडाच्या लोकलोकांतरामध्ये जे काही आहे ते सर्व या शरीरात आहे. यामुळेच शरीरामध्येच सप्त द्वीपांनी वेष्टिलेला सुमेरू पर्वत, नद्यांचे समूह, सागर, पर्वत, क्षेत्र, क्षेत्रपाल, ऋषी, मुनी, ग्रह, उपग्रह, नक्षत्र समूह, सर्व पवित्र तीर्थे, सिद्धपीठ व

पीठांच्या देवता इत्यादिंचा निवास असतो. सृष्टीच्या स्थितीला व संहाराला साहाय्य करणारे चंद्र व सूर्य या शरीरातच भ्रमण करीत असतात. आकाश, वायू, अग्नी, जल व पृथ्वी इत्यादि त्रैलोक्यामध्ये जे जे काही आहे ते ते सर्व या शरीरात विद्यमान आहे. या त्रैलोक्यातील चराचर सर्व वस्तू शरीरातील सुमेरूचा आश्रय घेऊन राहतात व आपापला व्यवहार उत्तम रीतीने करतात. याप्रमाणे जी जी वस्तू बाहेर ब्रह्मांडात आहे ती ती या पिंडरूप शरीरात आहे हे दिसून येते. जो साधक पिंडब्रह्मांडाची एकता आपल्या शरीरात पाहतो तो निस्संदेह ज्ञानी, महात्मा व योगी होतो.

या शरीरातच गंगा, यमुना, सरस्वती इत्यादि ७२ हजार नद्या नाड्यांच्या रुपाने वाहत असतात. जो साधक इडारूपी गंगा, पिंगलारूपी यमुना व सरस्वतीरूप सुषुम्णा या तीन नाड्यांच्या संगमावर मनाने स्नान करतो तो अत्यंत सहजतेने मुक्तीचा लाभ प्राप्त करून घेतो. या संगमालाच शिवतीर्थ असे म्हणतात. ज्यावेळी श्रीगुरुकृपेने कुंडलिनी शक्ती जागृत होते तेव्हाच या तीर्थावर दिव्य असे मानसिक स्नान घडून येते. त्यावेळी जीव सत्त्वगुणयुक्त होऊन सर्व सिद्धी प्राप्त करून घेऊन जीवन्मुक्त होतो.

**सुषुम्णा म्हणजे महातीर्थ :-**

शरीरातील ७२ हजार नाड्या जरी तीर्थरूप असल्या तरी सुषुम्णा नाडी ही महातीर्थ आहे. **"योगशिखोपनिषदात"** या नाडीचे महत्त्व सांगितले आहे. या नाडीतच परमेश्वराचे वास्तव्य असते. या नाडीला शांभवी शक्ती असेही नाव आहे. या नाडीच्या आधारानेच परमेश्वराची प्राप्ती होते; कारण या मार्गाने गेल्याने निरामय अशा ब्रह्मस्वरूपाची प्राप्ती सुलभतेने होते. या नाडीच्या दरवाजावर मूलाधारात कुंडलिनी शक्ती निद्रा घेत असते. श्रीगुरुकृपेने शक्ती जागृत होऊन हे द्वार जोपर्यंत उघडत नाही तोपर्यंत जीवाचे शिवाशी ऐक्य होत नाही. अज्ञान निवृत्त होऊन मोक्ष मिळत नाही. द्वैतभाव जाऊन अद्वैत स्थिती प्राप्त होत नाही. जगताच्या उभारणीचा जो भास झाला आहे

तो संपत नाही. यासाठी शक्ती जागृत व्हावी लागते. ही जागृती एकदा झाली की अनायासे सर्व घडून येते.

या सहज सुलभ मार्गाचे ज्ञान नसल्यामुळे व ज्ञान असले तरी या मार्गाची महती न कळल्यामुळे कुतार्किक लोक "मी ब्रह्म आहे जगत् मिथ्या आहे," या तत्त्वाचा प्रत्यक्ष अनुभव न घेता विचार करता करता मृत्यू पावतात. ज्या सुषुम्णा नाडीत परमेश्वराचे वास्तव्य असते तिकडे हे लोक ढुंकूनही पाहत नाहीत. यासाठी प्रकृती-पुरुष, आत्मा-परमात्मा किंवा जीव-जगत् इत्यादिंच्या निर्णयाच्या वादविवादात न पडता साधकाने आपल्याला आपल्या गंतव्य स्थानापर्यंत सुखाने नेऊन पोहोचविणाऱ्या मार्गाची कास धरली पाहिजे. याकरिताच श्रीसद्गुरुकृपेची पहाट केव्हा होईल यासाठी प्रयत्नशील राहिले पाहिजे.

**शक्तीची जागृती हाच सुलभ मार्ग :-**

एकदा का श्रीसद्गुरुकृपा झाली की, जागृत शक्ती साधकाला स्वतः गंतव्य स्थानापर्यंत घेऊन जाते. ज्याप्रमाणे एखाद्या मोठ्या दरवाजाचे कुलूप परिश्रमाशिवाय किल्लीने सहज उघडले जाते व आत जाण्याचा मार्ग मोकळा होतो त्याप्रमाणे ज्यावेळी श्रीगुरुकृपेने कुंडलिनी शक्तीचे उद्बोधन होते तेव्हा मोक्षाचा दरवाजा मोकळा होऊन परब्रह्म प्राप्ती सुलभ होते. श्रीभगवंताच्या प्राप्तीचा हाच एकमात्र सरळ व सोपा मार्ग आहे. मात्र इतर सर्व साधने व मार्ग मनुष्याला अनंत जन्माच्या फेऱ्यात अडकवून भटकत ठेवतात यात शंका नाही.

सारांश, ब्रह्मांडाची तुलना केली तर पिंडाची गणना नाममात्र सुद्धा होऊ शकणार नाही. असे असले तरी ईश्वराने मनुष्याच्या या पांचभौतिक शरीरामध्ये सर्व ज्ञानाचा समावेश करून ठेवला आहे. यासाठी पिंडाच्या संहारणीचा मार्ग स्वीकारला की ब्रह्मांडाची संहारणी आपोआप होते. ही संहारणी झाली की, जीव आत्मस्वरूप होऊन जातो. ही पिंडाची संहारणी कोणत्या सोप्या उपायाने घडते व जीव ब्रह्मस्वरूप कसा होतो ते आता पाहावयाचे आहे.

★★★★★

# - आधार चवथा -

## ★ शक्तिपातयोगाचा महिमा ★

**१) सोपे साधन आहे का?**
**२) पंथराज**
**३) योगशिखोपनिषदातील सिद्धयोगमार्गाचे महिमान**
**४) कूर्मपुराणातील महायोगाचा महिमा**
**५) शक्तिपातयोगाचे परमश्रेष्ठत्व**
**६) लिंगपुराणातील महायोगाचे श्रेष्ठत्व**
**७) श्रीज्ञानेश्वरीतील पंथराजाचे माहात्म्य**
**८) श्रीदासबोधातील शक्तिपातयोगाचे स्तवन**

**सोपे साधन आहे का? :-**

पिंडाची संहारणी होऊन मोक्षाचे ध्येय हे ज्ञानानेच साधत असल्यामुळे "**ऋते ज्ञानान्न मुक्तिः।**" असे शास्त्रकारांनी आवर्जून सांगितले आहे. याचा अर्थ असा आहे की, ज्ञानाशिवाय मोक्ष प्राप्त होत नाही. "**ज्ञान म्हणजे आत्मज्ञान। पाहावें आपणासि आपण।।**" (दासबोध ५-६-१) असे श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी सांगितले आहे. या आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठीच हठयोग, राजयोग, तारकयोग, मंत्रयोग, तंत्रयोग, लययोग, भक्तियोग व ज्ञानयोग असे निरनिराळे योगमार्गाचे संप्रदाय पुरातन काळापासून भारतवर्षात चालत आलेले आहेत.

या सर्व संप्रदायांचा म्हणजेच मार्गांचा हेतू माणसाला ज्ञानप्राप्ती करून देणे हाच असतो. या ज्ञानप्राप्तीमुळे "**यो वै भूमा तत्सुखम्।। छांदोग्य उपनिषद् ७-२३-१।।**" असे मोठे सुख प्राप्त होते. सुखाचे ऐहिक, पारलौकिक व अध्यात्मिक असे तीन प्रकार प्रसिद्ध आहेत. ऐहिक म्हणजे या लोकातील सुख व पारलौकिक म्हणजे परलोकातील सुख होय. या दोन्ही सुखांना विषयाची अपेक्षा असते. मात्र अध्यात्मिक सुख हे विषयनिरपेक्ष असते. अध्यात्मिक सुख आत्मभूत असल्याने ते सर्व सुखात उत्तम मानले जाते. ऐहिक व पारलौकिक सुखापेक्षा

अध्यात्मिक सुख श्रेष्ठ आहे; कारण ते नित्य असून त्यात कोणत्याही दु:खाचा संबंध असत नाही. हे अध्यात्मसुख म्हणजेच नि:श्रेयस होय. हे जे नि:श्रेयस त्यालाच मोक्ष म्हणतात. मोक्ष हा परमपुरुषार्थ आहे. तो प्राप्त झाल्याशिवाय जन्ममरण सुटत नाही व मनुष्य कृतकृत्य होत नाही.

जीवन कृतकृत्य व्हावे, आत्मज्ञान प्राप्त व्हावे व मोक्ष मिळावा म्हणून सर्वजण म्हणत असतात; परंतु प्रत्यक्षात माणसाची कृती मोक्षप्राप्तीची असलेली दिसून येत नाही. याचे खरे कारण असे आहे की, जीव अनित्य सुखाच्या वासनारूप मायाजालात गुंतून गेल्याने खूप दु:ख भोगतो. पुन:पुन्हा जन्ममृत्यूच्या फेऱ्यात सापडतो. कालचक्राच्या गतीत सापडून तो सतत फिरत असतो. यातून आपण सुटावे म्हणून प्रत्येक माणसाची जाणिवेने अगर नेणिवेने धडपड चालू असते. त्यासाठी वरीलपैकी एखाद्या मार्गाचा तो आपल्याला झेपेल त्याप्रमाणे अवलंब करीत असतो.

सुख, ज्ञान किंवा मोक्षप्राप्तीच्या हेतूने ज्यावेळी मनुष्य वाटचाल करू लागतो. त्यावेळी वैषयिक सुख व आत्मिक सुख यांची रस्सीखेच सुरू होते. **“न संसारात्परो रिपुः।”** म्हणजे संसारा इतका दुसरा कोणताही मोठा शत्रू नाही हे ध्यानात येते. पण तो सुटत नाही व सोडवत नाही. मोक्षासाठी केलेले मानवी प्रयत्न अपुरे पडतात. स्वत:च्या प्रयत्नांना मर्यादा उत्पन्न होते. आपण आपल्या बळावर अहंता, ममता, काम, क्रोध, मोह, मत्सरादि शत्रूंवर मात करून संसारसागर ओलांडून जाऊ शकू असे वाटत नाही.

अशा वेळी असे वाटते की, ऐलथडीलाच मायाजळ संपवून टाकणारे व बोधाचा तारा जोडून निवृत्तीच्या पैलतीराला झेपावून नेणारे असे एखादे दिव्य साधन आपल्याला मिळावे की, जे आपणहून आपल्याला या वासनांपासून व कामक्रोधादि विकारांपासून लवकरात लवकर सोडवून मुक्त करील. दिव्य सुखाचा अनुभव देईल. जीवन कृतकृत्य होईल. मनुष्य जीवनाचे ध्येय जे मोक्षप्राप्ती ते अनायास

सिद्ध होईल. कलियुगात असे सोपे साधन आहे का?

**पंथराज :-**

कलियुगामध्ये सोपे, सहज व सर्वांना करता येण्यासारखे दिव्य असे साधन आहे. श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी हे जे सोपे साधन आहे त्यालाच "**श्रीज्ञानेश्वरीत**" पंथराज असे म्हटले आहे. पंथराज म्हणजे सर्व अध्यात्मिक साधनांच्या पंथांचा राजा. अगदी सोपे व सहज असे साधन!

सिद्धमार्ग, सिद्धयोग, महायोग, शक्तिसंचारयोग, शक्तिपातयोग, श्रीगुरुदत्तयोग, वेधदीक्षायोग, कुंडलिनीजागरणयोग, क्रियायोग, सहज-योग इत्यादि अनेक नावे या पंथराजाला आहेत. ज्याला जीवन कृतकृत्य करावयाचे असेल, दिव्य सुखाचा अनुभव घ्यावयाचा असेल व मोक्षप्राप्ती करून घ्यावयाची असेल त्याने पंथराजाचाच अवलंब करणे श्रेयस्कर आहे; कारण या मार्गाइतका दुसरा सोपा मार्ग नाही. तत्काळ अनुभव देणारा पंथराज हाच एकमेव असा सर्वश्रेष्ठ मार्ग आहे. या कलियुगात सर्व दोषांचा परिहार करणारा, चित्तशुद्धी अविलंब घडवून आणणारा, साधकांच्या चित्तवृत्तींचा निरोध आपोआप घडवून आणणारा, जीवन दिव्य, भव्य व अलौकिक बनविणारा व जीवाला सर्व मोहपाशातून मुक्त करून मोक्षाप्रत नेणारा असा हा एकमात्र सहजसुंदर पंथराज आहे.

**योगशिखोपनिषदातील सिद्धयोगमार्गाचे महिमान :-**

पंथराजाचा महिमा अत्यंत अद्भुत आहे. "**योगशिखोपनिषदात**" या सिद्धमार्गाचे माहात्म्य पुढीलप्रमाणे सांगितले आहे. आत्यंतिक दुःखनिवृत्तीचा उपाय मानवाला कळावा या इच्छेने श्रीब्रह्मदेवांनी एकदा श्रीमहादेवांना पुढील प्रश्न केला.

**सर्वे जीवाः सुखैर्दुःखैर्मायाजालेन वेष्टिताः।**
**तेषां मुक्तिः कथं देव कृपया वद शङ्कर।।१।।**
**सर्वसिद्धिकरं मार्गं मायाजालनिकृन्तम्।**
**जन्ममृत्युजराव्याधिनाशनं सुखदं वद।।२।।**

हे शंकरा! सर्व जीव सुखदु:खाच्या मायाजालात गुरफटून गेले आहेत. त्यापासून त्यांची मुक्ती कशी होईल हे कृपा करून सांगावे. ज्या मार्गाने सर्व सिद्धी प्राप्त होतील, मायाजाल तुटून जाईल, जन्म, मृत्यू, जरा, व्याधी इत्यादि सर्वांचा नाश होईल व ज्या पासून मोठे सुख प्राप्त होईल असा मार्ग दाखवा.

यावर श्रीशंकरांनी श्रीब्रह्मदेवांना असे सांगितले की -

**नानामार्गैस्तु दुष्प्रापं कैवल्यं परमं पदम्।**
**सिद्धिमार्गेण लभते नान्यथा पद्मसम्भव।।३।।**

हे ब्रह्मदेवा! परमपद कैवल्यरूप आहे. ते निरनिराळ्या प्रकारच्या मार्गांनी मोठ्या कष्टाने प्राप्त होते. मात्र सिद्धमार्गामुळे ते कैवल्यपद सहज प्राप्त होते. इतक्या सहजतेने अन्य दुसऱ्या कोणत्याही मार्गाने कैवल्यपद मिळत नाही.

**कुर्मपुराणातील महायोगाचा महिमा :-**

"**कुर्मपुराणाच्या**" उत्तरार्धातील अकराव्या अध्यायात श्रीमहेश्वरांनी या महायोगाचे माहात्म्य पुढील प्रमाणे कथन केले आहे.

**अतः परं प्रवक्ष्यामि योगं परमदुर्लभम्।**
**येनात्मानं प्रपश्यन्ति भानुमन्तमिवेश्वरम्।।१।।**
**योगाग्निर्दहते क्षिप्रमशेषं पापपञ्जरम्।**
**प्रसन्नं जायते ज्ञानं साक्षान्निर्वाणसिद्धिदम्।।२।।**
**योगात्सञ्जायते ज्ञानं ज्ञानाद्योगः प्रवर्त्तते।**
**योगज्ञानाभियुक्तस्य प्रसीदति महेश्वरः।।३।।**
**एककालं द्विकालं वा त्रिकालं नित्यमेव च।**
**ये युञ्जन्ति महायोगं ते विज्ञेया महेश्वरः।।४।।**

श्रीमहेश्वर असे म्हणाले की, आता मी अत्यंत दुर्लभ अशा महायोगाचे (माहात्म्य) सांगतो. या महायोगामुळे सूर्यासारख्या अत्यंत प्रकाशमान् अशा आपल्या आत्मस्वरूपरूप ईश्वराला योगी लोक पाहतात. या महायोगरूप अग्नीमुळे लवकरात लवकर सर्व पापांचा समूह जळून नाश पावतो. त्यामुळे मोक्ष प्राप्त करून देणारे निर्मल

ज्ञान प्रकट होते. योगसाधनेमुळे ज्ञान उत्पन्न होते व ज्ञानामुळे योगसाधना करण्याची प्रवृत्ती होते. अर्थात् ज्ञान आणि योग या दोन्ही गोष्टी परस्पर पोषक आहेत. योगाचे लक्ष्य मोक्षप्राप्ती हेच आहे. त्या मोक्षप्राप्तीला ज्ञान साहाय्यक होते. जो साधक योग व ज्ञान यांनी युक्त होऊन साधन करीत असतो अर्थात् ज्याच्या ठिकाणी योगाचा व ज्ञानाचा शुभ योग झाल्याचे दृष्टीस पडते त्याच्यावर महेश्वर प्रसन्न होतात. याकरिता जो साधक दिवसातून एकदा, दोनदा, तीनदा किंबहुना नित्यनियमाने व सातत्याने महायोगाचा अभ्यास करतो तो महेश्वरस्वरूप आहे असे म्हटले पाहिजे.

योग दोन प्रकारचा असून त्यात महायोग श्रेष्ठ आहे असे सांगताना श्रीमहेश्वर "**कुर्मपुराणात**" पुढे असे म्हणतात की,

**योगस्तु द्विविधोज्ञेयो ह्यभावः प्रथमो मतः।**
**अपरस्तु महायोगः सर्वयोगोत्तमोत्तमः।।५।।**
**शून्यं सर्वनिराभासं स्वरूपं यत्र चिन्त्यते।**
**अभावयोगः स प्रोक्तो येनात्मानं प्रपश्यति।।६।।**
**यत्र पश्यति चाऽऽत्मानं नित्यानन्दं निरञ्जनम्।**
**मयैक्यं स महायोगो भाषितः परमः स्वयम्।।७।।**

योग दोन प्रकारचा आहे. पहिल्या योगाचे नाव अभाव योग असे आहे. दुसऱ्या योगाचे नाव महायोग असून तो सर्व योगामध्ये उत्तमातील उत्तम असा सर्वश्रेष्ठ मार्ग आहे. अभावयोगामध्ये शून्य व वेदान्ताने सांगितलेल्या सर्व प्रकारच्या निराभास स्वरूपाचे चिंतन साधक करीत असतो. या योगात आत्म्याला निर्गुण शून्य मानून साधक ध्यान करीत असल्याने त्याला ध्यानाच्या योगाने साक्षात्कार होतो. (या योगात स्वप्रयत्नाला विशेष स्थान आहे.) दुसऱ्या योगाचे नाव महायोग असून तो मी स्वतः सांगितला व प्रवर्तित केला आहे. या योगात साधक श्रीसद्गुरुकृपाश्रित राहून साधन करीत असतो. श्रीसद्गुरुकृपेने शक्तिसंक्रमण होऊन साधक साधन करीत असल्याने ध्यानाने नित्यानंद, आत्मस्वरूप व निरंजन ब्रह्म तो पाहत असतो. एवढेच नव्हे; तर

समाधीमध्ये तो मत्स्वरूपाचा लाभ करून ऐक्य पावतो.

केवळ एकमात्र महायोगच इतर दुसऱ्या कोणत्याही योगापेक्षा कसा श्रेष्ठ आहे हे सांगताना पुराणकार पुढे असे म्हणतात की,

**ये चान्ये योगिनां योगाः श्रूयन्ते ग्रन्थविस्तरे।**
**सर्वे ते ब्रह्मयोगस्य कलां नार्हन्ति षोडशीम् ।।८।।**
**यत्र साक्षात्प्रपश्यन्ति विमुक्ता विश्वमीश्वरम्।**
**सर्वेषामेव योगानां स योगः परमो मतः।।९।।**
**सहस्रशोऽथ बहुशो ये चेश्वर बहिष्कृताः।**
**न ते पश्यन्ति मामेकं योगिनो यतमानसाः।।१०।।**

इतर अनेक योग लोकांसाठी योगी लोकांनी सांगितले आहेत. त्यांची वर्णने विस्ताराने ग्रंथामध्ये वाचावयास मिळतात. हे जे इतर सर्व योग आहेत त्यांची योग्यता ब्रह्मयोगाच्या सोळाव्या कलेबरोबर सुद्धा होऊ शकणार नाही. याचे खरे कारण असे आहे की, इतर योग हे योगी लोकांनी प्रचलित केले आहेत. मात्र महायोग मी स्वतः सांगितला आहे. त्याची सुरुवात माझ्यापासून झाली आहे. मी स्वतः त्याचा प्रवर्तक आहे. याकरिता महायोगाची इतर कोणत्याही योगाशी कदापीही तुलना होऊ शकणार नाही. या योगाच्या साहाय्याने जीवनमुक्त योगिजन विश्व व ईश्वराला साक्षात् पाहतात. या परम पावन महायोगाच्या प्रवाहाने ब्रह्मांडातील यच्चयावत् तत्त्वे संपूर्ण जाणली जाऊ शकतात. या महायोगापुढे काहीही लपून राहू शकत नाही. याकरिता या भूतलावर जितके योग प्रचलित आहेत त्या सर्व योगात माझ्याकडून प्रवर्तित झालेला महायोग हा ईश्वरप्राप्तीचा सर्वोत्तम मार्ग आहे. अनेकानेक असे जे हजारो योग आहेत ते ईश्वराला यत्किंचितही मान्य नाहीत. त्या योगमार्गाच्या साहाय्याने मनुष्य ईश्वराची प्राप्ती करून घेऊ शकत नाही. त्या योगाची साधना करणारे योगी माझे दर्शन घेऊ शकत नाहीत. मला पाहू शकत नाहीत. केवळ एकमेव महायोगानेच जीवमात्र माझी प्राप्ती करून घेऊन मत्स्वरूप होऊ शकतो यात तिळमात्र शंका नाही.

**शक्तिपातयोगाचे परमश्रेष्ठत्व :-**

शक्तिपातयोग हा सर्व वेदांचे सार आहे व हा सर्व बंधनातून मनुष्याला मुक्त करणारा आहे हे सांगताना भगवान् श्रीआशुतोष **"कुर्मपुराणात"** असे म्हणतात की -

**एष पाशुपतोयोगः पशुपाशविमुक्तये।।११.६७।।**
**सर्व वेदान्तसारोऽयमत्याश्रममितिश्रुतिः।।**
**एतत्परतर गुह्यं मत्सायुज्यप्रदायकम्।।६८।।**
**द्विजातीनान्तु कथितं भक्तानां ब्रह्मचारिणाम्।।६९।।**

मी हा पाशुपत शक्तिपातयोग सांगितला आहे. त्याचे आचरण जे जे करतात ते ते सर्व जीव पशुपाशातून म्हणजे सर्व बंधनातून मुक्त होतात. हा शक्तिपातयोग जीवाची सर्व बंधने तोडण्यासाठीच आहे. हा संपूर्ण वेदान्ताचे सार असून यतींचे आश्रयस्थान आहे असे वेदांचे सांगणे आहे. याकरिता माझ्या या शक्तिपातयोगाचे ज्ञान परमश्रेष्ठ आहे. हे गोपनीय ज्ञान जीवाला सायुज्य मुक्ती प्राप्त करून देते. हा शक्तिपातयोग द्विजातीकरिता, भक्तांसाठी व ब्रह्मचारी साधकांसाठी सांगितला आहे.

**लिंगपुराणातील महायोगाचे श्रेष्ठत्व :-**

**"लिंगपुराणातही"** श्रीमहादेवांनी गिरिजा भगवती श्रीजगदंबेला महायोग कसा श्रेष्ठ आहे हे ११० व्या अध्यायात फारच सुंदर रीतीने समजावून सांगितले आहे.

**एवं पुरा महादेवो भगवन्नीललोहितः।**
**गिरिपुत्र्याऽम्बया देव्या भगवत्येकशय्यया।।५।।**
**पृष्टः कैलासशिखरे हृष्टपुष्टतनूरुहः।**
**योगः कतिविधः प्रोक्तस्तत्कथं चैव कीदृशम्।।६।।**
**ज्ञानञ्च मोक्षदं दिव्यं मुच्यये येन जन्तवः।**
**प्रथमो मन्त्रयोगश्च स्पर्शयोगो द्वितीयकः।।७।।**
**भावयोगस्तृतीयः स्यादभावश्च चतुर्थकः।**
**सर्वोत्तमो महायोगः पञ्चमः परिकीर्तितः।।८।।**

भगवान् श्रीशंकर कैलास पर्वतावर प्रसन्नपणे विराजमान झाले होते. गिरिजा भगवती श्रीपार्वतीदेवी त्यांच्या अर्ध्या आसनावर बसली होती. त्यावेळी श्रीदेवीने असे विचारले की, "हे प्रभो! दिव्य असे ज्ञान देऊन मोक्ष देणारे व जीवाला सर्व बंधनातून सोडविणारे योग किती प्रकारचे आहेत व त्यांचे स्वरूप कसे आहे ते मला आपण कृपा करून सांगावे." श्रीभगवान् शंकर असे म्हणाले, "हे पार्वती ! पहिला मंत्रयोग असून दुसऱ्याचे नाव स्पर्शयोग आहे. तिसऱ्याचे नाव भावयोग असून चवथ्याचे नाव अभावयोग आहे. पाचव्या योगाचे नाव महायोग असून तो सर्व योगांमध्ये अत्युत्तम असा योग आहे."

यानंतर इतर योगांचे वर्णन करून श्रीशंकरांनी महायोगाचे निर्विवाद श्रेष्ठत्व पुढील प्रकारे स्पष्ट केले आहे.

**नीरूपः केवलः शुद्धः स्वच्छन्दश्च सुशोभनः।**
**अनिर्देश्यः सदालोकः स्वयंवेद्यः समतन्तः।।१५।।**
**स्वभावो भासते यत्र महायोगः प्रकीर्तितः।**
**नित्योदितः स्वयञ्ज्योतिः सर्वचित्तसमुत्थितः।।१६।।**
**निर्मलः केवलो ह्यात्मा महायोग इति स्मृतः।।१७।।**

श्रीमहादेव असे म्हणतात की, "आत्मस्वरूप हे शून्य, अद्वितीय, निर्मल, स्वच्छंदतेसहित व परम सुशोभित म्हणजेच अत्यंत रमणीय असे आहे. श्रुतीला सुद्धा त्याचा निर्देश करता येत नाही. नेति नेति म्हणून स्वस्थ बसावे लागते. हे आत्मस्वरूप अप्रमेय असून नेहमी प्रकाशमान् असते. ते स्वतःच स्वतःला जाणू शकते. ते सर्वव्यापी असून समानतेने भरलेले आहे. असे हे स्वरूप स्वभावतःच ज्या योगाने कळून येते त्याला महायोग असे म्हणतात. नित्यप्रकाशमान्, स्वयमेवप्रकाशमान्, संपूर्ण चित्ताला उत्थापित करणारा व केवळ निर्मल आत्म्याचे दर्शन घडविणारा असा हा महायोग आहे.

**श्रीज्ञानेश्वरीतील पंथराजाचे माहात्म्यः-**

शक्तिपातयोगमार्ग हा सर्व योगमार्गाचा राजा असल्यामुळे श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी या मार्गाला पंथराज असे म्हटले आहे. "मी

ब्रह्मरूप व्हावे अशी माझी इच्छा आहे. ब्रह्मस्थिती प्राप्त होण्याकरिता जे काही केले पाहिजे म्हणून सांगाल त्याचा अभ्यास मी करीन," अशी अर्जुनाने श्रीकृष्णांना विनम्रभावाने प्रार्थना केली. त्यावेळी श्रीकृष्णांनी अर्जुनाला या शक्तिपातयोगमार्गाच्या साधनाची म्हणजेच पंथराजाची महती वर्णन करून सांगितली. **"श्रीज्ञानेश्वरीच्या"** ६ व्या अध्यायात या मार्गाचे माहात्म्य सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की -

**ऐसें विवरोनियां श्रीहरी। म्हणितलें तिये अवसरीं।**
**अर्जुना हा अवधारी। पंथराजु।।६.१५२।।**
**तेथ प्रवृत्तितरूच्या बुडीं। दिसती निवृत्तिफळाचिया कोडी।**
**जिये मार्गीचा कापडी। महेश आझुनी।।१५३।।**
**पैं योगिवृंदें वहिलीं। आडवीं आकाशीं निघालीं।**
**कीं तेथ अनुभवाच्या पाउलीं। धोरणु पडिला।।१५४।।**
**तिहीं आत्मबोधाचेनि उजुकारें। धांव घेतली एकसरें।**
**कीं येर सकळ मार्ग निदसुरे। सांडूनियां।।१५५।।**
**पाठीं महर्षी येणें आले। साधकांचे सिद्ध जाहाले।**
**आत्मविद थोरावले। येणेंचि पंथें।।१५६।।**
**हा मार्गु जैं देखिजे। तैं तहान भूख विसरजे।**
**रात्रिदिवसु नेणिजे। वाटे इये।।१५७।।**
**चालतां पाऊल जेथ पडे। तेथ अपवर्गाची खाणी उघडे।**
**आव्हांटलिया तरी जोडे। स्वर्गसुख।।१५८।।**
**निगिजे पूर्वीलिया मोहरा। कीं येइजे पश्चिमेचिया घरा।**
**निश्चळपणें धनुर्धरा। चालणे एथिंचें।।१५९।।**
**येणे मार्गें जया ठाया जाइजे। तो गांव आपणचि होइजे।**
**हें सांगो काय सहजे। जाणसी तूं।।१६०।।**

अशा प्रकारे त्यावेळी श्रीकृष्णांनी मनात विचार करून असे म्हटले की, "अर्जुना! आम्ही जो योगमार्ग तुला सांगणार आहोत तो सर्व मार्गांचा राजा आहे. या राजमार्गाचे माहात्म्य किती मोठे आहे

हे तुला सांगतो. तू ते श्रवण कर."

साधक या योगमार्गाने जाऊ लागला व साधन करू लागला की, त्याला कोट्यावधी मोक्षफले दृष्टीस पडतात म्हणजेच मोक्षप्राप्ती अगदी सुलभ होते. या मार्गावरून श्रीशंकर हे अद्यापपावेतो यात्रा करीत आहेत. श्रीशंकरांनी हा साधनमार्ग प्रवर्तित केलेला असल्यामुळे इतर साधकांनी या मार्गाचा प्रवास कसा करावा हे दाखविण्यासाठी ते सतत प्रवास करीत असतात. श्रीशंकरांना काहीही प्राप्तव्य शिल्लक राहिलेले नाही. परंतु सिद्ध झाल्यावरही आत्मस्वरूपाचे अखंड ध्यान व्हावे हे इतरेजनांना दाखविण्यासाठी ते साधन अभ्यास करीत असतात.

योगिजन प्रथम मार्ग न मिळाल्याने आडव्या तिडव्या मार्गाने चालले होते. परंतु; पुढे श्रीमहेशांच्या कृपेने त्यांना पंथराजाचे साधन मिळून ते या मार्गाला लागले. श्रीमहेशांनी हा मार्ग आधीच सिद्ध करून ठेवला होता. त्याच मार्गावरून हे योगिजन अनुभव घेत घेत ब्रह्मस्वरूपापर्यंत जाऊन पोहोचले.

एकदा हे सहज व सोपे साधन मिळाल्यावर ते दुसरे अज्ञानाचे सर्व आडमार्ग सोडून देऊन निःसंशयपणे आत्मबोध करून देणाऱ्या पंथराजाच्या सरळ मार्गाने वाट चालत गेले. खरे पाहता त्यांनी या मार्गाने अक्षरशः धावच घेतली. नंतरचे ऋषी, मुनी व महर्षी हेही याच मार्गाने ब्रह्मस्वरूप झाले.

या पंथराजाच्या मार्गानेच साधकांचे सिद्ध झाले. त्याचप्रमाणे तत्त्वज्ञानी व आत्मज्ञानी पुरुष हे देखील याच पंथाने श्रेष्ठत्वास चढले.

पंथराजाचा हा मार्ग जेव्हा श्रीगुरुकृपेने दृष्टीस पडतो तेव्हा तहान व भूक हरपून जाते. या मार्गाची वाट चालत असताना (साधन करताना) रात्र व दिवस यांची आठवण होत नाही. साधकाला रात्रंदिवस साधन करावेसे वाटते. साधकाचे पाऊल जसजसे पुढे पुढे पडत जाते तसतसे त्याला मोक्षसुख अनुभवावयास मिळते. यदाकदाचित् भोगाकांक्षेमध्ये साधक लिप्त होऊन साधनगतीत अडथळा

आला तर त्याला स्वर्गसुख भोगावयाला मिळते. या पंथराजाच्या साधनामुळे साधक पूर्वेकडील मार्गाने निघून पश्चिमेकडील मार्गाला सहजतेने येतो. शरीरातील पुढील भागातील गुह्यस्थान, बेंबी, हृदय, कंठ, व नाकाच्या द्वारा जो प्राणप्रवाह वाहत असतो त्याला पूर्वपथ असे म्हणतात. या पूर्वेकडील मार्गाची प्राणगती बहिर्मुख असते. या मुखातून श्वासप्रश्वासाची प्रक्रिया होत असल्याने जीवाची वृत्तीही बहिर्मुख राहते. हे श्वासप्रश्वासाचे कार्यच जीवाच्या जागृतीचे महत्त्वाचे चिह्न आहे. या बाह्य जागृतीमुळेच जीवाला द्वैताची म्हणजे अभिन्नतेची जाणीव किंवा बोध होतो. मात्र या पूर्व मार्गामुळे ऐक्यतेचा, एकतेचा म्हणजे अद्वैताचा बोध कधीही होत नाही; कारण पश्चिममार्ग नेहमीच बंद असतो. हा मार्ग बंद असल्याने जीवाला आपल्या स्वस्वरूपाचे ज्ञान म्हणजेच आत्मज्ञान किंवा ब्रह्मज्ञान होत नाही. त्याचा जन्म-जन्मांतरी निरंतर अभाव राहतो. "**हठयोगप्रदीपिकेत**" याचे कारण सांगताना श्रीस्वात्मारामयोगींद्र यांनी असे म्हटले आहे की, "**येन मार्गेण गन्तव्यं ब्रह्मस्थानं निरामयम्। मुखेनाच्छाद्य तद्द्वारं प्रसुप्ता परमेश्वरी।। ३.१०६।।** सुषुम्णा मार्गाचा अवलंब करूनच साधक सहस्रारातील निरामय ब्रह्मस्थानी पोहोचू शकतो. जोपर्यंत हे ब्रह्मद्वार उघडत नाही तोपर्यंत साधक ब्रह्म किंवा आत्मसाक्षात्काराच्या प्राप्तीपासून वंचित राहतो. हे ब्रह्मद्वार न उघडण्याचे खरे कारण असे आहे की, या ब्रह्मद्वाराला अडवूनच म्हणजे झाकूनच कुंडलिनी शक्ती झोपलेली असते. ही सुप्त शक्ती श्रीसद्गुरुकृपेने जोपर्यंत जागृत होत नाही तोपर्यंत मोक्षप्राप्ती होऊ शकत नाही. या अर्थानेच योग-शिखोपनिषदात असे लिहिले आहे की "**नाकृतं मोक्षमार्गं स्यात् प्रसिद्धं पश्चिमं विना" (१-१४५)** पश्चिम म्हणजे पाठीतील सुषुम्णामार्ग मोकळा झाल्याशिवाय मोक्षमार्गात साधकाची कधीही गती होत नाही. पूर्वेकडील मार्ग टाकून म्हणजे बहिर्मुखी गती टाकून देऊन या पंथराजामुळेच साधक अंतर्मुखी गतीचा होतो. तो पश्चिमेकडील सुषुम्णेच्या घरात येतो. या घरात जीवाने प्राणरूपाने प्रवेश केला

की, त्याला अपूर्व निश्चलता प्राप्त होऊन त्याची गती निश्चित होऊन तो ऊर्ध्वमुखाने वाटचाल करू लागतो. मूलाधारापासून निघून सहस्रारापर्यंत म्हणजे संसारादि वासनांपासून मुक्त करून मोक्षापर्यंत निश्चित पोहोचविणारा असा हा मार्ग आहे. अत्यंत दृढ श्रद्धा ठेवल्याशिवाय हे साधन होऊच शकत नाही. या मार्गावरून चालणे याचा अर्थच दृढ श्रद्धा ठेवून साधन करणे असाच आहे. ब्रह्मपदाच्या गावाला साधकाला पोहोचावयाचे असते. पण हे साधन इतके सोपे आहे की, साधन करता करता साधक ब्रह्मरूप होऊन जातो. ही ब्रह्मप्राप्ती अनायास होते हे सांगितले तर तुला नवल वाटेल, परंतु तू अभ्यासाला लागलास की, तुला हे आपोआप कळून येईल."

**श्रीदासबोधातील शक्तिपातयोगाचे स्तवन :-**

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी आपल्या स्वतःचे प्रत्यक्ष रूप असलेल्या "**श्रीदासबोध**" या महान् ग्रंथात शक्तिपातयोगाचे स्तवन गुप्तपणे केले आहे. श्रीसमर्थांनी मूळ सिद्धांत असा मांडला आहे की-

**मुख्य शक्तिपात तो ऐसा। नाहीं चंचळाचा वळसा।**
**निवांतीं निवांत कैसा। निर्विकारी।।१५.१०.१६।।**

श्रीसमर्थांच्या दृष्टीने शक्तिपाताचे महत्त्व असे अनन्य साधारण आहे. या दृष्टीनेच त्यांनी परमार्थाचे म्हणजे शक्तिपातयोगाचे स्तवन पहिल्या दशकाच्या दहाव्या समासात केले आहे. हा मार्ग समर्थामध्ये समर्थ आहे हे सांगताना श्रीसमर्थ म्हणतात-

**आता स्तवूं हा परमार्थ। जो साधकांचा निजस्वार्थ।।**
**नातरी समर्थांमध्ये समर्थ। योग हा।।१.९.१।।**
**आहे तरी परम सुगम। परि जनासी जाहला दुर्गम।**
**जां जयाचें चुकले वर्म। सत्समागमाकडे।।२।।**

श्रीसमर्थ असे म्हणतात की, आता ईश्वरप्राप्तीच्या साधनाची म्हणजेच परमार्थाची अर्थात् शक्तिपातयोगाची स्तुती करतो. त्याचे माहात्म्य सांगतो. हा मार्ग म्हणजे साधकांचा अपूर्व ठेवा असून त्यांचे स्वतःचे हित करणारा आहे. हे स्वहित सगळ्यात श्रेष्ठ व बलवान् अशा

योगाच्या आश्रयाने होते. या योगालाच शक्तिपातयोग किंवा पंथराज असे म्हणतात. हा योग समर्थ योगांमध्ये समर्थ आहे. वास्तविक पाहता तो अगदी सुगम आहे. सहज आहे. सोपा आहे. परंतु लोकांना मात्र तो कठीण वाटतो. हा योग कठीण वाटण्याचे खरे कारण एकच आहे. सत्पुरुषांच्या संगतीचे मर्म लोक विसरून गेले आहेत. त्यांच्या संगतीमुळेच शक्तिसंक्रमण घडून येत असते.

रोकडा ब्रह्मसाक्षात्कार घडविणारा हा अत्यंत गुप्त असा मार्ग आहे हे सांगताना श्रीसमर्थ असे म्हणतात की -

**नाना साधनांचे उधार। हा रोकडा ब्रह्मसाक्षात्कार।**
**वेदशास्त्रीं जे सार। तें अनुभवास ये।।३।।**
**आहे तरी चहूंकडे। परी अणुमात्र दृष्टीस न पडे।**
**उदास परी एकीकडे। पाहतां दिसेना।।४।।**
**आकाशमार्गीं गुप्तपंथ। जाणती योगिये समर्थ।**
**इतरांस हा गुह्यार्थ। सहसा न कळे।।५।।**

परमेश्वर प्राप्तीची इतर अनेक साधने आहेत. परंतु इतर साधनांमुळे साधकाला केव्हातरी कालांतराने प्रचीती येते. इतर साधनात सर्व हिशेब उधारीचाच असतो. परंतु सद्गुरू समागमामुळे सिद्धमार्गाची प्राप्ती झाल्यावर तत्क्षणीच ब्रह्मप्राप्ती होते. या साधनमार्गात उधारीचा हिशेब नाही. रोकडा ब्रह्मसाक्षात्कार, तत्कालस्वरूपप्राप्ती व प्रत्यक्ष अनुभव हेच या मार्गाचे खरे वैशिष्ट्य आहे. परब्रह्मप्राप्ती हे वेदशास्त्राचे सार आहे. शक्तिपात होताक्षणीच ते अनुभवास येते.

परब्रह्म सर्वत्र आहे. परंतु त्याची थोडीशीही प्रचीती येत नाही. ते अलिप्त असे तत्त्व आहे. परब्रह्म सर्वव्यापी असल्यामुळे ते एकीकडेच आहे व दुसरीकडे नाही असे म्हणता येणार नाही. सहस्राररूपी आकाशात जाण्याचे म्हणजेच शिवाशी समरस होण्याचे जे अनेक मार्ग आहेत त्यातील सिद्धमार्ग हा अत्यंत गुप्तमार्ग आहे. तो समर्थ योगीच जाणतात. इतर सामान्य जनाला या सिद्धमार्गाचा गुह्यार्थ सहसा कळत नाही.

परब्रह्म कसे आहे व ते श्रीगुरुकृपेच्या शक्तिपातरूप अंजनाशिवाय कळणे कधीही शक्य नाही हे सांगताना श्रीसमर्थ पुढे असे म्हणतात की-

**साराचेंही निजसार। अखंड अक्षय अपार।**
**नेऊं न शकती तस्कर। कांहीं केल्या।।६।।**
**तयासी नाहीं राजभय। अथवा नाहीं अग्निभय।**
**अथवा श्वापदभय। बोलोंचि नये।।७।।**
**परब्रह्म ते हालवेना। अथवा ठावही चुकेना।**
**काळांतरींही चळेना। जेथिचें तेथें।।८।।**
**ऐसें तें निज ठेवणें। कदापी पालटों नेणें।**
**अथवा नव्हे अधिक उणें। बहुता काळें।।९।।**
**अथवा तें घसटवेना। अथवा तें अदृश्य होईना।**
**नातरी पाहतां दिसेना। गुरुअंजनेविण।।१०।।**
**मागां योगिये समर्थ। त्यांचाही निजस्वार्थ।**
**त्यासी बोलिजे परमार्थ। परम गुह्य म्हणोनी।।११।।**
**ज्यांहीं शोधून पाहिला। त्यांसीच अर्थ सांपडला।**
**येरां असोनी अलभ्य जाहला। जन्मोजन्मीं।।१२।।**

परब्रह्म हे साराचे सार आहे. ते अखंड, अक्षय व अपार आहे. ते कोणताही चोर केव्हाही चोरून नेऊ शकणार नाही. त्याला राजा,अग्नी किंवा श्वापद यांपैकी कशाही पासून भय नाही. हे परब्रह्म कोणालाही उचलून नेता येत नाही किंवा हलविताही येत नाही. त्याची जागा चुकली असे होत नाही. कालांतरीही त्यात फरक होत नाही. ते जेथल्या तेथेच असते. हे परब्रह्म म्हणजे स्वतःची ठेव आहे. त्यात कधीही पालट किंवा बदल होणे शक्य नाही. कालांतराने त्यात काही अधिक किंवा काही उणे असे होत नाही. त्यात घट होत नाही किंवा ते अदृश्यही होत नाही. असे हे जे परब्रह्म आहे ते श्रीगुरुकृपेच्या अंजनाशिवाय कळून येत नाही. ही श्रीगुरुकृपा म्हणजेच शक्तिपात होय. मागे जे समर्थ समर्थ योगी होऊन गेले त्यांचाही हा साधन मार्ग म्हणजे एक अपूर्व ठेवाच होता. असा हा शक्तिसंक्रमणाचा सिद्धमार्ग

हाच खरा परमार्थ होय. मात्र हा मार्ग अत्यंत गुह्य आहे. श्रीसद्गुरूंची प्राप्ती होऊन शक्तिपात दीक्षा मिळाल्यावर जे साधक साधनाभ्यास दीर्घकाल, खंड न पाडता व अगदी आदरपूर्वक दृढावस्थेला प्राप्त होईपर्यंत करतात त्यांनाच खरे तत्त्व सापडते. इतरांना सुद्धा ही तत्त्वप्राप्ती करणे शक्य असते; परंतु श्रीसद्गुरुप्राप्तीशिवाय व प्रयत्नाभावी ही तत्त्वप्राप्ती त्यांना जन्मोजन्मी होत नाही.

या साधनाची अपूर्वता कशात आहे व या साधनामुळे कोणता परिणाम होतो हे सांगताना श्रीसमर्थ पुढे असे म्हणतात की-

**अपूर्वता या परमार्थाची। वार्ता नाहीं जन्ममृत्यूची।**
**आणि पदवी सायुज्यतेची। सन्निधचि लाभे।।१३।।**
**माया विवेकें मावळे। सारासार विचारें कळे।**
**परब्रह्म तेंहि निवळे। अतंर्यामीं।।१४।।**
**ब्रह्म भासलें उदंड। ब्रह्मीं बुडाले ब्रह्मांड।**
**पंचभूतांचे थोतांड। तुच्छ वाटे।।१५।।**
**प्रपंच वाटे लटिका। माया वाटे लापणिका।**
**शुद्धआत्मा विवेका-। अंतरीं आला।।१६।।**
**ब्रह्मस्थिती बाणता अंतरीं। सदेह गेला ब्रह्मांडाबाहेरी।**
**दृश्याची जुनी जर्जरी। कुहिट जाहली।।१७।।**
**ऐसा हा परमार्थ। जो करील त्याचा निजस्वार्थ।**
**आतां या समर्थासी समर्थ। किती म्हणोनी म्हणावे।।१८।।**
**या परमार्थाकरितां। ब्रह्मादिकांसी विश्रामता।**
**योगी पावती तन्मयता। परब्रह्मीं।।१९।।**
**परमार्थ सकळांस विसांवा। सिद्ध साधु महानुभावा।**
**सेखीं सात्त्विक जडजीवा। सत्संगें करूनी।।२०।।**
**परमार्थ जन्माचें सार्थक। परमार्थ संसारीं तारक।**
**परमार्थ दाखवी परलोक। धार्मिकासी।।२१।।**
**परमार्थ तापसांसी थार। परमार्थ साधकांसी आधार।**
**परमार्थ दाखवी पार। भवसागराचा।।२२।।**

या साधनमार्गाची हीच अपूर्वता व हेच आश्चर्य आहे की, इतर कोणत्याही साधनात न सापडणारा असा गुण यात आहे. या साधनामुळे जन्ममृत्यूची वार्ताच नाहीशी होते आणि सायुज्य मुक्ती तत्काळ प्राप्त होते. नित्यानित्यविवेक उत्पन्न होऊन माया मावळून जाते. संसार असार असून परब्रह्म सार आहे असा विचार अंतःकरणात बिंबून जातो. हृदयामध्ये परब्रह्म आपणहून प्रकट होऊन स्थिर होते. सर्वत्र ब्रह्म भरून राहिले आहे असा साक्षात्कार होतो. सर्व ब्रह्मांड ब्रह्मात बुडून गेले आहे असे वाटते. पंचमहाभूतांमुळे भासणारा संसार तुच्छ व असार आहे असे वाटते. प्रपंच खोटा वाटतो. माया ही व्यर्थ, पोकळ व मिथ्या आहे असे अनुभवास येते. विवेकज्ञान आपोआप उत्पन्न होऊन शुद्ध आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होऊन ते अंतरात ठसून जाते. या साधनाने ब्रह्मज्ञान अंतःकरणात बाणून जाते. त्यामुळे संशय पूर्णपणे नाहीसा होऊन ब्रह्मांडाबाहेर जातो. या साधनामुळे जगरूपाने दिसणारी जुनीपुराणी गोधडी फाटून तुटून नाश पावते व सर्व दोषांची निवृत्ती होऊन निखळ ब्रह्मतत्त्व उरते.

असे हे साधन आहे. जो साधन करतो त्याला अपूर्व ठेवा प्राप्त होतो. याकरिता हे साधन सर्व समर्थ साधनात समर्थ आहे. या साधनाची महती व थोरवी कितीही गायिली तरी थोडीच आहे.

या साधनमार्गामुळेच ब्रह्मादिदेवांना विश्रांती मिळते व योगी लोकांना परब्रह्माशी तद्रूपता प्राप्त होते. असा हा साधनमार्ग सकळांना विसावा देणारा व मनाला शांती देणारा आहे. या साधनाच्या जोरावर सिद्ध, साधू व महानुभाव आपल्या निजपदावर आरूढ होऊन समाधानी झाले. एवढेच नव्हे; तर जे सात्त्विक परंतु जडमूढ आहेत असे अनेक जीव सत्संगाने अनुग्रह प्राप्त होऊन तरून जातात.

श्रीसद्गुरुकृपेने शक्तिसंक्रमण होऊन साधनाने परब्रह्मप्राप्ती होणे हेच खरे जन्माचे सार्थक आहे. या साधनामुळे साधक संसार तरून जातो. धार्मिक लोकांना उन्नतीचा मार्ग या साधनामुळेच प्राप्त होतो. तपस्वी लोकांचा व साधकांचा हे साधन हाच एकमेव आधार व

थारा असतो; कारण या साधनामुळेच भवसागराच्या पैलतीराला जाता येते.

या साधनामुळे जन्म सार्थक होतो हे सांगताना श्रीसमर्थ शेवटी असे म्हणतात की-

**परमार्थी तो राज्यधारी। परमार्थ नाहीं तो भिकारी।**
**या परमार्थाची सरी। कोणास द्यावी।।२३।।**
**अनंत जन्मींचें पुण्य जोडे। तरीच परमार्थ घडे।**
**मुख्य परमात्मा आतुडे। स्वानुभवासी।।२४।।**
**जेणें परमार्थ वोळखिला। तेणें जन्म सार्थ केला।**
**येर तो पापी जन्मला। कुळक्षयाकारणें।।२५।।**

असे साधन ज्या साधकांना मिळते ते खरोखर स्वानंदरूपी राज्याचे चक्रवर्ती राजेच होत असे म्हटले पाहिजे. ज्यांना अशा रीतीने श्रीगुरुकृपादृष्टियुक्त साधन मिळत नाही ते खरोखरीच भिकारी होत. असे असल्याने या साधनाची बरोबरी इतर दुसऱ्या कोणत्याही साधनांना करता येणार नाही.

अनंत जन्मीचे पुण्य असेल तरच हे साधन मिळून भगवत्प्राप्ती होते. श्रीगुरुकृपा झाल्याशिवाय भगवत्प्राप्तीची वाटचालही सुरू होत नाही; मग प्राप्ती तर दूरची गोष्ट आहे. श्रीगुरुकृपा ही स्वानुभवाची व प्रचीतीची गोष्ट आहे. ती प्राप्त झाल्यावर परमात्म्याच्या प्राप्तीला उशीर होत नाही हे अगदी सत्य आहे.

जो मनुष्य या साधनाची किंमत जाणतो व जीवेप्राणे हे साधन करतो त्यानेच आपला जन्म सार्थक केला असे म्हणता येते. बाकीच्या साधना करणाऱ्या किंवा कोणतेही साधन न करणाऱ्या लोकांचे जन्म फुकट होत. अशी जी साधन न करणारी पापी माणसे जन्माला येतात ती कुलक्षयालाच कारणीभूत होतात.

येथपर्यंत शक्तिपातयोगाचे माहात्म्य काय आहे ते पाहिले. साधकाने वरील सर्व विवेचन ध्यानात घेऊन श्रीकृष्णांनी अर्जुनाचे निमित्त करून हा जो अपूर्व साधनमार्ग सांगितला आहे त्यावरून मार्गक्रमण

करण्यास सुरुवात केली पाहिजे; कारण शक्तिपात झाल्याशिवाय म्हणजेच कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय ब्रह्मप्राप्तीच्या मार्गाची वाटचाल सुरू होत नाही. सारांश, शक्तिपातयोगाचा स्वीकार करून शक्तीची साधना करीत करीत शिवभावाची प्राप्ती करून घेऊन जीवन कृतकृत्य करणे यातच मनुष्य जीवनाची सार्थकता आहे.



# - आधार पाचवा -

## ★शक्तिपातयोगाच्या विविध नावांचे रहस्य★

**१) सिद्धमार्ग २) सिद्धयोग ३) महायोग**
**४) सहजयोग ५) शक्तिपातयोग ६) भक्तियोग**
**७) क्रियायोग ८) श्रीगुरुदत्तयोग**

मनुष्य जीवनाचे सार्थक करणारा एकमेवाद्वितीय असा जो शक्तिपातयोगमार्ग आहे त्याची विविध नावे मागील आधारात आपण पाहिली. त्या नावातील रहस्य समजले म्हणजे शक्तिपातयोग कशाला म्हणतात ते सहज समजून येईल.

**सिद्धमार्ग :-**

शक्तिपातयोग हा सिद्धमार्ग आहे. सिद्धमार्ग म्हणजे सिद्ध असा मार्ग. राजमार्गासारखा अगदी तयार असा रस्ता. राजमार्गावरून चालताना माणसाला कष्ट पडत नाहीत. त्रास होत नाही. तो इच्छितस्थळी सुखकारकपणे पोहोचतो. एकदा राजमार्ग मिळाला की, इतर आडवेतिडवे फाटे फुटत नाहीत. मार्ग चुकण्याची भीती नाहीशी होते. चालण्याच्या गतीतील फरकामुळे मुक्कामाला पोहोचण्याची वेळ जरी निश्चित नसली तरी सुद्धा आपण इष्टस्थळी खचित पोहोचणार याची खात्री असल्यामुळे मन समाधानी व शांत असते.

जी गोष्ट राजमार्गाची तीच सिद्धमार्गाची. ज्याप्रमाणे राजमार्ग सामान्यांपासून असामान्यांपर्यंत इष्ट, सुखकारक व फलदायी ठरतो त्याचप्रमाणे सिद्धमार्गही ठरतो. सिद्धमार्गाने जाताना साधकाच्या मनाला एक अपूर्व निश्चिंतता असते. वाट चुकण्याची भीती मनाला कधीही शिवत नाही. कारण "**इये अभ्यासीं जे दृढ होती। ते भरंवसेनि ब्रह्मत्वा येती।। श्रीज्ञानेश्वरी ६.३३०।।**" असे आश्वासन श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी दिले आहे. या मार्गाने विनासायास योगाची प्राप्ती होते. योग प्राप्त झाला की ज्ञान मिळते. ज्ञानामुळे मुक्ती मिळते.

श्रीशंकरानी हा मार्ग स्वत: सिद्ध करून ठेवला आहे. मुलाचे सर्व दृष्टीने कल्याण व्हावे, त्याची उन्नती व्हावी व तो खूप मोठा व्हावा म्हणून आई लहानपणापासून त्याची सर्वतोपरी काळजी घेते. प्रत्येक गोष्ट त्याच्यासाठी सिद्ध ठेवते. मुलाला स्वत:ला काहीही करावे लागत नाही. तो आईने तयार करून ठेवलेल्या गोष्टींच्या साहाय्याने पुढे जात असतो. त्याचप्रमाणे श्रीशंकरांनी जीवाच्या उद्धारासाठी, त्याच्या उन्नतीसाठी व त्याला स्वत:चे साम्य मिळावे म्हणून हा योगमार्ग सिद्ध करून ठेवला आहे. त्यामुळे हा मार्ग मिळाला की साधकाला स्वत:ला काहीही करावे लागत नाही.

जीवाला कर्मसाम्यदशा प्राप्त झाली की श्रीशंकर श्रीसद्गुरुरूपाने साधकाला आपोआप भेटून त्याला हा सिद्धमार्ग प्राप्त होतो, श्रीशंकारांच्यापासून परंपरेने प्राप्त झालेली ही सिद्धविद्या, हे सिद्धज्ञान किंवा हा सिद्धमार्ग श्रीसद्गुरू शिष्याला देतात. त्यामुळे शक्तिसंचार होऊन तत्काळ कुंडलिनीशक्ती जागृत होते. त्यानंतर क्रमश: उन्नती होऊन योगाची, ज्ञानाची व मोक्षाची प्राप्ती होते.

हा योगमार्ग आपोआप कसा प्राप्त होतो हे पुढील उदाहरणावरून अधिक स्पष्ट होईल. एखादा मनुष्य भुकेने व्याकूळ झालेला असताना स्वत: परिश्रम करून जेवण करण्याची त्याला शक्यता नसते. अशा वेळी एखाद्या अन्नदात्याच्या कृपेने त्याला आयते जेवण करून मिळाले तर निरतिशय आनंद होतो. कारण त्याला कसलीही तयारी करावी लागत नाही. ताटात वाढलेले जेवणे एवढेच त्याचे काम असते. त्याला स्वत:ला स्वयंपाक तयार करण्याचे श्रम करावे लागत नाहीत. डाळ, तांदूळ, भांडी, पाणी, अग्नी इत्यादींबद्दलचा विचार करण्याचे त्याला कारणही पडत नाही. तो निश्चिंतपणे जेवण करून क्षुधानिवृत्ती करतो. कोणत्याही प्रकारच्या परिश्रमाची आवश्यकता त्याच्या बाबतीत राहत नाही.

अगदी याच प्रमाणे सिद्धमार्ग प्राप्त झाल्यावर होते. श्रीसद्गुरू सिद्ध असा योग साधकाला देतात. साधकाचे काम एवढेच की,

त्याने डोळे मिटून स्वस्थ बसावयाचे. त्यावेळी जप, नामस्मरण, मनन, चिंतन, पठण, ध्यान, मन मुद्दाम एकाग्र करणे, चित्तवृत्तींचा निरोध करणे इत्यादि काहीही करावयाचे नाही. जे काही होईल ते फक्त साक्षी होऊन पाहावयाचे. अशा प्रकारे साधकाने आत्मनिवेदन केल्याबरोबर श्रीसद्गुरुकृपेने मूलाधारात निवास करणाऱ्या आधाररूपी कुंडलिनी शक्तीचे उद्बोधन म्हणजेच जागरण घडून येते. त्यामुळे हठयोग, मंत्रयोग, लययोग इत्यादि सर्व योग स्वाभाविक रीतीने आपोआप साधू लागतात. हे योग मुद्दाम स्वतंत्र रीतीने व अस्वाभाविकपणे करण्याचे कारणच उरत नाही. आसन, मुद्रा, प्राणायाम, जप, अनुष्ठान, ध्यान, धारणा इत्यादि कोणतीही क्रिया स्वतःहून करण्याचे कारण उरत नाही. सर्व प्रकारच्या योगांचा व उपासनांचा अंतिम हेतू कुंडलिनी शक्ती जागृत करणे हाच असतो. हा हेतू केवळ श्रीगुरुशक्तीच्या प्रभावाने कुंडलिनी शक्ती जागृत होऊन आपोआप साध्य होतो व साधकाला अगदी स्वाभाविक रीतीने योगमार्गाचा लाभ होतो.

सिद्धमार्गाचा दुसरा अर्थ सिद्धांचा मार्ग किंवा सिद्ध होण्यासाठी मार्ग असा आहे. या दृष्टीने शक्तिपातयोग हाच एकमेव सर्वश्रेष्ठ असा मार्ग आहे असे म्हणण्याचे कारण "**आत्मविद थोरावले। येणेंचि पंथें।। श्रीज्ञानेश्वरी ६.१५६।।**" असे श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीत**" अगदी निक्षून सांगितले आहे. त्यामुळे ज्या साधकाला सिद्ध होण्याची इच्छा आहे त्याला या मार्गाची कास धरण्याशिवाय गत्यंतर नाही. श्री.विवेकानंदानी आपल्या "**राजयोग**" ग्रंथाच्या चवथ्या प्रकरणात या दृष्टीने अत्यंत उद्बोधक विवेचन केले आहे. त्याचा शेवट करताना ते असे म्हणतात की, "संपूर्ण ज्ञान व संपूर्ण चैतन्य यांची प्राप्ती करून घेण्याकरिता कुंडलिनी जागृत करणे हा एकच उपाय आपणांस उपलब्ध आहे. .........सर्व सुखांची जननी प्राणशक्ती कुंडलिनी तुमच्या जवळच आहे. तिची आराधना करा. तिला आळवा. तिचे दूध तुम्हास मिळाले तर अनंत काळापासून तुम्हास लागलेली क्षुधा तत्क्षणीच शांत होईल."

**सिद्धयोग :-**

ज्या अर्थाने शक्तिपातयोगाला सिद्धमार्ग म्हटले जाते त्याच अर्थाने त्याला सिद्धयोग असेही म्हटले जाते. हा योग मुळात सिद्ध करून ठेवला असल्यामुळे त्याच्या प्राप्तीत सर्व साधनांच्या साराची प्राप्ती आहे याचा साधन करताना साधकाला पदोपदी अनुभव येतो. या दृष्टीने "**अनुभवामृतातील**" श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांची एक ओवी बोधप्रद आहे.

**जो भेटलियासवे। पुरती उपायांचे धावे।**
**प्रवृत्तिगंगा स्थिरावे। सागरीं जिये।।२-८।।**

श्रीसद्गुरूंची भेट झाली की, त्यांच्या कृपेने शक्तिपातयोगाची दीक्षा मिळते. त्यामुळे ब्रह्मप्राप्तीच्या इतर उपायांकडे धावण्याची किंवा त्यासाठी नानाप्रकारची साधने करण्याची प्रवृत्ती बंद पडते. नदी सागराला मिळाली की, तिचे वाहणे आपोआप बंद पडते. त्याचप्रमाणे श्रीसद्गुरूंची प्राप्ती झाल्यावर शक्तिसंक्रमण होऊन शक्ती जागृत होते. एकदा ही प्रक्रिया घडून आली की, त्यामुळे इतर सर्व साधने आटून जातात. या दृष्टीने म.म.श्री.गोपीनाथ कविराज यांनी "**भारतीय संस्कृति और साधना**" या ग्रंथाच्या पहिल्या खंडात "**कुंडलिनी तत्त्व**" या लेखात मोठे उद्बोधक विचार मांडले आहेत. तेथे ते असे म्हणतात की-

**"कुंडलिनी-शक्तिके उद्बोधनके बिना जीव की ऊर्ध्वगति नहीं हो सकती। अरणि-मंथन करनेसे जिस प्रकार अग्नि प्रज्वलित की जाती है, अर्थात् अरणिस्थ सुप्त अग्नि जिस प्रकार संघर्षणसे उद्दीप्त होती है, उसी प्रकार साधन-प्रणाली द्वारा प्रसुप्त कुंडलिनी को जगाना पडता है। अग्नि जिस प्रकार प्रकट होते ही इंधन (काष्ठादि) को दग्ध करती है, उसी प्रकार कुंडलिनीके चैतन्य होनेपर साधना विलुप्त हो जाती है। बाह्य साधनामात्र अर्थात् विचार, भक्ति या हठ किंवा मंत्रयोगादि यह संपूर्ण उपासना पुरुषाकारसापेक्ष अथवा कर्तृत्त्वाभिमानजन्य है। यह कर्तृत्त्वबोध**

**क्रमसे कुंडलिनी चैतन्यके समयमें लुप्त हो जाता है। और कर्तृत्त्वबोध के लुप्त होनेसे कुंडलिनी अधिक जागृत होती है। जिस समय एक बार कुंडलिनी चेतन होने लगती है, उस समय स्वभाव के नियमसे ही सब कार्य स्वयं ही होते जाते हैं। जिस प्रकार अनुकूल स्त्रोत में नौका छोड देने पर उसको समुद्रमें पहुँचानेके अन्य प्रयत्न करने की आवश्यकता नहीं होती, उसी प्रकार कुंडलिनी के जगाने से और उसके प्रवाह में प्राण वा मनको डाल देनेसे जीव को ब्रह्मावस्था प्राप्त करने के लिए पृथक् उपाय करने की आवश्यकता नहीं रहती। संचारित शक्ति की न्यूनाधिकता एवं संचित वासनादिकों की गाढता के तारतम्य के कारण अवश्य "स्त्रोत-आपन्न" अवस्था नाना प्रकारकी होती है। (लेकिन) संकोच शक्ति अथवा उर्ध्वबिंदुस्थित आकर्षणशक्ति के प्रभाव में अंतर्मुखगति क्रमशः वृद्धिंगत होती है, और अंतमें साम्यावस्था स्थिर हो जाती है।"**

कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय जीवाची ऊर्ध्वगती कधीही सुरू होत नाही. अरणी-मंथन करून सुप्त असलेला अग्नी प्रज्वलित केला जातो. अर्थात् घर्षण करून अरणीमध्ये सुप्त असलेला अग्नी उद्दीप्त केला जातो. त्याचप्रमाणे साधन-प्रणाऴींच्या द्वारा झोपलेल्या कुंडलिनी शक्तीला जागृत करणे आवश्यक ठरते. ज्याप्रमाणे अग्नी प्रकट झाल्यावर तो काष्ठादि इंधन संपूर्णपणे जाळून टाकतो त्याचप्रमाणे कुंडलिनी चैतन्यमय झाल्यावर सर्व साधना आपोआप संपुष्टात येते. विचार, भक्ती, हठ, मंत्रयोग इत्यादि सर्व बाह्यसाधना किंवा संपूर्ण उपासना इत्यादि ती करणाऱ्या साधकांवर अवलंबून असून त्यामध्ये आपण अमुक प्रकारची साधना करतो असा कर्तृत्त्वाचा अभिमान असतो. हा जो कर्तृत्त्वाचा अभिमान, अंहकार व जाणीव आहे ती कुंडलिनी शक्ती चैतन्यमयी झाल्यावर क्रमाक्रमाने लोपून जाते आणि जसजसा कर्तृत्त्वाचा अंहकार लुप्त होत जाईल तसतशी शक्तीची जागृती अधिकाधिक होत जाईल. एकदा का ही कुंडलिनी शक्ती जागृत होऊ लागली की, अगदी स्वाभाविक नियमाप्रमाणे सर्व कार्य

स्वतः आपोआप होऊ लागते. ज्याप्रमाणे नदीच्या अनुकूल प्रवाहात नौका सोडल्यावर ती समुद्रात पोहोचण्यासाठी अन्य कोणतेही प्रयत्न करण्याची आवश्यकता राहत नाही, त्याचप्रमाणे कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर व तिच्या प्रवाहात मन किंवा प्राण सोडून दिल्यावर जीवाला ब्रह्मावस्था प्राप्त करण्यासाठी निराळा उपाय करण्याची कोणतीही आवश्यकता राहत नाही. संचारित शक्ती कमी-जास्त झाल्याने व संचित वासनांची दृढता निरनिराळी दिसून येत असल्याने या शक्तिपातयोगप्रवाहातून वाहत जाणाऱ्या प्रत्येक साधकाची अवस्था निरनिराळ्या प्रकारची दिसून येते. असे असले तरी संकोचशक्तीच्या किंवा ऊर्ध्वबिंदूमध्ये असलेल्या आकर्षण शक्तीच्या प्रभावामुळे जीवाची-मनाची-अंतर्मुखता हळूहळू क्रमाक्रमाने वाढत जाते आणि शेवटी साम्यावस्था प्राप्त होते.

**महायोग :-**

शक्तिपातयोगाला महायोगही म्हणतात. महायोग म्हणजे सर्व योगातील सर्वश्रेष्ठ असा योग होय. या भूतलावर या योगापेक्षा दुसरा श्रेष्ठ योग नाही; कारण या एकाच योगात इतर सर्व योगांचा व उपासनांचा समावेश झाला आहे. एवढेच नव्हे; तर इतर कोणत्याही साधनात शक्ती जागृत होऊन अनुभव येण्यास व फलप्राप्ती होण्यास खूप वेळ लागतो. महायोगामुळे मात्र कुंडलिनीशक्तीजागृतीचे फल तत्काळ मिळून नाना तऱ्हेचे दिव्य अनुभव साधकाला येऊन ब्रह्मप्राप्ती अगदी सुलभ व सुकर होते. मनुष्य जीवनाची जेवढी अंगे आहेत तेवढी या महायोगामुळे संपन्न झालेली दिसून येतात. हे खरे असले तरी वैराग्य, शमदमादि साधनसंपत्ती, विचार, संतोषादि दैवीगुण, नित्यानित्यवस्तुविवेक व प्रातिभ ज्ञान हे जसजसे साधन तीव्र होत जाईल तसतसे आतून प्राप्त होते हे या महायोगाचे सर्वात मोठे वैभव आहे.

**"योगशिखोपनिषदात"** महायोग कशाला म्हणतात हे सांगताना असे म्हटले आहे की -

**मन्त्रो लयो हठो राजयोगान्तर्भूमिकाः क्रमात्।**
**एक एव चतुर्धाऽयं महायोगोऽभिधीयते।।१२९।।**

मंत्र, लय, हठ व राजयोग या एकाच योगाच्या चार आंतरभूमिका आहेत. वरील चार प्रकारात हा योग विभक्त असला तरी तो एकच योग आहे. शक्तिपातयोगामध्ये या चारही योगांचा समावेश होत असल्याने त्याला महायोग असे म्हणतात. महेश्वरांनी हा स्वतः सांगितला म्हणून याला महायोग हे नाव मिळाले.

सर्व साधारण मनुष्य हठयोग, मंत्रयोग, लययोग व राजयोग हे चारही योग भिन्नभिन्न आहेत असे समजतो. परंतु वास्तविक स्थिती अशी नाही; कारण कुंडलिनीशक्ती जागृत झाल्यावर हे चारही योग साधकाला स्वतः होतात. हे सर्व योग ज्या अपूर्व योगाने आपोआप होऊ लागतात त्यालाच महायोग असे म्हणतात.

ज्यावेळी साधकाला एखाद्या अत्यंत शक्तिमान् श्रीगुरूंचा अनुग्रह होतो किंवा त्याचे पूर्वपुण्य उदयाला येऊन संचित पापाचा नाश होतो व सदिच्छा जागृत होते तेव्हा त्याला कल्पनातीत विषयाचा अनुभव येऊ लागतो. मात्र जोपर्यंत बुद्धी मंद असते, मनावर अनेक दुष्ट संस्कारांचा थर असतो, अनेक वासनांनी चित्त लिडबिडलेले असते, अज्ञानांधकाराची तीव्रता असते व संस्कारचक्राच्या प्रवाहात युगानुयुगे वाहत जाण्यातच बरे वाटते तोपर्यंत प्रत्यक्ष ब्रह्मदेव जरी आला तरी तो माणसाचे काहीही कल्याण करू शकत नाही. मात्र पुनःपुन्हा भोग भोगता एक वेळ अशी येते की, भोगाचे सामर्थ्य नाहीसे होते व इच्छाही नाहाशी होते. निसर्गाचा नियमच असा आहे की, अशा प्रकारे ज्यावेळी भोगाची वृत्ती पूर्ण होते त्यावेळी स्वाभाविकपणेच मन अंतर्मुख होण्याला सुरुवात होते. ही खरी निवृत्तीची सुरुवात असते. अनंत जन्म भोगविलास इत्यादि भोगून झाल्यावर प्रत्येक मनुष्याच्या जीवनात असा एक दिवस उजाडतो की, त्यावेळी निवृत्ती मार्गाचे द्वार उघडून त्याच्या अध्यात्म्य जीवनाच्या वाटचालीला मार्ग मोकळा होतो. हा मार्ग त्याला श्रीसद्गुरुकृपेनेच मिळतो. या मार्गालाच महायोग असे म्हणतात.

**सहजयोग :-**

शक्तिपातयोगाला सहजयोग असेही म्हटले जाते. सहजयोग म्हणजे सोपा असा योग किंवा सहजपणे साधणारा योग. या योगात अवघड असे काहीही नाही. जे काही या योगात आहे ते सर्व सोपे, साधे, सरळ व स्वाभाविक असे आहे. या योगात अस्वाभाविक असे काहीही नाही. मुद्दाम बलपूर्वक एकही गोष्ट या योगात करावी लागत नाही. शक्तिजागृतीमुळे प्रत्येक गोष्ट स्वभावत:च होऊ लागते. त्यामुळे हा योग अनायास साध्य होतो. सर्व क्रियादि गोष्टी आपोआप होत असल्याने हा योग सर्व योगात सुखकर आहे याचा अनुभव येतो.

सहजयोगामध्ये साधकाला कोणत्याही आपत्तीची शंका नसते. शक्ती जागृत झाली की, सर्व शरीर किंवा मान गोलाकार फिरणे, मागेपुढे डोलणे, तोंडातून नाना तऱ्हेचे शब्दोच्चार होणे, हसणे, रडणे, निद्रा येणे, शरीर कंप पावणे, मूर्च्छा येणे, शरीर मागे अथवा पुढे पडणे, घाम येणे, रोमांच येणे, मन अत्यंत प्रसन्न व आनंदित होणे, निरनिराळ्या तऱ्हेची आसने, बंध, मुद्रा, प्राणायाम होणे, प्रकाश दिसणे, निरनिराळ्या देवतांची व दृश्यांची दर्शने होणे इत्यादिंपैकी कोणतीही क्रिया होऊ लागली तर ती होऊ देणे इष्ट ठरते; कारण ती सहजपणे व स्वाभाविकरीतीने होत असते. या क्रिया होऊ लागल्यावर त्यांना रोखता कामा नये. किंवा या व इतर दुसऱ्या कोणत्याही क्रिया झाल्या तरी घाबरण्याचे कारण नाही; कारण ज्याप्रमाणे झोप आल्यावर झोपणे, भूक लागल्यावर जेवणे व शौचमूत्राचा वेग आल्यावर त्या पासून निवृत्त होणे या गोष्टी प्रकृतीला हितकारक ठरतात त्याचप्रमाणे वरील गोष्टी केल्याने मनाला आनंद होतो व चित्ताला सुख लाभते.

मात्र वरील गोष्टी वेळच्या वेळी केल्या नाहीत तर त्यापासून त्रास झाल्याशिवाय राहत नाही; कारण स्वाभाविक होण्याऱ्या गोष्टीत अडथळा आणला की, त्याची प्रतिक्रिया उमटल्याशिवाय राहणार

नाही. झोपणे, जेवणे, मलमूत्र त्याग करणे इत्यादि स्वाभाविक गोष्टी वेळच्या वेळी न केल्यास त्यामुळे अनिष्ट घडून येण्याचा संभव असतो. एखाद्या माणसाला खूप दुःख झाल्यावर त्याला रडू देणेच इष्ट ठरते. त्याच्यावर दडपण आणून त्याचे दुःख व रडणे दाबून टाकले तर त्याची मानसिक स्थिती बिघडण्याचा संभव असतो. मात्र शोक झाल्यावर मनसोक्त रडण्याने माणसाचे दुःख हलके होऊन त्याला खूप मोकळे वाटते.

वरील सर्व विवेचन सहजयोगाला पूर्णांशाने लागू पडते. श्रीगुरुशक्तीचे संक्रमण झाले की, शक्ती ऊर्ध्वगामी होते. त्यामुळे वर वर्णन केलेल्या नाना प्रकारच्या क्रिया होतात. त्या अगदी स्वाभाविक असतात. त्या उत्पन्न झालेल्या क्रियांना साधकाने अडथळा आणला तर त्याचे मन अशांत होते. चित्त अस्वस्थ बनते. अशा वेळी साधकाने क्रियांना मोकळेपणी वाव देणे हेच सर्वोतोपरी इष्ट व हितकारक असते. साधनाला बसल्यावर शक्तीकडून आतून जे आपोआप होईल ते निःशंकपणे होऊ देणे व त्या क्रियांना शरीर समर्पण करणे यातच सहजयोगाचे सार आहे.

सहजयोगाचे हे वैशिष्ट्य आहे की, श्रीसद्गुरुकृपेने एकदा साधन सुरू झाले की, विशेष कष्ट व प्रयत्न करावे लागत नाहीत. श्रीसद्गुरूजवळ राहून आसन, मुद्रा, प्राणायाम इत्यादि गोष्टी स्वतंत्रपणे शिकण्याचे कारण उरत नाही. या योगाला शक्तीकडून सर्व क्रिया होत असल्यामुळे साधकाला कधीही चुकण्याची व त्रास होण्याची भीती राहत नाही.

सहजयोगाचे हे वैशिष्ट्य श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीच्या**" बाराव्या अध्यायात पुढील प्रमाणे सांगितले आहे.

**परी मनें वाचा देहें। जैसा जो व्यापारु होये।**
**तो मी करीतु आहें। ऐसें न म्हणें।।११७।।**
**करणें कां न करणें। हें आघवें तोचि जाणे।**
**विश्व चळतसे जेणें। परमात्मेनि।।११८।।**

**उणेयापुरेयाचें कांहीं। उरों नेदीं आपुलिया ठायीं।**
**सजातचि करूनि घेईं। जीवत्व हें।।११९।।**
**माळियें जेउतें नेलें। तेउतें निवांतचि गेलें।**
**तया पाणिया ऐंसे केलें। होआवें गा।।१२०।।**
**म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ति। इयें वोझीं नेघें मती।**
**अखंड चित्तवृत्ति। माझ्या ठायीं।।१२१।।**
**येऱ्हवी तरी सुभटा। उजू का अव्हांटा।**
**रथ काई खटपटा। करीत असे।।१२२।।**
**आणि जें जें कर्म निपजे। तें थोडें बहु न म्हणिजे।**
**निवांतचि अर्पिजे। माझ्या ठायीं।।१२३।।**
**ऐसिया मद्भावना। तनुत्यागीं अर्जुना।**
**तूं सायुज्यसदना। माझिया येसी।।१२४।।**

साधन करताना मन, वाणी व शरीर यांच्याकडून जसा व जो व्यापार होईल तो मी करीत आहे असे साधकाने म्हणता कामा नये; कारण या क्रिया अगदी सहज होत असतात. परमात्मा या विश्वाचा चालक आहे. त्याच्या इच्छेने विश्वातील सर्व घडामोडी होत असतात. म्हणून कर्म करणे किंवा न करणे हे त्यालाच माहीत असते. साधनात कोणत्या क्रिया व्हाव्यात व कोणत्या होऊ नयेत हे परमेश्वरच ठरवीत असतो. त्यामुळे त्या सर्व क्रियात सुसूत्रता व सहजता असते. अमुक क्रिया कमी झाली किंवा अमुक क्रिया जास्त झाली या विषयी साधकाने काही एक मनात राहू देता कामा नये किंवा त्याविषयी मनात खेदही बाळगता कामा नये. ज्याप्रमाणे माळी नेईल तिकडे पाणी हे निवांतपणे जाते त्याप्रमाणे मनातील कर्तृत्वाभिमान टाकून साधन सहजपणे होऊ दिले पाहिजे. असे झाले म्हणजे प्रवृत्तिनिवृत्तीचे ओझे बुद्धीवर पडत नाही. अमुक चांगले किंवा अमुक वाईट हा भेद उरत नाही. त्यामुळे चित्तवृत्ती माझ्या ठायी अखंड राहते. वाट सरळ आहे किंवा वाकडी आहे याविषयी रथाला काही काळजी असते का? जिकडे त्यास न्यावे तिकडे तो जातो. त्याप्रमाणे ज्या ज्या क्रिया

होतील व जे जे कर्म होईल ते थोडे किंवा पुष्कळ आहे असे न म्हणता एकनिष्ठेने मला अर्पण कर. साधनाचा अभिमान धरू नकोस. या प्रमाणे भावना करून साधन करीत राहिले असता देहपातानंतर तू माझ्या ऐक्यरूपी मंदिरात प्राप्त होशील. अशा रीतीने कर्तृत्व सोडून साधन केले असता भोक्तृत्वही नाहीसे होऊन जीव कर्तृत्व-भोक्तृत्वरहित असा ब्रह्मस्वरूप होतो.

**शक्तिपातयोग :-**

सिद्धमहायोगाला योगाच्या परिभाषेत "**शक्तिपातयोग**" असे म्हणतात. शक्तिपात म्हणजे शक्तीचा ऱ्हास नव्हे; तर श्रीसद्गुरूंच्या द्वारे भगवंताचा अनुग्रह किंवा कृपा याला शक्तिपात असे म्हणतात. श्री.प.प.श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराजांनी आपल्या "**शक्तिपात**" या पुस्तकात "**तत्पातः शिष्येषु**"।।७।। व "**ततःशक्त्युद्बोधनम्**"।।८।। या दोन सूत्रांनी ही शक्तिपाताची प्रक्रिया स्पष्ट केली आहे. शिष्यावर शक्तीचा पात होतो, असा पहिल्या सूत्राचा अर्थ आहे. गुरुजन शिष्याच्या अध्यात्मिक उन्नतीसाठी, कल्याणासाठी, ज्ञानप्राप्तीसाठी व कैवल्य-प्राप्तीसाठी आपल्या जवळील दिव्य शक्तीचा शिष्यावर पात करतात. त्यामुळे शिष्याची शक्ती जागृत होते, असा दुसऱ्या सूत्राचा अर्थ आहे. प्रत्येक मनुष्याची अध्यात्मिक शक्ती सुप्तच असते. ती जागृत झाल्यावर तिचे स्वरूप कसे आहे याचा अनुभव येऊ लागतो. शिष्याची शक्ती जागृत करणे यालाच शक्तिपात असे म्हणतात.

"**जीवनमुक्तिविवेक**" या ग्रंथावर श्री. अच्युतराय मोडक यांनी जी टीका लिहिली आहे त्यात शक्तिपातासंबंधीचे उत्कृष्ट विवेचन केले आहे त्यात ते असे म्हणतात की-

"शिष्याचे कर्मसाम्य असले तरच शांभवी शक्ती तेथे संक्रांत होते. श्रीमन्माधवाचार्यांनी आपल्या टीकेतही हे सप्रमाण सांगितले आहे. प्राणिमात्राचे पूर्वजन्मातील कर्म (धर्माधर्मरूप) समान असताना एका क्षणात सर्वपाशच्छेदक शांभवी-शक्तिपात-दीक्षा श्रीगुरूंच्या फक्त दयार्द्र दृष्टीने होते. आगमातही असेच सांगितले आहे. अधर्म व

धर्माचे समत्व असताना शंभूची ज्ञानात्मिका श्रेष्ठ शक्ती शिष्यदेहात संक्रांत होते. येथील खरा अर्थ असा आहे की, श्रीगुरू व शिष्य यांचे धर्माधर्म समान झाले की, शिवाची परमशक्ती अधिकारी शिष्याच्या ठिकाणी चाक्षुष्यादि दीक्षासाधनद्वारा परमेश्वराचे ज्ञान करून देण्यासाठी प्रेरिली जाते. हाच शक्तिपात होय.

येथे एक अशी शंका घेतली जाईल की, शक्ती या शब्दाने तर केवळ अद्वैत चैतन्य हेच अभिप्रेत आहे. ते स्वरूपभूत, अनंत व अमूर्त आहे. त्यामुळे तिचा पात-पतन अशक्य व असंभव आहे आणि जर शक्ती ही स्वस्वरूपाहून भिन्न व दुसरीच गोष्ट असेल तर तिला ज्ञानात्मिका व परा ही विशेषणे लावणे व्यर्थ होय.

परंतु ही शंका योग्य नाही; कारण शक्ती म्हणजे चैतन्य शक्तीच होय. ती अद्वैतरूप, परमेश्वरस्वरूपभूत व सर्वगत आहे. असे शक्तीचे स्वरूप असल्यामुळे तिचे पतन होते हे म्हणणे अगदी औपचारिक आहे. शक्तीचा पात ही गोष्ट अगदी असंभव आहे. परंतु शिष्याचे चैतन्य नानाविध पाशजालाने झाकलेले असते. ते आवरण दीक्षा-संस्काराने दूर करून चिच्छक्ती प्रकट करणे यालाच पात असे म्हणतात. वरून खाली येणे म्हणजे पतन हे या चिच्छक्तीला संभवत नाही म्हणून आगमात असे वर्णिले आहे की-

**व्यापिनी परमा शक्तिः पतितेत्युच्यते कथम् ?**
**ऊर्ध्वादधोगतिः पातो मूर्तस्यासर्वगतस्य च।।**
**सत्या सा व्यापिनी नित्या सहजा शिववत् स्थिता।**
**किन्त्वियं मलकर्मादि पाशबद्धेषु संवृता।।**
**पक्वदोषेषु सुव्यक्ता पतितेत्युपचर्यते।।**

ती परमशक्ती सर्वव्यापिनी आहे. मग तिला पतित होते किंवा पडते असे का म्हटले जाते? साकार व परिच्छिन्न पदार्थच वरून खाली पडू शकतो. म्हणजे जो पदार्थ एकदेशीय व मूर्तिमान असून सर्वव्यापक नाही तो वरून खाली पडला म्हणजे त्या पदार्थाच्या पडण्याला पात किंवा पतन असे म्हणतात. परंतु ती शक्ती सर्व

व्यापिनी आहे. ती शिवाप्रमाणे सर्वत्र राहणारी व सहज आहे. परंतु शक्ती मलकर्मादि पाशबंधामुळे झाकलेली आहे. जेव्हा मलकर्मपाश-बंधादि दोष नष्ट होतात म्हणजे पक्व होऊन गळून पडण्याच्या मार्गावर असतात तेव्हा ती शक्ती व्यक्त होते. या शक्तीच्या प्रकटीकरणालाच पतित म्हणजे शक्तिपात असे म्हटले जाते.

असा हा शक्तिपात होणे अगदी नितांत आवश्यक व अपरिहार्य आहे हे सांगताना **"तांत्रिक वाङ्मय में शाक्तदृष्टी"** या पुस्तकातील **"भगवत् कृपा का रहस्य"** या आपल्या लेखात म.म.श्री.गोपीनाथ कविराज असे म्हणतात की, "इससे सिद्ध होता है कि शिष्य कितनाही भोगलोलुप क्यों न हो पर भगवान् की संचारित शक्ती व्यर्थ नहीं जाती। निम्न मात्राका शक्तिपात भी अंतमें अवश्य शिवत्वदायक होता है। इससे यह भी सिद्ध हुआ कि शक्तिपात निरपेक्ष है अर्थात् कर्मादिके अधीन नहीं है। कर्मादि अणुको याने जीवको मायामें प्रविष्ट कराते हैं, वे मायासे जीवका उद्धार नहीं कर सकते। जितने शुद्धात्मा अथवा रुद्राणु माया के मध्यमें हैं और जितने मायाके ऊपर हैं सब अपना अपना अधिकार समाप्त होनेपर हठात् अर्थात् कर्मादिकी अपेक्षाके बिना भगवत् शक्तिपातके प्रभावसे शिवत्वको प्राप्त होते हैं और जो लोक मायासे आक्रांत नहीं हैं वे कर्मादि निरपेक्ष हैं। वे केवल शक्तिपातमात्रसे भोग और मोक्ष दोनोंको प्राप्त करते हैं।"

यावरून हे सिद्ध होते की, शिष्य कितीही विषयांध व भोगलोलुप असला तरी ज्यावेळी श्रीसद्गुरू त्याच्यावर कृपा करून शक्तिपात करतात त्यावेळी त्याच्या ठिकाणी संचारित झालेली शक्ती कधीही व्यर्थ जात नाही. अगदी सामान्य मात्रेचा शक्तिपातही शेवटी साधकाला शिवत्वाची प्राप्ती निश्चितपणे करून देतो यात तिलप्राय शंका नाही. यावरून असे निश्चित दिसून येते की, "शक्तिपात हा निरपेक्ष असून तो कर्म इत्यादि कशाच्याही स्वाधीन नाही. कर्म वगैरे ज्या गोष्टी आहेत त्या जीवाला मायेमध्ये प्रविष्ट करतात. त्यामुळे कर्मामुळे किंवा तत्सम गोष्टींमुळे जीवाचा मायेपासून उद्धार होऊ शकत

नाही. जेवढे शुद्धात्मा किंवा रुद्राणू मायेमध्ये आहेत व जितके मायेच्या वर आहेत ते सर्व आपापला अधिकार संपल्यावर आपोआप म्हणजे कर्मादिची वगैरे कशाच्याही अपेक्षेशिवाय भगवच्छक्तिपाताच्या प्रभावाने शिवत्व प्राप्त करतात. जे लोक मायेने गुरफटलेले नसतात ते कर्मादि निरपेक्षच असतात. ते तर केवळ शक्तिपातानेच भोग व मोक्ष दोन्हीही प्राप्त करून घेतात."

"**भारतीय संस्कृति और साधना,**" खंड एक, या पुस्तकातील "**जीवन का लक्ष्य**" या आपल्या निबंधातही म.म.श्रीगोपीनाथ कविराज यांनी अज्ञाननिवृत्ती होण्यासाठी शक्तिपात होणे किती आवश्यक आहे व त्याशिवाय अन्य सर्व साधने अगदी निरुपयोगी कशी ठरतात हे सांगताना असे म्हटले आहे की, "अज्ञानाच्या प्रभावाने आत्म्याला मायेच्या अधीन होऊन देह धारण करणे भाग पडते. त्या अज्ञानाची निवृत्ती जोपर्यंत होत नाही तोपर्यंत आत्म्याचा नैसर्गिक असा शिवस्वरूप धर्म प्रकट होत नाही. या मूळ अज्ञानालाच पौरुष अज्ञान असे म्हटले जाते. या अज्ञानाची निवृत्ती व्हावी म्हणून जे जे अत्यंत आवश्यक उपाय व मार्ग आहेत ते ते सर्व निरर्थक आहेत. मग कर्म व ज्ञान हे मार्गच काय परंतु भक्तीचा मार्गही निरर्थक ठरतो. या सर्वांची उपायामध्ये गणना होत असली तरी हे सर्व मार्ग म्हणजे केवळ बुद्धीचा व्यापार आहेत. बुद्धी उत्पन्न होण्यापूर्वी जी गोष्ट घडली, उत्पन्न झाली किंवा उभारली गेली तिची निवृत्ती किंवा संहारणी करण्याची पात्रता वरीलपैकी एकाही उपायामध्ये नाही. यासाठी जोपर्यंत मनुष्याच्या आत्म्याचे मूळ अज्ञान दूर होत नाही तोपर्यंत मनुष्य जीवनाचा सर्वात श्रेष्ठ असा आदर्श म्हणजे मोक्ष कधीही प्रत्यक्षपणे प्राप्त होत नाही. आत्म्याने आपल्या इच्छेने जो आत्मसंकोच केला त्यालाच मूळ अज्ञान म्हणतात. मूळ अज्ञान म्हणजे आत्मसंकोचाशिवाय दुसरे तिसरे काहीही नाही. वास्तविक सम्यक् विचार केला तर हे स्पष्टच आहे की, शिवरूप आत्मा हा सर्व प्रकाराने संकोचरहित आहे. त्याच्या ठिकाणी कालाचा संकोच नसल्याने तो नित्य आहे. देशाचा संकोच नसल्याने तो विभू

म्हणजे व्यापक आहे. क्रियेचा संकोच त्याच्या ठिकाणी नसल्याने तो सर्वकर्ता आहे. ज्ञानाचा संकोच नसल्याने तो सर्वज्ञ आहे व आनंदाचा संकोच नसल्याने आत्मा नित्यतृप्त आहे. हेच आत्म्याचे शिवत्व होय. परंतु लीला करण्याच्या बहाण्याने आत्मा स्वेच्छेने आपल्याला संकुचित करतो व अभिनय करण्यासाठी जीवभाव ग्रहण करतो. असे झाले म्हणजे त्याचे सर्व स्वाभाविक धर्म संकुचित होणे अपरिहार्य ठरते. अशा प्रकारे परिच्छिन्न शक्तीमुळे क्षुद्र झालेला आत्मा मायेच्या अधीन होऊन आपणच कर्ता आहोत असे मानू लागतो अर्थात् तो कर्म जगतामध्ये प्रवेश करतो. कर्म करणे व केलेल्या कर्माचे फळ भोगणे या दोन व्यापारात गुंतून जाऊन एका योनीतून दुसऱ्या योनीत जाऊन भिन्न भिन्न शरीरे धारण करून भटकत राहतो. संकुचित आत्म्याच्या म्हणजे जीवाच्या संसार-चक्राच्या परिभ्रमणाचा हा संक्षिप्त इतिहास आहे. देह संपन्न असलेल्या आत्म्याच्या अभिमानसामग्रीमध्ये बुद्धी हे अत्यंत प्रधान अंग आहे. ज्ञान व अज्ञान हे दोन्हीही बुद्धीचेच धर्म आहेत. शाब्दिक ज्ञानाने शाब्दिक अज्ञान नष्ट होते हे खरे आहे. परंतु ही अत्यंत सामान्य गोष्ट आहे. अशा प्रकारे होणाऱ्या शाब्दिक ज्ञानाने मूळ अज्ञान नाहीसे होण्याचा संभव तिळमात्र असत नाही.

याकरिता सर्वात प्रथम मूळ अज्ञान कसे नाहीसे होईल याचा विचार केला पाहिजे. या पूर्वीच पहिल्या प्रथम अज्ञान दूर होण्यासाठी कर्म, शब्द-ज्ञान किंवा बाह्य-भक्ती यांचा कोणत्याही प्रकारे अज्ञान संपण्याच्या दृष्टीने उपयोग होत नाही हे जे सांगितले आहे ते त्रिकालाबाधित सत्य आहे; कारण हे सर्व मार्ग किंवा साधने मुळाला स्पर्शही करू शकत नाहीत. एकमात्र भगवंताच्या कृपाशक्तीच्या द्वारेच या मूळ अज्ञानाची निवृत्ती होऊ शकते. अन्य कोणत्याही उपायाने हे घडून येऊ शकत नाही. भगवत्कृपा ही स्वभावसिद्ध आहे व ती अहेतुक असली तरी आधाराच्या म्हणजे साधकाच्या पात्रतेनुसार तिची कार्यक्षमता प्रतिबिंबित झालेली दिसते. कृपाशक्ती जरी नित्य असली तरी जोपर्यंत जीवात्म्यावरील मूळ आवरणरूप मल पक्व होत नाही म्हणजे गळून

पडण्याच्या मार्गावर असत नाही तोपर्यंत शक्तिपात होऊन कृपाशक्ती साधकात संचारित होऊ शकत नाही. परंतु मल परिपक्व झाल्यावर मलपाकाच्या तारतम्यानुसार कृपा संचारित झाल्याशिवाय राहत नाही. लौकिक जगतात ज्याला दीक्षा म्हणतात ते त्याचेच फल आहे. ही शक्तिपातयोगदीक्षा स्थूल व सूक्ष्म अशा दोन्ही रीतीने होऊ शकते. दीक्षेचा प्रकार कोणता आहे यापेक्षाही ती होणे हे अत्यंत आवश्यक आहे. जोपर्यंत शक्तिपातयोगाची दीक्षा होत नाही तोपर्यंत साधकावर कोणत्याही साधनाचा परिणाम जितका व्हावयास पाहिजे तितका होत नाही."

उत्तम, मध्यम व कनिष्ठ अधिकाऱ्यांवर संतमहात्मे शक्तिपात कसा करतात व अंतर्निहित महाशक्ती जागृत करून साधकाला शिवरूप कसे करतात हे सांगताना **"भारतीय संस्कृति और साधना,"** खंड दुसरा, या ग्रंथातील **"संत परिचय"** या आपल्या लेखात म.म. श्री.गोपीनाथ कविराज असे म्हणतात की, "ज्यांना सत्याचा साक्षात्कार झाला आहे ते जर समर्थ असले व त्यांना जर आवश्यकता वाटली तर ते दुसऱ्यांनाही उपदेश देऊ शकतात. जो साधक श्रेष्ठ अधिकारी असतो त्याला प्रातिभ ज्ञानाच्या रूपाने हा उपदेश दिला जातो. हे प्रातिभ ज्ञान आपोआप हृदयामध्ये उत्पन्न होते. हे ज्ञान अनौपदेशिक असले तरी एक प्रकारे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी संक्रमित होत असल्याने उपदेशरूपच आहे. मात्र बाह्य शब्दाचा आश्रय घेऊन त्या ज्ञानाचा श्रेष्ठ अधिकाऱ्याच्या बाबतीत संचार करण्याचे कारण पडत नाही. अशा प्रकारे विशुद्ध ज्ञानानेच हृदयातील संशय सम्यक्पणे नाहीसे होतात. **"गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यः संछिन्नसंशयः"** या वाक्याचा अर्थच केवळ कृपेने शक्तिपात करून शिष्याच्या ठिकाणी ज्ञान संचारित करून शिष्याचा उद्धार करणे हा आहे.

मध्यम अधिकारी साधकाला संत लोक विशुद्ध चेतनाबरोबर शब्दाचा वापर करून शक्तिपाताने उपदेश देतात. या चेतन शब्दामध्ये इतके सामर्थ्य असते की, जेव्हा हा शब्द साधकाच्या कानामध्ये प्रवेश

करतो तेव्हा तो मर्मस्थानापर्यंत जाऊन भिडतो. ज्यावेळी ही प्रक्रिया घडते त्यावेळी अत्यंत असाधारण, असामान्य व अलौकिक आंदोलने साधकाच्या हृदयात उपस्थित होतात. साधकाचे हृदय अशा प्रकारे आंदोलित झाले की, त्याची स्थिती बदलून जाते. साधकाने शब्द ऐकल्याबरोबर त्याचे बाह्य जगताचे आकर्षणच नाहीसे होते. मन, प्राण व इंद्रिये ही सर्व एकत्रित होऊन अत्यंत प्रचंड व प्रबल वेगाने एखाद्या उद्दाम प्रवाहाप्रमाणे अंतरात्म्याला भेटून त्याच्याशी समरस होण्यासाठी धावत सुटतात. श्रीकृष्णाची बासरी ऐकल्याबरोबर श्रीराधेची किंवा गोपिकांची स्थिती व भाव अगदी असेच होत असत. तंत्रशास्त्रामध्ये मंत्र चैतन्ययुक्त व्हावा म्हणून जी व्यवस्था केलेली दिसते त्याचे कारण हेच आहे. शब्द चेतन केल्याशिवाय त्या शब्दाच्या साहाय्याने परब्रह्माचा साक्षात्कार होणे ही गोष्ट कालत्रयीही असंभवनीय व दुष्कर आहे. जो शब्द अचेतन असतो त्याला शब्दब्रह्म म्हणता येत नाही. मात्र अचेतन शब्दाचा वारंवार जप करण्याची एक विशेष प्रक्रिया आहे. तिचा अवलंब केला असता खूप परिश्रमाने शब्दाला चेतनता येऊन शक्ती जागृत होते. संतमहात्म्यांना इच्छा झाली की, अगदी प्रत्यक्षपणे ते चेतन शब्दाच्या प्रयोगाने शक्ती जागृत करतात.

जे साधक अगदी अधम अधिकारी असतात त्यांना संत लोक अचेतन शब्दाच्या द्वारा उपदेश करतात. परंतु त्याबरोबरच ते साधकाला अशी काही विशेष क्रिया सांगतात की, त्यामुळे अचेतन शब्द क्रमशः चेतन शब्दात रूपांतरित होत जातो. साधकाच्या अवस्थातील फरकामुळे साधक दीर्घकालपर्यंत विचार व नामस्मरण करीत राहिला तर त्यामुळे किंवा अन्य कोणत्याही कारणाने तीव्र संघर्षामुळे अचेतन शब्द चेतन होऊन शक्ती जागृत होते.

सारांश, जोपर्यंत कुंडलिनीरूपी महाशक्ती सत्यमार्गावर आवरण घालून घोरतम निद्रेत निमग्न असते तोपर्यंत जीवाची जडता दूर होत नाही व शिव शवरूप होऊन निष्क्रिय अवस्थेतच असतो. इतकेच नव्हे; तर या स्थितीत मिथ्या गोष्टींचे अवडंबर माजते. मायेचे तीव्र

प्रलोभन असते व विचित्र अशा प्रपंचाची मोहिनीशक्ती सतत प्रकट होत राहते. शक्तिपाताने कुंडलिनी जागृत झाली की, जीवाची घोर निद्रा संपून तो आपले स्वरूपदर्शन घेण्याला समर्थ होतो. ज्यावेळी जागरण पूर्णपणे घडून येते त्यावेळी जीवाचे जडत्व निःशेषपणे नाहीसे होऊन तो शिवत्वाची प्राप्ती करतो. याचा अर्थच असा आहे की, शक्तिपातयोगाची दीक्षा मिळाली की, अंतर्निहित महाशक्ती जागृत व गतिमान होऊन नित्य जागृत असलेल्या श्रेष्ठ अशा शिव-स्वरूपाशी समरस होण्यासाठी धावू लागते."

**भक्तियोग :-**

शक्तिपातयोगाची दीक्षा मिळाल्यावर भक्तियोग संपन्न होऊ लागतो; कारण शक्तिपातयोगाचे मुख्य लक्षण भगवद्भक्तीचा उन्मेष हे आहे. **"मालिनी विजयोत्तरतंत्रामध्ये"** शक्तिपात झाल्यावर कोणकोणती फले मिळतात हे सांगताना अगदी प्रथम पुढील लक्षण सांगितले आहे.

**सति तस्मिंश्च चिह्नानि तस्यैतानि विलक्षयेत्।**
**तत्रैतत्प्रथमं चिह्नं रुद्रे भक्तिः सुनिश्चला।।१।।**

श्रीगुरूंकडून तीव्र शक्तिपात झाल्यावर कोणताही प्रयत्न न करता अकस्मात् शिष्यामध्ये अनेक उत्तम लक्षणे प्रकाशित होतात. श्रीमहेश्वरांच्या ठिकाणी अत्यंत दृढ भक्ती होणे हे अगदी पहिले लक्षण साधकामध्ये दिसून येते. अशा प्रकारे भक्तिभाव साधकाला प्राप्त झाला की, कधी कधी बेहोश होऊन नृत्य करावे, गावे इत्यादि इच्छा त्याला होऊ लागतात. कधी कधी भक्तीच्या आवेशाने साधक जोरजोराने हसू व रडूही लागतो. आतून होणाऱ्या भक्तीच्या वेगामुळे शरीर कंप पावून घाम येऊ लागतो. एकदा का शक्ती जागृत झाली की, साधनकालामध्ये भक्तीची एक एक लक्षणे साधकामध्ये आपोआप प्रकट होऊ लागतात; कारण श्रीगुरुपरंपरेने चालत आलेले हे शक्तिपाताचे साधन साधक जन्मजन्मांतरी करीत आलेला असतो. त्याला जरी स्मृती नसली तरी ही साधना काही नवीन नसते. श्रीमत् चैतन्य महाप्रभूंचे परमभक्त शिष्य श्रीमत् रूपगोस्वामी यांनी आपल्या **"भक्ति-रसामृतसिंधू"** या

ग्रंथात "**दक्षिणविभागे द्वितीय अनुभावलहरीमध्ये**" या साधनात भक्तीच्या स्त्रोतामुळे पुढील क्रिया उत्पन्न होतात म्हणून वर्णन केले आहे.

**अनुभावास्तु चित्तस्थभावानामवबोधकाः।।**
**ते बहिर्विक्रियाप्रायाः प्रोक्ता उद्भासुराख्यया।।२.१।।**
**नृत्यं विलुठितं गीतं क्रोशनं तनुमोटनम्।**
**हुङ्कारो जृम्भणं श्वासभूमा लोकानपेक्षिता।।२।।**
**लालास्त्रवोऽट्टहासश्च घूर्णा हिक्काऽऽदयोऽपिच।**
**ते शीताः क्षेपणाश्चेति यथाऽर्थाख्या द्विधोदिताः।।३।।**

या साधनामध्ये चित्तस्थ भावांच्या सूचना देणाऱ्या या बाह्य क्रियांचा अनुभव साधकाला येत असतो. नृत्य, गीत, भूमीवर लोळणे, जोरजोराने ओरडणे, शरीराच्या निरनिराळ्या तऱ्हेच्या हालचाली करणे, हुंकार देणे, हूं हूं करणे, जांभई देणे, दीर्घ श्वासप्रश्वास करणे, लोकांच्या निंदेची किंवा प्रशंसेची पर्वा न करणे, लाळ वाहणे, जोरजोराने हसणे, घूर्णा म्हणजे शरीर डोलणे, उचकी लागणे, थंड लागणे, हातपाय आपटणे इत्यादि गोष्टी भक्तीचा उद्रेक आतून आला की दृग्गोचर होत असतात.

या ग्रंथातच भक्तीच्या उद्रेकाची लक्षणे सांगताना पुढे असे म्हटले की-

**चित्तं सत्त्वीभगवत्प्राणे न्यस्यत्यात्मानमुद्धटम्।।३८।।**
**प्राणस्तु विक्रियां गच्छन् देहं विक्षोभयत्यलम्।**
**तदा स्तम्भादयो भावा भक्तदेहे भवन्त्यमी।।९।।**
**ते स्तम्भस्वेदरोमाञ्चाः स्वरभेदोऽथ वेपथुः।**
**वैवर्ण्यमश्रुप्रलय इत्यष्टौ सात्त्विकाः स्मृताः।।१०।।**

हे साधन करू लागले म्हणजे चित्त सत्त्वयुक्त बनत जाऊन प्राण लीन होऊ लागतो. भक्ती आतून उफाळून आली की, प्राणाच्या नाना प्रकारच्या आंतरिक क्रिया घडून येतात. या क्रियांमुळे साधकाचा देह विशेष रूपाने क्षुब्ध झालेला दिसला तरी त्यामुळे शक्तीचा आतून सतत विकास होत असतो. भक्तीमुळे प्रक्षुब्ध झालेल्या प्राणामुळे

साधकभक्ताच्या शरीरात स्तंभादि अष्टसात्त्विक भावसमूह प्रकट होतो. स्तंभ म्हणजे खांबाप्रमाणे देहाची जडवत् स्थिती, घाम, रोमांच, स्वरभेद म्हणजे कंठस्वराची नाना प्रकारची विकृती, कंप, शरीर पांढरट होणे, अश्रू व निद्रा हे आठ भाव भक्तीने उसळून येतात. "मी तुला दिव्य दृष्टी देतो. तू योगाचे ऐश्वर्य पाहा," असे म्हणून श्रीकृष्णांनी अर्जुनावर शक्तिपात केल्याबरोबर त्याच्या ठिकाणी हे आठही सात्त्विक भाव भक्तिप्रेमामुळे उसळून आले. त्याचे वर्णन श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी **"श्रीज्ञानेश्वरीत"** पुढीलप्रमाणे केले आहे.

**आंतु महानंदा चेइरें जाहालें।**
**बाहेरि गात्रांचें बळ हारपोनि गेलें।**
**आपाद पां गुंतलें। पुलकांचलें।।११.२४६।।**
**वार्षिये प्रथमदशे। वोहळलया शैलांचे सर्वांग जैसें।**
**विरूढें कोमलांकुरीं तैसें। रोमांच जाहाले।।२४७।।**
**शिवतला चंद्रकरी। सोमकांत द्रावो धरी।**
**तैसियां स्वेदकणिका शरीरीं। दाटलिया।।२४८।।**
**माजी सांपडलेनि अलिकुळें।**
**जळावरी कमळकळिका जेविं आंदोळे।**
**तेविं आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें। बाहेरि कांपे।।२४९।।**
**कर्पूरकर्दळीचीं गर्भपुटें। उकलतां कापुराचेनि कोंदाटे।**
**पुलिका गळती तेविं थेंबुटें। नेत्रौनि पडती।।२५०।।**
**उदयलेनि सुधाकरें। जैसा भरलाचि समुद्र भरे।**
**तैसा वेळोवेळां उर्मिभरें। उचंबळत असे।।२५१।।**
**ऐसा सात्त्विकांही आठां भावां। परस्परें वर्ततसे हेवा।**
**तेथ ब्रह्मानंदांची जीवा। राणीव फावली।।२५२।।**

श्रीकृष्णांनी अर्जुनावर कृपा केल्यावर त्याच्या ठिकाणी आतील महानंद प्रकट झाला. अर्जुनाच्या ठिकाणी मूळ आनंद होताच. त्यावरील आवरण श्रीकृष्णांच्या सामर्थ्याने दूर झाल्याबरोबर तो आतून प्रकट झाला व अर्जुन आनंदसागरात बुडून गेला. त्याच्या

शरीराच्या अवयवांच्या ठिकाणी जे बळ होते ते नाहीसे होऊन अवयव ढिले पडले. आनंदातिरेकामुळे पायापासून मस्तकापर्यंत सर्व शरीरावर रोमांच उभे राहिले. वर्षाऋतूच्या आरंभी ज्याप्रमाणे पर्वताच्या अंगावरून पावसाचे पाणी वाहून गेल्यावर गवताचे कोवळे अंकुर फुटतात त्याप्रमाणे ते रोमांच दिसत होते. चंद्राच्या किरणांचा स्पर्श झाल्यावर सोमकांतमणी जसा पाझरतो त्याप्रमाणे अर्जुनाच्या सर्व शरीरावर घामाचे बिंदू दाटून आले. पाण्यावरील कमळाच्या कळीत भुंगा सापडला म्हणजे ती जशी हेलकावे खाऊ लागते त्याप्रमाणे आत उठणाऱ्या सुखाच्या ऊर्मीमुळे व लहरींमुळे अर्जुनाचे शरीर बाहेर कापू लागले. कापूर उत्पन्न करणाऱ्या कापुरकेळीत कापूर दाटला असता ज्याप्रमाणे त्या कापूरकेळीची सोपटे उकलली जाऊन त्यातून कापराचे कण गळू लागतात; त्याप्रमाणे अर्जुनाच्या डोळ्यातून आनंदाश्रूंचे थेंब पडू लागले. ज्याप्रमाणे पौर्णिमेला पूर्ण चंद्राचा उदय झाल्यावर भरलेल्या समुद्रालाही भरती येते त्याप्रमाणेच श्रीकृष्णांनी कृपा केल्यावर आत वेळोवेळी उठत असलेल्या आनंदाच्या ऊर्मीमुळे अर्जुन वारंवार उचंबळू लागला व अंतर्यामीच्या सुखाच्या लाटांनी तो वरचेवर डोलू लागला. याप्रमाणे अर्जुनाच्या ठिकाणी प्रकट झालेल्या अष्टसात्त्विक भावांची एकमेकात स्पर्धा होऊ लागून त्याला ब्रह्मानंदाचे राज्य प्राप्त झाले.

शक्तिपाताशिवाय खरी भक्ती प्राप्त होत नाही व भक्तीशिवाय चित्तशुद्धी होत नाही. चित्तशुद्धीसाठी अष्टसात्त्विक भाव उत्पन्न होण्याची नितांत आवश्यकता आहे. हे सांगताना **"श्रीमद्भागवताच्या" एकादश स्कंदाच्या चौदाव्या अध्यायात** श्रीव्यास महर्षी असे म्हणतात की -

**कथं विना रोमहर्षं द्रवता चेतसा विना।**
**विनाऽऽनन्दाश्रुकलया शुध्येद्भक्त्या विनाऽऽशयः**

**।।११.१४.२३।।**

अंगावर रोमांच उत्पन्न झाल्यावाचून, चित्त द्रवल्यावाचून किंवा नेत्रातून आनंदाश्रू आल्यावाचून भक्ती सिद्ध होत नाही आणि भक्तीवाचून

चित्तही शुद्ध होत नाही. या श्लोकावर टीका करताना श्रीसंत एकनाथ महाराजांनी "**श्रीएकनाथी भागवतात**" भक्ताच्या ठिकाणी भक्तीची जी चिह्ने दिसतात त्याचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे.

**तेणेंचि उपजे माझी भक्ती। माझ्या भजनाच्या अतिप्रीतीं।**
**आवडीं माझीं नामें गाती। रंगीं नाचती सद्भावें।।३०८।।**
**पोटांतूनिया उल्हासतां। रंगीं रंगता पैं नाचतां।**
**अंतरीं द्रवो झाला चित्ता। ते अवस्था बाह्य दिसे।।३०९।।**
**अंतरीं सुखाची झाली जोडी। बाह्य रोमांची उभिली गुढी।**
**त्या स्वानुभवसुखाची गोडी। नयनीं रोकडी प्रवाहे।।३१०।।**
**माझे भक्तीचिया आवडीं। अहं सोहं दोनी कुडीं।**
**तुटली अभिमानाची बेडी। विषयगोडी निमाली।।३११।।**
**ते काळींचें हेंचि चिह्न। पुलकांकित देहो जाण।**
**नयनीं आनंद जीवन। हृदयीं परिपूर्ण स्वानंदू।।३१२।।**
**पुंजाळले दोनी नयन। सदा सर्वदा सुप्रसन्न।**
**स्फुरेना देहाचें भान। भगवंतीं मन रंगलें।।३१३।।**
**ऐसी नुपजतां माझी भक्ती। कैंची होय विषय विरक्ती।**
**विरक्तीविण माझी प्राप्ती। नव्हे निश्चितीं उद्धवा।।३१४।।**
**माझी शुद्धभक्ती तत्त्वता। साचार आली जयाचे हाता।**
**ऐक त्याच्या चिह्नांची कथा। आणि पवित्रता तयाची।।३१५।।**
**माझे भक्तीसी जो लागला। तो तत्काळ पवित्र झाला।**
**त्याणें त्रिलोक पुनीत केला। हें गर्जोनी बोलिला श्रीकृष्णू।।**

शक्तिपाताने भक्तीची तीव्रता उत्पन्न झाली की, भक्ताची स्थिती कशी होते याचे वर्णन करताना श्रीव्यासमहर्षी "**श्रीमद्भागवतमहापुराणात**" असे म्हणतात की -

**वाग्गद्गदा द्रवते यस्य चित्तं रुदत्यभीक्ष्णं हसति क्वचिच्च।**
**विलज्ज उद्गायति नृत्यते च मद्भक्तियुक्तो भुवनं पुनाति**
**।।११.१४.२४।।**

भक्ताची वाणी सद्गदीत होते. चित्त आर्द्र होते. तो वारंवार

रडतो. एखाद्या वेळी हसतो. लज्जारहित होऊन मोठ्याने नाचतो व गातो. याप्रमाणे माझा भक्त सर्व भुवनाला पवित्र करतो. यावर श्रीएकनाथ महारांजानी "**श्रीएकनाथी भागवत**" या ग्रंथात फार सुंदर टीका केली आहे. ते असे म्हणतात की -

**अंगीं रोमांच रवरवित। स्वेदबिंदू डळमळित।**
**चित्त चैतन्यें द्रवत। तेणें सद्गदित पैं वाचा।।३१७।।**
**हर्ष वोसंडतां पोटीं। अर्धोन्मीलित होय दृष्टी।**
**जीवशिवा पडली मिठी। ध्यानत्रिपुटी मावळली।।३१८।।**
**नयनीं अश्रूंचा पूर लोटी। उभंडू न संटेचि पोटीं।**
**होत जीवभावाची तुटी। पडे सृष्टी मूर्छित।।३१९।।**
**आक्रंदे थोर आक्रोशें। वारंवार रडता दिसे।**
**रडण्यामाजीं गदगदां हांसे। जेवीं लागलें पिसें ब्रह्मग्रहो।।**
**रडणें हांसणें न सांडी। त्याहीमाजीं नवल आवडी।**
**अर्थावबोधें गाणें मांडी। निजात्मगोडीचेनि योगें।।३२१।।**
**विसरोनि माझें तुझें। सांडोनियां लोकलाजे।**
**हरिखें प्रेमाचेनि भोजें। तेणें नाचिजे निःशंक।।३२२।।**
**गाणें नाचणें हांसणें। तो रडे कासयाकारणें।**
**ऐक तींही लक्षणें। तुज कारणें सांगेन।।३२३।।**
**माउलीवेगळें बाळक पडे। जननी पाहतां कोठें नातुडे।**
**भेटतां ओरडूनि रडे। मिठी पडे सप्रेम।।३२४।।**
**जीव परमात्मा दोनी। चुकामुकी झाली भ्रमपट्टनीं।**
**त्यांसी एकाएकीं होता मिळणी। रडे दीर्घस्वरें स्फुंदत।।३२५।।**
**बहुकाळें झाली भेटी। ऐक्यभावें पडली मिठी।**
**तेणें उभंडू संटे पोटीं। रुदन उठी सप्रेम।।३२६।।**
**देवो लाघवी नानापरी। मायावी नातुडे निर्धारीं।**
**तो सांपडला घरींच्या घरीं। तेणें विस्मय करी टवकारें।।**
**देव सदा जवळीच असे। त्यालागीं जन कैसे पिसे।**
**पाहों जाती देशोदेशें। तें देखोनि हांसे गदगदां।।३२८।।**

**देव सर्वांसी अजितू। तो म्यां जिंकिला भगवंतू।**
**धरोनि राखिला हृदयांतू। यालागीं गातनाचतू उल्हासें।।**
**निवटूनि दुजयांची मातू। अंगें जीतिला भगवंतू।**
**जगीं झाला यशवंतू। यालागीं गात नाचतू उल्हासें।।३३०।।**
**पाहतां दुसरें न दिसे मज। यालागीं धरूं विसरला लाज।**
**जगीं झाला तो निर्लज्ज। निर्लज्ञतेचि वोज हे त्याची।।३३१।।**
**यापरी भक्तियुक्त। होऊनियां माझे भक्त।**
**निजानंदें गात नाचत। तेणें केलें पुनीत लोकत्रय।।३३२।।**
**जयाचे देखिता चरण। जडजीवां उद्धरण।**
**ज्याचे लागता चरणरेण। पशुपाषाण उद्धरती।।३३३।।**
**कीर्तनाचेनी महाघोकें। नाशिली जगाचीं सर्व दुःखें।**
**अवघें विश्वचि हरिखें। भरिले महासुखें उचंबळत।।३३४।।**
**दर्शनें स्पर्शनें वचनें। एक तारिले कीर्तनें।**
**एक तारिले नामस्मरणें। यापरी जग उद्धरणें उद्धवा।।३३५।।**
**अविद्या युक्त जीव मलिन। त्यासी शुद्ध व्हावया जाण।**
**माझी भक्तीचि प्रमाण। हेचि श्रीकृष्ण स्वये सांगे।।३३६।।**

श्रीचैतन्य महाप्रभूंना श्रीपुरीजी महाराजांकडून शक्तिपातयुक्त नामस्मरणाची दीक्षा मिळाल्याबरोबर त्यांच्या ठिकाणी प्रेमाचा उन्माद प्रकट झाला. श्रीप्रभुदत्त ब्रह्मचारी यांनी "**श्रीश्रीचैतन्य-चरितावली,**" **खंड १,** या ग्रंथात त्यांच्या उन्मेषाचे वर्णन केले आहे. ते लिहितात, "**उनकी हृदय कंदारसे जो भक्ति-भावका भव्य स्रोत उदित हो गया, वह फिर सदा उत्तरोत्तर बढता ही गया। उनकी दशा भी विचित्रसी हुई। वे भोजन करते-करते सहसा बीचमें ही उठकर रुदन करने लगते थे। रास्ता चलते चलते पागलोंकी भाँती नृत्य करते थे। शय्यापर लेटे लेटे सहसा उठकर बैठ जाते थे। और "हा कृष्ण! हा कृष्ण!" कहकर जोरसे चिल्लाते थे। कभी कभी लोगोंसे बाते करते करते बीचमेंही जोरोंसे ठहाका मारकर हँसते थे। लम्बी लम्बी साँसे लेते रहते थे। कभी कभी अधीर होकर अत्यन्त विरहीकी भाँति**

**हिचकियाँ भरते रहते थे। उनके नेत्रोंसे इतना जल निकलता था कि संपूर्ण वस्त्र गीले हो जाते थे।**" (पृ.२७२) शक्तिपातामुळे भक्ताची अशी स्थिती अगदी स्वाभाविकपणे होते असे "**श्रीमद्भागवतात**" महर्षी श्रीव्यासांनीही सांगितले आहे.

**यदाग्रहग्रस्त इव क्वचिद्धसत्याक्रन्दते ध्यायति वन्दते जनम्।**
**मुहुः श्वसन्वक्ति हरे जगत्पते नारायणेत्यात्मगतिर्गतत्रपः**
**।।७.७.३५।।**

प्रेमी भक्त प्रेमाच्या भावावेशामध्ये पिशाच्याने पकडलेल्या माणसाप्रमाणे कधी कधी खळखळून हसू लागतो. कधी जोराने ओरडू लागतो. कधी भंगवंताच्या मंजुळ मूर्तीचे ध्यान करतो, कधी लोकांचे पाय पकडून त्यांना वंदन करतो. कधी पुनःपुन्हा दीर्घ श्वासोच्छ्वास करू लागतो, काही वेळेस तर लोकलज्जेची थोडी सुद्धा पर्वा न करता जोरजोराने हे हरे! हे जगत्पते!! हे नारायण!!! याप्रमाणे उच्चारण करीत असतो. यावरून हे स्पष्ट दिसते की, शक्तिपातयोगाची अमूर्त प्रक्रिया भक्तियोगाच्या रूपाने साकार झालेली दिसते. भक्तियोग हे शक्तिपातयोगाचे मूर्त व दृश्य स्वरूप आहे. अष्टसात्त्विक भावांची प्राप्ती शक्तिपातामुळे फार त्वरित वेगाने घडून येते, हे आपण वर पाहिलेच आहे. ही प्रक्रिया कशी घडते याचे वर्णन "**भक्तिरसामृतसिंधूत**" पुढीलप्रमाणे केले आहे.

**चत्वारि क्ष्मादिऽऽभूतानि प्राणो जात्ववलम्बते।**
**कदाचित् स्वप्रधानः सन् देहे चरति सर्वतः।।३.११।।**
**स्तम्भम्भूमिस्थितः प्राणस्तनोत्यश्रुं जलाश्रयः।**
**तेजस्थः स्वेदवैवर्णे प्रलयं वियदाश्रितः।।१२।।**
**स्वस्थ एव क्रमान्मन्दमध्यतीव्रत्व भेदभाक्।**
**रोमाञ्चकम्पवैस्वर्य्याण्यत्र त्रीणि तनोत्यसौ।।१३।।**

शक्तिपातामुळे भक्तीचा उद्रेक होऊन प्राणाच्या गतीत बदल होतो. त्यामुळे प्राण देहाला विशेष रीतीने क्षुब्ध करतो. प्राण कधी पृथ्वीतत्त्व, कधी जलतत्त्व, कधी तेजतत्त्व व कधी आकाशतत्त्व

यांपैकी एका तत्त्वाचा अवलंब करून शरीरात वावरू लागतो. काही वेळेस तो स्वप्रधान होऊन देहात सर्वत्र फिरू लागतो. जेव्हा प्राण भूमीतत्त्वाचे अवलंबन करतो तेव्हा शरीर खांबासारखे निश्चल होऊन साधकाला स्तंभभाव प्राप्त होतो. जलतत्त्वाशी प्राण निगडित झाला की, अश्रुपात होऊ लागतो. तेजतत्त्वाशी प्राण संबद्ध झाला की, घाम येऊ लागतो व शरीराचा रंग पालटून जातो. यालाच वैवर्ण्य किंवा वर्ण विकृती असे म्हणतात. जेव्हा प्राणाचा आकाशतत्त्वाशी संयोग होतो तेव्हा प्रलय म्हणजे भावसमाधी, मूर्च्छा, तंद्रा अगर निद्रा हे भाव प्रकट होतात. जेव्हा प्राण स्वस्थ होतो म्हणजे आपल्या वायुरूपतत्त्वामध्ये राहू लागतो तेव्हा मंद, मध्य किंवा तीव्रतेने रोमांच, कंप व स्वरविक्रिया हे तीन भाव प्रकट होतात.

आपल्या देहामध्ये मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत व विशुद्ध ही पाच चक्रे पृथ्वी, जल, तेज, वायू व आकाश या पाच महाभूतांची स्थाने म्हणून प्रसिद्ध आहेत. मूलाधारात पृथ्वीतत्त्व, स्वाधिष्ठानात जलतत्त्व, मणिपुरात तेजतत्त्व, अनाहतामध्ये वायुतत्त्व व विशुद्ध चक्रामध्ये आकाशतत्त्व असते. वर जे प्राणाच्या गतीसंबंधी सांगितले त्याचा अर्थ असा आहे की, प्राण ज्या ज्या वेळी ज्या ज्या चक्रांचा आश्रय करतो त्या त्या वेळी तो त्या त्या भूततत्त्वांची लक्षणे प्रगट करीत असतो.

खरी भगवद्भक्ती प्राप्त होण्यासाठी शक्तिपाताची नितांत आवश्यकता असते. हा शक्तिपात महापुरुषांकडून म्हणजेच श्रीसद्गुरू-कडून होत असतो. महर्षी श्रीनारदांनी आपल्या "**भक्तिसूत्रात**" पुढील दोन सूत्रात महापुरुषांकडून होणाऱ्या शक्तिपाताचे अलौकिकत्व प्रकट केले आहे. पहिले सूत्र असे आहे. "**मुख्यतस्तु महत्कृपयैव भगवत्कृपा-लेशाद्वा।।३८।।**" शक्तिपाताने भक्तियोग कसा साधतो हे सांगताना भगवंताच्या अखंड भजनाने शक्ती जागृत होऊन ते भक्तिसाधन फलद्रूप होते असे प्रथम श्रीनारदांनी सांगितले आहे. त्यानंतर लोकांमध्ये भगवंताचे गुणश्रवण व कीर्तन केल्याने शक्ती जागृत होऊन भक्तीचे

फल मिळते असे स्पष्ट केले आहे. परंतु या दोन्ही गोष्टींनी शक्ती जागृतीची प्रक्रिया केव्हा घडून येईल हे सांगता येत नसल्याने व त्यामध्ये उशीर लागत असल्याने महापुरुषांच्या कृपेला श्रीनारद महर्षींनी अग्रस्थान दिले आहे. त्यामुळे शक्तिपात मुख्यत्वेकरून संतमहात्म्यांच्या कृपेने अगर भगवंताच्या कृपालेशाने प्राप्त होऊन भक्तियोग साधतो असे त्यांनी म्हटले आहे. अशा प्रकारे जो शक्तिपात होतो तो अलौकिक असतो. श्रीनारद महर्षी आपल्या पुढील सूत्रात असे म्हणतात की, "**महत्सङ्गस्तु दुर्लभोऽगम्योऽमोघश्च।।३९।।**" परंतु संतमहात्म्यांचा संग अत्यंत दुर्लभ आहे; कारण तो अगम्य म्हणजे सहजासहजी न कळणारा आहे. पण जर का तो लाभला तर तो अचूक फल देणारा आहे. याचा अर्थ असा आहे की, शक्तिपात करणारे महापुरुष हे अत्यंत दुर्लभ असतात. त्यामुळे त्यांची संगती व कृपा प्राप्त होणे हे त्याहून कठीण असते. असे असले तरी ते जेव्हा कृपा करून शक्तिपात करतात तेव्हा आपल्याला कोणती गोष्ट मिळत आहे हे कळण्याची पात्रता लागते. शक्तिपात झाल्यावर नाना तऱ्हेच्या क्रिया होऊ लागतात व अनुभव येऊ लागतो. त्यावेळी या क्रिया पैशाचिक कशावरून नसतील, श्रीसद्गुरूंनी संमोहन, मायाजाल किंवा जादूटोणा तर केला नसेल, श्रीज्ञानेश्वरादि ब्रह्मनिष्ठांच्या दीक्षेहून ही दीक्षा निराळी आहे, अशी सहजासहजी कुंडलिनी शक्ती जागृत होणे शक्य नाही, इत्यादि नाना तऱ्हेचे विकल्प मनात येऊन त्याचे माहात्म्य कळेनासे होते. म्हणून ही कृपा अगम्य आहे असे श्रीनारद महर्षी म्हणतात. एकदा शक्तिपात झाला की, तो अचूक फल देतो; कारण "**इयें अभ्यासीं (साधनीं) जे दृढ होती। ते भरंवेसेनी ब्रह्मत्वा येती।।६.३३०।।**" असा निर्वाळा श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीत**" दिला आहे.

अशा प्रकारे महापुरुषांकडून शक्तिपात झाला की, दिव्य भक्ती साधकाच्या ठिकाणी उत्पन्न होते त्याचे वर्णन श्रीनारद महर्षींनी पुढील सूत्रामध्ये केले आहे. "**सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा।।२।।**"

म्हणजे शक्तिपात झाल्यावर अंतरात्म्याच्या ठिकाणी जी भक्ती उत्पन्न होते ती परमप्रेमाच्या स्वरूपाची असते. पूर्वजन्मीचे काही सुकृत असेल तरच माणसाला परमेश्वराच्या प्राप्तीची इच्छा होते. अशी इच्छा झाल्यावर श्रीसद्गुरू भेटतात व ते शक्तिपात करतात. त्यामुळे परमप्रेमरूप पराभक्ती प्राप्त होते.

परमेश्वरप्राप्तीचा शेवटचा टप्पा गाठेपर्यंत सामान्य साधक जी भक्ती करतो तिला अपराभक्ती म्हणतात. या भक्तीत द्वैत असल्याने अनन्यता व सर्वात्मभाव प्राप्त होत नाही आणि अंतरातून दिव्य प्रेमही उत्पन्न होत नाही. मात्र परमेश्वराचा साक्षात्कार झाल्यावर परमेश्वराशी एकरूप होऊन आनंदमय अवस्थेत ठेवणारी जी भक्ती होते ती पराभक्ती होय. या अवस्थेत भक्ती करावी लागत नाही. ती आपोआप होते. स्वस्वरूपानुसंधानात लाभणारे दिव्य प्रेम व अलौकिक आनंद हा आतून उत्पन्न होतो. हेच पराभक्तीचे खरे स्वरूप आहे. हीच परमप्रेमरूपा भक्ती होय. शक्तिपात झाल्यावर ही अवस्था आपोआप प्राप्त होते. जोपर्यंत शक्तिपात होत नाही, कुंडलिनी शक्ती जागृत होत नाही व अनादि निद्रेचा भंग होत नाही तोपर्यंत ही परमप्रेमस्वरूप भक्ती उत्पन्न होत नाही हे नितांत सत्य आहे.

महर्षी श्रीनारदांनी "**अमृतस्वरूपा च।।३।।**" व "**अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम्।।५१।।**" म्हणजे ही पराभक्ती अमृतस्वरूप अर्थात् मोक्षस्वरूप व भगवंताच्या प्रेमाचे स्वरूप, अनिर्वचनीय म्हणजे शब्दातीत आहे, असे सांगून पुढील सूत्रात या भक्तीचा साधकावर कोणता परिणाम दिसून येतो हे स्पष्ट केले आहे.

**यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवति,**
**अमृतो भवति, तृप्तो भवति।।४।।**
**यत्प्राप्य न किञ्चिद्वाञ्छति, न शोचति,**
**न द्वेष्टि, न रमते नोत्साही भवति।।५।।**
**यज्ज्ञात्वा मत्तो भवति, स्तब्धो भवति,**
**आत्मारामो भवति।।६।।**

महात्म्यांची कृपा झाली व शक्तिसंक्रमण घडले की, ती पराभक्ती अंतरात्म्याच्या ठिकाणी भगवंताबद्दलच्या परमप्रेमाच्या रूपाने साकार होते. निर्हेतुक व निरतिशय प्रेम अशा भक्तीत अंतर्भूत असते. या भक्तीत निष्काम व निरंतर अशा प्रेमाचा प्रवाहच अंतःकरणात उत्पन्न होतो. अशी ही भक्ती ज्याला प्राप्त होते तो मानव पूर्णतेला पोहोचतो. अमर होतो. सर्वार्थाने तृप्त होतो. या भक्तीचा उद्रेक एकदा का आतून झाला की, साधकभक्त कशाचीही किंचित्सुद्धा इच्छा करीत नाही. कोणत्याही गोष्टीबद्दल तो शोक करीत नाही. कोणाचाही द्वेष करीत नाही. कोणत्याही इतर गोष्टीत रममाण होणे त्याला आवडत नाही. त्याला कोणत्याही कर्माचा उत्साह नसतो. ज्याला अशा अमृतासारख्या दिव्य भक्तीचे पान अंतरातून घडते तो त्या अनुभवाने वेडा होऊन जातो. भक्तिप्रेमाने धुंद व मस्त होतो. शांत होतो व आत्मस्वरूपात रममाण होऊन अगदी आत्मरूप होतो. असे हे शक्तिपातयोगाचे वैभव आहे. शक्तिपातयोगाच्या अमोलिक हिऱ्याचे कर्म, लय, हठ, राज, तारक, यंत्र, भक्ती, ज्ञान, सूक्ष्म, असंप्रज्ञात, अखंड, अस्पर्श, अमात्रक, अमनस्क हे सर्व योग भिन्न भिन्न पैलू आहेत. त्यातील भक्तियोग हा सर्वांत अमोलिक, सर्वांगसुंदर व अलौकिक असा पैलू आहे. समर्थ श्रीगुरूंकडून शक्तिपात झाला की, पराभक्ती प्राप्त होऊन हा पैलू सर्वार्थाने झळकू लागतो.

हा भक्तियोग नामस्मरणाने सहजसाध्य आहे असे सांगून संतांनी तो सोपा व सहजसुलभ केला आहे. परंतु श्रीगुरुकृपेशिवाय म्हणजे शक्तिसंक्रमण झाल्याशिवाय खरी भक्ती उदय पावत नाही; कारण पराभक्ती किंवा निर्गुण भक्तीत गती होण्यास त्याशिवाय दुसरा मार्गच उपलब्ध नाही. श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी शक्तिपाताची अपरिहार्यता पुढीलप्रमाणे स्पष्ट केली आहे. श्रीसमर्थ "**श्रीदासबोधात**" असे म्हणतात की -

**जेणें बहुतांस घडे भक्ति।**
**ते हे रोकडी प्रबोधशक्ति।।१२.१०.३७।।**

प्रबोधशक्ती म्हणजे प्रकर्षत्वाने बोध करण्याची शक्ती. अशा प्रकारे शक्तीचा समावेश शिष्यात केल्याशिवाय खरी भक्ती उत्पन्न होऊ शकत नाही. अनेकांना जर भक्तियोगसंपन्न करावयाचे असेल, त्यांना रोकडा साक्षात्कार घडवावयाचा असेल व बहुतांचे मनोगत हातात घेतले पाहिजे असे वाटत असेल तर श्रीसद्गुरूंच्या ठिकाणी शक्तिपात करण्याचे सामर्थ्य अत्यंत आवश्यक आहे असे श्रीसमर्थ अगदी निक्षून सांगतात. शक्तिपाताशिवाय भक्ती संपन्न होऊ शकत नाही हा सिद्धान्त श्रीसमर्थांनी अगदी स्पष्टपणे मांडला आहे. प्रबोधशक्तीमुळे निर्गुणभक्ती व आत्मनिवेदन भक्ती कशी साधते हे सांगताना श्रीसमर्थ "**श्रीदासबोधात**" असे म्हणतात की -

**निर्गुणीं अनन्य असतां। तेणें होय सायुज्यता।**
**सायुज्यता म्हणजे स्वरूपता। निर्गुण भक्ति।।३०।।**
**सगुण भक्ती हे चळे। निर्गुण भक्ती ते न चळे।**
**हें अवघे प्राजंळ कळे। सद्गुरु केलियां।।४.१०.३१.।।**
**जाणतां जाणतां जाणीव जाते। आपली वृत्ति तद्रूप होते।**
**आत्मनिवेदन भक्ति ते। ऐसी आहे।।१३.२.२८.।।**

अशी भक्ती प्राप्त झाली की, साधक साम्यावस्थेला प्राप्त होतो. या अद्वितीय अवस्थेचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीत**" अपूर्व वर्णन केले आहे. ते असे म्हणतात की, "माझी जी सहजस्थिती आहे तिलाच भक्ती असे म्हणतात. त्याचप्रमाणे विश्वाचा उदय व लोप ज्या प्रकाशाने होतो त्या परमेश्वराच्या सहज प्रकाशालाच उत्तम भक्ती असे म्हणतात. ही भक्ती एकदा का उसळून आली की, ती अज्ञान, भेद, द्वैत व इतर सर्व किडाळ नाहीसे करते. अशा प्रकारे या भक्तीचे सामर्थ्य असल्याने हा भक्तियोग दृश्यमार्गाहून भिन्न आहे. ज्ञानी लोक या भक्तीला स्वतःची ज्ञानकला मानतात. शैवलोक हिला शक्ती म्हणतात. आम्ही आपली परमभक्ती असे म्हणतो.।।१८.१११३ ते ११३३।।"

"या भक्तियोगामध्ये साधक माझे स्वरूप होऊन कोणतीही क्रिया न करता भजन करतो. मौनानेच माझे स्तवन करतो. त्याच्या सर्व

क्रिया आत्मस्वरूप झाल्यामुळे त्या सर्व क्रियांना न करणेच म्हणावे लागेल. हीच खरी माझी पूजा होय. म्हणून तो ज्या ज्या यथासांग क्रिया करतो त्या त्या न केल्याप्रमाणे होऊन तीच माझी महापूजा होते.।।१८.११७७ ते ११७९।।"

ही भक्ती अर्जुनाला प्राप्त व्हावी म्हणूनच श्रीकृष्णांनी अर्जुनाला आलिंगन दिले आणि शक्तिपात करून त्याच्या ठिकाणी ती भक्ती संक्रमित केली.

सारांश, खरा भक्तियोग साधण्यासाठी कुंडलिनी शक्ती जागृत होणे नितांत आवश्यक आहे हे सांगताना म.म.श्री.गोपीनाथ कविराज आपल्या "**भारतीय संस्कृती और साधना**", खंड एक, या ग्रंथातील "**कुंडलिनी तत्त्व**" या लेखात असे म्हणतात की, "मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ प्रभृती हठयोग प्रवर्तक नाथ आचार्यगण व आगमांच्या जाणकारांचे असे मत आहे की, मूलाधारातील प्रसुप्त कुंडलिनी शक्तीला जागृत केल्याशिवाय कर्म, ज्ञान किंवा भक्ती आदि कोणतेही साधन मुक्ती किंवा अनर्थ निवृत्तीच्या उपायाच्या दृष्टीने उपयोगी ठरत नाही. कर्म, भक्ती किंवा ज्ञान यांपैकी जी कोणती गोष्ट शक्ती जागृतीला साहाय्यता करते तीच यथार्थ कर्म, ज्ञान किंवा भक्ती म्हणजेच कर्मयोग, ज्ञानयोग किंवा भक्तियोग या पदाला सार्थ ठरते. जी गोष्ट शक्तीच्या जागरणाला साहाय्यक होत नाही ती व्यर्थ प्रयासाला कारण होते. कारण त्यापासून कधीही सिद्धी-मोक्ष प्राप्त होत नाही. कुंडलिनीची निद्रा भंग झाल्याशिवाय आत्मा किंवा परमात्म्यामध्ये जीव मिळून जाऊ शकत नाही."

"कुंडलिनीचे एक नाव आधारशक्ती असे आहे. ती सर्व पदार्थांचा आश्रय असून सर्व पदार्थांच्या मूळ सत्तारूपाने विद्यमान राहते. ती चैतन्यमयी झाल्याबरोबर निराधार म्हणजे निरालंब होऊन शुद्ध चित्स्वरूपात स्थिर होते. ज्यावेळी ती आधाररहित होते त्यावेळी संसारातील सर्व वस्तू निराधार होतात. त्याचप्रमाणे ती ज्यावेळी जागृत होऊन चिन्मयी बनते तेव्हा सर्व विश्व चैतन्यरूप धारण करते. कुंडलिनीचे जागरण

किंवा सर्वत्र ब्रह्मसाक्षात्कार अगर चैतन्यमयतेचा अनुभव घडवून आणणारी **"सर्वं खल्विदं ब्रह्म"** याची श्रुतिनिष्ठ साधना या दोन्ही गोष्टी निश्चितपणे एकाच स्वरूपाच्या आहेत. हे जागरण क्रमाक्रमाने होते. म्हणून कर्म, ज्ञान, भक्ती इत्यादि कुंडलिनी शक्तीच्या जागृतीच्या भिन्न क्रमिक अवस्था आहेत. ज्यावेळी शक्तीचे जागरण पूर्ण होते तेव्हा निद्रा लेशमात्र सुद्धा शिल्लक राहत नाही. त्यावेळी परिपूर्ण अद्वैतसिद्धी म्हणजेच आत्मनिवेदन भक्ती होते"

**क्रियायोग :-**

शक्तिपातयोगाला क्रियायोगही म्हणतात. क्रिया म्हणजे शक्तीची गती. या गतीमुळेच विश्वाची उभारणी व संहारणी होत असते. क्रियाशक्ती जेव्हा बहिर्मुख होऊन कार्य करते तेव्हा पिंडब्रह्मांडाची रचना होते. तिची गती जेव्हा अंतर्मुखी होते तेव्हा पिंडब्रह्मांडाची निवृत्ती होते. क्रियाशक्ती जेव्हा बहिर्मुख होते तेव्हा भेदरूपी सृष्टी निर्माण होऊन स्वस्वरूपावर आवरण येते. यासाठी शक्तीची अंतर्मुख गती उत्पन्न होणे आवश्यक असते; कारण अशी अंतर्मुख गती उत्पन्न झाल्याशिवाय अज्ञान व विक्षेप यांची निवृत्ती होऊ शकत नाही. हे कार्य घडून यावे यासाठीच क्रियाशक्तीचा उन्मेष व विकास होणे आवश्यक असते. या क्रियाशक्तीलाच श्रीगुरुशक्ती किंवा चिच्छक्ती असे म्हटले जाते. जेव्हा शक्तिपात होऊन ही चिच्छक्ती जागृत होते तेव्हा अंत:शक्तीच्या क्रियांचा सूत्रपात होतो. तेव्हा ही शक्ती निरंतर कार्यरत होते. तिचा क्रमिक विकास सुरू झाला की, साधकाला हळू हळू अंतर्मुख गती प्राप्त होत जाते. मन, वायू, बुद्धी, बिंदू इत्यादि सर्वांवर या गतीचा परिणाम होतो. शक्ती शरीरातील प्रत्येक कणातून प्रवाहित होऊ लागते. त्यामुळे शक्तीचे कार्य सुरू होते. जडता कमी होते व ही शक्ती क्रमाक्रमाने मनुष्याचे चैतन्यस्वरूप प्रकट करीत जाते. महामायाशक्तीकडून होणारी क्रियारूप साधना म्हणजे श्रीगुरुशक्तीचा क्रमाक्रमाने होणारा विकास आहे.

या दृष्टीने **"तांत्रिक वाङ्मय में शाक्तदृष्टि"** या ग्रंथातील **"अद्वयतत्त्व**

**के प्रकार-भेद**" या निबंधात म.म.श्री.गोपीनाथ कविराज यांनी फार सुदंर विवेचन केले आहे. ते असे म्हणतात की, "क्रियाशक्तीमुळे म्हणजेच क्रियेची गती अंतर्मुखी झाली की, तिचा शरीरात संचार होतो. जोपर्यंत शक्तीची अंतर्मुखी गती उत्पन्न होत नाही तोपर्यंत शक्तीच्या बाह्यगतीमुळे जो देह निर्माण झालेला असतो त्यात तिचा प्रवेश होऊ शकत नाही. भेदज्ञान हे अचिच्छक्तीचे कार्य आहे हे प्रथमच सांगितलेले आहे. त्याचप्रमाणे अभेद-दर्शन हे चिच्छक्तीचे कार्य आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. यासाठी क्रियारूपाने प्रकट होणारी श्रीगुरुशक्ती शिष्याला अभेद–ज्ञान प्राप्त व्हावे म्हणून सतत कार्य करीत असते. हे अभेद-ज्ञान पुष्ट होता होता क्रमाक्रमाने सर्व देहाला व्यापून टाकते. या प्रक्रियेलाच दुसऱ्या शब्दात देहभेद असे नाव दिले जाते. मनाची, प्राणाची व बिंदूची जसजशी अंतर्मुखी गती होत जाते तसतसा अभेदज्ञानाचा क्रमिक विकास होत जातो. या ज्ञानाचा पूर्ण विकास झाल्यावर म्हणजेच क्रियाशक्तीचे कार्य पूर्ण झाल्यावर आत्मा परमात्मास्वरूप होतो. साधकाचा व्यष्टिदेह समष्टिदेहरूपी विश्वरूपात परिणत होतो. यालाच योगावस्था असे म्हणतात. क्रियाशक्तीच्या उन्मेषाने म्हणजेच कुंडलिनी शक्तीच्या जागरणाने या योगावस्थेची सूचना मिळते. त्याचप्रमाणे क्रियाशक्तीचा विकास म्हणजेच कुंडलिनी शक्तीचा पूर्ण विकास होय. आत्माच्या ठिकाणी जेव्हा क्रियाशक्तीचा पूर्ण विकास होतो तेव्हा आत्म्याला परमात्मस्वरूप म्हटले जाते. क्रियाशक्ती ही वस्तुतः चैतन्यशक्तीच आहे; कारण या क्रियाशक्तीपासून अगदी प्रथम ज्ञानशक्ती उत्पन्न होत असते. अशी ज्ञानशक्ती जर पहिल्या प्रथम उत्पन्न झाली नाही तर क्रियाशक्तीचा उन्मेषच संभवत नाही. ज्ञानशक्तीच्या विकासाने द्रष्टा किंवा साक्षिभाव उत्पन्न होतो. या साक्षिभावाच्या जोडीने क्रियाशक्तीचा विकास झाला नाही तर आत्मा परमात्म्याकडे क्रमशः सरकू शकत नाही. अशी स्थिती प्राप्त झाली नाही तर नुसती गती म्हणजे संसाराचेच दुसरे नाव ठरेल. अर्थात् आत्म्याचे स्वरूप आवरणयुक्त राहून त्याच्या आश्रयाने जर गती उत्पन झाली तर तिला

भेदज्ञान असेच नाव द्यावे लागेल. ज्यावेळी स्वरूपावरील आवरण दूर होते त्यावेळी अनावृत आत्म्याच्या आधाराने जी गती उत्पन्न होते तीच अभेदज्ञानाची क्रीडा असते. तिलाच चिच्छक्तीचा विलास असे म्हणतात.

श्रीगुरुशक्तिरूपी क्रियाशक्ती क्रमशः देहभेद करीत राहते. योगदीक्षेच्या वेळी शिष्य श्रीगुरूंकडून चिन्मयता प्राप्त करून घेत असतो. यालाच जागृत कुंडलिनी असे म्हटले जाते. प्रत्येक साधकाची पूर्वजन्माची जितकी तयारी असेल, त्याच्या देहाची जशी स्थिती असेल व मनाची जशी धारणा असेल त्या मानाने क्रियाशक्तीचे प्रयोजन निश्चित होत जाऊन विकास होतो. त्यामुळे देहात काहीतरी बदल होत राहतो. अयोगी साधक सुद्धा दीक्षेच्या फलामुळे चैतन्यशक्ती प्राप्त करून घेऊ शकतो. मात्र तिचा विकास होणे आवश्यक असते. असा विकास होत राहिला म्हणजे हळूहळू अज्ञान जाऊन ज्ञान प्रकट होऊ लागते. कुंडलिनीच्या जागृतीमुळे हा विकास व ज्ञानप्राप्ती आपोआप घडून येते.

साधना सुरू झाली की, साधकाचा विकास सुरू होतो. या विकासात नानाप्रकारच्या वासना, पूर्वजन्मींचे संस्कार, भोगासक्ती व जीवनासक्ती यांच्यामुळे मायेचे जाळे रचले जाते. हे मायेचे जाळे तुटणे मोठे दुष्कर असते. अशा वेळी आपणास मिळालेल्या साधनाच्या निर्दिष्ट मार्गाचा साधकाने अवलंब केला तर या जाळ्याचा भेद अवश्य होतो. इतर कशानेही ही माया दूर होणे शक्य नसते. यासाठी श्रीगुरुप्रदत्त शक्तीवर पूर्ण विश्वास ठेवून तिचा विकास होण्यासाठी साधकाने नियमित साधन करून वाव दिला पाहिजे. असे झाले म्हणजे श्रीगुरुशक्तीच्या जोरावर मायाजालाचा भेद अवश्य होतो. श्रीगुरुशक्तीचे मुख्य कार्यच जीवाला मायेच्या जाळ्यातून सोडवून ज्ञानप्राप्ती करून देणे हे असल्यामुळे साधक जागृत शक्तीवर पूर्ण निर्भर राहिला तर त्याला आणखी दुसरा कोणताही स्वप्रयत्न करण्याची आवश्यकता उरत नाही."

क्रियाशक्तीचा विकास व परमात्मभावाची अभिव्यक्ती या दोन्ही

गोष्टी एकच आहेत. क्रियाशक्तीचा पूर्ण विकास झाल्याशिवाय हृदयात मन स्थिर होत नाही. क्रियाशक्तीच्या उन्मेषाबरोबर जी अंतर्मुखी गती सुरू होते ती क्रियाशक्तीचा पूर्ण विकास होऊन परमात्मरूपाने हृदयात स्थिर झाल्यावर समाप्त होते. याचे स्पष्टीकरण करताना म.म.श्री.गोपीनाथ कविराज असे म्हणतात की, "वास्तविकपणे हृदयामध्ये शाश्वत स्थिती मूलतःच असते. परंतु जीवाला बहिर्मुखता प्राप्त झाल्याने तिचे भान होत नाही. योगी आपल्या अंतरंगातील चिच्छक्तीच्या साहाय्याने मायेला काबूत आणतो. ज्यावेळी माया पूर्णपणे ताब्यात येते त्यावेळी योगी-साधक-परमात्मरूपात स्थिर राहतो. क्रियाशक्तीच्या पूर्ण विकासाशिवाय ही अवस्था साधकाला प्राप्त होत नाही. यालाच व्याप्तीची अवस्था असे म्हणतात. आत्मा जेव्हा हृदयात प्रवेश करतो तेव्हा त्याला साक्षिभाव प्राप्त होतो. त्यावेळी साधक समस्त जगत् अर्थात् विश्व हे दृश्यरूप आहे हे एकावेळी पाहू शकतो. यालाच सर्वज्ञत्व असे म्हणतात. सर्व जगताविषयीच्या अपरोक्ष ज्ञानाचा हा विकास आहे. परंतु हे ज्ञान अपरोक्ष असूनसुद्धा पूर्ण असत नाही; कारण जगत् हा आभास आहे हे कळून सुद्धा त्याची अनुभूती येत नाही. अनुभूतीची प्रत्यक्ष प्राप्ती केवळ एकमात्र क्रियायोगानेच होते. क्रियायोगाची प्राप्ती झाली नाही तर केवळ ज्ञानामुळे शाश्वत कैवल्यप्राप्ती कधीही मिळत नाही. ज्ञानामुळे जे तत्त्व सूक्ष्मरूपाने दिसते ते क्रियायोगाच्या द्वारे साधकाच्या बरोबर अभिन्नरूपाने वास करू लागते. क्रिया पूर्ण झाली की, सर्व व्यवधाने पूर्ण होतात. त्यावेळी एकही वस्तू अप्राप्य आहे असे वाटत नाही. यालाच आत्म्याच्या व्याप्तीचे विभुत्व असे म्हणतात. जेव्हा क्रियाशक्तीचे कार्य पूर्ण होते तेव्हा आत्मा परमात्मस्वरूपात सिद्ध होतो. त्यावेळी तो सर्व पदार्थांचा केवळ द्रष्टाच राहतो असे नाही तर सर्व पदार्थरूप होऊन त्याला अभेदभाव प्राप्त होतो."

ही शक्तिपातयोगाची उपासना हृदयामध्ये परमात्म्याचा साक्षात्कार घडविणारी एकमात्र व अद्वितीय उपासना आहे; कारण एकदा का श्रीगुरुकृपेने क्रियाशक्तीचा उन्मेष झाला की, तिचा क्रमशः जसाजसा

विकास होत जातो तसातसा साधक चित्कलासंपन्न बनत जातो. त्यावेळी परमेश्वराबद्दल अधिकाधिक प्रेम वाटू लागून परमात्माच एक उपास्य आहे याची दृढतर जाणीव होऊन उपासना गाढ बनत जाते. अशावेळी चित्कलेच्या वृद्धीच्या प्रभावाने परमात्मा आपल्या अधिक जवळ आहे याची साधकाला जाणीव होते.

सारांश म.म.श्रीगोपीनाथ कविराज यांनी म्हटल्याप्रमाणे "उपासनेची खरी सुरुवात क्रियाशक्तीच्या उन्मेषानेच होते आणि उपासनेची खरी समाप्ती क्रियाशक्तीच्या पूर्ण विकासाने होते. उपासनेलाच योग म्हणतात. दोन वस्तू समभावसंपन्न होणे हे योगशब्दाने सूचित होते. या दोन वस्तूंमध्ये एक मुक्त पुरुष आहे. त्याच्या ठिकाणीच प्रथम क्रियाशक्तीची जागृती होते. दुसरी वस्तू परम पुरुष आहे. त्याच्या ठिकाणी क्रियाशक्तीचा विकास समाप्त होतो. याप्रकारे जीवात्म्याचे परमात्म्याशी जे मिलन होते त्याला योग असे म्हणतात. जितक्या प्रमाणात क्रियाशक्तीचा विकास होईल तितक्या प्रमाणात योग स्थापित होत असतो. योगावस्थेत जीवात्म्यामध्ये क्रमशः परमात्मभाव जागृत होऊ लागतो. जीवात्मा जेव्हा स्वतःला परमात्मस्वरूप प्राप्त करून घेतो तेव्हा योग पूर्ण होतो. परमात्म्याशी सायुज्य पावणे यालाच पूर्ण योग असे म्हणतात."

**श्रीगुरुदत्तयोग :-**

श्रीगुरुदत्तयोग हे शक्तिपातयोगाचे एक अर्थपूर्ण नाव आहे. श्रीगुरूंनी दिलेला योग म्हणजे श्रीगुरुदत्तयोग होय. या नावातच श्रीगुरूंचा व त्यांच्याकडून दान होणाऱ्या योगाचा महिमा अनुस्यूत आहे. याचा अर्थच असा आहे की, श्रीगुरूकडून शक्तिसंक्रमण होऊन योग म्हणजेच साधन मिळाल्याशिवाय सर्व व्यर्थ आहे. नुसत्या स्वबलाने व स्वप्रयत्नाने काहीही साधणे शक्य नाही. तत्त्वप्राप्तीसाठी श्रीसद्गुरूंशिवाय इतर सर्व साधने व्यर्थ होत हे सांगताना "**मनाच्या श्लोकात**" श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराज असे म्हणतात की-

**नव्हे पिंडज्ञानें नव्हे तत्त्वज्ञानें।**
**समाधान कांहीं नव्हे तानमानें।**

**नव्हे योग यागें नव्हे भोग त्यागें।**
**समाधान ते सज्ञनाचेनि योगें।।१५५।।**

श्रीसद्गुरूंच्या कृपेशिवाय इतर साधने अगदी व्यर्थ होतात; कारण त्याशिवाय आपल्याला आपला लाभ घडून येणारे व आदिअंती स्वत: सिद्ध स्वरूप असलेले परम दुर्लभ ज्ञान होत नाही. बंधनाची भ्रांतीही फिटत नाही. असे हे श्रीगुरुदत्तयोगाच्या साधनामुळे ऋषी-मुनींपासून श्रीसदाशिवांपर्यंत ज्ञान कसे झाले हे सांगताना श्रीसमर्थ "**श्रीदासबोधात**" असे म्हणतात की -

**व्यास वसिष्ठ महामुनी। शुक नारद समाधानी।**
**जनकादि महाज्ञानी। येणेंचि ज्ञानें।।५.६.२३।।**
**वामदेवादिक योगीश्वर। वाल्मीक अत्री ऋषीश्वर।**
**शौनकादि अध्यात्मसार। वेदान्तमतें।।२४।।**
**सनकादिक मुख्य करूनी। आदिनाथ मीन गोरक्षमुनी।**
**आणि बोलतां वचनीं। अगाध असती।।२५।।**
**सिद्ध मुनी महानुभाव। सकळांचा जो अंतर्भाव।**
**जेणें सुखें महादेव। डुल्लत सदा।।२६।।**

श्रीगुरुदत्तयोगाने ज्ञान प्राप्त झाल्यावर साक्षात् श्रीमहादेवही डोलतात हा या मार्गाचा अद्भुत महिमा आहे यात शंकाच नाही. आपल्याला जसा आनंदाचा डोल आला तसा सर्वांना प्राप्त व्हावा म्हणून त्यांनी या सिद्धयोगाचा सूत्रपातही केला. या सिद्धयोगामुळेच आपले समाधान झाले असून इतर सर्व साधने श्रीगुरुकृपाप्राप्त योगापुढे व्यर्थ आहेत हे सांगताना श्रीसमर्थ पुढे असे म्हणतात की-

**साधु संत आणि सज्ञन। भूत भविष्य वर्तमान।**
**सर्वत्रांचें गुह्यज्ञान। ते सांगिजेल आतां।।२८।।**
**तीर्थें व्रतें तपें दानें। जें न जोडे धूम्रपानें।**
**पंचाग्नी गोरांजनें। जे प्राप्त नव्हे।।२९।।**
**सकळ साधनांचे फळ। ज्ञानाची शीगच केवळ।**
**जेणें संशयाचें मूळ। निःशेष तुटे।।३०।।**

**छप्पन्न भाषा तितुके ग्रंथ। आदिकरूनि वेदान्त।।**
**या इतुकियांचा गहनार्थ। एकचि असे।।३१।।**
**जें नेणवे पुराणीं। जेणें शिणल्या वेदवाणी।**
**तेंचि आतां येच क्षणीं। बोधीन गुरुकृपें।।३२।।**
**पाहिलें नसतां संस्कृतीं। रीग नाहीं महाराष्ट्र ग्रंथीं।**
**हृदयीं वसल्या कृपामूर्ती। सद्गुरु स्वामी।।३३।।**
**आतां नलगे संस्कृत। अथवा ग्रंथ प्राकृत।**
**माझा स्वामी कृपेसहित। हृदयीं वसे।।३४।।**
**न करितां वेदाभ्यास। अथवा श्रवणसायास।**
**प्रयत्नेविण सुरस। सद्गुरुकृपा।।३५।।**
**अरे गहनाचेंही गहन। तें तूं जाण सद्गुरुवचन।**
**सद्गुरुवचनें समाधान। नेमस्त आहे।।३९।।**
**सद्गुरुवचन तोचि वेदान्त। सद्गुरुवचन तोचि सिद्धान्त।**
**सद्गुरुवचन तोचि धादान्त। सप्रचीत आता।।३७।।**

इतके सांगून झाल्यावर श्रीसमर्थांनी शक्तिपातयोगाची प्रक्रिया आत्मनिवेदन होऊन कशी घडते व त्यामुळे ज्ञानवह्नी प्रकट होऊन दृश्याचा केर कसा नाहीसा होतो हे सांगितले आहे.

**ऐक शिष्या येथींचें वर्म। स्वयें तूंचि आहेस ब्रह्म।**
**ये विषयीं संदेह भ्रम। धरूंचि नको।।५-६-४५।।**
**नवविधा प्रकारें भजन। त्यांत मुख्य आत्मनिवेदन।**
**ते समग्र प्रकारें कथन। कीजेल आतां।।४६।।**

शिष्या तू स्वतः ब्रह्मच आहेस असे श्रीगुरूंनी म्हणता क्षणीच शक्तिपात होऊन आत्मनिवेदन घडून येते. यामुळे शिष्याला आत्मज्ञान होऊन सर्व बंधने दूर होतात. श्रीसमर्थ असे म्हणतात की-

**निर्माण पंचभूतें इयें। कल्पांतीं नासती यथान्वयें।**
**प्रकृतिपुरुष जियें। तेही ब्रह्म होती।।४७।।**
**दृश्य पदार्थ आटतां। आपणही नुरे तत्त्वतां।**
**ऐक्यरूप ऐक्यता। मुळींच आहे।।४८।।**

**सृष्टीची नाहीं वार्ता। तेथें मुळींच ऐक्यता।**
**पिंडब्रह्मांड पाहो जाता। दिसेल कोठें।।४९।।**
**ज्ञानवह्नी प्रकटे। तेणे दृश्यकेर आटे।**
**तदाकारें मूळ तुटे। भिन्नत्वाचें।।५०।।**
**मिथ्यत्वें वृत्ति फिरे। तों दृश्य असतांच वोसरे ।**
**सहजचि येणें प्रकारें। झालें आत्मनिवेदन।।५१।।**

यानंतर श्रीसमर्थांनी श्रीगुरुदत्तयोगाचा गाभा उकलून दाखवून आत्मज्ञानासाठी श्रीसद्गुरुभजनच केले पाहिजे असे सांगितले आहे.

**असो सद्गुरूचे ठायीं अनन्यता। तरी तुज कायसी रे चिंता।**
**वेगळेपणें अभक्ता। उरोंचि नको।।५२।।**
**आतां हेंचि दृढीकरण। व्हावया करीं सद्गुरुभजन।**
**सद्गुरुभजनें समाधान। नेमस्त आहे।।५३।।**
**या नांव शिष्या आत्मज्ञान। येणे पाविजे समाधान।**
**भवभयाचे बंधन। समूळ मिथ्या।।५४।।**

अशा प्रकारे श्रीगुरू शक्तिपातपूर्वक ज्ञान देऊन साधकाला आपण जडापासून निराळे आहोत याची प्रचीती देऊन दुःखमय कालचक्रातून कायमचे मुक्त करतात. या शक्तिजागरणामुळेच साधक ऐश्वर्यसंपन्न होतो. त्याची सर्व संकुचितता दूर होते व सर्व त्रुटी नाहीशा होतात. कोणत्याही प्रकारचा अभाव शिल्लक राहत नाही. या दृष्टीनेच श्री.म.म.गोपीनाथ कविराज यांनी आपल्या **"भारतीय संस्कृती और साधना" खंड दोन,** यातील **"सहजयान और सिद्धमार्ग"** या लेखात असे म्हटले आहे की, "योगाशिवाय श्रेष्ठ अवस्था प्राप्त होणे कधीही शक्य नाही." आदिनाथांनी असे म्हटले आहे की - **"योगमार्गात् परो मार्गो नास्ति नास्ति श्रुतौ स्मृतौ।" "विवेकमार्तंड"** ग्रंथातसुद्धा शब्दात बदल करून हाच भाव व्यक्त केला आहे. **"योगशास्त्रं पठेन्नित्यं किमन्यैः शास्त्रविस्तरैः।"** सर्वसाधारण सटरफटर श्रीगुरूंच्या मुखातून बाहेर पडणारा उपदेश किंवा शास्त्रचर्चा हे केवळ नाना तऱ्हेचे विकल्प उत्पन्न करणारे एक जाळेच आहे असे म्हटले पाहिजे;

कारण अशा प्रकारचा उपदेश किंवा चर्चा जीवाला लेशमात्र सुद्धा बंधनापासून मुक्त करू शकत नाही अगर त्या दृष्टीने काही साहाय्यही करू शकत नाही. निर्विकल्प अशा परमपदापर्यंत जाऊन पोहोचावयाचे असेल तर इतर अनेक विकल्पांप्रमाणेच शास्त्राध्ययनरूपी विकल्पाचाही पूर्णपणे त्याग करणे आवश्यक ठरते. केवळ बाह्य इंद्रियांनाच जाणवतील असे शब्द ऐकून कोणीही मनुष्य इंद्रियातीत अशा निष्कंप किंवा चिन्मय स्वरूपात कधीही स्थिर होऊ शकत नाही. जीवनातील जो वेळ शास्त्राध्ययन किंवा निरनिराळे विकल्प ज्यामुळे उत्पन्न होतील अशा बडबडण्यामध्ये खर्च केला जातो तो अक्षरश: वाया जातो. जीव विकल्पामध्ये पडल्याने आपले नित्यसिद्धरूप विसरून गेला आहे. अविद्येच्या प्रभावामुळे असत्याला सत्य मानून तो तृषित हृदयाने वाळवंटात भटकणाऱ्या वाटसरूप्रमाणे मृगजळाच्या मागे धावत जातो. सिद्धगणांच्या म्हणण्याप्रमाणे विकल्पाची शांती व अगदी अनादि कालापासून वाहणारा भ्रांतीचा प्रवाह थांबल्याशिवाय कोणत्याही उपायाने जीवाचे परम कल्याण होऊ शकत नाही. ज्याप्रमाणे अंधळा मनुष्य दुसऱ्या अंधळ्याला मार्ग दाखवून वाटचाल करू शकत नाही त्याप्रमाणे विकल्पांनी वेढलेला जीव केवळ विकल्पांच्या साहाय्याने निर्विकल्प पदावर आरूढ होऊ शकत नाही.

याकरिताच श्रीसद्गुरूंची नितांत आवश्यकता असते. श्रीगुरुकृपेशिवाय अगर श्रीगुरुशक्तीचा आधार घेतल्याशिवाय जीवाला मोहातून तरून जाण्याचा दुसरा कोणताही मार्ग उपलब्ध नाही. जलप्रवाहामध्ये तरंगणाऱ्या गवताच्या काडीप्रमाणे जीव संसार सागरात सतत खालीवर हेलखावे खात असतो. अशा असहाय्य जीवाला श्रीसद्गुरू आपल्याला परंपरेने प्राप्त झालेला व स्वत: आचरलेला सन्मार्ग दाखवून त्याची भ्रांती दूर करून आत्मसामर्थ्य संपादनाच्या कामात मदत करण्यास समर्थ असतात. अशा प्रकारे जे महात्मे जीवाला आत्मस्वरूपाची प्राप्ती करून देऊन अखंड विश्रांतीचा लाभ करून देतात त्यांनाच श्रीसद्गुरू म्हणणे योग्य ठरते. असे श्रीसद्गुरू जो मार्ग दाखवितात त्या

मार्गावरून चालल्याने स्वसंवेद्य अशा आत्मवस्तूचे दर्शन होऊन त्याची हमखास प्राप्ती होते. याशिवाय आत्मसाक्षात्काराचा दुसरा कोणताही उपाय नाही. केवळ उपदेशामुळे, बडबडीमुळे, व्याख्यानबाजीने, वाक्जालाने किंवा प्रवचनांच्या अवडंबरामुळे आत्मस्वरूपाचा साक्षात् अनुभव कदापीही येऊ शकत नाही किंवा त्याच्या आधारावर कोणी करूही शकत नाही. याचे कारण असे आहे की, आत्मस्वरूप हे मन, वचन व इंद्रियादि सर्व गोष्टींच्या पलीकडचे असून स्वयंप्रकाश आहे. याकरिताच "**गुरोस्तु मौनं व्याख्यानम्**" आहे. "**जठरसंहितेमध्ये**" असे म्हटले आहे की -

**परम्पराप्राप्तसन्मार्गदर्शने यस्य योग्यता।**
**स गुरुर्भवति श्रीमानात्मविश्रान्तिकारणम्।**
**तेन सन्दर्शिते मार्गे स्वसंवेद्यस्य दर्शनम्।**
**भवतीति गुरुं देवभावेन परिचिन्तयेत्।।**

सारांश, एकमेव श्रीगुरूंच्या कृपाकटाक्षाच्या दृष्टिक्षेपानेच जीवाच्या उत्थान दशेचा उदय होत असतो. या उत्थानदशेमुळेच जीवाला आत्मसंवेद्य अवस्था प्राप्त होऊन तो परमपदाशी समरस होऊन जातो. या आवेशामुळे किंवा या आत्मस्मृतीमुळे एका निरतिशय अशा महान् आनंदमय अवस्थेचे स्फुरण होऊ लागते. यामुळे ज्या प्रकाशाचा आविर्भाव किंवा उद्दीपन होते त्याची अनुभूती आल्याने सर्व भेद नाहीसे होऊन जातात."



# - आधार सहावा -

## ★शक्तिपातयोगाची वैशिष्ट्ये★

**१) सर्व मार्गांचा राजा**
**२) साधकाच्या योग्यायोग्यतेची अनावश्यकता**
**३) सर्वार्थाने शरणागती** **४) श्रीसद्गुरुकृपा**
**५) स्वतः होणारा योग** **६) आपत्तिरहित साधन**
**७) इतर साधनांची अनावश्यकता** **८) स्वप्रयत्नशून्य साधन**
**९) सर्वांना मुक्त साधन**
**१०) एका दिव्याने दुसरा दिवा लावावा असे साधन**
**११) प्रारब्ध जय व ज्ञानप्राप्ती**

सिद्धमहायोग हा सर्वार्थाने व सर्वांगाने वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्याची अपूर्वता कशाकशात सामाविलेली आहे ते पाहिले म्हणजे संत, महंत, ऋषी, मुनी, साधू व सज्ञन यांनी मुक्तकंठाने या मार्गाची प्रशंसा करून कास का धरली याचा उलगडा होतो.

**सर्व मार्गांचा राजा :-**

शक्तिपातसिद्धमहायोग हा सर्व मार्गांचा राजा आहे; कारण यात सर्व योगांचा समावेश होतो. राज्यातील सर्व रस्ते जसे शेवटी राजधानीला व अगदी शेवटी राजवाड्याला जाऊन मिळतात त्याप्रमाणे साधन राज्यातील सर्व साधने शेवटी महायोगाला येऊन मिळतात व महायोगाची परिणिती ज्ञानप्राप्तीत होऊन मनुष्य मुक्त होतो. राजा सिंहासनाधिष्ठित झाला म्हणजे ज्याप्रमाणे मंत्री, सेनापती इत्यादि सर्व अंगे आपोआप उपस्थित होऊन कार्यरत होतात त्याप्रमाणे महायोगाची दीक्षा होऊन शक्ती जागृत झाली की हठ, लय, मंत्र, राज, भक्ती इत्यादि सर्व योग आपोआप घडून येतात. **"म्हणोनि निःशंकें येणें महायोगें। मज मीनला मनाचेनि आंगें। एथ संशय करणें न लगे। तो त्रिशुद्धी जाहला।। श्रीज्ञानेश्वरी १०-१०८।।** अशी या महायोगाची प्रशंसा श्रीसंतज्ञानेश्वर-

महाराजांनी केली आहे.

म.म.श्री.गोपीनाथ कविराज यांनी शक्तिपातयोगामुळेच शक्ती जागृत होऊन साधक ज्ञानप्राप्तीने धन्य कसा होतो हे **"तांत्रिक वाङ्मय में शाक्तदृष्टि"** या ग्रंथातील **"देह और कर्म"** या निबंधात प्रकर्षाने सांगितले आहे. ते पाहिले म्हणजे हा मार्ग सर्व मार्गांचा राजा कसा आहे याची प्रतीती अंत:करणात उत्पन्न होते.

"शक्तिपातयोगाच्या साधनानेच साधकाला ज्ञानाची प्राप्ती होते व त्यापासून उत्पन्न होणाऱ्या ज्ञानाग्नीने अशुद्ध वासनांना जाळून मायिक उत्पत्तीचे मूळ बीज जाळण्यास हा अग्नी समर्थ होतो. यामुळे त्याचे फल म्हणून जन्ममृत्यूच्या पलीकडे असलेली कैवल्यावस्था त्याला प्राप्त होते. या ज्ञानप्रदानाच्या प्रक्रियेत कुंडलिनी शक्तीच्या प्रबोधनाचा फार घनिष्ठ संबंध आहे. श्रीसद्गुरू शक्तिपात करताना साधकावर फक्त इतक्याच प्रमाणावर शक्तिसंचार करतात की, त्यामुळे त्याची कुंडलिनी शक्ती जागृत होऊन ती ऊर्ध्वगतीचे अवलंबन करून अग्रेसर होण्यात समर्थ होईल. ज्या अशुद्ध वासना साधकात मूलत:च असणाऱ्या ज्ञानशक्तीला झाकून ठेवतात त्या श्रीगुरुकृपेने कुंडलिनी शक्तीच्या जागृतीबरोबरच हळूहळू जळून जातात. त्यामुळे साधकाचा अंतरात्मा शुद्ध होऊन श्रीगुरुदत्त चिन्मय शक्ती इष्ट असा आकार धारण करते म्हणजे शिवस्वरूप होते. हे क्रमाक्रमाने घडून येते. यामुळे साधकाची दीक्षा झाल्यावर त्याच्याकडून यथाविधी केल्या गेलेल्या कर्मांच्या प्रभावाने प्रबुद्ध झालेल्या कुंडलिनी शक्तीचा क्रमशः विकास होऊन ती चैतन्यरूपामध्ये आपला विस्तार करते व हळूहळू संपूर्ण देह, इंद्रिये, मन इत्यादि सर्वांना चिन्मयत्व प्राप्त करून देते. अशुद्ध वासना संपूर्णपणे नाहीशा करणे हे चिच्छक्तीचे खरे कार्य आहे. हे कार्य जसेजसे होत जाईल त्या त्या प्रमाणात चिच्छक्तीद्वारा अगदी अभिन्नपणे असलेले इष्टस्वरूप क्रमशः अभिव्यक्त होत जाते. परंतु हे कार्य साधकाच्या लक्षात येत नाही व दृष्टिगोचरही होत नाही. याचे खरे कारण असे आहे की, जोपर्यंत अशुद्ध वासनेचा

थोडासुद्धा अंश राहतो तोपर्यंत शुद्ध वस्तूचा साक्षात्कार होऊ शकत नाही. ज्यावेळी निर्विकल्प ज्ञानाचा उदय होतो त्यावेळीच साधकाला आत्मसाक्षात्कार होतो."

**साधकाच्या योग्यायोग्यतेची अनावश्यकता :-**

शक्तिपातयोगमार्गाचे दुसरे महत्त्वाचे वैशिष्ट्य हे आहे की, या साधनात साधकाच्या योग्यायोग्यतेचा विचार केला जात नाही. "**भारतीय संस्कृती और साधना" प्रथम खंड**, पृष्ठ २३७ वर श्री.म.म. गोपीनाथ कविराज यांनी "**शक्तिपात रहस्य**" या लेखात शक्तिपातयोगमार्गाचे हे वैशिष्ट्य सांगताना असे म्हटले आहे की-

**यहाँतक जो कुछ कहा गया है, उससे स्पष्ट जान पडता है कि शक्तिपात अथवा श्रीभगवान् की कृपा के बिना कोई जीव पूर्णत्व लाभ नहीं कर सकता। यहाँतक कि पूर्णत्व के मार्ग में भी प्रवेश नहीं कर सकता। शक्तिपात का तारतम्य जीव के आधार (धारणा शक्ति) के भेद से होता है। परन्तु, यह भी सत्य है कि जीव चाहे कितने ही निम्न अधिकार का हो और कितना ही भोगाकांक्षा-युक्त हो, एक बार शक्तिपात होने पर वह कभी न कभी परम पद में अवश्य पहुँच जायेगा। भोगाकांक्षादि अन्तराय रहने से उसकी गति में विलम्ब होगा नहीं तो शीघ्रातिशीघ्र यहाँतक कि क्षणमात्र में भी (जैसे तीव्र तीव्र की मात्रा में ) हो सकता है। शक्तिपात के समय योग्यता का विचार नहीं होता, परन्तु स्वभावत: योग्यता के अनुसार ही शक्तिपात की मात्रा निर्दिष्ट होती है। परन्तु मात्रा कुछ भी हो, भगवत्-शक्ती की ऐसी ही महिमा है कि इसका एक बार पात होने पर यह जीवको भगवद्धाम में पहुँचाये बिना शान्त नहीं होती, इसमें सन्देह नहीं।।"**

येथपर्यंत जे काही सांगितले त्यावरून हे स्पष्ट होते की, शक्तिपाताशिवाय म्हणजे श्रीभगवंताची कृपा झाल्याशिवाय कोणताही जीव पूर्णत्व प्राप्त करू शकत नाही. इतकेच काय; तो पूर्णत्व प्राप्त करण्याच्या मार्गात प्रवेश देखील करू शकत नाही. जीवाच्या आधार-शक्तीच्या अर्थात् धारणाशक्तीच्या भेदानुसार शक्तिपाताचे कमीजास्त

प्रमाण किंवा भिन्नता दिसून येते. मात्र हेही तितकेच खरे आहे की, जीव कितीही सामान्य कोटीतील असला आणि भोग, वासना, आकांक्षा इत्यादिंनी कितीही गुरफटलेला असला, तरी एकदा त्याच्यावर शक्तिपात झाला की, तो श्रेष्ठ अशा ब्रह्मपदाला अवश्य पोहोचतो. मात्र भोगाकांक्षादि विक्षेपांमुळे जीवाच्या परमपदाला जाण्याच्या गतीत अडथळा उत्पन्न होतो. जर शक्तिपाताची मात्रा तीव्रातितीव्र असेल व आडवे येणारे विक्षेप जर नसतील तर अत्यंत शीघ्र गतीने म्हणजे क्षणभरातसुद्धा जीव परमपदाला जाऊन पोहोचतो. शक्तिपात दीक्षेच्या वेळी योग्यायोग्यतेचा विचार केला जात नाही. मात्र (जीवाच्या) मुळातील योग्यतेनुसारच शक्तिपाताचे प्रमाण स्वाभाविकपणे निश्चित होत जाते. परंतु प्रमाण काहीही असले तरी भगवंताच्या शक्तीचा महिमा इतका मोठा आहे की, एकदा का होईना, (श्रीसिद्धगुरूंकडून) ही शक्ती साधकात संक्रमित झाली की ती त्या जीवाला भगवंताच्या घरी ( ब्रह्मपदाला ) पोहोचविल्याशिवाय शांत होत नाही, हे अगदी निःसंशय सत्य आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी **"अनुभवामृतात"** श्रीगुरू शिष्याच्या योग्यायोग्यतेचा विचार शक्तिपाताच्या वेळी करीत नाहीत हे सांगताना असे म्हटले आहे की,

**कैवल्यकनकाचेया दाना। न कडसी थोर साना।**
**द्रष्टेयाचेया दर्शना। पाढाउ जो।।२.५।।**

या ओवीवर टीका करताना श्रीनिरंजन रघुनाथांनी अत्यंत सुंदर स्पष्टीकरण केले आहे. "कैवल्य, मोक्ष, तल्लक्षण हेंचि कोणी एक सुवर्ण. त्याचें दान करण्याविषयी ( श्रीगुरु शिष्य हा ) साधनचतुष्टयसंपन्न अथवा अनधिकारी आहे, हे कडसणी म्हणजे शोध करीत नाहीं. जो शरण येईल त्यास श्रीगुरु मोक्ष देतो. कारण जे, गुरु तो जो परमात्मा होय, तो जें करील तें होईल म्हणून. आता श्रीगुरु जो तो शून्यरूपा माया जे तिचा पार दाखविणारा होय ऐसे वर्णितात, जैसे बद्रीनारायणाचे दर्शनास पहाडी लोक जे ते यात्रेकऱ्यास शिंक्यांत बसवून दुर्लंघ्य

दरीपर करून देतात, तैसे स्वशरण ब्रह्मजिज्ञासु जे त्यास शून्यरूपा माया हेचि कोण्ही एक सखोल दरी, तिजमध्यें न पडूं देतां शक्तिपात-सामर्थ्यप्रभावें द्रष्टा जो त्याचें वास्तविक स्वरूप निर्विशेष ब्रह्म जें त्याचें चरम वृत्तीनें दर्शन करून देतो, म्हणून हा गुरु जो तो पाढाऊ होय, अलाग ब्रह्मीं पावविण्याविषयीं तेथील माहीतगार होय."

"**श्रीज्ञानेश्वरीच्या**" सहाव्या अध्यायात श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी या योग्यायोग्यतेचा फारच सुंदर विचार केला आहे. शक्तिपातयोगमार्गाची सर्व माहिती सांगून झाल्यावर अर्जुनाने श्रीकृष्णांना असे विचारले की-

**आतां कृष्णा तुवां सांगितला योगु। तो मना तरी आला चांगु।**
**परि न शके करूं पांगु। योग्यतेचा।।६.३३३।।**
**सहजें आंगिक जेतुलें आहे। तेतुलियाचि जरी सिद्धि जाये।**
**तरी हाचि मार्ग सुखोपायें। अभ्यासीन।।३३४।।**
**ना तरी देव जैसें सांगतील। तैसें आपणपें जरी न ठकेल।**
**तरी योग्यतेवीण होईल। तेंचि पुसों।।३३५।।**
**हां हो जी अवधारिलें। हें जें साधन तुम्हीं निरूपिलें।**
**तें आवडतयाहि अभ्यासिलें। फावों शके?।।३३७।।**
**कीं योग्यतेवीण नाहीं। ऐसे हन आहे कांहीं।।३३७.१/२।।**

अर्जुन म्हणाला, "हे श्रीकृष्णा! आता तुम्ही मला हा जो योग सांगितला, तो माझ्या मनाला फार आवडला. परंतु माझी योग्यता कमी असल्याकारणाने माझ्या हातून काही तो होणार नाही. माझ्या अंगात जेवढी शक्ती आहे तेवढी खर्च करून जर हा अभ्यास शेवटास जाणार असेल तर मी मोठ्या समाधानाने व आनंदाने या योगमार्गाचाच अभ्यास करीन. सहजपणे जेवढे अंगचे सामर्थ्य आहे, तेवढ्या सामर्थ्याने जर अभ्यास सिद्ध होत असेल तर या योगमार्गाचाच मी आनंदाने अभ्यास करीन. किंवा हे श्रीकृष्णा! आपण जसे सांगितले तसे माझ्याकडून होण्याजोगे नसेल तर योग्यतेची आवश्यकता नाही असेच एखादे साधन विचारीन. तुम्ही हे जे योगसाधन सांगितले ते माझ्या पूर्ण

लक्षात आले. परंतु वाटेल त्याने त्याचा अभ्यास केला तर या योगाची प्राप्ती होईल काय? किंवा हे योग्यतेशिवाय होणारच नाही असे आहे की काय?"

अर्जुनाने हा योग्यायोग्यतेचा प्रश्न उत्पन्न केल्यावर त्याला श्रीकृष्णांनी पुढील उत्तर दिले.

**तेथ श्रीकृष्ण म्हणती काई। धनुर्धरा।।३३८।।**
**हें काज कीर निर्वाण। परि आणिकही जें कांहीं साधारण।**
**तेंही अधिकाराचे वोडवेविण। काय सिद्धी जाय।।३३९।।**
**पैं योग्यता जे म्हणिजे। ते प्राप्तीचि अधीन जाणिजे।**
**कां जें योग्य होऊनि कीजे। तें आरंभिलें फळे।।३४०।।**
**तरी तैसी एथ कांहीं। सावियाची केणी नाहीं।**
**आणि योग्यतेची काई। खाणी असे?।।३४१।।**
**नावेक विरक्तु। जाहला देहधर्मी नियतु।**
**तरि तोची नव्हे व्यवस्थितु। अधिकारिया।।३४२।।**
**मग म्हणे पार्था। ते हे ऐसी व्यवस्था।**
**अनियतासि सर्वथा। योग्यता नाहीं।।३४४।।**

तेव्हा श्रीकृष्ण असे म्हणाले की, "हे अर्जुना! तू हे काय विचारतोस? हा शक्तिपात योगाभ्यास जर म्हणशील तर खरोखर मोक्ष देणारा आहे. हे अंतिमप्राप्तीचे साधन आहे. पण याशिवाय दुसरी साधारण जरी गोष्ट असली तरी ती सुद्धा अधिकाराच्या योग्यतेशिवाय सिद्धीस जाईल काय? आणि योग्यता म्हणून जिला म्हणतात ती तरी प्राप्तीवरूनच जाणली जाते. आपण योग्य होऊन कार्याला आरंभ केला की, ते सफल होतेच. म्हणून या योगमार्गात खरोखर तसा काही प्रकार नाही आणि योग्यतेची एखादी खाण असते की काय? जो थोडासा विरक्त किंवा विहित धर्म आचारण्यात नियमित झाला आहे, इतकेच नव्हे; तर सामान्यतः व्यवस्थेशीर वागणारा जो आहे तो देखील अधिकारी होतो. मग श्रीकृष्ण असे म्हणाले की, हे पार्था! या योगप्राप्तीची अशी व्यवस्था आहे. परंतु अव्यवस्थित मनुष्याला त्याची प्राप्ती होण्याचा

कधीही संभव नाही."

महामहेश्वराचार्य श्रीउत्पलदेव श्रीभगवंताची स्तुती करताना असे म्हणतात की -

**शक्तिपातसमये विचारणं प्राप्तमीश न करोषि कर्हिचित्।**
**अद्य मां प्रति किमागतं यतः स्वप्रकाशनविधौ विलम्बसे।।**

"हे भगवन्! शक्तिपात करण्याच्या वेळी म्हणजेच जीवावर कृपा करण्याच्या वेळी योग्यायोग्यतेचा विचार करणे न्यायतः खरे असले तरी आपण पात्रापात्रतेचा विचार करीत नाही. मग आजच माझ्या बाबतीत अशी कोणती नवी गोष्ट आड आली आहे की, जी मला आत्मप्रकाशाची प्राप्ती होण्यास विलंब करीत आहे."

**स्थावरान्तमपि देवस्य स्वरूपोन्मीलनात्मिका।**
**शक्तिः पतन्ति सापेक्षा न क्वापि ......... ।।**

ब्रह्मदेवापासून गवताच्या काडीपर्यंत देवाच्या स्वरूपाला प्रकट करणारी शक्ती शिष्याच्या ठिकाणी संक्रमित होताना कसलीही अपेक्षा करीत नाही. ती निरपेक्ष आहे. योग्य शिष्याचा उद्धार करणे व अयोग्य शिष्याला योग्य करून तारणे हे श्रीसद्गुरूंचे कार्य असते. **"बोधसार"** या ग्रंथात श्रीनरहरी यांनी असे म्हटले आहे की,

**तत्तद्विवेकवैराग्ययुक्तवेदान्तयुक्तिभिः।**
**श्रीगुरुः प्रापयत्येव न पद्यमपि पद्यताम्।**
**प्रापय्य पद्यतामेनं प्रबोधयति तत्क्षणात्।।**

अर्थात् श्रीगुरू विवेकवैराग्ययुक्त वेदान्तयुक्तीच्या योगाने अयोग्य शिष्याला योग्यता प्राप्त करून देतात आणि नंतर त्याच्यावर शक्तिपाताचा अनुग्रह करून त्याला त्याच क्षणी जागृत करतात.

**"ललिता सहस्रनामाच्या भाष्यात"** देखील श्रीभास्करराय मखी यांनी असे स्पष्ट म्हटले आहे की, **"अयोग्येऽपि योग्यतामापाद्य श्रीगुरुसूर्यो बोधयति।।१०।।"** म्हणजे श्रीगुरुरूपी सूर्य अयोग्य शिष्याला योग्य करून प्रबुद्ध करतात.

पात्रापात्रतेचा विचार श्रीमुकुंदराजांनी **"विवेकसिंधूत"** फारच

उत्कृष्ट रीतीने केला आहे. ते असे म्हणतात की -

**परोपकाराचेनी संतोषें। पात्र कुपात्र ऐसें न देखे।**
**गुरुमेघु सर्वत्र वरुषे। उदारपणे।।१.८२।।**
**तथापि पात्रताविशेषें। स्थिर होये सखोल भूमिके।**
**थेंबु न राहे उटंके। जाये निरसौनियां।।८३।।**
**तैसे पात्रतावीण। स्थिर नोहे ब्रह्मज्ञान।**
**येथ दृष्टान्तु सांघैन। तो आइकै पां।।८४।।**
**जैसे पुत्र विटाळले। ते पितृधनासि मुकले।**
**शुद्ध जालेया विभागु पावले। जियापरी।।८५।।**
**तैसे जगजनक ईश्वराचें। ब्रह्मचि धन निज साचें।**
**शुद्ध जीव विभागिये तेथिंचे। तद् औंश म्हणौनियां।।८६।।**
**चित्तासी न संडे विषयसंगु। तंव जीवासि नव्हे ज्ञानाचा धनभागु।**
**म्हणौनि हा प्रसंगु। आम्हीं विस्तारिला।।८७।।**

दुसऱ्यावर उपकार करण्यात जो योग्यअयोग्य हा विचार करीत नाही तो श्रीगुरुरूपी मेघ आपल्या कृपेची वृष्टी सर्वांवर मोठ्या उदारपणे करतो. तरीपण योग्यता विशेष असेल तर नम्र, सौजन्यशील व पात्रता असलेल्या शिष्यात श्रीगुरुकृपेचा वर्षाव रुजून खोल जाऊन बसतो. मात्र जो उद्धट, गर्विष्ठ व अहंकारी असतो त्याच्यावर केलेली कृपा, उंचवट्यावर पडलेला पाऊस टिकून न राहता ज्याप्रमाणे निरसून जातो त्याप्रमाणे निरुपयोगी होते. योग्यतेशिवाय ब्रह्मज्ञान हे स्थिर होत नाही. याबाबत एक उदाहरण सांगतो ते ऐक. जे मुलगे भ्रष्ट झालेले असतात ते वडिलांच्या संपत्तीस अंतरतात. ते चांगले शुद्ध झाल्यावर ज्याप्रमाणे त्यांना आपला वाटा मिळतो त्याप्रमाणे जगाचा पिता जो परमेश्वर त्याचे ब्रह्म हे खरे धन आहे. त्याचे अंश म्हणून शुद्ध जीव हेच त्या धनाचे हिस्सेदार असतात. चित्ताला जोपर्यंत विषयाची आवड सुटत नाही तोपर्यंत जीवाला ज्ञानधनाचा वाटा मिळत नाही.

**सर्वार्थाने शरणागती :-**

शक्तिपातयोगाचे तिसरे वैशिष्ट्य असे आहे की, शिष्याने सर्वार्थाने श्रीसद्गुरूंना शरण गेले पाहिजे; कारण महायोगाचा हा मार्ग मुख्यतः समर्पणाचा मार्ग आहे. पुरुषार्थाचा, प्रयत्नाचा व स्वबलोपायाचा हा मार्ग नाही. "**श्रीमद्भगवद्गीतेत**" श्रीकृष्णांनी अर्जुनाला हेच सांगितले. ते म्हणाले -

**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ।।१८.६६।।**

"तू सर्व धर्म टाकून मला एकट्यालाच शरण ये. मी तुला सर्व पापांपासून मुक्त करीन. तू शोक करू नकोस." या श्लोकावर टीका करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रथम शरण येण्याचा अर्थ स्पष्ट करताना "**श्रीज्ञानेश्वरीत**" असे म्हटले आहे की-

**पैं आपुलेनि भेदेंविण। माझें जाणिजे जें एकपण।**
**तयाचि नांव शरण। मज येणें गा।।१८.१३९८।।**
**जैंसे घटाचेनि नाशें। गगनीं गगन प्रवेशें ।**
**मज शरण येणें तैसें। ऐक्य करी।।१८.१३९९।।**
**सुवर्णमणी सोनया। ये कल्लोळु जैसा पाणिया।**
**तैसा मज धनंजया। शरण ये तूं।।१४००।।**

"आपलेपणाचा भेद न ठेवता माझे एकत्व जे जाणणे, त्याचेच नाव मला शरण येणे होय. घटाचा नाश झाला म्हणजे त्यातील आकाश आकाशामध्ये शिरते तसे मला शरण आलास म्हणजे माझ्याशी ऐक्य पावशील. सुवर्णाचा मणी सुवर्णाशी जसा एकरूप असतो, अथवा पाण्याची लाट जशी पाण्याशी एकरूप असते तशा रीतीने हे धनंजया! तू मला ऐक्यत्वेकरून शरण ये."

अर्जुनाला श्रीकृष्णांनी इतक्या आग्रहाने शरण येण्यास सांगितले; कारण त्यामुळे त्याची अहंबुद्धी जाऊन तो अनुग्रहास योग्य व्हावा. पापपुण्य, धर्माधर्म इत्यादि द्वंद्वातून बाहेर पडण्यास शरण जाण्यासारखा दुसरा मार्ग नाही, हे अर्जुनाच्या मनावर बिंबावे म्हणून श्रीकृष्ण असे

म्हणतात की -

मग ताकौनियां काढिलें। लोणी माघौतें ताकीं घातले।
परी न घेपेचि कांहीं केलें। तेणें जेवीं।।१८.१४०६।।
तैसें अद्वयत्वें मज। शरण रिघालिया तुज।
धर्माधर्म हे सहज। लागतील ना।।७।।
लोह उभें खाय माती। तें परिसाचिये संगती।
सोनें जालया पुढती। न शिविजे मळें।।८।।
हें असो काष्ठापासोनी। मथूनि घेतलिया वह्नी।
मग काष्ठेंही कोंडोनी। न ठके जैसा।।९।।
अर्जुना काय दिनकरू। देखत आहे आंधारू।
की प्रबोधी होय गोचरू। स्वप्नभ्रमू।।१०।।
तैसें मजसीं येकवटलेया। मी सर्वरूप वांचोनियां।
आन कांहीं उरावया। कारण असे?।।११।।
म्हणौनि तयाचें कांहीं। चिंतीं ना आपुल्या ठाईं।
तुझें पापपुण्य पाहीं। मीचि होईन।।१२।।
तेथ सर्वबंधलक्षणें। पापें उरावें दुजेपणें।
तें माझ्या बोधीं वायाणें। होऊनि जाईल।।१३।।
जळीं पडिलिया लवणा। सर्वही जळ होय विचक्षणा।
तुज मी अनन्यशरणा। होईन तैसा।।१४।।
येतुलेनी अपैसया। सुटलाचि आहासी धनंजया।
घेईं मज प्रकाशोनियां। सोडवीन तूंतें।।१५।।
या कारणें पुढती। हे आधी न वाहे चित्तीं।
मज एकासि ये सुमती। जाणोनि शरण।।१४१६।।

"मंथन करून ताकातून लोणी वेगळे काढल्यावर पुन्हा जरी ताकात घातले, तरी ते काही केल्याने त्यात मिसळत नाही. त्याप्रमाणे अद्वितीय बोधाने तू मला शरण आल्यावर तुला धर्माधर्माचा स्पर्श होणार नाही. लोखंड उभे अलग असले तरी त्याला तांब चढते; पण तेच परिसाच्या स्पर्शाने सोने झाल्यावर मळ (गंज) त्याला शिवत

नाही. फार काय काष्ठ मंथून काढलेला अग्नी जसा काष्ठांनी कोंडून राहत नाही, सूर्याला जसा अंधार दिसत नाही किंवा जागे झाल्यावर स्वप्न दृष्टीस पडत नाही तसे माझ्याशी ऐक्य पावल्यावर सर्वरूप असा जो मी, त्या माझ्यावाचून दुसरे काही उरण्यास कारण आहे काय? याकरिता पापपुण्याची किंवा धर्माधर्माची चिंता तू करू नकोस. तुझे पाप व पुण्य मीच होईन. सर्व बंध देणारे असे जे पाप त्याचे हेच लक्षण होय की, माझ्याहून भिन्नपणे उरणे. ते पाप माझ्या ज्ञानाने नाश पावेल. हे कसे होते असे जर विचारशील तर हे अर्जुना! उदकात मीठ पडले म्हणजे ते आपण नाहीसे होऊन सर्व जलरूप होते, त्याप्रमाणे तू अनन्यभावाने मला शरण आलास म्हणजे मद्रूपच होशील. हे धनंजया! या योगाने तू आपोआप सर्व बंधनांपासून सुटशील. याकरिता मला जाणून तू माझी प्राप्ती करून घे. (मला आपलासा करून घे.) म्हणजे मग मी तुला सर्व बंधनांपासून मुक्त करीन. म्हणून हे सुमते! धर्माधर्माची चिंता मनात ठेवू नकोस. एक अद्वितीय जो मी, त्या मला जाणून शरण ये."

ज्या कारणाकरिता श्रीकृष्णांनी अर्जुनाला शरण येण्यास सांगितले त्याच कारणाकरिता श्रीपांडुरंगांनी श्रीनामदेवांना श्रीविसोबा खेचरांना शरण जाण्यास सागितले. श्रीसद्गुरूंना शरण गेल्याशिवाय त्यांच्या मनात शिष्याविषयी करुणा उत्पन्न होत नाही. एकदा का शिष्य शरण गेला की, श्रीसद्गुरूंच्या मनात शिष्याविषयी करुणा उत्पन्न होते व तो शक्तिसंक्रमण करून शिष्यास मुक्त करतो. पुढील दोन अभंग या दृष्टीने पाहण्यासारखे आहेत-

**देव आणि नामा उभे भीमातीरा। प्रेमें येरयेरां आळविती।।१।।**
**देव म्हणे नाम्या ऐकें गुह्य गोष्टी। संसाराची तुटी जेणें होये।।२।।**
**श्रीगुरुवांचुनी मुक्ति तुज नाहीं। भवनदीडोहीं नुतरसी।।३।।**
**शरण गुरुसी झालिया सप्रेमें। संसाराचा श्रम उतरेल।।४।।**
**गुरुवांचुनियां कैंचा मुक्ति ठाव। संसार हा वाव कैसा होय।।५।।**
**म्हणूनि नाम्या तुवां गुरुसि जावें शरण। तेणे भवबंधनें मुक्त होती।।**

**ऐसें ऐकूनियां नामा थरारिला। मूर्च्छागत झाला भूमीवरी।।७।।**
**भूमि लोळे नामा कंठ सद्गदित। डोळियां स्रवत अश्रुजळ।।८।।**
**इतुकें देखोनियां द्रवला पुरुषोत्तम। नाम्यासि सप्रेमें उचलिलें।।९।।**
**नाम्या तुज काय वाटतसे दुःख। संसाराचें सुख तुज झालें।।१०।।**
**नामा म्हणे देवा तुज ऐसा दाता। मज भवव्यथा कवणेपरी।।११।।**

श्रीपांडुरंगासारखा दाता आपल्याला भेटला असताना तोच श्रीविसोबा खेचरांना आपल्यास शरण जाण्यास सांगतो याचे श्रीनामदेवांना फार वाईट वाटले. ते असे म्हणतात की,

**अनाथांचा नाथ तुझी ब्रिदावळी। मज कां रे जाळी भवव्यथा।।१।।**
**देव म्हणे नाम्या गुरुवांचूनियां। मुक्ति पावावया आन नाहीं।।२।।**
**आन नेणें कांहीं करिसी विपत्ती। नव्हे माझी प्राप्ती गुरुवीण।।३।।**
**जाई नाम्या जाई गुरुसी शरण। तुटे भवबंधन तुझे वेगीं।।४।।**
**नामा म्हणे देवा कवणा शरण जाऊं। कोणा मी होऊं शरणागत।।**
**देव म्हणे नाम्या विसोबा खेचरासी। शरण तयासी जावें वेगीं।।६।।**

श्रीपांडुरंगांच्या सांगण्याप्रमाणे श्रीनामदेवराय श्रीविसोबा खेचरांना शरण गेले व त्यांच्याकडून शक्तिपातयोगदीक्षा मिळवून कृतार्थ झाले.

"**श्रीमद्भागवताच्या**" एकादश स्कंधातील बाराव्या अध्यायातील पंधराव्या श्लोकावर टीका करताना श्रीसंत एकनाथमहाराजांनी "**श्रीएकनाथी भागवतात**" श्रीकृष्णांनी उद्धवाला शरणागतीचे पुढील प्रमाणे रहस्य सांगितले आहे. श्रीकृष्ण हे उद्धवाचे श्रीगुरू असल्याने ज्यावेळी ते उद्धवाला, तू मला शरण ये असे म्हणतात त्यावेळी श्रीसद्गुरूंना शरण हा अर्थच साधकाने ध्यानात घेतला पाहिजे. ते असे म्हणतात की, "वेदशास्त्राचे कर्मविधान हे अविद्यायुक्त साधन आहे. ती अविद्या घालविण्यासाठी श्रीसद्गुरूंना साधकाने शरण गेले पाहिजे. स्त्रीपुत्रादि सर्व विषयांचा ध्यास सोडून योग, योग्यता, कर्मठपणा व कर्माभिमान टाकून श्रीसद्गुरूंना शरण जावे. वेदाध्ययन, शास्त्रश्रवण, प्रवृत्ती व निवृत्ती हे सर्व सोडून श्रीसद्गुरूंना शरण जावे. धन व मान यांच्या चेष्टा सोडून, विद्वत्ता व प्रतिष्ठा दूर सारून आणि अनेक

प्रकारच्या निष्ठा बाजूला ठेवून साधकाने श्रीसद्गुरूंना शरण गेले पाहिजे. वैदिक, लौकिक, तांत्रिक, पुराणोक्त व पांचरात्रागमात सांगितलेले मंत्र, तंत्र इत्यादि सर्व टाकून जर साधक श्रीसद्गुरूंना शरण गेला तरच तो त्यांच्या कृपेने आत्मसुखाला प्राप्त होतो. आपल्या कुळाचा मोठेपणा टाकून, जातीचा अभिमान सोडून व चार आश्रमांपैकी स्वतःच्या आश्रमाचे श्रेष्ठपण विसरून मला शरण यावे. ज्ञान-ध्यान, विधि-विधान व देहाभिमान टाकून मला शरण यावे. माझे नावच अंतर्यामी असे आहे. हृदयातील जाणणारा मुख्य मीच आहे. शब्दांनी मी माझ्या स्वरूपापासून च्युत होत नाही. निर्ममत्वानेच परब्रह्मावरील श्रद्धा दृढ होते. सर्व अभिमान सोडून मला शरण आल्यास तुझी जन्ममरण परंपरा नाहीशी होईल. मग तू माझ्या प्रभावाने सहज तरून जाशील. मला शरण येण्यासाठी पर्वताच्या गुहेत, दरीत किंवा दशदिशात भटकण्याचे कारण नाही. श्रीसद्गुरू हे एका जागी राहत नाहीत. त्यांना गाव नाही. तेव्हा त्यांना शरण जावे तरी कोठे असे तुला वाटेल. पण मी तुझ्या हृदयातच श्रीसद्गुरुरूपाने आहे. या हृदयस्थालाच शरण जावे. अशा प्रकारे सर्वस्वी सर्वभावाने जर तू मला शरण येशील तर सर्व भूतांच्या हृदयात मी वास करीत असल्याने तू सर्वव्यापकतेस प्राप्त होशील. परंतु तू मनात तिळमात्र जरी अभिमान ठेवून मला शरण आलास तरी माझी प्राप्ती होणार नाही; कारण माझ्या प्राप्तीला अभिमान हे फार मोठे विघ्न आहे. याकरिता अभिमान टाकून श्रीसद्गुरूंना शरण गेले पाहिजे. तू मला शरण आलास म्हणजे कळीकाळही तुझ्या पाया पडेल. मग संसाराचे भय तर क्षुल्लकच आहे. तुला माझे सामर्थ्य प्राप्त होईल. याकरिता हृदयस्थालाच शरण जा. नाम, रूप व अभिमान टाकल्यावर जे उद्धवपण स्फुरते तेच हृदयस्थाचे रूप आहे असे लक्षात ठेव. त्यालाच तू शरण जा. नाम-रूप-गुण ही वस्तुतः माया आहे. तिला सोडून जी सत्ता स्फुरते तेच माझे म्हणजे हृदयस्थाचे रूप आहे. अशा प्रकारे हृदयस्थाची प्राप्ती केल्यावर मग सर्व भूतांमध्ये देवच दिसू लागतो.

साधकाला निराळे राहण्यासाठी रिकामी जागा उरत नाही. त्याप्रमाणे श्रीसद्गुरुकृपेने साधक हृदयस्थाला शरण गेला म्हणजे मला येऊन मिळतो."

इतके सांगून श्रीकृष्णांनी उद्धवाची पाठ थोपटली. त्याबरोबर त्याने त्यांच्या पायांना मिठी घातली. त्यानंतर श्रीकृष्णांनी त्याला उठविले तरी तो काही केल्या उठेना.

**श्रीसद्गुरुकृपा :-**

श्रीसद्गुरुकृपेचे अनन्यसाधारण महत्त्व हे या शक्तिपातयोगमार्गाचे चवथे वैशिष्ट्य आहे. अनन्यशरण आलेल्या शिष्याला श्रीगुरू शक्तिपातदीक्षा देऊन कृतार्थ करतात. त्यामुळे श्रीसद्गुरूंचे व त्यांच्या कृपेचे महत्त्व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी **"श्रीज्ञानेश्वरीत"** पुढीलप्रमाणे सांगितले आहे.

**म्हणोनि जाणतेनें गुरु भजिजे। तेणें कृतकार्य होईजे।**
**जैसें मूळसिंचनें सहजें। शाखापल्लव संतोषती।।१.२५।।**
**हें असो दिठी जयावरी झळके।**
**कीं हा पद्मकरु माथां पारुखे।।**
**तो जीवचि परी तुके। महेशेंसीं।।१०.९।।**
**जय जय वो शुद्धे। उदारे प्रसिद्धे।।**
**अनवरत आनंदें। वर्षतिये।।१२.१।।**
**विषयव्याळें मिठी। दिधलिया नुठी ताठी।।**
**ते तुझीये गुरुकृपादृष्टी। निर्विष होय।।१२.२।।**
**तरी कवणातें तापु पोळी?। कैसेनि वो शोकु जाळी?।**
**जरी प्रसादरसकल्लोळीं। पुरे येसी तूं।।१२.३।।**
**योगसुखाचे सोहळे। सेवकां तुझेनि स्नेहाळें।**
**सोहंसिद्धिचे लळे। पाळिसी तूं।।१२.४।।**
**आधारशक्तीचिया अंकीं। वाढविसी कौतुकीं।**
**हृदयाकाशपल्लकीं। परिये देसी निज।।१२.५।।**
**प्रत्यक्ज्योतीची वोवाळणी। करिसी मनपवनाचीं खेळणीं।**

**आत्मसुखाचीं बाळलेणीं। लेवविसी।।१२.६।।**
**सतरावियेचें स्तन्य देसी। अनाहताचा हल्लरु गासी।**
**समाधिबोधें निजविसी। बुझाउनी।।१२.७।।**
**म्हणोनि साधकां तूं माउली। पिके सारस्वत तुझिया पाउलीं।**
**या कारणे मी साउली। न संडीं तुझी।।१२.८।।**

याकरिता जे शहाणे आहेत त्यांनी श्रीगुरूंची सेवा करावी म्हणजे त्यांच्या मनातील सर्व हेतू सिद्धीस जातील. झाडाच्या मुळाशी पाणी घातले म्हणजे फांद्या व पाने आपोआप टवटवीत होतात. ज्या व्यक्तीवर श्रीगुरूंची कृपादृष्टी होते किंवा ज्याच्या मस्तकावर त्यांचा वरदहस्त पडतो तो जरी जीव असला तरी तो श्रीशंकरांसमान होतो. अर्थात् व्यक्ती कितीही कनिष्ठ किंवा यःकश्चित असली तरी श्रीगुरुकृपेने तिला तत्क्षणी जगच्चालक परमेश्वराचा दर्जा प्राप्त होतो. हे श्रीसद्गुरू आई! तू शुद्ध म्हणजे अखंड अज्ञानादिदोषरहित आहेस. तू एक अत्यंत उदार म्हणून प्रसिद्ध आहेस व तू निरंतर आनंदस्वरूप किंवा प्रेमरूप असून शिष्याच्या ठिकाणी अखंड परमानंदाचा वर्षाव करणारी किंवा परमानंदरूप प्रेमाची प्राप्ती करून देणारी आहेस. विषयरूपी भयंकर सर्पाने जीवाच्या ठिकाणी मिठी मारल्यामुळे जी त्याला आत्मविस्मृतिरूप मूर्च्छा आली आहे, ती कशानेही नाहीशी होत नाही. पण हे श्रीगुरो! एक तुमच्या कृपा दृष्टीनेच विषयरूपी सर्पाचे विष उतरून ती मूर्च्छा नाहीशी होते. तुझ्या अंतःकरणात ज्याच्याविषयी कृपाप्रेमाचा पूर येऊन त्याच्या लाटा उसळू लागल्या असता, संसारातील त्रिविध तापाने कोण पोळला जाईल? व त्याला प्रिय वस्तूचा वियोग व अप्रिय वस्तूचा संयोग यांच्याविषयीचा शोक कसा जाळू शकेल? सेवकांना तुझ्याच कृपेने योगसुखाचे सोहळे भोगावयास मिळतात व मी ब्रह्म व्हावे अशी जी सेवकांची हौस, तीही तू पूर्ण करतेस. आधारशक्तीच्या मांडीवर कुंडलिनी शक्ती जागी करून तिच्या साहाय्याने आपल्या सेवकाला कौतुकाने वर नेतेस आणि हृदयाकाशरूपी पाळण्यात त्याला आपल्या शुद्ध आत्मस्वरूपाच्या ऐक्याचे झोके देतेस. तू

आपल्या सेवकाला चैतन्याची ओवाळणी करून मनपवनाची खेळणी करून देतेस व आत्मसुखाची बाळलेणी लेववितेस. तसेच त्याला जीवनकलेचे अमृतपान देऊन अनाहताचे गाणे गातेस आणि ऐक्यज्ञानाच्या उपदेशाने त्याचे समाधान करून त्याला समाधिसुखाचा बोध करून निजवतेस. याकरिता हे श्रीसद्गुरू आई! तू साधकाची सतत कृपादृष्टीने सांभाळ करणारी आईच आहेस. तुझे चरण ज्या साधकाच्या हृदयात राहतील, त्याला सर्व प्रकारच्या विद्या प्राप्त होतात. यास्तव मी तुझ्या कृपेची सावली सोडीत नाही.

श्रीसद्गुरूंच्या या अनन्यसाधारण कृपेचे महत्त्व वर्णन करताना भगवान् श्रीशंकराचार्य यांनी **"शतश्लोकीच्या"** पहिल्याच श्लोकात शक्तिपातपूर्वक होणाऱ्या ज्ञानदानाचे सुंदर वर्णन केले आहे.

**दृष्टान्तो नैव दृष्टस्त्रिभुवनजठरे सद्गुरोर्ज्ञानदातुः।**
**स्पर्शश्चेत्तत्र कल्प्यः स नयति यदहो स्वर्णतामश्मसारम्।।**
**न स्पर्शत्वं तथापि श्रितचरणयुगे सद्गुरुः स्वीयशिष्ये।**
**स्वीयं साम्यं विधत्ते भवति निरुपमस्तेन वा लौकिकोऽप्यपि।।१।।**

या त्रिभुवनामध्ये ज्ञानदान करणाऱ्या श्रीसद्गुरूंना देता येईल असा कोणताही योग्य दृष्टान्त सापडत नाही. जर त्याला परिसाची उपमा दिली तर तीही योग्य ठरत नाही; कारण परीस लोखंडाचे सोने करतो, मात्र तो लोखंडाचा परीस करू शकत नाही. परंतु जो शिष्य श्रीसद्गुरुचरणांचा आश्रय घेतो त्याला श्रीगुरू शक्तिपातपूर्वक ज्ञानदान करून निजसाम्य देऊन कृतार्थ करतात. याकरिता श्रीसद्गुरूंना कोणतीही उपमा देता येत नाही.

**"शतश्लोकीच्या"** ९१ व्या श्लोकात श्रीगुरू आपली कृपापूर्ण दृष्टी शिष्यावर टाकून शक्तिपातद्वारा कसा बदल करतात त्याचे उत्कृष्ट वर्णन केले आहे.

**तद्ब्रह्मैवाहमस्मीत्यनुभव उदितो यस्य कस्यापि चेद्वै।**
**पुंसः श्रीसद्गुरुणामतुलितकरुणापूर्णपीयूषदृष्ट्या।**

**जीवन्मुक्तः स एव भ्रमविधुरमना निर्गतेनाद्युपाधौ।**
**नित्यानन्दैकधाम प्रविशति परमं नष्टसन्देहवृत्तिः।।९१।।**

श्रीसद्गुरूंच्या अतुलनीय अशा करुणापूर्ण अमृतदृष्टीमुळे जर कोणाला "मी ब्रह्म आहे" हा अनुभव प्राप्त झाला, तर त्याचे मन भ्रमरहित होऊन जाते. त्यामुळे त्याचे सर्व संशय व मोह नष्ट होतात आणि तो जीवन्मुक्त होतो. त्याची अनादि उपाधी नष्ट झाल्यामुळे तो चिरंतन आनंदाच्या साम्राज्यात प्रवेश करतो.

श्रीसंत एकनाथमहाराजांनी "**श्रीनाथभागवताच्या**" "**यदु-अवधूत-संवादात**" श्रीदत्तात्रेयांनी यदुराजाला आलिंगन देऊन व आपले श्रीगुरू श्रीजनार्दनस्वामी यांच्या मस्तकावर हात ठेवून स्पर्शदीक्षा देऊन कृपा कशी केली व आत्मबोध कसा केला याचे अत्यंत हृदयस्पर्शी वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे.

**याहीपरी पाहतां। माझा गुरु एक एकुलता।**
**एक तेथें दुजेपणाची वार्ता। नाहीं सर्वथा यदुराया।।९.४२२।।**
**ऐशी सद्गुरुकथा। तुज सांगितली परमार्था।।**
**हरिखें आनंदला नृपनाथा। दोघां ऐक्यता निजबोधें।।४२३।।**
**जीवीं जीवा पडली मिठी। आनंदें ओसंडणें सृष्टी।**
**तेणें वाचेसी पडली बेलवटी। बोलों उफराटी विसरली।।**
**हरिखु न संठवे हृदयभवनीं। बाहेर वोसंडे स्वेदेजोनी।**
**आनंदघन वोळला नयनीं। स्वानंदजीवनीं वर्षतु।।४२५।।**
**तुटली अहंकाराची बेडी। पावलों भवार्णवपरथडी।**
**म्हणौनि रोमांची उभविली गुढी। जिंतली गाढी अविद्या।।**
**समूळ देहभावो पळाला। यालागीं गात्रकंपू चळचळा।**
**संकल्पविकल्प निमाला। मनेंसीं बुडाला मनोरथू।।४२७।।**
**जीवभावो उखिता। यदूनें अर्पिला गुरुनाथा।**
**तें चिह्न बाहेरी तत्त्वतां। दावी सर्वार्था निजांगीं।।४२८।।**
**तो अवधूत जाण दत्तात्रेया। तेणें आलिंगूनि यदुराया ।**
**निजरूपाचा बोधू तया। अनुभवावया दीधला।।४२९।।**

**दत्तात्रेयशिष्यपरंपरा। सहस्त्रार्जुन यदु दुसरा।**
**तेणें जनार्दनू तिसरा। शिष्य केला खरा कलियुगीं।।४३०।।**
**गुरुप्राप्तीलागीं सर्वथा। थोर जनार्दनासी चिंता।**
**विसरला तिन्ही अवस्था। सद्गुरु चिंतिता चिंतनीं।।४३१।।**
**देवो भावाचा भोक्ता। दृढ जाणोनि अवस्था।**
**येणें जाहलें श्रीदत्ता। तेणें हातु माथां ठेविला।।४३२।।**
**हातु ठेवितांचि तत्काळ। बोधु आकळिला सकळ ।**
**मिथ्या प्रपंचाचे मूळ। स्वरूप केवळ स्वबोधें।।४३३।।**

"हे यदुराजा! अशा रीतीने पाहिले म्हणजे माझा श्रीगुरू एकुलता एकच आहे. तेथे दुजेपणाची वार्ताही नाही. श्रीसद्गुरूंची कथा मी तुला परमार्थप्राप्तीसाठी सांगितली." असे बोलून अवधूताने आनंदाने राजाला आलिंगन दिले. आत्मज्ञानामुळे ते दोघेही तद्रूप झाले. सृष्टीला आनंदाचे भरते आले. त्यामुळे वाचा बंद पडली व उलट पक्ष घेऊन बोलण्याचे विसरली. अंतःकरणात आनंद न मावल्यामुळे तो घामाच्या रूपाने बाहेर वाहू लागला म्हणजे आनंदातिशयामुळे त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहून घाम सुटला. आनंदरूपी मेघ डोळ्यात भरून आला व तो प्रेमाश्रूंचा वर्षाव करू लागला. अहंकाररूपी बेडी तुटली. आम्ही भवसमुद्राच्या परतीराला जाऊन पोहोचलो म्हणून रोमांचरूपी पताका उभारली. अविद्येला पार जिंकले. देहभाव पळून गेला म्हणून शरीर चळाचळा कापू लागले. संकल्पविकल्प नाहीसा झाला व मनोरथ मनासह बुडाला. यदुराजाने सर्व जीवभाव श्रीसद्गुरूंना अर्पण केला व त्याचे चिह्न तो तत्त्वतः आपल्या देहावर दाखवू लागला. ते अवधूत साक्षात् श्रीदत्तात्रेय होते असे जाण. त्यांनी यदुराजाला आलिंगून त्याला आत्मस्वरूपाच्या ज्ञानाचा अनुभव दिला. पहिला शिष्य सहस्त्रार्जुन व दुसरा यदु अशी श्रीदत्तात्रेयांची शिष्य-परंपरा असून कलियुगात जनार्दन यांना आपला तिसरा शिष्य केले. आपल्याला श्रीगुरुप्राप्ती कशी होईल म्हणून जनार्दनांना अतिशय चिंता लागून राहिली होती. त्या सद्गुरूंच्या चिंतनामध्ये त्यांना तिन्ही अवस्थांचा विसर पडला. परंतु देव हा

भावाचा भोक्ता असल्यामुळे, त्यांची ती खरी तळमळ जाणून श्रीदत्तदेव त्यांच्याकडे आले व त्यांनी त्यांच्या मस्तकावर हात ठेवला. हात ठेवल्याबरोबर तत्काळ जनार्दनांना आत्मबोधाचे आकलन झाले व त्या बोधाच्या योगाने प्रपंचाचे मूळच मिथ्या करून सोडले.

**"विवेकसिंधू"** या ग्रंथात शिष्य श्रीसद्गुरूंना अनन्य भावाने शरण गेल्यावर शक्तिपात दीक्षा देऊन श्रीगुरू त्याला कसे कृतार्थ करतात त्याचे अत्यंत रेखीव वर्णन श्रीमुकुंदरायांनी केले आहे.

**तंव शिष्यु तापत्रयीं संतप्तु। शमदमसाधनीं संयुक्तु।**
**गुरूतें शरणांगतु। विनविता जाला।।१.८९।।**
**जी मी संसारसागरीं बुडालो। तापत्रयेंवडवानळीं पोळलो।**
**क्रोधादि जळचरीं विसंचिलों। जालो अतिशोच्यु।।९०।।**
**ज्ञानाचिया तारुवीं बैसउनि। कृपेचिये सुवायें पेलौनि।**
**देवेंचि तारक होवौनि। उतरावें मातें।।९१।।**
**संसाराचिये बंदिशाळे। बांधलों अज्ञानसांखळें।**
**तियें बंधनें तोडावीं स्वामी सकळें। ज्ञानशस्त्रे करौनिया।।९२।।**
**भवार्क मध्यान्ह तापवेळे। तापलों तापत्रयें दावानळें।**
**जी कृपाजळधरा ज्ञानजळें। निववावें मातें।।९३।।**
**ऐसी कृपा उपजवौनि। विनवी शिष्यशिरोमणी।**
**मस्तकु श्रीगुरुचरणीं। न्यासिता जाला।।९४।।**
**तंव बोलिला श्रीगुरुराजा। बारे तूं शिणलासि कवणीये काजा।**
**कैसें बंधन तोडिजैल वोजा। हें चोज पाही रोकडेंचि।।९५।।**
**ऐसी प्रतिज्ञा स्वीकारौनि। शिष्यातें सन्मुख बैसवौनि।**
**ज्ञानसमावेश करौनि। गुरुसंप्रदायक्रमें।।९६।।**
**तेथें ज्ञानशक्तीचा प्रवेशु। अज्ञानशक्तीचा निरासु।**
**बोध उठिला स्वयंप्रकाशु। शिष्य चैतन्यीं।।९७।।**
**तेवेळी कंपस्वेदादिक। उठिले भाव सात्त्विक।**
**जैसें साम्राज्य पावे रंक। तैसें वर्तते जाले।।९८।।**
**या नांव शक्तिपातु बोलिजे। जेथे स्वानुभवुचि अनुभविजे।**

नि:शेष तेही विसरिजे। स्मरण सांसारिक।।९९।।
स्तंभ स्वेद रोम उभारण। स्वरभंगादि कंपायमान।
वैवर्ण्य अश्रु प्रलपन। अष्ट सात्त्विक भाव हे।।१००।।
चित्त चाकाटले आंतु घेत। वाचा पांगुळली जेथिच्या तेथ।
आपाद कंचुकित। रोमांच आले।।१०१।।
वर्षताती आनंदजळें। आंतुला सुखोर्मिचेनि बळें।
बाहीर कापे अंग सगळे। अति वेगें थराथरा।।१०२।।
तंव आनंदाचा पूरू। शिष्यसरिते आला थोरू।
तेथ अविवेक पोहणारू। बुडौनि जाये।।१०३।।
अहंकारद्रुम उन्मूळिला। तृष्णेपक्षिणीचा कुरुठा मोडिला।
इंद्रियेग्रामु बुडाला। तिये आनंदजळीं।।१०४।।
असो हे सुखाचिये शेजारी। तेथ स्वानुभूतीं अंतुरीं।
तिया आलंगिला सुंदरी। तो योगीराजु।।१०५।।
तियेचेनि आंगमेळे। नुठती इंद्रियांचे डोहाळे।
तेथ आसकेंचि केवळें। स्वस्वरूप।।१०६।।
तेथ नेणीव ना जाणीव। सरले भावाभाव।
जेथ एकछत्र राणीव। तया योगीराजासी।।१०७।।
स्वस्वरूपसुखाचेनि भरे। तेथ कांहींच न स्फुरे।
ते योगनिद्रा न संहरे। तया योगिराजासी।।१०८।।
जेथ स्वर्गसुखाची कुरवंडी। वोवाळोनि सांडिजे फुडी।
तेया ब्रह्मसुखाची गोडी। केवीं बोलावी।।१०९।।
जेथ मनाचें जाणणें। खुंटले वाचेचें बोलणें।
हें जयाचें तोचि जाणे। येरा टकमकचि।।११०।।
तैसें वैराग्यवन्ही तापले। ज्ञानाधिकारु पातले।
अवधातुही ब्रह्म जाले। गुरुचरणस्पर्शें।।७३।।
पाहतां श्रीगुरुचेया महिमाना। परिसुहि होये ठेंगणा ।
तो लोहाते करी सुवर्णा। परि तो परिसु नोहेचि।।७४।।
परिससन्निधीं वेंधलें। लोहो सुवर्ण होऊन ठेलें।

**परि तेथ अवधातु लागलें। ते कनक नोहेचि कीं।।७५।।**
**तैसा नोहे गुरुकृपेचा वेधु। जो सद्यस्वरूपावबोधु।**
**शिष्यचि ब्रह्म होये हा विनोदु। नवल तेथिंचा।।७६।।**
**कल्पतरूसी उपमा द्यावी। तरी तो कल्पिलिया अर्थातें पुरवी।**
**कल्पनातीत भेटवी। श्रीगुरुनाथु।।७७।।**
**कामधेनू आणि चिंतामणी। इये पुरवू न सकती आयणी।**
**चिंतिलेया अर्थाची दानी। म्हणौनिया।।७८।।**
**जीयें जननीजनकें। तीयें संसारदायकें।**
**परि नव्हेति भवबंधछेदकें। येके श्रीगुरुवांचौनि।।७९।।**
**जे चिंतनासि अतीत। सकळ कल्पनाविरहित।**
**ते ब्रह्म निजानंदभरित। देता श्रीगुरुनाथु।।८०।।**
**म्हणौनि श्रीगुरूसीं उपमा। यैसी कवणासी असे महिमा।**
**प्रपंचचि होये परब्रह्म। प्रसादें जयाचेनि।।८१।।**

त्रिविध तापांनी गांजलेला व शमदम वगैरे साधनांनी युक्त असलेला असा शिष्य श्रीगुरूंना शरण येऊन त्याने नम्रतेने विनंती केली की, "महाराज! मी भवसागरात बुडालो आहे. त्रिविध तापांच्या वडवाग्नीने पोळलो आहे. क्रोध वगैरे जलचर प्राण्यांकडून ग्रासला गेलो आहे. त्यामुळे अतिशोकाकुल झालो आहे. श्रीगुरुदेवांनी ज्ञानाच्या तारवात बसवून कृपेच्या चांगल्या वाऱ्याने त्याला चालवून माझे तारक होऊन मला पैल उतरवावे. मी संसाराच्या कैदखान्यात अज्ञानरूपी बेड्यांनी जखडून गेलो आहे. स्वामींनी ज्ञानरूपी हत्याराने त्या सर्व बेड्या तोडून टाकाव्यात. संसाररूपी सूर्याच्या प्रखर माध्याह्नीच्या वेळेला तापत्रयाच्या दावानळाने त्रासून गेलेल्या मला हे कृपारूपी मेघराजा! ज्ञानरूपी जलाने शांत करावे." अशी करुणा भाकून शिष्यश्रेष्ठ विनवू लागला.

त्याने श्रीगुरूंच्या चरणांवर डोके ठेविले. तेव्हा श्रीगुरू म्हणाले, "काय म्हणून तू दमून गेलास बाबा! हे बंधन स्वसामर्थ्याने कसे तोडले जाते हेच आश्चर्य तू प्रत्यक्ष पाहा." अशी प्रतिज्ञा करून

शिष्याला समोर बसवून आपल्या श्रीगुरूंच्या संप्रदायाप्रमाणे त्याच्या ठिकाणी ज्ञानाचा समावेश केला. त्याच्या ठिकाणी ब्रह्मज्ञानशक्तीचा प्रवेश केला व अज्ञान शक्तीचा निरास केला. त्याबरोबर शिष्यरूप चैतन्याला आपल्या ब्रह्मतेजाचे ज्ञान झाले. त्यावेळी कंप, घाम वगैरे सात्त्विक भाव शिष्यामध्ये उत्पन्न झाले. एखाद्या दरिद्र्यास साम्राज्य मिळाले म्हणजे तो जसा वागतो तसा तो शिष्य वागू लागला. या अवस्थेलाच शक्तिपात असे म्हणतात. तो झाला म्हणजे आपण ब्रह्म आहोत असा अनुभव अनुभवावयाला मिळतो व संसाराचे स्मरण नि:षेश नाहीसे होते. शरीर निश्चल होणे, घाम येणे, रोमांच येऊन केस उभे राहणे, आवाजात बदल होणे, शरीर कंप पावणे, फिकटपणा येणे व अश्रुपात होणे हे अष्टसात्त्विक भाव शक्तिपात झाल्यामुळे उत्पन्न होतात. चित्ताची बाहेरची ओढ संपून ते आतच स्थिर होऊ लागते. वाचा जेथल्या तेथेच पांगळी होऊन जाते. सर्व शरीरभर रोमांच येतात. आनंद आत न मावल्यामुळे तो अश्रूंवाटे बाहेर पडतो. हृदयात सुखाच्या ऊर्मी इतक्या बलवान् होऊन उसळत असतात की, त्यामुळे शरीर सतत कंप पावते. त्यावेळी शिष्यरूपी नदीला आनंदाचा मोठा पूर आला. त्यात अविवेकी पोहणारा बुडूनच जावयाचा. त्या आनंदाच्या पुरात अहंकाररूपी वृक्ष मुळासकट उपटून जातो. वासनारूपी पक्षिणीचे घरटे मोडून पडते. इंद्रियसमूह बुडून जातो. या सुखात सहभागी म्हणून स्वत:ची अनुभूती ही स्त्री होते. ती त्या योगिराजाला आलिंगन देते. तिच्या अंगस्पर्शाने विषयसुखाच्या इच्छाच उत्पन्न होत नाहीत. तेथे तत्काळ केवळ स्वस्वरूपाचे ज्ञानच होते. त्या स्थितीत जाणीव नसते-नेणीव नसते. भावाभाव उरत नाहीत. योगिराज त्या स्थितीत एकछत्री साम्राज्यपद भोगतो. स्वस्वरूप हे सुखाने पूर्ण भरलेले असते. तेथे कोणताच भाव स्फुरत नाही. त्या योगिराजाची ही योगनिद्रा कधीही नाहीशी होत नाही. या सुखावरून स्वर्गातील सर्व सुखे निरर्थक म्हणून ओवाळून टाकावीत. असल्या ब्रह्मसुखाची गोडी कशी सांगावी? त्याच्यापुढे मनाचे जाणणे व वाचेचे बोलणे खुंटून जाते. हे ज्याचे तोच जाणतो.

इतरांनी नुसते टकमक पाहतच राहावे. त्याचप्रमाणे निकृष्ट धातूसारखे असलेले वाईट शिष्यही वैराग्यरूपी अग्नीने तापल्यामुळे ज्ञानाचे अधिकारी होऊन श्रीगुरुचरणांच्या स्पर्शाने ब्रह्मरूप होतात. श्रीगुरूंचा मोठेपणा पाहता परीससुद्धा त्यांच्यापुढे कमी दिसतो. तो लोखंडाचे सोने करतो; परंतु ते लोखंड परीस होत नाही. परिसाला लोह चिकटले तर लोखंडाचे सोने होते; परंतु तेथे दुसरा निकृष्ट धातू आणला तरी त्याचे सोने होत नाही. श्रीगुरूंच्या कृपेचा वेध तसा नाही. त्याने एकदम स्वरूपाचा बोध होतो. तेथील आनंददायक आश्चर्य हेच आहे की, त्याने शिष्य प्रत्यक्ष ब्रह्म होतो. श्रीगुरुकृपेच्या वेधाला जर कल्पवृक्षाची उपमा द्यावी, तर कल्पवृक्ष मनात आणलेल्या इच्छा पुरवितो. परंतु श्रीगुरुनाथ कल्पनेच्या पलीकडचे जे ब्रह्म ते भेटवितो. कामधेनू काय किंवा चिंतामणी काय, कोणीच ब्रह्मप्राप्तीची इच्छा पुरवू शकत नाही; कारण ते इच्छिलेल्या वस्तूचेच दाते आहेत. आईबाप खरे, पण ते संसारच मागे लावून देतात. परंतु एका श्रीगुरूशिवाय कोणीही संसाराची बंधने तोडू शकत नाही. चिंतनाच्याही जे पलीकडचे व सर्व कल्पनांच्याही पलीकडचे स्वानंदपूर्ण ब्रह्म ते प्राप्त करून देणारा श्रीगुरुनाथच! म्हणून श्रीगुरूंना उपमा देण्याइतका मोठेपणा कोणात आहे? त्यांच्या प्रसादाने संसार हाच प्रत्यक्ष परब्रह्म होतो.

सारांश, श्रीगुरुकृपेशिवाय सर्व गोष्टी तुषकंडनवत् व्यर्थ होत. या दृष्टीने श्रीनिपट निरंजन असे म्हणतात की-

**जोगजुगत कर देखे। ध्यानकूं कर देखे।**
**करमकूं कर देखे। कुचभी भयो नहीं।।१।।**
**स्नानसंध्या कर देखे। देवपूजा कर देखे।**
**पवन शीस चढा देखे। बालबी उखाडो नहीं।।२।।**
**काशीरामेसर फिर देखे। द्वारका जगन्नाथ देखे।**
**अजोध्या मथुरा देखे। देव तो मिला नहीं।।३।।**
**तनमो खाक चढाई। जटादाढीभी बढाई।**
**नींबकी पात खाई। झ्यांट भी भयो नहीं।।४।।**

**कहे निपटनिरंजनलाल। मिले जब सद्गुरु दयाल।**
**तब एक पलखमो उजाल। सब खलकभर अलख दिखायो।।**

**स्वतः होणारा योग :-**

शक्तिपातयोगमार्गाचे पाचवे वैशिष्ट्य हे आहे की, श्रीगुरुकृपेने शक्ती जागृत झाल्यावर शिष्य स्वतःच या योगमार्गाची वाट चालू लागतो; कारण शक्तिपातयोग हा स्वतः होणारा योग आहे. एकदा का श्रीगुरूंनी आपल्या शिष्यावर शक्तिपात करून दैवी शक्ती संक्रमित केली की, शिष्य आपोआप आसन, प्राणायाम, मुद्रा, प्रत्याहार, धारणा व ध्यान या गोष्टी सहजपणे आत्मसात करतो. यासाठी त्याला कोणाचेही मार्गदर्शन घेण्याचे कारण पडत नाही. कारण जागृत झालेली शक्तीच साधकाला सतत आतून मार्गदर्शन करीत असते. त्यामुळे डोळे मिटून बसण्यापलीकडे साधकाला कोणत्याही प्रकारची विशिष्ट मेहनत किंवा त्रास करून घ्यावा लागत नाही.

दीक्षा झाल्याबरोबर साधकाचे शरीर, मन, बुद्धी, व वासना यांचे शुद्धीकरण सुरू होते. ज्याला त्याला त्याच्या संस्काराप्रमाणे अनुभव येऊ लागतात. कोणाला घूर्णा म्हणजे शरीर गरगर फिरणे होते. तर कोणाला योगासने होतात. ज्याला योगासनांचा गंधही नाही असा अशिक्षित साधकही योगमुद्रा, शीर्षासन, जालंधर बंध, दीर्घ कुंभक, भ्रामरी इत्यादि करू लागतो. हसणे, रडणे, जमिनीवर लोळण घेणे, शरीरावर आघात करून घेणे, जोराने गाणे, ओरडणे, भजन म्हणणे, नाम घेणे, ॐकाराचा दीर्घ उच्चार करणे, जमिनीवर निश्चेष्ट पडणे, झोप लागणे इत्यादि क्रिया होऊ लागतात.

शक्ती जागृत झाली की, मूलाधारात कंपन सुरू होते. शरीर थरथर कापू लागते. श्वासप्रश्वास जोराने चालू होतात. आत्यंतिक आनंद होतो. नाचावेसे वाटते. शरीराचा तोल सांभाळता येत नाही. अंगावर रोमांच उभे राहतात. रडू येते. मुखातून चमत्कारिक शब्द निघू लागतात. अतिशय भीती उत्पन्न होते. घाम फुटतो. मूत्रोत्सर्ग होतो. क्वचित् वीर्यपात होतो. केवल कुंभक होतो. मन बाह्यज्ञानरहित

होते. उड्डीयान, जालंधर व मूलबंध आपोआप होतात. खेचरी मुद्रा होते. दृष्टी भ्रुकुटीमध्ये, नासाग्री किंवा हृदयस्थानी स्थिर होते. मन शून्य होते. प्रणवजप आपोआप होतो. सुषुम्णेतून प्रवाह वरवर चढल्यासारखा वाटतो. मनाला निरतिशय सुख प्राप्त होते. सर्वत्र शून्य भासते. भयानक काळोख किंवा प्रखर उजेड दिसतो. नेत्र उघडण्याचा प्रयत्न केला तरी ते उघडत नाहीत. शरीर शून्य होऊन नाना प्रकारचे अनाहत नाद ऐकू येऊ लागतात. शरीर खेचले जाते. वरवर तरंगत आहे असे वाटते. शरीराला विजेचे झटके बसत आहेत असे वाटते.

काही वेळा शरीर जमिनीवर निश्चेष्ट पडते. नाड्या आतल्या आत खेचल्यासारख्या वाटतात. शरीरातून प्राण बाहेर चालले आहेत असा भास होऊन प्राण कासावीस होतात. शरीर बेडकासारखे उड्या मारते, डोलते व हाताने रगडले जाते. बुक्क्या मारून घ्याव्याशा वाटतात. टाळ्या व चुटक्या वाजवून साधक गाऊ लागतो.

मनात आवेश येतो. शरीरात कोणत्यातरी अद्भुत शक्तीचा संचार झाला आहे असे वाटते. कितीही आसने व क्रिया झाल्या तरी थकल्यासारखे वाटत नाही.

साधनाच्या वेळी शक्ती शरीराचा ताबा घेते. त्यावेळी आतून उसळून येणाऱ्या क्रिया केल्याशिवाय साधकाला बरेच वाटत नाही. त्यावेळी मन आनंदात मग्न होऊन मस्त बनल्यामुळे परिस्थितीचे भान राहात नाही. भांगेसारख्या पदार्थांचे सेवन केल्यासारखी धुंदी येते. स्थळ-काळाचे भान हरपून जाते. शरीर हलके होते. हवेतून चालल्यासारखे वाटते. मन नेहमी प्रसन्न व प्रफुल्लित राहते. इष्ट-अनिष्ट गोष्टी घडल्या तरी मन विचलित होत नाही.

साधक कविता करू लागतो. ग्रंथलेखन करतो. त्याच्या वाणीत अद्भुत तेज येते. त्याला भूत, भविष्य व वर्तमान कळते. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध यांचे दिव्य अनुभव येतात. वेदवेदान्ताचे मर्म लक्षात येते. कोणत्याही शास्त्रात गती प्राप्त होते.

साधनात साधकाला देवतांची दर्शने होतात. मंत्र स्फुरतात. रोगांना औषधी मिळते. आतले शरीर किंवा सूक्ष्म शरीर आपल्या दृष्टीपुढे दिसू लागते. स्थूल शरीराचे अस्तित्व संपून जाते. डोळे उघडल्यावरही काही वेळ सर्वत्र शून्यतेचा भास होतो.

सकाळ-संध्याकाळ ठराविक वेळ झाली की, साधनाला बसल्याशिवाय साधकाला चैन पडत नाही. काही वेळेस साधकाला स्वप्नात अगर साधनाच्यावेळी भयंकर आकृती व रूपे दृष्टीस पडतात. देवता, श्रीगुरू किंवा पितरांचे दर्शन होते. श्रीराम, श्रीकृष्ण, श्रीशिवलिंग आदि दर्शने होतात. पुस्तक, वस्त्र, स्त्रिया, बालक, सूर्य, चंद्र, तारे, ज्योती, नदी, समुद्र, तलाव, पर्वत, वृक्ष, जल, गाय, घोडा, सिंह, वाघ, पशू, पक्षी, सर्प, अन्न, पुष्प, फल, दूध या गोष्टीही ध्यानात दिसतात. वेदध्वनी ऐकू येतो. आपण मृत्यू पावलो आहोत असे दिसू लागते.

अशा प्रकारे शरीर, मन, बुद्धी व प्राण यांच्या शुद्धीसाठी ज्याला ज्या आसनांची आवश्यकता असते ती आपोआप सुरू होतात. साधकाला दोष घालविण्यासाठी स्वतः काहीही करावे न लागता शक्ती साहाय्य करते. शिष्य निरोगी, तरुण, मन व इंद्रिये यांवर ताबा असलेला, वर्णाश्रमधर्मांचे नियम पाळणारा, देव, ब्राह्मण व श्रीगुरू यांच्यावर पूर्ण श्रद्धा असलेला असेल तर अशा साधकावर शक्ति-संक्रमणाचा ताबडतोब परिणाम होतो.

वरील सर्व क्रिया ज्याच्या त्याच्या पूर्वसंस्काराप्रमाणे घडून येतात. अमुक क्रिया होतील किंवा होणार नाहीत हे सांगता येत नाही. त्याचप्रमाणे अमुक क्रिया आपणास झाल्या पाहिजेत व अमुक नको असाही साधकाला आग्रह धरता येत नाही. साधकाच्या प्रगतीसाठी ज्या क्रिया आवश्यक असतील त्या होत राहतील व नको असलेल्या होणार नाहीत किंवा थांबून जातील.

**आपत्तिरहित साधन :-**

शक्तिपातयोगमार्गाचे सहावे वैशिष्ट्य हे आहे की, या साधनात

साधकाला कोणत्याही प्रकारची दुखापत किंवा इजा होण्याची भीती नसते. साधक शारीरिक, मानसिक व सांस्कारिक दृष्टीने ज्या अवस्थेत असेल त्या अवस्थेतून शक्ती त्याला पुढे नेत असते. अशा वेळी ज्या क्रियादि गोष्टी घडून येतात, त्या साधकाला पेलतील व कोणत्याही प्रकारचा त्रास होणार नाही इतक्याच तीव्र, मध्यम किंवा मंद असतात. श्रीगुरूंच्या मार्गदर्शनाशिवाय आसने, प्राणायाम वगैरेंचा अभ्यास करीत असताना धोका उत्पन्न होण्याचा खूप संभव असतो. "**अयुक्ताभ्यासयोगेन सर्वरोगसमुद्भवः ।।२.१६।।**" असे "**हठयोगप्रदीपिकेमध्ये**" या धोक्याचे वर्णन केले आहे. म्हणजे हठयोगातील अभ्यासातील चुकांमुळे वाटेल त्या तऱ्हेच्या शारीरिक व्याधी उत्पन्न होऊ शकतात. परंतु शक्तिपातयोगमार्गाच्या सांप्रदायातील साधना ही एक नैसर्गिक साधना आहे. ही साधना इतकी श्रेष्ठ आहे की, ती नरदेह सर्व प्रकारच्या व्याधींपासून मुक्त व शुद्ध करते, इतकेच नव्हे; तर असाध्य रोगही नाहीसे करते.

संसारी मनुष्यही या साधनेपासून मिळणाऱ्या लाभांनी आपले कल्याण करून घेऊ शकतो. परमानंद व मनःशांती हे दोन महान् लाभ या साधनेमुळे अनायासे पदरात पडतात.

जो साधक इतर कोणत्याही प्रकारच्या साधनाचा अवलंब करून योगाचा अभ्यास करतो, त्याला निरनिराळ्या आपत्तींना तोंड द्यावे लागते व परम कल्याण होईपर्यंत अतिशय शिस्तबद्ध जीवन जगावे लागते. परंतु या साधनात इतर साधनांइतकेच शिस्तबद्ध जीवन जगता आले नाही तरी परमानंद प्राप्त होतोच. शिवाय साधकातील कुंडलिनी शक्ती जागृत होताच ती त्याला आत्मप्रचीतीपर्यंत घेऊन जाते. साधक परमोच्च ब्राह्मी स्थितीस पोहोचेपर्यंत शक्तीचे कार्य अव्याहत चालू असते. मध्यंतरी जर साधन अपूर्ण राहिले, मृत्यू आला, अनेक जन्म घ्यावे लागले तरी जागृत झालेली शक्ती झोपी न जाता तशीच जागृत राहाते व आपले उद्दिष्ट पूर्ण करते.

**इतर साधनांची अनावश्यकता :-**

शक्तिपातयोगमार्गाचे सातवे वैशिष्ट्य हे आहे की, एकदा का श्रीसद्गुरुकृपेने शिष्याची योगशक्ती जागृत झाली की, इतर साधनांचे महत्त्व शिल्लक राहात नाही. "हे नामदेवा! तुला गुह्य ज्ञान सांगितले व निजस्वरूपाचा प्रत्यय आणून दिला तेव्हा तुला अन्य साधनांच्या खटपटीची काय आवश्यकता आहे?" असे श्रीनामदेवांचे श्रीगुरू श्रीविसोबा खेचरराय यांनी नामदेवास बजावून सांगितले याचे कारण हेच आहे. आसन, प्राणायाम, मुद्रा, ध्यान, धारणा व इतर योगाचे प्रकार यांनाही काही महत्त्व उरत नाही; कारण या सर्व गोष्टी शक्ति-जागृतीसाठीच करावयाच्या असतात. अर्थात् श्रीगुरुकृपेने शक्ती आधीच जागृत झाल्याने इतर योगक्रियांची व साधनांची आवश्यकताच संपून जाते.

शक्तिपातयोगमार्गाद्वारे साधकास एकदा दीक्षा मिळाली की, मग तो स्वतः योगाच्या कोणत्याही मार्गाचा अवलंब करू शकत नाही. इतकेच नव्हे; तर त्याने तसा प्रयत्न केला असता त्याला सुखही लाभत नाही.

साधकानेही मनातून नानाविध साधनांतून व मंत्रतंत्राच्या जालातून स्वतःला निश्चयाने मुक्त करून व इतर अवडंबरांचा त्याग करून हे साधनच आपल्याला तारील असा निश्चय ठामपणे मनात बाणवून अभ्यास केला पाहिजे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी **"अनुभवामृतात"** श्रीसद्गुरुकृपेनंतर इतर साधनांचे महत्त्व कसे शिल्लक राहात नाही हे सांगताना म्हटले आहे की -

**जो भेटलियाचि सर्वे। पुरती उपायांचे धावे।**
**प्रवृत्तिगंगा स्थिरावे। सागरीं जिये।।२-८।।**

यावर टीका करताना श्रीनिरंजन रघुनाथ **"अनुभवामृत-पद-बोधिनी"** या ग्रंथात असे म्हणतात की -

जो भूमास्वरूप श्रीगुरू भेटला असता, अपरोक्षत्वेंकरून अनुभविला

असतां, मोक्षाविषयीं श्रवणमननादि नाना उपायांचे धावे पुरती, यत्न सरतात; कां जे, शिष्य जो तो मोक्षरूप आपणचि होतो म्हणून. आणखी प्रवृत्ति म्हणजे प्राक्प्रवणवृत्ति हेचि कोण्ही एक गंगा जे ती आनंदसिंधु अपारावर गुरु तल्लक्षण सागर जो त्याचे ठायीं स्थिरावे, विलयातें पावते.

**स्वप्रयत्नशून्य साधन :-**

शक्तिपातयोगमार्गाचे आठवे वैशिष्ट्य हे आहे की, सकाळ-संध्याकाळ साधकाने नियमितपणे ठराविक वेळी डोळे मिटून आसनावर बसले पाहिजे. या मार्गातील स्वप्रयत्नाचा भाग एवढाच आहे. एखादा साधक डोळे मिटून आसनावर बसला की, डोळे उघडेपर्यंत त्याने आतून ज्या क्रिया होतील त्यांना अगदी मुक्तपणे वाव दिला पाहिजे. ज्या ज्या क्रिया आतून होतील त्यांना कसलाही विरोध न करता व मध्ये अडचण न आणता साधकाने फक्त निरीक्षकाची भूमिका घेऊन त्या क्रिया नियंत्रित करण्याचा प्रयत्न कधीही करता कामा नये. साधनाच्या वेळी घडणाऱ्या क्रिया दैवी शक्तीकडून विवेकबुद्धीने आतून चालविल्या जातात. ज्या ज्या क्रिया घडून येतात त्यामुळे साधकाला अतिशय समाधान लाभते.

श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी **"श्रीज्ञानेश्वरी"** या ग्रंथात या मार्गातील प्रयत्नांचे व त्यांच्या फलांचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे.

"या मार्गातील प्रयत्नाचा भाग एवढाच आहे की, निश्चलपणे बसून राहणे होय. या साधनाच्या नियमित अभ्यासाने विषयांचा विसर पडतो. इंद्रियांचे चांचल्य व तळमळ नाहीशी होते. मनाचे मनपण व हाव संपून ते हृदयात विलीन होऊन जाते. नियमित अभ्यास केल्याने निरनिराळ्या क्रिया होऊन अभ्यासाचा कृपाप्रसाद घडून येतो. अभ्यासाच्या सातत्याने मनाची गती कमी होते व मनोविकार आपोआप बंद पडून सर्व मनोधर्माचे अस्तित्वच नाहीसे होते. कल्पना खुंटते. संकल्प विकल्प मावळून विचार संपतात व अनिर्वचनीय असे महासुख प्राप्त होते.

जे कोणी दृढनिश्चयाने शेवटपर्यंत या योगाचा अभ्यास करतात ते स्वतःच ते अनिर्वचनीय सुख बनतात. हे साधन जे कोणी आपले शरीर झिजवून करतात ते शुद्ध होऊन परमेश्वराच्या योग्यतेस पोहोचतात. ब्रह्मानुभवाचा अंतरंगात उदय झाल्याबरोबर साधकाला विश्व भासेनासे होते. हा अभ्यास जे पराकाष्ठेच्या दृढतेने करतात ते निश्चितपणे ब्रह्मपदाला पोहोचल्याशिवाय राहत नाहीत. साधकाने अभ्यासाचे पाऊल उचलून मार्गक्रमण केले तरच तो आयुष्य संपण्यापूर्वी मोक्षप्राप्तीच्या गावाला पोहोचू शकतो. एरवी दृढ अभ्यासाशिवाय हे शक्य नाही." **(श्रीज्ञानेश्वरी अध्याय ६)**

महर्षी श्रीपतंजलीनी "**पातंजल योगसूत्रे**" या ग्रंथात सांगितलेली पुढील तीन सूत्रे या दृष्टीने लक्षात ठेवण्यासारखी आहेत. "**तीव्र-संवेगानामासन्नः ।।१.२१।।**" म्हणजे जो फार प्रयत्नशील असतो त्याला या योगात लवकर यश मिळते. "**मृदुमध्याधिमात्रत्वात् ततोऽपि विशेषः ।।१.२२।।**" साधनेतील मंद प्रयत्न, मध्यम प्रयत्न व उत्कट प्रयत्न यांच्या अनुसार साधकांना प्राप्त होणाऱ्या यशामध्येही फरक पडतो. "**स तु दीर्घकाल नैरन्तर्य्य सत्कारासेवितो दृढभूमिः ।।१.१४।।**" अभ्यास दीर्घकाल, खंड न पडता व अत्यंत श्रद्धाभक्तिआदरपूर्वक केला म्हणजे तो अभ्यास दृढ होतो (व परमपदाची प्राप्ती होते.)

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी "**अंतर्भाव**" या प्रकरण ग्रंथात देखील नित्यनियमित साधनाचे महत्त्व पुढीलप्रमाणे सांगितले आहे. ते साधकांनी अवश्य लक्षात ठेवले पाहिजे.

**कांहीं तरी एक कारण। कैसें घडें यत्नेंविण।**
**ब्रह्मज्ञान परम कठीण। साधनावांचूनि।।२.१२।।**
**नित्यनेम दृढ चित्तीं। तेणें शुद्ध चित्तवृत्ती।**
**होवोनि भगवंतीं। माग फुटे।।३.५।।**
**नित्यनेमें भ्रांति फिटे। नित्यनेमें संदेह तुटे।**
**नित्यनेमें लिगटे। समाधान अंगीं।।६।।**
**नित्यनेमें अंतर शुद्ध। नित्यनेमें वाढे बोध।**

**नित्यनेमें बहुखेद। प्रपंचीं तुटती।।७।।**
**नित्यनेमें सत्त्व चढे। नित्यनेमें शांती वाढें।**
**नित्यनेमें थारा मोडे। देहबुद्धीचा।।८।।**
**नित्यनेमें दृढभाव। नित्यनेमें भेटे देव।**
**नित्यनेमें पुसे ठाव। अविद्येचा।।९।।**

श्रीशंकरांचे उदाहरण देऊन साधन का व कसे केले पाहिजे तेही श्रीसमर्थांनी पुढे "**पंचसमासी**" व उपरोक्त ग्रंथात सांगितले आहे.

**जो सिद्धाचाही सिद्ध। ज्ञानवैराग्य प्रसिद्ध।**
**सामर्थ्यसिंधु अगाध। कैलासराणा।।पंच.३.१७।।**
**तो सिद्ध करी साधन। सर्वकाळ रामचिंतन।**
**ध्यान धारणा अनुष्ठान। चुकों नेदी।।१८।।**
**ऐसे अपार महामती। झाले ते साधन करिती।**
**तरी ते मानव किती। बापुडे किंकर।।१९।।**
**म्हणोनि साधनासी जो सिद्ध। तोचि ज्ञाता परम शुद्ध।**
**येर जाणावे अबद्ध। अप्रमाण।।अंत.४.६।।**
**साधनेंविण बाष्कळता। तीच जाणावी बद्धता।**
**तेणें अनर्गळता। आसक्तरूपें।।५।।**

श्रीकपिल महामुनींनी "**सांख्यसूत्रात**" सांगितल्याप्रमाणे "**कृत-नियमलङ्घनादानर्थक्यं लोकवत्।।४.१५।।**" मूळ नियमांचे उल्लंघन केल्यास, इतर व्यावहारिक गोष्टींप्रमाणे येथेही ध्येयसिद्धी अशक्य होऊन बसते म्हणून नियमादिकांचे पालन उत्तम रीतीने करून साधन करीत राहिले पाहिजे.

**सर्वांना मुक्त साधन :-**

शक्तिपातयोगमार्गाचे नववे वैशिष्ट्य हे आहे की, जगातील सर्व लोकांना हा मार्ग मोकळा आहे. स्त्री, पुरुष, बाल, वृद्ध, तरुण, आस्तिक, नास्तिक, स्वकीय, परकीय, रोगी, निरोगी, पापी, पुण्यवान इत्यादि सर्वांना हा मार्ग खुला आहे. काही ठराविक बंधने व नियम पाळल्यानंतर सर्वांना आत्मशक्ती जागृत झाल्यानंतर त्यांच्या त्यांच्या

संस्काराप्रमाणे अनुभव येऊ लागतात. प्रत्येक मनुष्य हा ईश्वरी ज्ञानाचा अधिकारी असल्यामुळे देश, काल, धर्म, जाती इत्यादि कशाचेही बंधन या योगमार्गात आडवे येत नाही.

कर्म, जाती, अवस्था आणि आश्रम या गोष्टी योगसाधनेच्या किंवा तपस्येच्या आड येत नाहीत. चंदन व विष्ठा अग्नीत टाकल्यावर अग्नी दोन्ही गोष्टी ज्याप्रमाणे दग्ध करून शुद्ध करतो त्याप्रमाणे योगाग्नीत चांगले व वाईट सर्व नाहीसे होऊन मनुष्य ब्रह्मरूप होऊन जातो.

मनुष्यमात्राला दुःखनिवृत्तीचा उपाय कळावा व त्याला निरतिशय सुख प्राप्त व्हावे म्हणून श्रीब्रह्मदेवांनी एकदा श्रीमहादेवांना पुढील प्रश्न केला, "हे शंकरा! सर्व जीव सुखदुःखाच्या मायाजालात गुरफटून गेले आहेत त्यापासून त्यांची मुक्ती कशी होईल हे कृपा करून सांगावे. ज्या मार्गाने सर्व सिद्धी प्राप्त होतील, मायाजाल तुटून जाईल, जन्म, मृत्यू, जरा, व्याधी इत्यादि सर्वांचा नाश होईल व ज्यापासून मोठे सुख प्राप्त होईल, असा मार्ग दाखवा."

त्यावर श्रीशंकरांनी श्रीब्रह्मदेवांना सांगितले की, "हे ब्रह्मदेवा! परमपद कैवल्यरूप आहे. ते निरनिराळ्या प्रकारच्या मार्गांनी मोठ्या कष्टाने प्राप्त होते. मात्र सिद्धमार्गामुळे म्हणजेच शक्तिपातयोगमार्गामुळे ते कैवल्यपद सहज प्राप्त होते. इतक्या सहजतेने अन्य दुसऱ्या कोणत्याही मार्गाने कैवल्य मिळत नाही." **(योगशिखोपनिषद् अध्याय १.१ ते ३)**

यामुळे अशा प्रकारे शक्तिपातायोगाची दीक्षा देणारे सिद्धगुरू हे या भूतलावरील साक्षात् श्रीशंकरच होत हे निःसंशय खरे आहे.

**एका दिव्याने दुसरा दिवा लावावा असे साधन :-**

शक्तिपातयोगमार्गाचे दहावे वैशिष्ट्य हे आहे की, एका दिव्याने दुसरा दिवा प्रज्वलित करावा असे हे साधन आहे. एकदा का श्रीगुरूंनी शिष्याची चैतन्यशक्ती जागृत केली की, ती स्वतः प्रज्वलित राहते. पूर्वजन्माची शिदोरी व या जन्मीचे प्रयत्न यांच्या तेलाने हा दीप सतत प्रज्वलित राहतो. एकदा जागृत अथवा प्रज्वलित झालेला हा दिवा कधीही विझत नाही.

जीवाची बहिर्मुख वृत्ती, शारीरिक रोग, मानसिक चिंता, शोक, भय, वृद्धावस्था, अशुद्धी, श्रद्धाहीनता, मनाचे जडत्त्व, पूर्वजन्मीचे दुष्ट संस्कार, पाप, संशय, प्रमाद, आळस, चित्ताची विषयाकडे ओढ इत्यादि अनेक गोष्टी साधनाच्या आड येऊन दिवा विझला आहे असे वाटावयास लावतात. त्यामुळे उदासीनता प्राप्त होते. परंतु नियमित सकाळ-संध्याकाळ साधन केल्याने श्रीसद्गुरुकृपेने सर्व दोषांची निवृत्ती होऊन साधक परतीराला जाऊन पोहोचतो. "**रत्नमाला आगमामध्ये**" असे लिहिले आहे की -

**यस्मिन्काले तु गुरुणा निर्विकल्पं प्रकाशितम्।**
**तदैव किल मुक्तौऽसौ यन्त्रं तिष्ठति केवलम्।।**

ज्यावेळी श्रीगुरूंकडून निर्विकल्पाचा बोध शिष्याला प्रकाशित करून दिला जातो त्याचवेळी तो मुक्त होतो. त्यानंतर मात्र तो केवळ यंत्रवत् होऊन राहतो.

ज्योत प्रज्वलित झाल्यावर शिष्याने फक्त साक्षिभावाने तिच्याकडे पाहवयाचे. ती स्वतः कार्यरत होऊन महाज्योतीत विलीन होईल.

म.म.श्रीगोपीनाथ कविराज यांनी "**भारतीय संस्कृति और साधना" खंड एक,** या ग्रंथातील "**शक्ती का जागरण**" या लेखात म्हटल्याप्रमाणे "शक्तिपात होऊन कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय ब्रह्मप्राप्तीच्या महान् मार्गाच्या वाटचालीला सुरुवातही होत नाही. मग ब्रह्मप्राप्तीची गोष्ट तर फारच दूरची आहे. शक्ती जागृत होणे हाच मनुष्य जीवनाचा खरा उद्देश आहे. केवळ अपूर्ण कैवल्य प्राप्त करून जन्ममृत्यूच्या फेऱ्यात सापडून वरच्या दर्जाचे स्थान प्राप्त करणे हे मनुष्य जीवनाचे ध्येय असूच शकत नाही. आपली सुप्त भगवच्छक्ती जोपर्यंत पूर्णपणे जागृत होत नाही तोपर्यंत मनुष्य जीवनाचे खरे सार्थक होत नाही. कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय जड व चैतन्य यातील संघर्ष समाधानकारकपणे संपत नाही. विवेकज्ञानाचा उपयोग हा या मार्गाची वाटचाल सुरू करण्यास पहिली पायरी म्हणून ठीक आहे; परंतु शक्तीची साधना केल्याशिवाय शिवभावाची प्राप्ती होणे अत्यंत कठीण आहे."

**प्रारब्ध जय व ज्ञानप्राप्ती :-**

शक्तिपातयोगाचे अकरावे वैशिष्ट्य असे आहे की, या योगमार्गाच्या अभ्यासानेच पिंडसिद्धी म्हणजे प्रारब्ध जय होऊन ज्ञानप्राप्ती होते. योगी लोक यामुळेच असे म्हणतात की, शुष्क अशा ज्ञानमार्गापेक्षा हा सिद्धमहायोगमार्ग श्रेष्ठ आहे. ज्ञानमार्गात देह परिपक्व होत नसल्याने प्रारब्धाचा जय होऊ शकत नाही. परंतु ज्याच्या ठिकाणी योगाग्नी उत्पन्न झालेला असतो त्याचा देह प्रारब्धाधीन राहत नाही. विद्यारण्य-स्वामींनी "**जीवन्मुक्तीविवेकात**" "**योगप्राबल्याचा विचार**" मांडताना असे म्हटले आहे की, "**प्रारब्धं कर्म यथा तत्त्वज्ञानात्प्रबलं तथा तस्मादपि कर्मणे योगाभ्यासः प्रबलोऽस्तु। तथा च योगिनामुद्दाल-कवीतहव्यप्रभृतीनां स्वेच्छया देहपरित्याग उपपद्यते।**" म्हणजे प्रारब्ध-कर्म हे तत्त्वज्ञानापेक्षा प्रबल आहे व प्रबल प्रारब्धकर्मापेक्षा योगाभ्यास प्रबल आहे. अशा प्रकारे योगाभ्यास श्रेष्ठ आहे असे स्वीकारले म्हणजे उद्दालक व वीतहव्य प्रभृति योग्यांनी स्वेच्छेने देहपरित्याग केला हे जुळते. नाही तर त्यांना देहपरित्यागाकरिता प्रारब्धाधीन राहावे लागले असते. आपण अल्पायुषी आहोत, कमी आहोत व आपणास उद्दालकासारखा हा योग जमणार नाही असे साधकाने कधीही मनात आणता कामा नये. जन्मजन्मांतरी केलेल्या साधनाचे फल म्हणून उपरोक्त योग्यांना महायोगाची प्राप्ती होऊन ते प्रारब्धजयी झाले. त्याप्रमाणे पुढे आपणासही असा उपयोग होईल व या जन्मात यावच्छक्य कामक्रोधलोभादिंचा निरोध होईल असा विचार करून साधकाने योगाभ्यास केला पाहिजे. साधकाने याउलट विचार केला व शास्त्रीय प्रयत्न हे प्रबल नाहीत असे म्हटले तर वैद्यकीयशास्त्रापासून मोक्षशास्त्रापर्यंतची सर्व शास्त्रे व्यर्थ होतील. शक्तिपातयोगाची दीक्षा होऊनही, या ग्रंथात पुढे जी फले सांगितली आहेत, ती क्वचित् प्रसंगी आढळली नाहीत व एखाद्या साधकाला जरी त्याचा अनुभव आला नाही तरी शास्त्रीय प्रयत्न म्हणजे शक्तिपात योगसाधन हे प्रबलच आहे, हे त्याने पक्के ध्यानात ठेऊन साधन केले पाहिजे.

शास्त्रामध्ये असे सांगितले आहे की, जन्म अथवा स्थूल देहसंबंध, आयुष्य अथवा जीवनकाळ व भोग किंवा सुखदुःखबोध ही सर्व प्रारब्धकर्माची फले आहेत. प्रारब्धकर्माला ओलांडून जाणे, तोडणे किंवा त्याचे खंडन करणे शक्य नसल्यामुळे जात, जन्म, आयुष्य, भोग इत्यादि कोणत्याही गोष्टीत परिवर्तन होऊ शकत नाही. इतकेच नव्हे; तर ज्ञानाचा उदय झाल्यावरही जेव्हा सर्व संचित कर्मे जळून जातात व क्रियमाण कर्मे शिल्लक राहत नाहीत तेव्हा प्रारब्ध मात्र शिल्लक राहते. त्या प्रारब्धकर्माचा केवळ भोगूनच क्षय होतो. प्रारब्ध कर्म शिल्लक राहत असल्यामुळे ज्ञानोदयाबरोबर देह पडत नाही. जीवन्मुक्तीत व विदेहमुक्तीत जो फरक आहे त्याचे हेच खरे कारण आहे. यामुळे जीवनमुक्त पुरुषही प्रारब्धरहित होत नाहीत. सर्वश्री सौभरीमुनी, चंद्र, मांडव्यमुनी, शिखिध्वज, कवी, हरी इत्यादि योगी, नारद, ध्रुव, वासुदेव, ऋषभदेव, अगस्ती इत्यादि सर्व लोकांच्या चरित्रांकडे पाहिले म्हणजे हे लक्षात येते की, तत्त्वज्ञानाने प्रारब्धाचा क्षय होत नाही.

यासाठीच सिद्धमहायोगाचा महिमा मोठा आहे. "**सर्वसिद्धांत-संग्रहामध्ये**" श्रीमदाद्यशंकराचार्यांनी अगदी स्पष्टपणे असे म्हटले आहे की, केवळ ज्ञानानेच साधकाला मुक्ती मिळत नाही. श्रीसद्गुरूंच्या उपदेशाने विद्यालाभ होऊन अविद्येची निवृत्ती होते. परंतु देहशुद्धी झाल्याशिवाय देहरूपी आरशाचे दोष नष्ट होत नाहीत. योगाभ्यास हा देहशुद्धीचा एकमात्र उपाय आहे. यामुळे ज्या लोकांना ज्ञानप्राप्ती झालेली असते त्यांच्यामध्येही कधी कधी देहामुळे दोष उत्पन्न होऊन व ते प्रबल होऊन त्यांची बुद्धी भ्रांत झालेली दिसते. यासाठी ज्ञान व वैराग्य प्राप्त झाले तरी सुद्धा दोषक्षयासाठी साधकाने योगमार्गाचा अवलंब करणे अपरिहार्य ठरते. ज्याप्रमाणे गुळाची किंवा अन्य पदार्थांची चव माहीत असूनही ताप आल्यावर रोग्याच्या जिभेला त्या पदार्थाच्या चवीचा अनुभव तापामुळे येत नाही त्याचप्रमाणे आत्म्याचे शब्दद्वारा सम्यक् ज्ञान झाले तरी योगाच्या शिवाय

अपरोक्षानुभूती होत नाही.

ज्ञान परोक्ष व अपरोक्ष असे दोन प्रकारचे आहे. श्रीगुरूंनी शिकविल्यावर व शास्त्राचे वाचन झाल्यावर जे ज्ञान होते त्याला परोक्ष ज्ञान असे म्हणतात. ज्याचा प्रत्यक्ष अनुभव येतो त्याला अपरोक्ष ज्ञान असे म्हणतात. हे अपरोक्ष ज्ञान साधनावरच अवलंबून असल्यामुळे "**हठयोगप्रदीपिकेच्या**" चवथ्या प्रकरणात श्रीस्वात्माराम-योगींद्र यांनी असे म्हटले आहे की -

**यावन्नैव प्रविशति चरन्मारुतो मध्यमार्गे।**
**यावद् बिन्दुर्न भवति दृढप्राणवातप्रबन्धात्।।**
**यावद्ध्याने सहजसदृशं जायते नैव तत्त्वं।**
**तावज्ज्ञानं वदति तदिदं दम्भमिथ्याप्रलापः।।११४।।**

जोपर्यंत सुषुम्णामार्गामध्ये प्राणवायूचा संचार होऊन सहस्रारामध्ये असलेल्या ब्रह्मरंध्रामध्ये तो प्रवेश करीत नाही, जोपर्यंत केवलकुंभक साधन आपोआप घडून येऊन बिंदू म्हणजे वीर्य स्थिरभाव धारण करीत नाही व जोपर्यंत सहजासहजी चित्तवृत्ती ध्येयाकार व निर्विषय होऊन तत्त्वज्ञान उत्पन्न होत नाही तोपर्यंत शब्दामुळे झालेल्या व शास्त्रवाचनाने कळलेल्या शाब्दिक ज्ञानाचे कथन या गोष्टी अक्षरशः दांभिक व खोट्या ठरतात.

अखंड वस्तूलाच वास्तविक तत्त्व म्हणतात. या अखंड वस्तूच्या म्हणजे चैतन्याच्या संबंधी जे ज्ञान असते त्याला तत्त्वज्ञान असे म्हणतात. या तत्त्वालाच भक्त लोक भगवान्, ज्ञानी लोक ब्रह्म व योगी लोक परमात्मा असे म्हणतात. या अखंड तत्त्वाची प्रत्यक्ष अनुभूती येणे हे फार महत्त्वाचे आहे. दिवा लावला की, अंधार आपोआप नाहीसा होतो. मात्र नुसते दिवा दिवा असे ओरडले किंवा गोंधळ घातला तरी अंधकार नाहीसा होत नाही. या प्रकारेच आत्मा, परमात्मा, ब्रह्म इत्यादि व त्यासंबंधी नुसते बोलून, सांगून किंवा आरडाओरडी करून आत्मस्वरूपाचे दर्शन होत नाही. एकमात्र साधनानेच आत्मस्वरूपाचे किंवा ब्रह्मस्वरूपाचे दर्शन होते. "**सच्चिदा-**

**नंदरूपी आत्मा व ब्रह्म आहे,"** असे म्हणणे याला परोक्ष ज्ञान म्हणतात आणि **"मीच सच्चिदानंद स्वरूप आत्मा किंवा ब्रह्म आहे,"** अशा प्रकारच्या साक्षात् अनुभूतीला अपरोक्ष ज्ञान म्हणतात. श्रीविद्यारण्यभारतीतीर्थस्वामींनी **"पंचदशीमध्ये"** या दोन्ही ज्ञानांची व्याख्या करताना असे म्हटले आहे की -

**अस्ति ब्रह्मेति चेद्वेद परोक्षज्ञानमेव तत्।**
**अहं ब्रह्मेति चेद्वेद अपरोक्षं तदुच्यते।।६.१६।।**

नुसते ब्रह्म आहे असे म्हणून परोक्ष ज्ञान होण्यापेक्षा मी साक्षात् ब्रह्म आहे अशी अपरोक्षानुभूती येणे हे खरे ज्ञान आहे. (येथे "साक्षात्कारः स उच्यते," असा पाठभेद घेतल्यास "मी ब्रह्म आहे असे जाणले की, तोच साक्षात्कार होय, असा अर्थ होईल.") कारण **"योगशिखोपनिषदात"** असे म्हटले आहे की -

**पतिताः शास्त्रजालेषु प्रज्ञया तेन मोहिताः।।४।।**
**स्वात्मप्रकाशरूपं तत् किं शास्त्रेण प्रकाश्यते।।४-१/२।।**

जे लोक न्याय, व्याकरणादि शास्त्रांच्या जाळ्यांमध्ये गुरफटलेले असतात ते त्यातील प्रमेयादिकांनी मोहित होऊन अगदी मुग्ध होऊन जातात. त्यांची बुद्धी शास्त्रांच्या पलीकडील तत्त्व पाहण्यास व त्या तत्त्वाचे आकलन करण्यास अगदी असमर्थ ठरते. किंबहुना त्याच्या पलीकडे काही आहे व असू शकते याची जाणीव त्यांना होत नाही. त्यामुळे केवळ शास्त्राध्ययनाने आत्मस्वरूपाची प्राप्ती म्हणजे अनुभूती त्यांना येऊ शकत नाही. स्वतःच प्रकाशरूप असलेल्या आत्म्याला शास्त्र प्रकाशित करू शकत नाही.

उपरोक्त अपरोक्षानुभूतीसाठी शक्तिपातयोगाचीच कास धरली पाहिजे हे सांगताना **"श्रीस्वात्मारामयोगींद्र"** यांनी **"हठयोगप्रदीपिकेत"** असे म्हटले आहे की -

**दुर्लभो विषयत्यागो दुर्लभं तत्त्वदर्शनम्।**
**दुर्लभा सहजावस्था सद्गुरोः करुणांविना।।४.९।।**

जोपर्यंत श्रीसद्गुरू आपली कृपापूर्ण दृष्टी शिष्यावर टाकून शक्तिपाताने आदिमाया कुंडलिनी शक्तीची जागृती करीत नाहीत तोपर्यंत विषयत्याग, तत्त्वदर्शन व सहजावस्था या तीनही गोष्टी घडून येणे कदापीही शक्य नाही. हे जर घडून यावे असे वाटत असेल तर साधकाला शक्तिपातयोगाचे साधन मिळालेच पाहिजे.

**"नासिकेतपुराणामध्येही"** योगाचा महिमा सांगताना असे म्हटले आहे की -

**अग्निहोत्रमिदं तात संसारस्य तु बन्धनम्।**
**जन्ममृत्युमहामोहाः संसारे पततां ध्रुवम्।।**
**योगाभ्यासत्परं नास्ति संसारार्णवतारणम्।**
**ब्रह्माद्या देवताः सर्वे इन्द्राद्याः कश्यपात्मजाः।।**
**सर्वे योगवशात्सिद्धा गतास्ते परमां गतिम्।।**

अग्निहोत्रादि कर्मकांड हे संसाराचे बंधनच आहे. या महामोहरूपी संसारात जन्ममृत्यूच्या फेऱ्यात सापडून जीव अनंत कालपर्यंत भटकत राहतो हे अगदी ध्रुवसत्य आहे. या संसाररूपी समुद्रातून पार होण्याला योगाशिवाय दुसरा उपाय नाही. ब्रह्मदेव, कश्यपाचे पुत्र व इंद्रादिक सर्व देवता योगाच्या प्रभावानेच सिद्ध होऊन श्रेष्ठ गतीला गेल्या. इतके सांगण्याचे कारण असे आहे की, जो मनुष्य योगाची कास धरत नाही त्याची स्थिती **"स्वर्गं गत्वा पुनर्जन्म संसारे भवति ध्रुवम्।"** म्हणजे स्वर्गात जाऊन जीव पुन्हा भूतलावर जन्म घेतो अशी होते. याशाठी शास्त्र असे सांगते की, **"योगाभ्यासात्परं नास्ति न भूतो न भविष्यति।"** या भूतलावर सिद्धमहायोगासारखे साधन झाले नाही व पुढे होणारही नाही.

**"योगबीज"** नावाच्या सिद्धयोगमार्गाच्या ग्रंथामध्ये महासिद्धयोगी श्रीगोरक्षनाथ यांनी असे म्हटले आहे की, "कामादि नानाविध दोषांनी झाकलेला जीव केवळ ज्ञानाने मुक्तीचा लाभ करू शकत नाही." **"योगशिखोपनिषदाच्या"** पहिल्या अध्यायातही असेच म्हटले आहे की -

**ज्ञाननिष्ठोविरक्तोऽपि धर्मज्ञोऽविजितेन्द्रियः ।।१.२४।।**
**विना देहेन योगेन न मोक्षं लभते विधे।।१.२४.१/२।।**

श्रीशंकर श्रीब्रह्मदेवांना असे सांगतात की, "हे ब्रह्मदेवा! साधक जरी ज्ञाननिष्ठ, विरक्त, धर्मज्ञ व जितेंद्रिय असला तरीसुद्धा योगाशिवाय म्हणजे योगाच्याद्वारा चित्तशुद्धी झाल्याशिवाय सामान्य देहाने मुक्तीचा लाभ करू शकत नाही. ज्याप्रमाणे मातीच्या कच्च्या घड्यात भरलेले पाणी हळूहळू गळत जाऊन शेवटी ते मातीचे भांडे नष्ट होते त्याप्रमाणे योगहीन देहावर नानातऱ्हेच्या रोगांचे आक्रमण होऊन चित्त चंचल होते व देह अकालीच मृत्युमुखी पडतो. पक्व व अपक्व असे देहाचे दोन प्रकार आहेत. योगाग्नीच्या शिवाय देहाला परिपक्व करण्याचा दुसरा कोणताही उपाय नाही आणि शक्तिपात झाल्याशिवाय म्हणजे कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय हा योगाग्नी उत्पन्न होऊ शकत नाही. योगाग्नी उत्पन्न झाला की, साधकाचा अपक्व देह हळूहळू पक्व होऊ लागतो. त्यामुळे जडता, शोक, शीत, उष्ण, सुख, दुःख, मानसिक व्याधी, दुश्चिंता इत्यादि सर्वांपासून तो विमुक्त होतो. जे योगी नसतात त्यांचा देह अपक्व, जड, पार्थिव व दुःखप्रद असतो." महासिद्धयोगी श्रीगोरक्षनाथांनी "**योगबीज**" या ग्रंथात अगदी स्पष्टपणे असे सांगितले आहे की, "योगाशिवाय ज्ञान, वैराग्य, जप इत्यादि सर्व गोष्टी अगदी अर्थशून्य व विफल ठरतात. जे लोक योगाचा आश्रय घेऊन त्याच्या बलावर देहाला परिपक्व करण्यास असमर्थ ठरतात ते ध्यानस्थ बसले तरीसुद्धा इंद्रियांना आपल्या ताब्यात ठेवू शकत नाहीत. त्यांनी तीव्र निग्रह केला तरी कामक्रोधादि शत्रूंचे दमन ते करू शकत नाहीत. इतकेच नव्हे; तर मानसिक दुःखामध्ये ते अविचलित राहू शकत नाहीत. अग्नी, वायू, जल, शस्त्र इत्यादींच्या प्रभावाने अपक्व देहाला त्रास होतो व चित्तामध्ये क्षोभ उत्पन्न होतो. अपक्व देहामध्ये प्राण व अपान यांचा साम्यभाव राहत नाही. त्यामुळे वायूच्या चांचल्याने चित्त चंचल होऊन नाना प्रकारच्या दुःखांचा मनात उदय होतो. जोपर्यंत चित्तजय होत नाही तोपर्यंत साधकाच्या मनाला शांती मिळत नाही

यासाठी साधकाला स्वाधीनता, परिपक्वता व चित्तशांती प्राप्त करावयाची असेल तर सिद्धमहायोग हाच एकमेव मार्ग आहे. शक्तिपातयोगाचा त्याग करून शास्त्राध्ययन, विचार, आचार, कर्मकांड, भजन इत्यादि कोणताही मार्ग साधकाने स्वीकारला तरी यांपैकी कशानेही त्याला स्वस्वरूप व स्वसंवेद्य अशा आत्मस्वरूपाची प्राप्ती होऊ शकत नाही. देह, बुद्धी, मन, इंद्रिये इत्यादि सर्वांचे आक्रमण तोडून जर पुढे जावयाचे असेल तर सिद्धयोगसोपानाची कास धरल्याशिवाय गत्यंतर नाही असेच म्हणावे लागते."

असे हे योगाचे माहात्म्य असल्याचे "**कुर्मपुराणातील**" उत्तरार्धातही सांगितले आहे.

**योगाग्निर्दहते क्षिप्रमशेषं पापपञ्जरम्।**
**प्रसन्नं जायते ज्ञानं साक्षान्निर्वाणसिद्धिदम्।।११.२।।**

योगरूप अग्नी अत्यंत शीघ्रतेने पापांचे डोंगरच्या डोंगर जाळून टाकतो. मग ज्ञान प्राप्त होते व त्या ज्ञानामुळे मोक्षप्राप्ती होते.

"**अत्रिसंहितेमध्येही**" योगानेच ज्ञानाची प्राप्ती होते हे सांगताना असे म्हटले आहे की -

**योगात्सम्प्राप्यते ज्ञानं योगाद्धर्मस्य लक्षणम्।**
**योगः परं तपोज्ञेयस्तस्माद्युक्तः समभ्यसेत्।।**
**न च तीव्रेण तपसा न स्वाध्यायैर्न चेज्यया।**
**गतिं गन्तुं द्विजाः शक्ता योगात्सम्प्राप्नुवन्तियाम्।।**

योगानेच ज्ञानाची प्राप्ती होते. योगानेच धर्म प्राप्त होतो. योग हेच परम तप आहे. याकरिता योगाचा सतत अभ्यास करणे हेच उचित ठरते. शक्तिपातयोगाच्या अभ्यासाने साधकाला जी गती प्राप्त होते अशी गती उग्र तपाने, मंत्रजपाने किंवा यज्ञाच्या अनुष्ठानाने ब्राह्मण लोकसुद्धा प्राप्त करण्यास समर्थ होऊ शकत नाहीत.

योगाची ही महती पाहिली म्हणजे मनात असा प्रश्न येतो की, शास्त्राने तर ज्ञान हेच मुक्तीचे साधन आहे असे आवर्जून सांगितले आहे. मग ते खोटे आहे का? ज्ञानाने मुक्ती होते की नाही? जो कोणी

साधक योग सोडून केवळ ज्ञानानेच साधन करतो त्याचे परिश्रम राखेमध्ये तूप ओतल्याप्रमाणे व्यर्थ जातात का? अगदी हाच प्रश्न "**योगबीज**" ग्रंथात श्रीपार्वतीने श्रीशंकरांना विचारला आहे. ती म्हणते-

**ज्ञानादेव हि मोक्षं तु वदन्ति ज्ञानिनः सदा।**
**न कथं सिद्धयोगेन योगः किं मोक्षदो भवेत्।।६७।।**

"हे श्रीशंकरा! ज्ञानाशिवाय दुसऱ्या कोणत्याही साधनाने मोक्षप्राप्ती होत नाही असे ज्ञानी लोक निक्षून सांगत आले आहेत. अशा वेळी आपण तर म्हणता की, साधकाला सिद्धयोगानेच मोक्षप्राप्ती होईल. तेव्हा हे कसे शक्य आहे?" त्यावेळी श्रीशंकर असे म्हणाले की,

**ज्ञानेनैव हि मोक्षश्च तेषां वाक्यं तु नान्यथा।**
**सर्वे वदन्ति खड्गेन जयो भवति तर्हि किम्।।६८।।**
**विना युद्धेन वीर्येण कथं जयमवाप्नुयात्?।**
**तथा योगेन रहितं ज्ञानं मोक्षाय नो भवेत्।।६९।।**
**रूपलावण्यसम्पन्ना यथा स्त्री पुरुषं विना।**
**तथा योगेन रहितो ब्रह्मज्ञानरतोऽपि वा।।७०।।**

"हे पार्वती! शास्त्राचे वचन खोटे नाही. ज्ञानाशिवाय दुसऱ्या कोणत्याही साधनाने मोक्षप्राप्ती होत नाही हे अगदी खरे आहे. परंतु ज्ञान हे खड्ग, योग हे युद्ध व मोक्ष हा विजयलाभ आहे. मात्र खड्गानेच विजयाची प्राप्ती होते असे जे सर्व लोक म्हणतात त्यात काहीही अर्थ नाही. कारण तलवारीने विजयाची प्राप्ती होते यात कुठलाही संशय नसला तरीसुद्धा युद्ध केल्याशिवाय किंवा वीर्य म्हणजे पराक्रमाशिवाय नुसत्या तलवारीच्या जोरावर एखादा योद्धा विजय प्राप्त करू शकेल अशी आशा करणे ही केवळ दुराशा आहे. कारण अशी गोष्ट घडणे कालत्रयीही शक्य नाही. त्याचप्रमाणे सिद्धयोगाच्या प्राप्तीशिवाय साधकाला केव्हाही मोक्षप्राप्ती होणे शक्य नाही. ज्याप्रमाणे रूपलावण्यसंपन्न स्त्री असली तरी पुरुषाशिवाय तिला शोभा नाही व त्याच्याशिवाय पुत्रोत्पत्तीही होत नाही त्याचप्रमाणे साधक ज्ञानरत असला तरीसुद्धा योगाशिवाय त्याला मोक्षप्राप्ती होत

नाही व त्याच्या ज्ञानाला शोभाही येत नाही.

सारांश, मोक्षप्राप्तीच्या साधनांमध्ये ज्ञानाला व योगाला प्राधान्य असले तरीसुद्धा उपरोक्त विवेचनावरून सिद्धयोगाचे साधनच श्रेष्ठ आहे हे मान्य करणे भागच पडते. **"योगशिखोपनिषदाच्या"** पहिल्या अध्यायात योगाचा हा महिमा अतीव सुंदरतेने स्पष्ट केला आहे.

**देहान्ते ज्ञानिभिः पुण्यात् पापाच्च फलमाप्यते।**
**ईदृशं तु भवेत् तत्तद् भुक्त्वा ज्ञानी पुनर्भवेत्।।४९।।**
**पश्चात् पुण्येन लभते सिद्धेन सह संगतिम्।**
**ततः सिद्धस्य कृपया योगी भवति नान्यथा।।५०।।**
**ततो नश्यति संसारो नान्यथा शिवभाषितम्।।५०.१/२।।**
**प्रविचार्य चिरं ज्ञानं मुक्तोऽहमिति मन्यते।**
**किमसौ मननादेव मुक्तो भवति तत्क्षणात्।।५४।।**
**पश्चाज्जन्मान्तरशतैर्योगादेव विमुच्यते।**
**न तथा भवतो योगाज्जन्ममृत्यु पुनः पुनः।।५५।।**
**योगेन रहितं ज्ञानं न मोक्षाय भवेद्विधे।।५१।।**
**ज्ञानेनैव विना योगो न सिद्धति कदाचन।**
**जन्मान्तरैश्च बहुभिर्योगो ज्ञानेन लभ्यते।।५२।।**
**ज्ञानं तु जन्मनैकेन योगादेव प्रजायते।**
**तस्माद् योगात् परतरो नास्ति मार्गस्तु मोक्षदः।।५३।।**

जेव्हा ज्ञानसाधन करणाऱ्या साधकाला मृत्यू येतो तेव्हा तो पापपुण्याचे फल भोगून पुन्हा जन्म घेतो. अशा प्रकारे पुष्कळ जन्मग्रहण केल्यावर त्या जन्मांमध्ये ज्ञानचर्चेमुळे जे पुण्य तो साठवितो त्यामुळे त्याला सिद्धाची संगती प्राप्त होते. त्याच्या कृपेमुळे साधकाला सिद्धयोगाची प्राप्ती होते. त्यामुळे तो योगसंपन्न होतो. सिद्धयोगाच्या साधनाशिवाय इतर कोणत्याही उपायाने हे घडून येऊ शकत नाही. सिद्धयोगाच्या साधनप्राप्तीमुळे त्याचा संसार असून नसल्याप्रमाणे होतो; कारण या योगप्राप्तीमुळे त्याची अविद्या नाहीशी होते. या अविद्यानाशामुळे स्वयंप्रकाशरूप आत्मा प्रकाशित होतो. ही गोष्ट त्रिकालाबाधित सत्य

आहे असे श्रीशंकरांनी श्रीब्रह्मदेवांना बजावून सांगितले आहे. ते पुढे असे म्हणतात की, योगरहित ज्ञान साधकाला कधीही मोक्षसिद्धी देऊ शकत नाही. जो ज्ञानी साधक शेकडो जन्म ज्ञानाभ्यास करतो त्याला सिद्धयोग प्राप्त होतो. मात्र सिद्धयोगाचे साधन मिळालेला साधकयोगी या साधनाच्या जोरावर एकाच जन्मात ज्ञानप्राप्ती करून घेऊन मुक्ती प्राप्त करू शकतो. यासाठी हा सिद्धयोग सोडून मोक्ष किंवा मुक्ती देणारा दुसरा कोणताही उपाय श्रेष्ठ नाही.

ज्ञानमार्गावरील साधक दीर्घकालपर्यंत विचार करीत राहिला म्हणजे त्याच्या ठिकाणी ज्ञानाचा उदय होऊन "मी ब्रह्म आहे," "मी मुक्त आहे," अशा प्रकारचा बोध जागृत होतो व मी मुक्त आहे असे तो मानतो. अशा प्रकारे मनन करून साधकाला मुक्ती कशी प्राप्त होईल? कारण अशा प्रकारची अनुभूती ही परोक्ष असल्याने शाब्दिक, आभासात्मक, अभिमानाने भरलेली व अहंकारयुक्त असते. वास्तविक पाहता ज्ञानमार्गाने जाणाऱ्या साधकाला हजारो जन्मांनंतर सिद्धयोगाची प्राप्ती होऊन तो मुक्त होतो. या प्राप्तीमुळे शाब्दिक कसरती व चर्चा संपतात. आभास, अभिमान व अहंकार गळून पडतात. विशुद्ध चित्तात आत्मज्ञान स्वभावतः साधकाच्या ठिकाणी अपरोक्षानुभूतीच्या रूपाने उदयाला येते. शक्तिपातयोगाच्या साधनाचा हा अपूर्व विशेष आहे. या साधनाच्या बलावरच साधकाला प्रारब्धावर मात करता येऊन ज्ञानप्राप्तीने मोक्षसिद्धी गाठता येते.

श्रीकृष्णांनीही "**श्रीमद्भगवद्गीतेत**" सिद्धयोगाचे माहात्म्य सांगताना "**जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते।।६.४४।।**" असे म्हटले आहे. म्हणजे योगाचे स्वरूप जाणण्याची इच्छा ज्याला होते त्याला पूर्व पुण्याईच्या बळाने सिद्धयोगाची प्राप्ती होऊन तो शब्दब्रह्म म्हणजे वेदांनी सांगितलेल्या कर्मफळाला उल्लंघून पलीकडे जातो. याचा अर्थ असा आहे की, या कर्मफळापेक्षा श्रेष्ठ फळ त्याला प्राप्त होते. सिद्धयोगाचे असे कोणते अपूर्व फल मिळते हे सांगताना या श्लोकाचा पुढील भावार्थ श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीत**" सांगितला

आहे. ते असे म्हणतात की -

**बळियें इंद्रियें येती मना। मन एकवटे पवना।**
**पवन सहजे गगना। मिळोंची लागे।।६.४६०।।**
**ऐसें नेणों काय आपैसें। तयातेंचि कीजे अभ्यासें।**
**समाधि घर पुसे। मानसाचें।।४६१।।**

ज्यावेळी श्रीसद्गुरुकृपेने साधकाला शक्तिपातयोगाची प्राप्ती होते त्यावेळी इंद्रिये बलवान् असली तरी ती आपोआप मनाच्या स्वाधीन होतात. मन प्राणाशी एकरूप होते व मग तो प्राण चिदाकाशात मिळू लागतो. या सिद्धयोगाची ही अपूर्व विशेषता आहे की, असे आपोआप कसे होते हे सांगता येत नाही. पण योगाभ्यास साधकाकडून आपणहून केला जातो आणि समाधी साधकाच्या मनाच्या घराचा शोध करीत येते. भगवान् श्रीकृष्णांनी यामुळेच अर्जुनाला अगदी आवर्जून असा उपदेश केला आहे की -

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः।**
**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन।।६.४६।।**

तपस्वी, ज्ञानी व कर्म करणाऱ्या सर्व लोकांपेक्षा वर सांगितलेले सिद्धयोगाचे साधन करणारा योगीच श्रेष्ठ आहे. म्हणून हे अर्जुना ! तू सिद्धयोगी हो.



# - आधार सातवा -

## ★शक्तिपातयोगाचे स्वरूप★

**१) कल्पनातीत साधन २) तत्काल प्रचीती देणारे साधन**
**३) सर्वतंत्रस्वतंत्र साधन ४) राधाकृष्णस्वरूप साधन**
**५) शिवशक्तिस्वरूप साधन ६) आत्मनिवेदन योग**
**७) मायानिरपेक्ष साधन ८) भक्तियोगाचा योगमार्ग**

शक्तिपातयोगाचे स्वरूप लक्षात आले म्हणजे हे अपूर्व साधन कोणत्याही कक्षेत बसणारे नाही व मानवी मनाच्या साधनाच्या ज्या ज्या कल्पना व कक्षा आहेत त्या सर्वांना ओलांडून पलीकडे जाणारे व नेणारे साधन आहे हे लक्षात आले म्हणजे मन स्तिमित होऊन जाते.

**कल्पनातीत साधन :-**

ब्रह्म हे कल्पनातीत तत्त्व आहे. त्यामुळे त्याची व्याख्या करता येत नाही. वेदही **"नेति नेति"** म्हणून त्याबद्दल गप्प बसले आहेत. असे असल्यामुळे कल्पनांतर्गत येणाऱ्या साधनांनी ब्रह्मप्राप्ती होणे केवळ अशक्य आहे. वास्तविक पाहता कल्पनेच्या कक्षेपलीकडे कोणतेही साधन नाही. परंतु शक्तिपातयोगात श्रीगुरुकृपेने कुंडलिनी शक्ती जागृत झाली की, कल्पनातीत शक्ती जागृत होते. ती स्वतः ज्या क्रिया करविते त्याची कल्पना कोणताही साधक करू शकत नाही. ही कुंडलिनी शक्ती सर्व शक्तिमान् शक्तीतील ज्ञानयुक्त अशी श्रेष्ठ शक्ती आहे. कोणत्या साधकाला कोणत्या पद्धतीने पुढे नेणे आवश्यक आहे हे ती पूर्णपणे जाणते. **"श्वेताश्वतर उपनिषदात" "परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते। स्वाभाविकी ज्ञान बल क्रिया च।। ६-८।।"** असे म्हटले आहे. परमेश्वराची पराशक्ती नाना प्रकारची आहे असे कानावर येते. ती स्वभावतःच ज्ञानक्रिया व बलक्रिया या रूपाने दिसून येते.

चित्ताशी तादात्म्य झाल्याने जीवाचे जीवत्व मिथ्या आहे. आत्मतत्त्वाचे कशाशीही तादात्म्य होत नाही. चित्त सूक्ष्म आहे. याकरिता

जीव, कर्तृत्वाभिमानाच्या अधीन असल्याने सर्व साधने प्रयत्नसाध्य आहेत. त्यामुळे कष्टसाध्य सर्व साधनांना सूक्ष्म अशा ब्रह्मतत्त्वप्राप्तीबद्दलच्या उपायांतर्गत मानले गेले आहे. तसे शक्तिपात-योगाचे साधन नसल्याने ते अलौकिक व अपूर्व ठरते.

या अर्थानेच श्रीसंतएकनाथमहाराजांनी "**स्वात्मसुख**" या प्रकरण ग्रंथात हे साधन कल्पनातीत आहे हे सांगताना म्हटले आहे की,

**सुमनें सांडुनि सकळें। गुणेंवीण गुंफिजे परिमळें।**
**तैसें आत्मसाधन केवळें। स्वात्मसिद्धीचें।।४२।।**

फुले एकत्र गुंफण्याकरिता ज्याप्रमाणे दोऱ्याची आवश्यकता असते त्याप्रमाणे जी इतर अनेक साधने ब्रह्मप्राप्तीसाठी सांगितली आहेत त्यासाठी कशाचे तरी आलंबन आवश्यक असते. परंतु शक्तिपातयोग साधन हे कल्पनातीत असल्याने त्याला कोणत्याही आलंबनाची किंवा आधाराची आवश्यकता लागत नाही. या अर्थानेच श्रीएकनाथमहाराजांनी असे म्हटले आहे की, सर्व फुले टाकून देऊन ती दोऱ्याशिवाय फक्त सुगंधाने गुंफावीत म्हणजे सुगंधाने सुगंध गुंफावा त्याप्रमाणे सर्व-अशेष-साधनांचा त्याग करून फक्त आत्म-साधनाचाच आश्रय साधकाने केला पाहिजे. कारण हे एकच साधन असे आहे की, जे साधकाला आपल्या गंतव्य स्थानापर्यंत स्वतः पोहोचविल्याशिवाय कधीही थांबत नाही. एकदा का साधक श्रीगुरुकृपेने या कल्पनातीत साधनाला समर्पित झाला की, त्याचे जीवत्व संपून तो स्वतःसिद्ध अशी कल्पनातीत वस्तू होऊन जातो.

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनीही आपली उपासना ही कल्पनातीत उपासना असून ती श्रीगुरुकृपेने शक्तिपात होऊन आपल्याला कशी प्राप्त झाली हे ग्रंथराज "**श्रीदासबोधात**" स्पष्ट करून सांगितले आहे. त्यादृष्टीने श्रीसमर्थ असे म्हणतात की -

**नारायण असे विश्वीं। त्याची पूजा करीत जावी।**
**याकारणें तोषवावी। कोणी तरी काया।।१५.९.२५।।**
**उपासना शोधून पाहिली। तों ते विश्वपाळिती झाली।**

**न कळे लीळा परीक्षिली। न वचे कोणा।।२६।।**
**देवाची लीळा देवेंविण। आणीक दुसरा पाहे कोण।**
**पाहणें तितुकें आपण। देवचि असे।।२७।।**
**उपासना सकळां ठायीं। अंतरात्मा कोठें नाहीं।**
**याकारणें ठायीं ठायीं। रामें आटोपिलें।।२८।।**
**ऐसी माझी उपासना। आणितां नयें अनुमाना।**
**नेऊनि घाली निरंजना। पैलीकडे।।२९।।**

जो साधक असेल त्याने आपल्या देहाचे सार्थक व्हावे म्हणून अखिल विश्वात भरून राहिलेल्या नारायणाचा आपणास अनुभव येऊन आपण नारायणस्वरूप व्हावे यासाठी त्याची उपासना केली पाहिजे. मी जेव्हा स्वतःला आत्मरूप करणारी एखादी उपासना आहे का? असे म्हणून शोध घेतला तेव्हा माझ्या असे लक्षात आले की, श्रीसद्गुरूंनी आपणास शक्तिपातपूर्वक जी उपासना दिली आहे तीच विश्वपालन करणारी आहे. ब्रह्मांडचालिनी जी शेषकुंडलिनी शक्ती तीच विश्वाचे पालन करते. उत्पत्ती व लय तिच्यावरच अवलंबून आहे. तीच जीवाला आत्मरूप करते. कितीही परीक्षा केली तरी या शक्तिरूप उपासनेची परीक्षा कोणालाही करता येणे शक्य नाही व सांगताही येणे शक्य नाही; कारण ही कल्पनातीत उपासना आहे. ही उपासना देवाची एक लीलाच आहे. ती देवाशिवाय कोणालाही कळणे शक्य नाही व दुसरा कोणी पाहणेही शक्य नाही. मात्र या कल्पनातीत अशा उपासनेचा आश्रय घेऊन पाहिला की, आपण देवस्वरूप व आत्मस्वरूप होऊन जातो. ही उपासना साधकाने सुरू केली की, सर्वत्र अंतरात्मा भरून राहिला आहे याची जाणीव होते. आतबाहेर, रोमारोमात आत्माराम भरून राहिला आहे याची अनुभूती येते. अशा प्रकारे सर्वत्र आत्मस्वरूपाचे दर्शन घडविणारी माझी उपासना आहे. तिची तर्काने किंवा बुद्धीने कल्पना करता येणे शक्य नाही; कारण ही उपासना कल्पनातीत आहे. ही उपासना शुद्ध सत्त्वांश जो ईश्वर त्याच्या पलीकडे नेणारी व ब्रह्मस्वरूप करणारी आहे.

**तत्काल प्रचीती देणारे साधन :-**

शक्तिपातयोगसाधन हे तत्काल प्रचीती देणारे साधन आहे. श्रीसद्गुरूंकडून दीक्षाप्राप्ती झाल्यावर साधकाला प्रत्यक्ष अनुभूती येत असल्याने त्याला प्रमाणाची आवश्यकता देण्याचे कारण नाही. जे तत्काल प्रचीती देते ते खरे साधन होय. ग्रंथराज "**श्रीदासबोधात**" या दृष्टीने श्रीसमर्थांनी जे विवेचन केले आहे ते अपूर्व आहे.

श्रीसमर्थ असे म्हणतात की, मला श्रीसद्गुरुकृपेने प्राप्त झालेली उपासना ही नुसती अनुमानाने जाणण्यासारखी नाही. माझी उपासना ही प्रत्यक्ष अनुभव देणारी दिव्य उपासना आहे. श्रीसमर्थांनी हे अगदी आग्रहपूर्वक व निक्षून सांगितले आहे; कारण त्यांच्या लेखी अनुमानाला काही महत्त्व नाही. "**जितुकें अनुमानाचें बोलणें। तितुकें वमनप्राये त्यागणें। निश्चयात्मक तेंचि बोलणें। प्रत्ययाचें।।९.५.३९।।**" उपासना अनुभव देणारीच पाहिजे. परब्रह्मप्राप्ती करून देणारी पाहिजे. नुसत्या अनुमानाला, बोलण्याला किंवा तर्काला किंमत शून्य आहे. नुसते अनुभवशून्य पांडित्य हे ओकारीप्रमाणे त्याज्य आहे. बोलणे प्रत्ययाचे व निश्चयात्मक पाहिजे. अशी उपासना आपण केली म्हणून श्रीसमर्थ सांगतात की, "**आत्माराम उपासना। तेणें पावलो निरंजना। नि:संदेह, अनुमाना। ठावचि नाहीं।।२०.६.३०।।**" माझी उपासना ही आत्मारामाची उपासना आहे. त्यामुळेच मी निरंजनपद पावलो आहे. या माझ्या अनुभवात कसलाही संदेह नाही. तर्काला व शंकेला येथे वावच नाही.

श्रीसमर्थांच्या दृष्टीने अनुमानाचे बोलणे खोटे असते. प्रत्यय हाच खरा आहे. प्रत्ययाशिवाय सर्व व्यर्थ ठरते. "**उगीच बोलणें अनुमानाचें। अनुमानाचें कोण्या कामाचें। येथें सगट विचाराचें। काम नाहीं।।२०.७.२९।।**" यामुळे अनुभव किंवा प्रचीती हीच सर्वश्रेष्ठ आहे. सरसकट विचार करून काहीतरी गोलमाल किंवा अद्वातद्वा बोलणे हे निरुपयोगी आहे असे ते म्हणतात. प्रचीती देणारे साधन व त्यामुळे होणारे ज्ञान हेच खरे श्रेष्ठ आहे, त्यामुळे श्रीसमर्थांना

प्रचीतीचे ज्ञान श्रेष्ठ वाटते. प्रचीती नाही म्हणजे खरे साधन नाही व खरे साधन नाही तोपर्यंत खरी ज्ञानप्राप्ती नाही. "**प्रचीतीविण जें ज्ञान। तें अवघेंचि अनुमान। तेथें कैंचें परत्रसाधन। प्राणियांसी।। १४.७.१८।।**" प्रचीतीशिवाय खरे ज्ञानच होत नाही. खऱ्या अनुभवाशिवाय किंवा प्रचीतीशिवाय जे ज्ञान होते असे वाटते तो फक्त तर्कच आहे. त्यामुळे जीव हा संसार-सागर ओलांडून जाऊ शकत नाही व परत्राची म्हणजे परब्रह्माची प्राप्तीही घडत नाही.

प्रचीतीशिवाय काहीही खरे मानू नये असे श्रीसमर्थ म्हणतात. "**जें प्रचीतीस आलें खरें। तेंचि घ्यावें अत्यादरें। अनुभवाविण जीं उत्तरें। तीं फलकटे जाणावी।।१८.५.२१।।**" साधन करताना अनुभव पाहिजे. प्रचीती हवी. नुसती बडबड किंवा अनुभवाशिवाय जे बोलणे असते ते फोलकटे जशी टाकाऊ असतात त्याप्रमाणे टाकाऊ गोष्ट ठरते. इतकेच नव्हे; तर "**प्रचीतीवीण जें केलें। तें अवघें व्यर्थ गेलें। प्राणी कष्टकष्टोंची मेले। कर्मकचाटें।।१८.८.२०।।**" असे निक्षून सांगून श्रीसमर्थ साधकाला पुढील इशारा देण्यास विसरत नाहीत. "**अवघी भ्रांतीची ठकाठकी। प्रचीतीवीण गोष्टी लटकी। वेड लागलें जें बटकी। तो भलतेचि बोले।।१७.४.२९।। प्रत्यये ज्ञाता सावधान। त्याचें ऐकावें निरूपण। आत्मसाक्षात्काराची खूण। तत्काळ बाणे ।।१७.४.३०।।**" असा प्रत्यय देणारा व साधन देऊन आत्मसाक्षात्कार घडविणारा श्रीसद्गुरू हवा.

अशा प्रकारे शक्तिपाताने कुंडलिनी जागृत करून प्राणांची गती ऊर्ध्व करणारा महायोगी शोधून काढून त्याच्याकडून साधन प्राप्त करून घेऊन प्रचीती घेऊन आत्मज्ञानप्राप्ती साधकाने प्रयत्नपूर्वक केली पाहिजे असे श्रीसमर्थ अगदी कळकळीने सांगतात.

**अधोमुखें भेद वाढतो। ऊर्ध्वमुखें भेद तुटतो।**
**निःसंगपणें निर्गुणी तो। महायोगी।।२०-३-२२।।**
**माया मिथ्या ऐशी कळली। तरी मग भीड कां लागली।**
**मायेचे भिडेनें घसरली। स्वरूपस्थिती।।२३।।**

लटकें मायेनें दपटावें। सत्य परब्रह्म सांडावें।
मुख्य निश्चयें हिंडावें। कासयासी।।२४।।
पृथ्वीमध्यें बहुत जन। त्यांमध्यें असती सज्जन।
परी साधूस वोळखतो कोण। साधूवेगळा।।२५।।
म्हणोन संसार सांडावा। मग साधूचा शोध घ्यावा।
फिरफिरों ठायीं पाडावा। साधुजन।।२६।।
उदंड हुडकावे संत। सांपडे प्रचीतीचा महंत।
प्रचीतीवीण स्वहित। होणार नाहीं।।२७।।
प्रपंच किंवा परमार्थ। प्रचीतीविण अवघे व्यर्थ।
प्रत्ययज्ञानी तो समर्थ। सकळांमध्यें।।२८।।

असा महायोगी जेव्हा साधकाला भेटतो तेव्हा तो शक्तिपातयोगदीक्षा देऊन त्याला कृतार्थ करतो. ही प्रचीती देणारी उपासना म्हणजे एकमात्र शक्तिपातयोग आहे हे वर्णन करताना श्रीसमर्थ म्हणतात.

अज्ञानशक्ती निरसली। ज्ञानशक्ती मावळली।
वृत्तिशून्ये कैशी झाली। स्थिती पाहा।।१५-१०-१२।।
मुख्य शक्तिपात तो ऐसा। नाहीं चंचळाचा वळसा।
निवांतीं निवांत कैसा। निर्विकारी।।१३।।

**सर्वतंत्र स्वतंत्र साधन :-**

शक्तिपातयोगसाधनेचा सूत्रपात श्रीशंकरांनी कसा केला व हे अपूर्व साधन भूमंडलावर कसे प्रकट झाले हे सांगताना **"सौंदर्यलहरी"** या आपल्या प्रसिद्ध ग्रंथात श्रीमदाद्य भगवान् शंकराचार्य असे म्हणतात की -

चतुःषष्ट्यातन्त्रैः सकलमतिसन्धान भुवनं
स्थितस्तत्तत्सिद्धि-प्रसवपरतन्त्रैः पशुपतिः।
पुनस्त्वन्निर्बन्धादखिल-पुरुषार्थैक-घटन
स्वतन्त्रं ते तन्त्रं क्षितितलमवातीतरदिदम्।।३१।।

श्रीशंकरांनी चौसष्ट तंत्रांची रचना करून ज्या ज्या लोकांना सिद्धीची व काम्य फलांची इच्छा होती ती पूर्ण करण्याची सोय

केली. केवळ मोक्ष प्रतिपादन करणारा वेदान्तही सांगितला आणि ते स्वस्थ बसले. परंतु ज्यायोगे धर्म, अर्थ आणि काम यांच्यासह परम पुरुषार्थाचा लाभ होईल असे साधन प्रकट होणे आवश्यक होते. जगज्ञननीने श्रीशंकरांना असे साधन प्रकट करण्याचा आग्रह केला. त्यावेळी त्यांनी इतर पुरुषार्थांसह प्रामुख्याने परमपुरुषार्थ जो मोक्ष त्याचा लाभ होईल अशा योग्यतेचे एक स्वतंत्रच तंत्र या भूमंडलावर प्रकट केले. या साधनाची प्रशंसा व वंदन श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्या "**अमृतानुभव**" या ग्रंथात पुढीलप्रमाणे केले आहे.

**गुरुरित्याख्यया लोके साक्षाद्विद्याहि शाङ्करी।**
**जयत्याज्ञा नमस्तस्यै दयार्द्रायै निरन्तरम्।।२।।**

या इहलोकामधील सर्व विद्यांमध्ये ही शांकरी म्हणजे शक्तिपात-योगरूप ब्रह्मविद्याच श्रेष्ठ आहे. ही साक्षात् आनंद प्राप्त करून देणारी, दयाळू व अत्यंत ज्ञानरूप आहे. या साधनेचा, विद्येचा जयजयकार असो. तिला मी वंदन करतो.

जगात जेवढ्या म्हणून विद्या आहेत त्या सर्व विद्यांमध्ये अध्यात्मविद्या ही भगवत् विभूती आहे असे "**श्रीमद्भगवद्गीतेमध्ये**" भगवान् श्रीकृष्णांनी सांगितले आहे. ही ब्रह्मविद्या सकलदु:खनिवृत्ती व निरतिशयानंदप्राप्ती करून देणारी आहे. यामुळे या विद्येला किंवा साधनाला गुरू म्हणजेच श्रेष्ठ अशी संज्ञा आहे. ब्रह्मविद्येप्रमाणेच या शक्तिपातयोगविद्येला शांकरी विद्या असेही म्हणतात. कारण "शं" म्हणजे सुख आणि "कर" म्हणजे करून देणारा म्हणजे सुखाची प्राप्ती करून देणारा असा शंकर या शब्दाचा अर्थ आहे. त्या श्रीशंकररूप परमात्म्याच्या एका अंशाचे ठिकाणी ही विद्या राहते म्हणून या शक्तिपातयोगविद्येला शांकरी विद्या असे म्हणतात.

या शक्तिपातयोगरूपी ब्रह्मविद्येचा श्रीगुरुरूपाने अवतार कसा झाला याची कथा "**केनोपनिषदात**" आली आहे. एकदा देव व असुर यांचे युद्ध झाले. युद्धात देवांचा जय झाला. जगताची रहाटी उत्तम चालावी म्हणूनच ईश्वराने देवांचा जय व असुरांचा पराजय

घडवून आणला होता. परंतु आपण असुरांना जिंकले असा अभिमान देवांना झाला. देव विवेकी व देहाहंकारी नसूनही ही चूक घडली. सात्त्विक देवांना असा अभिमान होणे बरे नव्हे, तो त्यांना देवत्वापासून भ्रष्ट करणारा आहे, असे श्रीभगवंताला वाटले. त्यांना सर्व जगच्चालक आत्मवस्तूची जाणीव करून देऊन झालेला अभिमान घालविण्याच्या दृष्टीने श्रीभगवंतांनी आपल्या शुद्धसत्त्वात्मक मायाशक्तीने अत्यंत विस्मयकारक स्वरूप धारण करून ते देवांसमोर आले. देवांना आपल्या समोर कोण आले आहे हे समजले नाही. इंद्रादि देवांनी ते कोण आहेत हे समजून घेण्याकरिता अग्नी व वायू यांना क्रमाने श्रीभगवंतांकडे पाठविले. श्रीभगवंतांनी प्रथम अग्नीला, "तू कोण आहेस?" म्हणून विचारले. त्यावर अग्नी म्हणाला, "मी अग्नी असून मला जातवेद म्हणतात. "श्रीभगवंतांनी विचारले, "तुझे सामर्थ्य काय आहे?" अग्नी म्हणाला, "या पृथ्वीवरील कोणतीही गोष्ट जाळण्याचे सामर्थ्य माझ्यात आहे. "श्रीभगवंतांनी त्याच्यापुढे एक गवताची काडी ठेवली व ही तू जाळ असे अग्नीला सांगितले. अग्नीने आपल्या सर्व सामर्थ्यानिशी ती काडी जाळण्याचा प्रयत्न केला. परंतु तो ती काडी जाळू शकला नाही. त्यामुळे तो परत आला. इंद्रादि देवांनी अग्नीनंतर वायूला श्रीभगवंतांकडे पाठविले. श्रीभगवंतांनी त्याचा परिचय विचारला. वायूने, "मी वायू आहे, मला मातरिश्वा म्हणतात" असे सांगून "या पृथ्वीवरील सर्व पदार्थ मी उडवून लावू शकतो," असे आपले सामर्थ्य असल्याचेही सांगितले. श्रीभगवंतांनी अग्नीप्रमाणेच त्याच्यापुढे एक काडी ठेवून ती उडवून देण्यास सांगितले. परंतु आपल्या सर्व सामर्थ्याचा उपयोग करूनसुद्धा वायू ती गवताची काडी अणुमात्रसुद्धा हलवू शकला नाही. या पराभवामुळे तोही लज्जीत होऊन परत गेला.

शेवटी देवांनी इंद्रालाच श्रीभगवंतांकडे जाण्यास सांगितले. इंद्र श्रीभगवंतांकडे आला. परंतु श्रीभगवान् तेथेच अंतर्धान पावले. "अग्नी व वायू यांना श्रीभगवंतांचे दर्शन होऊन त्यांच्याशी बोलण्यासही मिळाले; पण आपल्याला मात्र दर्शन देखील झाले नाही," असे मनात येऊन

इंद्राला फार वाईट वाटले. इंद्र अशा रीतीने शोकाकुल झाला असता त्याला श्रीभगवंतांचे ज्ञान करून देण्याकरिता भगवान् श्रीशंकरांची विद्याशक्ती उमा अतिशय सुंदर स्वरूप धारण करून प्रकट झाली. इंद्राने सुवर्णभूषणांनी विभूषित झालेल्या श्रीपार्वती-स्वरूपी ब्रह्मविद्येला विचारले की, "आता या ठिकाणी कोण येऊन गेले याची तुला माहिती आहे काय?" तेव्हा ती शक्ती इंद्राला म्हणाली, "ते ब्रह्म होते. तुम्हाला जो विजय प्राप्त झाला तो परब्रह्मामुळेच झाला. तुम्ही येथे निमित्त आहा."

या कथेवरून हेच सिद्ध होते की, जोपर्यंत शक्ती जागृत होऊन मार्गदर्शन करीत नाही तोपर्यंत साधकाला ब्रह्मप्राप्ती होऊ शकत नाही.

**राधाकृष्णस्वरूप साधन :-**

शक्तिपातयोगाचे साधन राधाकृष्णस्वरूप आहे. मूलतः श्रीकृष्ण व श्रीराधा यांचे स्वरूप कोणते आहे आणि त्यांचे मिलन कसे होते हे पाहिले की, या साधनाचे स्वरूप स्पष्ट होईल.

परमात्मारूपी श्रीकृष्णांचे सहस्त्रदलपद्मात स्थान आहे. त्यांच्या या स्वरूपाचे वर्णन करताना "**ब्रह्मसंहितेत**" असे म्हटले आहे की -

**ईश्वरः परमः कृष्णः सच्चिदानन्दविग्रहः।**
**अनादिरादिगोविन्दः सर्वकारणकारणम्।।१।।**

अनादि वस्तू परब्रह्म हीच सच्चिदानंदस्वरूप श्रीकृष्णरूपाने नटलेली आहे. ते लीलेसाठी सर्वप्रथम पुरुषाकार रूपाने प्रकट झाल्यामुळे त्यांना आदि म्हणतात. ते पृथ्वीचे रक्षक असून सर्व कारणांचे कारण आहेत. "**ब्रह्मसंहितेतील**" **ब्रह्मांड प्रकरणातही** श्रीकृष्णांचे व श्रीराधेचे स्वरूप पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे.

**परं प्रधानं परमं परमात्मानमीश्वरम्।**
**सर्वाद्यं सर्वपूज्यं च निरीहं प्रकृतेः परम्।।**
**स्वेच्छामयं नित्यरूपं भक्तानुग्रहविग्रहम्।**

**तस्य प्राणाधिका राधा बहुसौभाग्यसंयुता।**
**महाविष्णोः प्रसूः सा च मूलप्रकृतिरीश्वरी।।४८-४९-५१।।**

श्रीकृष्ण हे सर्वांत प्रधान, परमात्मा, परमेश्वर, सर्वांचे आदिकारण, सर्वपूज्य, निरीह व प्रकृतीच्या पलीकडे विराजमान असलेले तत्त्व आहे. त्यांचे स्वरूप स्वेच्छामय असून नित्य आहे. श्रीराधा त्यांना प्राणाहून अधिक प्रिय असून ती परम सौभाग्यशालिनी आहे. तीच श्रीमहाविष्णूंची जननी असून ईश्वराची मूल प्रकृती आहे.

श्रीकृष्णांनी आपल्या मुखाने श्रीराधाशक्ती आपली परमाराध्या व सा ात् आत्मशक्ती कशी आहे हे सांगताना असे म्हटले आहे की-

**यथा क्षीरे च धावल्यं दाहिका च हुताशने।**
**भूमौ गन्धौ जले शैत्यं तथा त्वयि मम स्थितिः।**
**धावल्यदुग्धयोरैक्यं दाहिकानलयोर्यथा।**
**भूगन्धजलशैत्यानां नास्ति भेदस्तथाऽऽवयोः।।**
**मया विना त्वं निर्जीवा चादृश्योऽहं त्वया विना।।**

ज्याप्रमाणे दूध व दुधाची शुभ्रता, अग्नी व त्याची दाहकशक्ती, भूमी व गंध आणि पाणी व शीतलता यांमध्ये अंतर असत नाही त्याप्रमाणे माझ्यात व मत्स्वरूप असलेल्या श्रीराधाशक्तीरूप आत्मस्वरूपात कोणतेही अंतर असत नाही. शुभ्रता व दूध अभिन्न आहेत. दाहक शक्ती व अग्नी भिन्न नाहीत. भूमी व गंध एक आहेत. जल व शीतलता यात फरक नाही. याप्रमाणे आम्ही दोघे एक आहोत. आमच्या दोघात कोणताही भेद नाही. माझ्याशिवाय तू निर्जीव आहेस; कारण मीच तुझे जीवन आहे. मात्र हे सत्य आहे की, तुझ्याशिवाय मी प्रकट होऊ शकत नाही.

श्रीराधा ही भगवान् श्रीकृष्णांची अभिन्न अशी चिच्छक्तीच आहे. ज्यावेळी ही चिच्छक्तिस्वरूपिणी श्रीराधा चैतन्यरूपी श्रीकृष्णांबरोबर अभेदरूपाने विराजमान असते त्यावेळी उत्पत्ती, स्थिती किंवा संहार यांपैकी कोणतीही लीला होऊ शकत नाही. परंतु ज्यावेळी दिव्य लीलेचा रसभोग आपण आपल्याच ठिकाणी करावा अशी इच्छा

भगवान् श्रीकृष्णांना होते तेव्हा ते आपल्या चिच्छक्तीला श्रीराधारूपाने प्रकट करतात. ही श्रीराधा संधिनी, संवित् किंवा आह्लादिनी शक्ती या नावाने ओळखली जाते. यामुळे श्रीराधा म्हणजेच चिच्छक्ती किंवा कुंडलिनी शक्ती होय, हे स्पष्ट होते. ही कुंडलिनी शक्ती साधकाला आनंदाचे दान करते म्हणून हिला आह्लादिनी शक्ती म्हणतात. ही आह्लादिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय साधकाला आनंदाची प्राप्ती कदापीही होऊ शकत नाही. "**श्रीचैतन्य चरित्रामृता-मध्ये**" असे म्हटले आहे की,

**एकई चिच्छक्ति ताँर धरे तिन रूप।**
**आनन्दांशे ह्लादिनी सदंशे सन्धिनी।**
**चिदंशे संवित् यारे ज्ञान करी मानि।।**
**सन्धिनीर सार अंश शुद्ध सत्त्व नाम।**
**भगवानेर सत्ता हय याहाते विश्राम।।**
**ह्लादिनीर सार प्रेम प्रेमसार भाव।**
**भावेर परमकाष्ठा नाम महाभाव।**
**महाभावस्वरूपा श्रीराधा ठाकुराणी।**
**सर्वगुणखानि कृष्ण कान्तशिरोमणि।।**
**किंवा प्रेमरसमय कृष्णेर स्वरूप।**
**ताँर शक्ति ताँर सह हय एकरूप।।**
**कृष्ण वांच्छापूर्तीरूप करे आराधने।**
**अतएव राधिका नाम पुराणे बाखाने।।**
**राधा पूर्णशक्ति कृष्ण पूर्णशक्तिमान्।**
**दुई वस्तु भेद नाइ शास्त्र परिमाण।।**

एकच चिच्छक्ती तीन रूपे धारण करते. जेव्हा ती आनंद अंशाने प्रकट होते तेव्हा तिला आह्लादिनी म्हणतात. सत् अंशाने प्रकट झाल्यावर या चिच्छक्तीलाच संधिनी व चित् अंशाने प्रकट झाल्यावर संवित् असे म्हणतात. संधिनी शक्तीचा जो साररूप अंश आहे त्याला शुद्ध सत्त्व म्हणतात. या ठिकाणीच श्रीभगवंताची सत्ता

आनंदाने विश्राम घेत असते. आह्लादिनी शक्तीचे सार प्रेम आहे. प्रेमाचे सार भाव म्हणजे भक्ती हे असून महाभावामध्येच प्रेमाची पराकाष्ठा झालेली दिसून येते. श्रीराधा ठाकुराणी ही महाभावस्वरूप आहे. सर्व गुणांची खाण असलेले श्रीकृष्ण कांतशिरोमणी असल्यामुळे त्यांच्या स्वरूपाला प्रेमरसमय म्हटले जाते. त्यांची शक्ती त्यांच्या- बरोबर एकरूप होऊनच नेहमी राहत असते. आराधना करू लागल्यावर श्रीकृष्ण इच्छापूर्ती करून प्रसन्न होतात. श्रीराधा पूर्ण शक्ती असून श्रीकृष्ण पूर्ण शक्तिमान् आहेत. त्या दोघांमध्ये कसलाही भेद नाही. याचे प्रमाण एक शास्त्रच आहे. सहस्रारामधून म्हणजे मूलस्वरूपापासून धारा म्हणजे शक्ती खाली तोंड करून वाहू लागते त्यावेळी जगदुत्पत्ती होते. यालाच अनुलोमक्रम म्हणतात. परंतु ज्यावेळी श्रीगुरुकृपा होते त्यावेळी तिचा अनुलोमक्रम लुप्त होऊन ती विलोमक्रमाने ऊर्ध्वगामिनी होऊन वाहू लागते. तिचे "**धारा**" स्वरूप बदलून ती "**राधा**" स्वरूप होते. एकदा का ही कुंडलिनीराधा जागृत झाली की, ती परमात्मरूपी श्रीकृष्णाला आलिंगन देऊन त्याच्याशी एकरूप होईपर्यंत शांत होत नाही. ऊर्ध्वगामिनी शक्तीच्या ज्या दिव्य लीला घडून येतात त्यालाच रासलीला असे म्हटले आहे. ही ऊर्ध्वगामिनी शक्तीच साधकाला परमानंदाचा अधिकारी बनविते. यामुळे सर्व साधनांचे अंतिम सार हेच आहे की, धाराचे राधेमध्ये रूपांतर व्हावे. शक्तिपात-योगाने ही गोष्ट सहजसाध्य होत असल्याने शास्त्रकारांनी, संतांनी, महंतांनी, मुनींनी, ऋषींनी व साधूंनी या श्रीगुरुकृपाप्राप्त साधनेचा डिंडिम आपापल्या ग्रंथांमध्ये आपापल्या सांप्रदायिक पद्धतीने व क्रमाने नानाविध प्रकारे करून या साधनाचा महिमा पटविण्याचा प्रयत्न केला आहे.

आकाशातून पडलेले पावसाचे पाणी नदीनाल्यातून वाहत वाहत शेवटी ज्यावेळी सागराला जाऊन मिळते त्यावेळी ते आपल्या नामरूपाचा त्याग करून सागराशी एकरूप होऊन जाते. त्याचप्रमाणे जीव, जगत् व ईश्वर यांच्या रूपाने साकार झालेली ही शक्ती ज्यावेळी परमात्म्याशी एकरूप होते त्यावेळी आपल्या सर्व नामरूपात्मक प्रपंचाची संहारणी

व पूर्ण त्याग करून टाकते. नाम व रूप ही लीला आहे. नाम व रूपाची कल्पना करूनच जप, तप, पूजा, अर्चना, प्रार्थना इत्यादींना आरंभ होत असतो. मात्र हे लक्षात ठेवले पाहिजे की, सर्व नामे व सर्व रूपे ही शक्तीचीच आहेत. तद्भिन्न काहीही नाही. याकरिता शक्तीची साधना केल्याशिवाय व कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय अन्य दुसऱ्या कोणत्याही साधनाने केव्हाही साधक नामरूपातीत अशा निर्गुणचैतन्याची प्राप्ती करू शकत नाही.

ज्याप्रमाणे नामरूप बाहेर भासित होते त्याप्रमाणे ते अंतरंगातही अनुभवास येते. प्रकाश हे परमेश्वराचे रूप असून अनाहत नाद हे त्याचे नाम आहे. साधनात अनाहत नादाचे चित्र प्रकाशयुक्त अशा ॐकाराच्या नामाने साकार झालेले दिसून येते. "**घोषाच्या कुंडीं। नादचित्रांचीं रूपडीं। प्रणवाचिया मोडीं। रेखिलीं ऐसीं।।६.२७६।।**" असे याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीत**" वर्णन केले आहे. परंतु साधकाला याही नामरूपाचा त्याग करून पुढे जावे लागते. याचे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे केले आहे,

**ते ॐकाराचिये पाठी। पाय देत उठाउठी।**
**पश्यंतीचिये पाउटी। मागां घाली।।६.३०३।।**
**पुढें तन्मात्रा अर्धवेरी। आकाशाच्या अंतरीं।**
**भरती गमे सागरीं। सरिता जेवीं।।३०४।।**
**मग ब्रह्मरंध्रीं स्थिरावोनी। सोहंभावाच्या बाह्या पसरोनी।**
**परमात्मलिंगा धांवोनी। आंगा घडे।।३०५।।**
**तंव महाभूतांची जवनिका फिटे।मग दोहींसि होय झटें।**
**तेथ गगनासकट आटे। समरसीं तिये।।३०६।।**
**पैं मेघाचेनि मुखी निवडला। समुद्र कां वोघीं पडिला।**
**तो मागुता जैसा आला। आपणपयां।।३०७।।**
**तेवीं पिंडाचेनीं मिषें। पदीं पद प्रवेशे।**
**तें एकत्व होय तैसें। पंडुकुमरा।।३०८।।**

निर्गुण चैतन्यावरच अंतर्बाह्य नामरूप भासित होत असते. पाण्यावर

तरंग खेळताना दिसतात; पण ते पाण्याहून निराळे नसतात. त्याप्रमाणे नामरूपांचाही निराळेपणा असू शकत नाही. ज्यावेळी श्रीगुरुकृपेने शक्ती जागृत होऊन दीर्घकालपर्यंत निरंतर सत्काराने श्रीगुरूपदिष्ट साधन क्रिया घडून येऊन शक्ती ब्रह्मरंध्रामध्ये लीन होते तेव्हा निर्गुण सच्चिदानंदरूपाची प्राप्ती होते. त्यावेळी साध्य व साधक एकरूप होतात. साधकाची निजसत्ता संपुष्टात येऊन ती भगवत्सत्तेमध्ये विलीन होऊन जाते. यालाच महाभाव असे म्हणतात. रासलीलेमध्ये श्रीकृष्ण ज्यावेळी अदृश्य होतात त्यावेळी गोपी त्यांना शोधून काढण्या-साठी तडफडत असतात. या तडफडीमुळे त्यांना प्राणरूपातच रमणारा असा प्राणाराम श्रीकृष्णच सर्वत्र दिसू लागतो. गोपींप्रमाणे असलेल्या साधकांची "**अहं ब्रह्मास्मि**" या विचारापासून सुरू झालेली साधना "**सर्वं खल्विदं ब्रह्म**" या महाभावामध्ये परिणत होऊन अहं ममतादि सर्व गोष्टींचा नाश होऊन आपणच श्रीकृष्णस्वरूप आत्माराम आहोत असा अनुभव येतो.

**शिवशक्तिस्वरूप साधन :-**

शक्तिपातयोगाचे साधन शिवशक्तिस्वरूप आहे. श्रीशिव व श्रीशक्ती हे अभिन्न असून वरवर फक्त निराळे भासतात. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीशिवशक्तीचे ऐक्य अनादि असते असे सांगितले आहे.

**सार्धं केन च कस्यार्धं शिवयोः समरूपिणोः ।**
**ज्ञातुं न शक्यते लग्नमितिद्वैतच्छलान्मुहुः ।।**
**अनुभवामृत ३।।**

द्वैतामुळे एकच सच्चिदानंदरूपाने असणारे ब्रह्म व माया किंवा श्रीशिव व श्रीशक्ती हे भिन्न आहेत असे भासते. परंतु त्यांच्यामध्ये कोणाच्या योगाने कोण अर्ध्यासह आहे, कोण कोणाचा अर्ध आहे व त्याचप्रमाणे त्यांचे ऐक्य केव्हा होते हे दोघेही पूर्ण एकरूप असल्यामुळे कोणी जाणू शकत नाही.

या दोघांमुळेच नामरूपात्मक असे जग उत्पन्न होते. श्रीशिवशक्तीची सत्ता एक असून दोघांचा प्रकाशही एकच असतो. त्यामुळे "**सूतसंहितेत**"

"**संविदेव पराशक्तिः**" संवित् किंवा चैतन्य हीच मूळ शक्ती होय असे म्हटले आहे. "**केनोपनिषदात**" "**विद्योमारूपिणी प्रादुरभूत स्त्रीरूपा (केन.उप.३।१२)**" श्रीशंकरांची शक्ती स्त्रीरूप श्रीउमा विद्यारूप म्हणजे चैतन्यरूपच मानली आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**अनुभवामृतात**" ज्ञानदृष्टीनेच शक्तीचे रूप वर्णन केले आहे. ज्ञानदृष्टी प्राप्त झालेल्या ज्ञानी पुरुषाला परमेश्वराची शक्ती विद्यारूप म्हणजे ज्ञानरूप दिसते. "**श्रीदेवीभागवतातही**" देवीने आपले स्वरूप सांगताना "**रूपं मदीयं ब्रह्मतत् सर्वकारणकारणम्। मायाधिष्ठानभूतं तु सर्वसाक्षी निरामयम्।।**" असे म्हटले आहे. सर्व कारणांचे कारण जे सच्चिदानंद ब्रह्मस्वरूप तेच माझे स्वरूप होय. ते माझे स्वरूप शुद्ध साक्षिस्वरूप असून मायेला म्हणजे ज्ञानाने निवृत्त होणाऱ्या जीवाच्या विपरीत कल्पनेला अधिष्ठानभूत आहे.

जीवाची विपरीत कल्पना निवृत्त होण्याचे कार्य हेच खरे महत्त्वाचे कार्य आहे. त्यासाठीच सर्व साधनादिकांचा खटाटोप आहे. हे कार्य शक्ती करते. "**सूतसंहितेत**" असे म्हटले आहे की -

**सदाकारा परानन्दा संसारोच्छेदकारिणी।**
**सा शिवा परमादेवी शिवाभिन्ना शिवङ्करी।।**
**यज्ञवैभवखण्ड १३.३।।**

श्रीशिवाची शक्ती शिवा परमादेवी ही परमानंदरूप संसाराचा उच्छेद करणारी, शिवाशी एकरूप असणारी व आत्यंतिक कल्याण करणारी आहे. या श्लोकावरील आपल्या टीकेत श्रीविद्यारण्य असे म्हणतात, "**तथाच शिवशक्त्योर्भेदावभास एव मिथ्या न तु प्रपञ्चवत्स्वरूपमपीत्यर्थः**" श्रीशिवशक्ती हे दोन भिन्न आहेत असे मानणे हेच खोटे आहे. श्रीशिवशक्तीचे स्वरूप जडविनाशी प्रपंचाप्रमाणे खोटे नाही. श[क्त]ीचे खरे स्वरूप असे आहे की,

**एषा सा साक्षिणी शक्तिः शङ्करस्यापि शङ्करी।**
**शिवाभिन्ना तया हीनः शिवः साक्षात् निरर्थकः।।**
**सूतसंहिता-यज्ञवैभवखण्ड १३.२९।।**

अशी श्रीशंकरांची साक्षात् शंकरी शक्ती आहे. ती श्रीशिवांपासून अभिन्न आहे. तिच्याशिवाय श्रीशिव हे निर्रथक किंवा शवरूपच आहेत.

श्रीशिवशक्तीचे एकरूपत्व अनुभवास येणे हेच साधकाचे ध्येय आहे. असा अनुभव देते तेच खरे साधन होय. **"न शिवेन विना शक्तिर्न शक्तिरहितः शिवः। उमाशङ्करस्योरैक्यं यः पश्यति स पश्यति ।। सूतसंहिता यज्ञवैभवखण्ड १३.३०।।"** असे शास्त्रकारांनी यासाठीच सांगितले आहे. श्रीशिवाशिवाय श्रीशक्ती व श्रीशक्तीशिवाय श्रीशिव वेगळे असूच शकत नाहीत. जे अशा प्रकारे चिन्मात्ररूपाने श्रीउमाशंकरांचे किंवा श्रीशिवशक्तीचे ऐक्य अनुभवितात तेच ज्ञानी होत.

वस्तू व वस्तूची शक्ती ही दोन निरनिराळी नावे असली तरी वस्तू एकच असते. म्हणून वस्तू व वस्तूची शक्ती यांचे सदा अद्वैतच असते. वस्तूची शक्ती स्फुरण पावत नाही तोपर्यंत वस्तू व शक्ती अत्यंत एकरूप असतात, यात शंका नाही. पण शक्तीचे स्फुरण झाले असताही, ते शक्तीचे स्फुरण वस्तूवरच होत असते. त्या स्फुरणात मूळ वस्तूच स्फुरत असल्यामुळे, वरकरणी वस्तू व शक्ती असा दोनपणा दिसून येतो. परंतु वस्तू व शक्ती दोन निरनिराळ्या वस्तू होऊन त्या परस्पराहून भिन्न होत नाहीत. वस्तू व वस्तूची शक्ती यांचे दोनपण नेहमीच अव्यक्त असते. मात्र शक्तिस्फुरण झाले असता ते व्यक्त होते. व्यक्तदशेत दोघांना दोन नावे येतात, मात्र वस्तू एकच राहते. स्फुरणापूर्वी जी वस्तू होती, तीच स्फुरणदशेतही एकच राहते. म्हणून वस्तू व वस्तूची शक्ती यांचे द्वैत कधीही उत्पन्न होत नाही. अशा रीतीने वस्तू व शक्ती ही परस्परात मिळून राहून आपले अद्वैत तत्त्व सारखे दाखवीत असतात. श्रीशिवशक्तीही याच नियमानुसार एकरूपच असतात व एकरूपानेच स्फुरणात जगाचा प्रत्यय येतो व स्फुरणाच्या लोपात जगाचा लय दिसून येतो.

श्रीशिवशक्तीचा दोनपणा जाऊन एकरूपत्व अनुभवास कसे

येते? ह्यासाठी एखादे साधन आहे काय ? असा प्रश्न जेव्हा साधकाला पडतो त्यावेळी श्रीशक्ती व श्रीशिव यांची जागृती झाल्याशिवाय हे घडून येत नाही असे स्पष्ट दिसते. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी हे श्रीशिवशक्ती जागृतीचे साधन "**अनुभवामृतात**" सांगितले आहे.

**तेयां दोघांमाजी एखादें। विपायें उमजलें होय निदे।**
**तरी घरवात गिळोनि नुसुधें। कांहीं ना करी।।१.३६।।**

या दोघांमध्ये एखादे कदाचित् निद्रेपासून जागृतीस म्हणजे स्वरूपस्थितीस आले तर सर्व स्वरूपमात्र असते; दुसरे काही राहत नाही. याचा अर्थ असा आहे की, श्रीशिव व श्रीशक्ती या दोघांमध्ये एखाद्या तत्त्वास जागृती आली की, प्रपंच गिळला जातो. श्रीशिवशक्तीचे ऐक्यज्ञान म्हणजे श्रीशिवरूप होणे. हे श्रीशिवरूपत्व विसरले की, सर्वत्र जडरूपत्वाचा अनुभव येतो. मूळ शक्ती चेतन असतानासुद्धा अज्ञानामुळे हा द्वैताचा किंवा जड प्रपंचाचा भास होतो. परंतु ज्ञानरूप श्रीशिव व वृत्तिरूप श्रीशक्ती या दोघांमध्ये जर त्यांचे अद्वैतस्वरूपाचे ज्ञान प्रकट झाले तर विश्वप्रपंचाचा भास उरत नाही.

येथे "एखादे" या शब्दाचा अर्थ "जर" असा आहे. त्यामुळे श्रीगुरुकृपेने जर कदाचित् दोघांमध्ये एकाचे किंवा दोघांचेही यथार्थ स्वरूपाचे म्हणजे अद्वैताचे ज्ञान स्फुरले म्हणजे जीवाचे खरे कल्याण होते. मी म्हणजे वृत्तिरूपशक्तिस्फुरणाने आपले शुद्धज्ञानस्वरूप ओळखून आधारभूत शुद्धज्ञानस्वरूप श्रीशिवाशी ऐक्य करणे हे श्रीशक्तीचे जागे होणे होय. ही श्रीशक्ती जेव्हा श्रीगुरुकृपेने शक्तिपात होतो तेव्हा जागी होते. त्यामुळे श्रीशिवाशी ऐक्याची जाणीव होते. तेव्हा "**अहं ब्रह्मास्मि**" हा ऐक्यानुभव येतो. श्रीशिवाचे जागेपण म्हणजे "**ब्रह्मैवेदं सर्वं**" आपले सर्वात्मत्व ओळखणे होय. श्रीशिवाने श्रीशक्तीच्या सर्वरूप आविष्काराशी ऐक्य करणे ही श्रीशिवाची जागृती आहे. असे दोघेही जण जागे झाले असता सर्व प्रपंचच गिळला जातो.

**आत्मनिवेदनयोग :-**

शक्तिपातयोग हा खऱ्या अर्थाने आत्मनिवेदनयोग आहे. आत्म-

निवेदन म्हणजे आपण आपले स्वतःचे सर्व काही अर्पण करणे होय. आत्म्याला सर्व काही अर्पण केल्याशिवाय साधक आत्मस्वरूप होऊच शकत नाही. शक्तिपातयोगात ही निवेदनाची म्हणजे अर्पणाची क्रिया शक्तीकडून घडून येत असल्याने हा खऱ्याखुऱ्या अर्थाने आत्मनिवेदनयोग आहे. "**एकवीस समासी**" या आपल्या "**जुन्या दासबोधात**" श्रीसमर्थ रामदास्वामीमहाराज असे म्हणतात की -

**आत्मा साधावया जात। तो साधकाचाचि होय घात।**
**तेणें गुणें निवांत। निःशब्द राहे।।२१.४३।।**
**व्हावया वस्तूची प्राप्ती। साधक साधनें करिती।**
**तंव तंव वस्तु आहुती। साधकाचीच मागे।।४४।।**
**जेंहीं विवेकें आपुली। वस्तूसी आहुती दिधली।**
**तयांसीच वस्तू लाधली। येरां अप्राप्त।।४५।।**
**येथींचा विपरीत विचार। करितां आपुला संहार।**
**तेणें अक्षय्य अपार। सुख लाहे।।४६।।**
**जेणें जिवावरी उठावे। तेणें आनंदासी लुटावे।**
**आनंदभोग लुटोनि असावें। कल्पकोटी।।४७।।**
**जो कां आपुली कुरवंडी। ओवाळूनि परती सांडी।**
**तयासीच वस्तूची जोडी। इतरां न घडे।।४८।।**
**येथें मोठा लाभ होतो। आपुल्यासाठीं राम मिळतो।**
**साठी केलिया मग तो। रामचि होये।।४९।।**
**जो रामरूपीं झगटे। तो उभय अंगें पालटे।**
**आशंका मात्र तुटे। स्वस्वरूपीं।।५०।।**
**जो रामरूपीं मिळाला। तो परतोनि नाहीं आला।**
**जैसा लोहो परिसें पालटला। तो लोहखंड न होय।।५१।।**
**आत्मनिवेदनाच्या अंतीं। जे कां घडली अभेदभक्ती।**
**त्या नांव सायुज्यमुक्ती। जाण शिष्या नेमस्त।।५२।।**
**जो सद्गुरूसी शरण गेला। अद्वैत निरूपणें बोधला।**
**मग जरी वेगळा केला। तरी होणार नाहीं।।५३।।**

जेव्हा साधक श्रीसद्गुरूला शरण जातो तेव्हा श्रीसद्गुरू अत्यंत कृपाळूपणे साधकाला शक्तिपातयोगाचे साधन देतात. मग आत्मप्राप्तीसाठी साधक साधन करू लागतो. त्यामुळे साधकाची देहात्मबुद्धी कमी होऊ लागून तो निवांत व निःशब्द अशा ब्रह्मस्वरूपात स्थिर होऊ लागतो. ब्रह्मवस्तूची प्राप्ती होण्याकरिताच साधक साधन करीत असतात. मात्र ज्या ज्या प्रमाणात शक्ती जागृत होत जाते त्या त्या प्रमाणात ब्रह्मवस्तू साधकाची आहुती मागू लागते. अर्थात् जागृत शक्ती साधकाच्या एकेक गोष्टीचा ग्रास करून पिंड-ब्रह्मांडाची रचना गिळून शेवटी श्रीशिवस्वरूप होते. अशा प्रकारे जेव्हा विवेकाने इतर सर्व साधने व इतर सर्व बाह्य गोष्टींचा त्याग करून साधक शक्तिस्वरूप श्रीशिवाच्या आधीन होऊन साधन करून शक्तीला वाट मोकळी करून देऊन आहुती देतो तेव्हाच त्याला परब्रह्मवस्तूची प्राप्ती होते. जोपर्यंत साधक अशा प्रकारे आपल्या सर्वस्वाचे निवेदन करीत नाही तोपर्यंत त्या साधकाला आत्मस्वरूपाची उपलब्धी होऊ शकत नाही.

खरोखर शक्तिपातयोगरूप आत्मनिवेदनाचे हे साधन काही निराळेच आहे; कारण या साधनाचा विचार केला म्हणजे या साधनात सर्व काही विपरीतच आहे असे दिसून येते. हे साधन सुरू होऊन शक्ती जागृत झाली की, साधकाचा संहार होऊ लागतो. दोष दूर होतात. शरीराची आसक्ती कमी होते. कल्पना शेवटास येतात. षट्चक्रांचा वेध होतो. पंचमहाभूतांची आटणी होते. मनाचे मनपण नाहीसे होते. विषयांचा विसर पडू लागतो. अर्थात् जसजसे हे घडत जाते तसतसे साधकाचे सुख वाढत जाते व शेवटी त्याला अक्षय्य व अपार सुख प्राप्त होते.

अशा प्रकारे जो साधक प्राणांची पर्वा न करता जीवावर उदार होऊन साधन करतो त्यालाच खरा ब्रह्मानंद प्राप्त होतो. या रीतीने साधन करणारा साधक खूप आनंद लुटीत असतो व तो ब्रह्मस्वरूप झाल्यामुळे कोटी कोटी कल्पपर्यंत आनंद भोगीत असतो. मात्र यासाठी त्याला सर्वस्वाचा त्याग करावा लागतो. प्राणांची कुरवंडी करावी

लागते. अशा रीतीने प्रयत्न करणाऱ्या साधकालाच वस्तू म्हणजे ब्रह्म प्राप्त होते. इतरांना ते प्राप्त होत नाही.

एकदा का आपण आपल्याला जागृत शक्तीच्या प्रवाहात झोकून दिले की, मग स्वत:ला काहीही करावे लागत नाही. सर्व काही शक्ती करते. या साधनामुळे खूप मोठा लाभ होतो. आपण आपल्या स्वत:ला दिले की, आपण श्रीरामरूप होतो. शक्तीच्या आधाराने जीव सुषुम्णेच्या प्रवाहात शिरला की, तो आपोआप आत्माराम होतो. यासाठी श्रीरामाची संगती हवी. आत्मनिवेदन हवे. हे घडले की, जीव श्रीरामस्वरूप होतो. त्याच्या सर्व शंका नाहीशा होऊन तो स्वस्वरूपी लीन होतो. तो परत जीव दशेला येत नाही. परिसामुळे लोखंडाचे सोने होते; मात्र पुन्हा सोन्याचे लोखंड होत नाही. असे आत्मनिवेदन घडले म्हणजे जीवाला सायुज्यमुक्ती मिळते. मात्र यासाठी श्रीसद्गुरूंना शरण जाऊन साधकाला साधनप्राप्ती होऊन अद्वैतानुभव येणे आवश्यक असते. हा अनुभव आला की, साधक ब्रह्मरूप होतो. मग त्याला त्या स्थितीपासून कोणीही वेगळे करू शकत नाही.

आत्मनिवेदन योगालाच श्रीसमर्थांनी नवविधा भक्तीत मुख्य भक्ती असे म्हटले आहे. "**ऐक शिष्या येथींचें वर्म। स्वयें तूंचि आहेसि ब्रह्म। येविषयी संदेह भ्रम। धरूंचि नको।। श्रीदासबोध ५.६.४५।।**" असे सांगून श्रीसद्गुरूंनी शक्तिपात केला की, सर्व साधनयोगातील आत्मनिवेदनाचे भजन घडून येऊन काय काय घडते हे सांगताना श्रीसमर्थ असे म्हणतात की -

**नवविधा प्रकारें भजन। त्यांत मुख्य आत्मनिवेदन।**
**तें समग्र प्रकारें कथन। कीजेल आतां।।५.६.४६।।**
**निर्माण पंचभूतें इयें। कल्पांतीं नासतीं यथान्वयें।**
**प्रकृतिपुरुष जियें। तेही ब्रह्म होती।।४७।।**
**दृश्य पदार्थ आटतां। आपणही नुरे तत्त्वतां।**
**ऐक्यरूपें ऐक्यता। मुळींच आहे।।४८।।**
**सृष्टीची नाहीं वार्ता। तेथें मुळींच ऐक्यता।**

**पिंड ब्रह्मांड पाहों जातां। दिसेल कोठें।।५०।।**
**ज्ञानवह्नी प्रकटे। तेणें दृष्य केर आटे।**
**तदाकारें मूळ तुटे। भिन्नत्वाचें।।५१।।**
**मिथ्यात्वें वृत्ति फिरे। तो दृश्य असतांची वोसरे।**
**सहजचि येणें प्रकारें। झालें आत्मनिवेदन।।५२।।**

नवविधा प्रकारच्या भजनात आत्मनिवेदन योगामुळे जे भजन म्हणजे साधन घडते तेच महत्त्वाचे आहे. ते आता समग्र सांगतो. ज्याप्रमाणे निर्माण झालेली पंचमहाभूते कल्पांत झाला म्हणजे जशी परब्रह्मात मिळून जातात त्याचप्रमाणे हे साधन सुरू झाले म्हणजे त्यांची आटणी होते. इतकेच नव्हे; तर प्रकृती व पुरुष ही मूळ तत्त्वेही ब्रह्मरूप होऊन जातात. अशा प्रकारे सर्व दृश्य पदार्थ आटून गेल्यामुळे जीवाचे जीवपण संपून तो तत्त्वतः ब्रह्मरूप होतो. ही एकरूपता मूळचीच असते. परंतु मध्ये झालेला द्वैताचा भास साधनाने नाहीसा होतो. या आत्मनिवेदनयोग साधनाचा महिमा अद्भुत आहे. त्यामुळे सृष्टीची वार्ताच नाहीशी होते; कारण सृष्टीची जननी जी कल्पना ती श्रीशक्तीचे व श्रीशिवाचे ऐक्य झाल्याने आपोआपच मावळून जाते. त्यामुळे सृष्टीचा लय होतो. अशा स्थितीत पिंड व ब्रह्मांड शोधूनही सापडणे शक्य नसते; कारण या लयावस्थेत एका ब्रह्माशिवाय दुसरे काहीही असत नाही.

या शक्तिपातयोग साधनामुळे ज्ञानरूप अग्नी प्रकट होऊन दृश्याचा पसारा त्यात जळून जातो. जीव आत्म्याशी तदाकार झाल्याने भिन्नत्वाचे मूळच तुटून जाते. वृत्तीचे भटकणे मिथ्या दर्शनामुळेच होत असते. परंतु या आत्मनिवेदन योगाच्या साधनमार्गाने साधक जाऊ लागला की, दृश्य प्रपंच विलीन होऊ लागून साधक ब्रह्मरूप होतो.

**मायानिरपेक्ष साधन :-**

शक्तिपातयोगाचे साधन सर्वार्थाने मायानिरपेक्ष आहे; कारण ज्या मूळ अज्ञानामुळे आत्मा संकुचित होऊन जीवभाव धारण करतो त्या अज्ञानाची निवृत्ती कर्म, ज्ञान, भक्ती इत्यादि कोणत्याही

उपायांनी होत नाही. हे सर्व उपाय मायांतर्गत बुद्धीचे व्यापार ठरतात. त्याचप्रमाणे मूळ अज्ञान जाळून टाकण्याचे सामर्थ्य या उपायांमध्ये नसल्याने त्यांचा तितकासा उपयोगही होत नाही. यासाठी मायानिरपेक्ष साधनच उपयोगी पडते. या दृष्टीने शक्तिपातयोग हेच एकमेव साधन मायानिरपेक्ष मूळ अज्ञान निवृत्ती करण्यास समर्थ ठरते. श्रीभगवंतांची कृपाशक्ती जेव्हा श्रीसद्गुरूंच्या द्वारे साधकामध्ये संचारित होते तेव्हा निद्रिस्थ कुंडलिनी शक्ती जागृत होऊन या मायानिरपेक्ष साधनाला सुरुवात होते. श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराज **"ग्रंथराज श्रीदासबोधात"** असे म्हणतात की, वेदादि सर्व गोष्टी व साधने मायांतर्गत असल्याने त्यांच्या ठिकाणी ब्रह्मप्राप्ती करून देण्याचे सामर्थ्य असत नाही. ते केवळ संतकृपेतच असते.

**वेदें प्रकाशिलें सर्वही। वेदविरहित कांहीं नाहीं।**
**तो वेद कोणासही। दाखवूं शकेना।।१-५-१२।।**
**तेचि वस्तु संतसंगें। स्वानुभवें कळों लागे।**
**त्याचा महिमा वचनीं सांगे। ऐसा कवणु।।१३।।**
**विचित्र कळा ये मायेची। परी ओळखी न सांगवे वस्तूची।**
**मायातीत अनंताची। संत सोय सांगती।।१४।।**

संतलोक आपल्या कृपेने साधकावर शक्तिपात करून त्याला मायातीत अनंताची सोय सांगतात. संत जी भगवत्कृपा करतात ती स्वभावसिद्ध असून अहेतुक असते, हा तिचा सर्वात मोठा विशेष आहे. मोठमोठ्या शास्त्रकारांनी, संतांनी व महात्म्यांनी एकमुखाने हे मान्य केले आहे की, जोपर्यंत साधकामध्ये भगवत्कृपेचा संचार होत नाही तोपर्यंत सर्व व्यर्थ ठरते. ही भगवत्कृपा ज्ञानाने, कर्मसाम्यामुळे, मलपाकामुळे अगर श्रीभगवंताच्या इच्छेने प्राप्त होते, असे दृष्टिभेदाने शास्त्रकारांनी सांगितले आहे.

ज्ञानामुळे शक्तिपात होतो असे जे शास्त्रकार म्हणतात त्यांचे मत असे आहे की, अज्ञानामुळे संसार उत्पन्न होतो; पण ज्ञानोदय झाल्यावर अज्ञानाची निवृत्ती होऊन शक्तिपात होतो. ज्ञानरूपी अग्नी सर्व प्रकारच्या

कर्मांना जाळून टाकून शक्तिपाताची भूमी तयार करतो.

श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी कर्मसाम्यामुळे शक्तिपात होतो असे "**श्रीज्ञानेश्वरीत**" म्हटले आहे. ते असे म्हणतात की -

**ऐसी कर्मे साम्यदशा। होय तेथ वीरेशा।**
**मग श्रीगुरु आपैसा। भेटेचि गा।।१८-९६६।।**

ज्यावेळी कर्मांची साम्यावस्था प्राप्त होते तेव्हा श्रीसद्गुरू आपणहून सहजच साधकाला खात्रीने भेटतात. त्यावेळी शक्तिपात होतो.

काही शास्त्रकारांचे असे मत आहे की, मलपाक झाल्याशिवाय शक्तिपात होऊ शकत नाही. मलपाक म्हणजे अनादि मल हळूहळू पक्व होत असतो. तो जेव्हा पूर्ण परिपक्व होतो तेव्हा तो दूर करण्याची वेळ येते. मोतीबिंदू पूर्ण पिकल्याशिवाय त्यावर शस्त्रक्रिया करणे योग्य ठरत नाही; कारण त्यामुळे अपाय होण्याचा संभव असतो. त्याचप्रमाणे अपक्व मलही जबरदस्तीने दूर करण्याचा प्रयत्न केला तर जीवाचा सर्वनाश होण्याचा संभव असतो. ज्यावेळी मलाचा परिपाक होतो त्यावेळी ईश्वर श्रीसद्गुरुरूपाने दीक्षा देऊन शक्तिपात करतात व मल दूर करतात.

निरपेक्ष शक्तिपातवादी आचार्यांच्या मते ज्ञान, कर्मसाम्य किंवा मलपाक यांपैकी एकही गोष्ट शक्तिपाताला कारण नसून कर्मादि निरपेक्ष भावाने केवळ एकमात्र श्रीभगवंतांच्या कृपेनेच शक्तिपात अनुग्रह होतो. कर्मसाम्य, मलपाक, ज्ञान इत्यादि कशाच्याही अधीन शक्तिपात नसून तो निरपेक्ष व स्वतंत्र आहे. पुराणातही "**तस्यैव तु प्रसादेन भक्तिरुत्पद्यते नृणाम्**" असा पुरावा याबाबतीत मिळतो.

शक्तिपात कसाही होत असला तरी तो होणे आवश्यक आहे व त्याच्याशिवाय श्रीसमर्थांनी म्हटल्याप्रमाणे मायापार होणे शक्य होत नाही, हे त्रिकालाबाधित सत्य आहे. शक्तिपातयोगाचे जे साधन उपरोक्त प्रक्रियेने प्राप्त होते ते सर्वार्थाने मायानिरपेक्ष असते; कारण हे साधन करीत असताना शक्तिपात होऊन जो ईश्वरभाव साधकाला त्याच्या योग्यतेप्रमाणे मिळालेला असतो किंवा त्याच्या ठिकाणी उद्भुत झालेला

आढळतो तो क्रमशः वृद्धिंगत होत जातो. आत्मस्वरूप मायातीत असल्याने ते जप, ध्यान, एकाग्रता, पूजा, पाठ, मंत्र इत्यादि कशाच्याही कक्षेत बसत नाही. त्यामुळेच दीक्षा देताना इतर कोणत्याही मायिक व्यापारांना अवसर न देता श्रीसद्गुरू साधकाला असे सांगतात की, "डोळे मिटून स्वस्थ बस. शरीर शिथिल ठेव. साधी मांडी घाल. शरीरावर कोणत्याही प्रकारे मुद्दाम ताबा ठेवू नको व शरीर सैल ठेवून स्वस्थ बसून काय होते ते पाहा. त्यावेळी जप, नामस्मरण, ध्यान, मनन, चिंतन, पठण, मनाची मुद्दाम एकाग्रता, चित्तवृत्तींचा निरोध इत्यादि काहीही करू नको. असे केले म्हणजे श्रीकृपेने शक्तिसंचार होईल."

शक्ती ही मायानिरपेक्ष वस्तूशी संलग्न व्हावी म्हणून अशा प्रकारे श्रीसद्गुरू मायांतर्गत सर्व गोष्टींचा त्याग करावयास लावून आतूनच चालणाऱ्या साधनाला प्रवृत्त करतात. जे स्वतः होते ते साधन. जे मुद्दाम केले जाते ते साधन नव्हे. ती क्रिया आहे. जप, ध्यानादि सर्व या क्रियेचा व कर्माचा भाग आहे. तो सर्व मायांतर्गत असल्याने वेदही हे स्वरूप दाखवू शकत नाहीत असे श्रीसमर्थ म्हणतात. यासाठी संतांना सर्वभावे शरण गेले म्हणजे ते शक्तिपात करून मायानिरपेक्ष साधन देतात.त्यामुळे ज्या चिच्छक्तीने अनैक्याचा आभास पिंडब्रह्मांडाच्या रूपाने उत्पन्न केलेला असतो ती सर्व संकोच, बंधने, मल, विक्षेप, आवरण इत्यादींचा नाश करून आपल्या स्वस्वरूपाचा विकास करीत करीत श्रीनामदेवमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे **"नाही कुळ याती। नाही दिनराती।"** असलेल्या एका अनिर्वचनीय अवस्थेप्रत साधकाला घेऊन जाते. त्या विशुद्धरूपात साधक प्रतिष्ठित झाला म्हणजे मुक्त होऊन निरतिशय आनंदात डुंबत राहतो.

**भक्तियोगाचा योगमार्गः-**

शक्तिपातयोगाच्या साधनाला श्रीसंतएकनाथमहाराजांनी **"एकनाथी भागवतात"** "भक्तियोगाचा योगमार्ग" असे सार्थ नाव देऊन गौरविले आहे. इतकेच नव्हे; तर शक्तिपातयोगमार्गाचे विवरण म्हणजे भागवताचे

निरूपण आहे. हा मार्ग म्हणजे पंचम पुरुषार्थ आहे. एवढेच नव्हे; तर हा योग म्हणजे मुक्तीवरील भक्ती आहे असे या मार्गाचे श्रेष्ठत्व त्यांनी सांगितले आहे. इतकेच नव्हे; तर या योगाची श्रीकृष्णांच्या मुखातून महती सांगतांना श्रीएकनाथ असे म्हणतात की, "हे उद्धवा! हा भक्तियोगाचा योगमार्ग अर्थात् शक्तिपातयोगमार्ग ज्याला कळत नाही त्याला संसार दुःखरूप होतो. हा योग अखंड माझ्यापाशी आहे. त्यामुळे मी संसारात असूनही अखंड सुखस्वरूप आहे. हा शक्तिपातयोग एक तर सदाशिव जाणतो किंवा मी नारायण जाणतो. हा मार्ग अगम्य असल्यामुळे इतरांचा त्यात सहजासहजी प्रवेश होत नाही."

भक्तियोगाचा हा योगमार्ग **"गुरुगम्यता अगम्य"** असण्याचे खरे कारण सांगताना श्रीएकनाथमहाराज असे म्हणतात की, **"कां शिष्यासी स्वानुभव देणें। हें स्वयें जाणे सद्गुरु।।२९-४९३।।"** ज्याला आपण घेतलेला स्वानुभव शिष्याला दान करता येतो तो खरा श्रीसद्गुरू. अशा प्रकारे ज्ञानदानदीक्षा होऊन शिष्याला स्वानुभव मिळाला की, श्रीसद्गुरूंना निरतिशय आनंद मिळतो.

**शिष्य साचार अनुभव लाहे। तेणें सद्गुरु सुखाचा मेरू होये।**
**जेवीं तानयाचे धणीं माये। सुखावली राहे स्वानंदें।।२९-४९१।।**

अशा ज्ञानदान करणाऱ्या दीक्षेची अनिवार्यता श्रीकृष्णांच्या मुखातून पटविताना **"श्रीज्ञानेश्वरीच्या"** १८ व्या अध्यायात श्रीसंतज्ञानेश्वर-महाराज असे म्हणतात की, "हे अर्जुना! ज्यावेळी माझी तुझ्यावर कृपा होईल त्यावेळी अभेदरूपी सेवेने तुझे चित्त भरून जाईल म्हणजे तू मद्रूप होशील. अशी ही माझी कृपा तुझ्यावर झाली म्हणजेच तुझ्यावर माझा पूर्ण प्रसाद झाला असे समज. जन्म व मृत्यू ही तर सर्व दुःखाची निवासस्थाने आहेत. ही दुःखे जीवमात्रांकडून भोगली जातात. त्यांचा नाश होणे अती दुर्घट असते. असे असले तरी माझ्या शक्तिपातयोगाच्या प्रसादप्राप्तीमुळे तुला ही दुःखे सुखकारक व सोपी होतील. जेव्हा सूर्यप्रकाशाची साहाय्यता डोळ्यांना मिळते तेव्हा त्यांना अंधाराची किंमत वाटत नाही. त्याचप्रमाणे श्रीसद्गुरूंच्या

साहाय्याने माझा हा शांभवी विद्येचा प्रसाद मिळून ज्याची जीवपणाची हीनदशा जाऊन विभुदशा म्हणजे ब्रह्मप्राप्ती होते, तो संसाररूपी बागुलबुवाच्या भीतीने घाबरणे कधीही शक्य नाही. त्यामुळे हे धनंजय! माझा हा शक्तिपातयोगदीक्षाप्रसादच ज्ञानोपलब्धी झाल्याने या संसाररूपी दुर्गतीपासून तुला तारून नेईल. मात्र अशा प्रकारच्या दीक्षाप्रसादाची अहंकाराने व अभिमानाने तू अवहेलना करशील व अशा प्रकारच्या ज्ञानदानानेच जीव संसारसागर तरून जातो हे तू नुसते आपल्या कानामनाला स्पर्शही करून देणार नसशील तर तू वस्तुतः जरी नित्यमुक्त व अव्यय असलास तरी अशी कृपादीक्षा न मिळाल्याने सर्व व्यर्थ होईल. देहतादात्म्यसंबंधाचे घाव तुझ्या अंगावर आदळून ते तुला सोसावेच लागतील; कारण शक्ती जागृत झाल्याशिवाय ती ज्ञानाचा उदय घडवून आणीत नाही व देहतादात्म्यसंबंधाचा विच्छेद होत नाही. तो व्हावा हाच या साधनाचा खरा हेतू आहे."
(श्रीज्ञानेश्वरी १८.१२६९ ते १२७५)



# - आधार आठवा -

## ★ कुंडलिनी शक्तीचे स्वरूप ★

**१) एक अद्भुत आत्मानुभव**
**२) चिच्छक्ती, पराशक्ती व शब्दब्रह्मात्मिका स्फूर्ती**
**३) सर्व वृत्तींचे बीज**
**४) चैतन्याचा निरनिराळा आविर्भाव**
**५) प्राणपंचकरूपाने स्फुरणारी अत्युत्तम जीवशक्ती**
**६) लक्ष्मी व स्पंदधर्मिणी**
**७) प्रणवादि सर्व मंत्रांची निर्माती**
**८) दोन मुखांनी युक्त**
**९) सूर्यासारखी व विजेसारखी तेजस्वी**
**१०) आधारशक्ती**
**११) चैतन्याची परमप्रेमरूपशक्ती**
**१२) सार्वभौमचैतन्याचे ऐश्वर्य व जीवाची सावली**

**१) एक अद्भुत आत्मानुभव :-**

ज्या कुंडलिनी शक्तीच्या साहाय्याने साधक ब्रह्मरूप होतो त्या शक्तीचे स्वरूप कसे आहे हे पाहणे अत्यंत आवश्यक व उद्बोधक आहे. अगदी सुरुवातीलाच एका साधकाचा अनुभव पाहून मग शास्त्रीय चिकित्सा करू. हा अनुभव सांगताना साधक असे म्हणतो की -

"प्रत्यक्ष अनुभवाविना नुसते शास्त्रीय ज्ञान अंधळेच होय. एखादी बहुमोल जोड-दुर्बीण अंधळ्याच्या हाती दिली तर त्याला त्या दुर्बिणीचा स्पर्श जाणवेल. तिचा जाडजूडपणा त्याला समजेल. तो अंधळा त्या दुर्बिणीवरून हात फिरवील; पण त्या जोड-दुर्बिणीच्या भिंगातून दूरच्या वस्तूंना पाहण्याची दृष्टी मात्र त्याला असणार नाही. मनाची तयारी व मानसिक सिद्धता ज्ञानाच्या कोणत्याही शाखेचे ज्ञान संपादन

करण्यासाठी आवश्यक असते हे खरे आहे. पण केवळ एवढीच तयारी असून भागत नाही. विशेषतः शक्तिपातयोगात अनुभवाला सर्वांत मोठे स्थान आहे, हे निखालस खरे आहे.

एके दिवशी मीलित नेत्र होऊन मी ध्यानस्थ बसलो असता अंतःसृष्टीत म्हणजे माझ्या अंतर्यामात जे काही घडत होते ते पाहण्यात मी गढून गेलो होतो. इतक्यात एक विचित्र व अनपेक्षित खळबळ माझ्या अंतरंगात उसळली. एकाएकी बहिःसृष्टीत अनुभव घेत असल्याप्रमाणे ऐन दुपारचा सूर्यप्रकाश मला दिसला. या लख्ख प्रकाशात उंच उंच आणि अजस्त्र अशा पर्वतास मी निरखून पाहतो आहे असे मला दिसले. नंतर हा पर्वत हळूहळू माझ्या जवळजवळ आला. थोड्या वेळाने त्याचा पायथा माझ्या दृष्टिपथात आला. हा पर्वत अगदी उघडा-बोडका होता. काळ्या भिन्न कठीण प्रस्तरांनी तो घडला होता. त्या पर्वतावर गवताचे एखादे वाळलेले पानसुद्धा दृष्टीस पडत नव्हते. मग हिरवळीची गोष्ट तर दूरच राहिली. हा पर्वत आकाशात इतका उंच गेला होता की, त्याचा शिखराकडील भाग तर पूर्णपणे माझ्या नजरेच्या टप्प्याबाहेर होता. एका भव्य शिलाखंडासारखे महाअजस्त्र असे त्या पर्वताचे स्वरूप होते. त्या पर्वताच्या दर्शनाने मी दिङ्मूढ झालो.

इतक्यात छायेसारखी एक मानवी आकृती त्या पर्वताच्या रोखाने माझ्या समोरून चाललेली मला दिसली. ती आकृती एका स्त्रीची आहे हे थोड्याच वेळात माझ्या लक्षात आले. त्या स्त्रीच्या कडेवर एक मूल होते.

थोड्या वेळाने ती स्त्री पर्वताच्या पायथ्याशी पोहोचली. तेथे जाताच तिने आपल्या कडेवरील अर्भकाला तो उंचच उंच पर्वत चढून जाण्यास सांगितले. "नाही, नाही. अगदी अशक्य!" असे त्या अर्भकाने उच्चारलेले शब्द मला अगदी स्पष्ट ऐकू आले. मुलाने नकार दिल्यावर लगेचच त्या स्त्रीने त्या बालकासह तो उंचच उंच पर्वत चढावयाला आरंभ केला. आश्चर्याची गोष्ट अशी की, पावले रोवून बसविण्यास त्या उंच

व सरळ अशा चढणीवर कोठेही काही खुणा दिसत नव्हत्या. त्या पर्वताच्या चढणीवर खाचा केलेल्या नव्हत्या किंवा खडक फोडून पावले टेकायला जागाही केलेली नव्हती. अशा परिस्थितीत ही स्त्री ही खडी चढण चढणार तरी कशी? याचे मला आश्चर्य वाटू लागले. तोच माझी दृष्टी तिच्या पावलांशी खिळली. ती स्त्री अनवाणी नव्हती. तिच्या पायात काहीतरी पादत्राण होते आणि पादत्राण घालूनच ती चढण चढून जात होती. हे सर्व कशाचे द्योतक आहे व यातून कोणता अर्थ सूचित होत होता हे मात्र मला काही कळत नव्हते.

त्यानंतर हळूहळू त्या स्त्रीने त्या पर्वताची खडी चढण चढण्यास आरंभ केला. वळणावळणाच्या नागमोडी पाऊलवाटेने तिचे हे गिर्यारोहण चालू झाले. पर्वताची चढण उभी खडी असली तरी तिला त्याचा अडथळा झाला नाही. प्रथम ती उजवीकडे वळली. नंतर डावीकडे वळली. पुन्हा उजवीकडे आणि मग डावीकडे, अशा प्रकारच्या नागमोडी वळणाने तिचे चढणे चालले होते.

माझी एकाग्र दृष्टी तिचे अनुसरण करीत होती. पुढे थोड्या वेळाने ती एका सपाट मैदानावर उभी राहिली आहे असे मला दिसले. डोंगराच्या रांगाच्या रांगा ओलांडून ती त्या सपाट मैदानावर केव्हा आली याचा पत्ताच लागला नाही. मैदान लागल्यावर ती थांबेल असे वाटले. परंतु क्षणभरही विश्रांती न घेता तिने आपले चालणे तसेच पुढे चालू ठेवले. तिची चालण्याची गती कल्पनातीत होती. मानसिक दृष्ट्या मी पाठीमागे राहत नव्हतो हे जरी खरे असले तरी शारीरिक दृष्ट्या तिच्या चालण्याचा वेग मी सांभाळू शकत नव्हतो, हे अगदी उघड होते. माझी अहंभावाची अथवा मीपणाची जाणीव त्या स्त्रीचे अनुसरण करीत होती हेच खरे!

त्या स्त्रीने खूप अंतर पार केल्यावर दुतर्फा झाडींच्या मधील एक नवीनच देखावा प्रगट झाला. भव्य भव्य मंदिरांच्या दोन रांगांमधून एक रुंद रस्ता पसरलेला दिसत होता. त्या रस्त्यावर यात्रिकांच्या रूपाने जमलेला खूप मोठा जनसंमर्द दिसत होता. सर्व प्रकारच्या

वयाचे यात्रिक व यात्रिका त्या जनसंमर्दात दिसून येत होत्या.

कडेवर अर्भकाला घेऊन चालणाऱ्या त्या स्त्रीने त्या यात्रिकांना एकाएकी गाठले. त्या गर्दीतूनही तिने अगदी झपाट्याने वाट काढली. तिच्या वेगवान् गतीमुळे अगदी अग्रेसर यात्रिकही जेव्हा मागे पडला तेव्हा ती त्या अर्भकाला असे म्हणाली की, "पाहा! आपण त्या सर्वांना कसे सहजासहजी गाठले आणि त्यांना खूपच मागे टाकले. हे मागे पडलेले लोक कोणकोण आहेत हे तुला नंतर कळेलच!"

त्या स्त्रीचे हे शब्द मला अगदी स्पष्टपणे ऐकू आले. हे शब्द उच्चारल्यावर त्या स्त्रीने आपले चालणे तसेच पुढे चालू ठेवले. शेवटी ती मुक्कामावर आल्याप्रमाणे थांबली. तिने त्या अर्भकाला एका उंच व खड्या अशा सुळक्यासमोर उभे केले. त्या सुळक्याचा पृष्ठभाग चकाकणारा व प्रकाश परावर्तीत करणारा होता. अशा त्या सुळक्यासमोर बालकाला उभे करून ती स्त्री त्या अर्भकाच्या पाठीशी उभी राहिली. त्यानंतर ती स्त्री त्या बालकाला असे म्हणाली की, "माझ्या छकुल्या! मी तुला ब्रह्मासमोर आणून उभे केले आहे. येथे तू आणखी शिकशील. शेवटी तू ब्रह्मरूप होशील. तोपर्यंतच्या या मधल्या काळात मी तुझ्या पाठीशी उभी असेन आणि तुझ्या प्रगतीकडे लक्ष देईन."

त्याक्षणी एक विलक्षण प्रकार घडून आला. एखाद्या चलच्चित्रपटाचा चित्रखेचक एखाद्या नामांकित घटनांच्या मागे चित्रे घेत घेत दौडत असतो त्याप्रमाणे मागे मागे जाणारा माझा देहाभिमानी आत्मा वितळत व विरत चाललेला दिसला आणि त्या अर्भकामध्ये तो पुढे येऊन डोकावू लागला. त्यावेळी माझ्या असे लक्षात आले की, ते अर्भक म्हणजे दुसरे तिसरे कोणी नसून मीच आहे.

माझी ही समजूत पटते न पटते तोच ते अर्भक आवेशाने ओरडून म्हणाले, "माते! तू कोण आहेस हे आता मला समजले! दुर्लंघ्य पर्वतावर नागमोडी वळणावळणाने तुझे सहज चढत राहणे, मोठ्या कष्टाने पुढे गेलेल्या व रडतखडत चाललेल्या यात्रिकांना

किंवा साधकांना एकदम गाठून लीलेने मागे टाकणे आणि मला इतक्या हळूवार हाताने घेऊन येऊन या ज्ञानलिंगासमोर बसविणे या सर्व गोष्टींचा मला आता उलगडा झाला. आई! तू कुंडलिनी शक्ती आहेस. ज्ञानशक्ती आहेस. माझी तुझ्या चरणी अनन्यभावाने अशी प्रार्थना आहे की, माझे सारे अज्ञान वितळून जाऊ दे आणि आत्मानुभूतीच्या प्रांतात माझा प्रवेश होऊन दिव्य आंनदात मला विहार करू दे''

कुंडलिनी शक्तीचे खरे स्वरूप काय व ती कोणते कार्य करते याचा उलगडा या अनुभवावरून फारच चांगल्या रीतीने होतो. आता ह्या कुंडलिनी शक्तीचे शास्त्रीय स्वरूप काय आहे ते पाहू.

**चिच्छक्ती, पराशक्ती व शब्दब्रह्मात्मिका स्फूर्ती :-**

कुंडलिनी म्हणजे चिच्छक्ती, पराशक्ती व शब्दब्रह्मात्मिका स्फूर्तीच आहे. "**योगवासिष्ठातील**" निर्वाण प्रकरणाच्या पूर्वार्धातील ८० व्या सर्गात कुंडलिनी शक्तीचे विवेचन करताना श्रीवसिष्ठ महर्षी असे म्हणतात की, "शरीरात सुषुम्णा म्हणून एक नाडी आहे. ती सभोवार पसरलेल्या शाखांनी परिवेष्टित झालेली असल्यामुळे परिमंडलिताकार आहे. त्या शाखानाड्यांनी आतड्यांना वेढलेले असल्यामुळे आंत्रवेष्टनिका असे तिचे नाव आहे. तिने मर्मस्थानांचा आश्रय केला आहे. तिच्यापासून शंभर नाड्या निघाल्या आहेत. वीणादंडाच्या मूलभागी असलेला जो तारा जोडण्याचा आवर्त किंवा पाण्याचा भोवरा असतो त्यासारखी ही नाडी आहे. ॐकाराच्या शेवटच्या ऽ अशा अर्ध्या भागाच्या आकारा-सारखा तिचा आकार आहे. किंवा कुंडलाच्या आवर्तासारखी तिची रचना आहे. देव, असुर, मनुष्य, पशू, नक्र, पक्षी इत्यादिकात कीटकापासून ब्रह्मदेवापर्यंत सर्व प्राण्यांमध्ये ही उदय पावली आहे. थंडीने व्याकुळ होऊन पडलेल्या मोठ्या सर्पाच्या वेटोळ्याप्रमाणे तिने मंडल केले आहे. ती शुभ्र आहे. कल्पाग्नीने विरघळून जाणाऱ्या चंद्राप्रमाणे तिने आपला वलय आकार केला आहे. गुदापासून भ्रूमध्यापर्यंत जी रंध्रे आहेत त्यात अनुवृत

असलेली, मनोवृत्तीच्या योगाने आत अतिशय चंचल झालेली व बाहेर प्राणवायूच्या योगाने एकसारखी स्पंदन करणारी अशी ती सुषुम्णा नाडी आहे. तिच्या मुळाशी आत साडेतीन वलयांच्या आकाराची कुंडलिनी या नावाची चिच्छक्ती आहे. वीणेच्या मूलप्रदेशी तार जशी वेगाने झणत्कार करीत असते त्याप्रमाणे मूलाधारात अत्यंत सूक्ष्म अशी पराशक्ती स्फुरण पावते. तीच शब्दब्रह्मात्मिका स्फूर्ती आहे. तीच प्राणाच्या संगतीने नाभी, हृदय, कंठ या स्थानी उत्तरोत्तर अधिकाधिक व्यक्त होत जाऊन पश्यंती, मध्यमा, वैखरी इत्यादि भेदास प्राप्त होते.

केळीच्या गाभ्याप्रमाणे कोमल असलेल्या त्या मूलाधारातील ती पराशक्ती कुंडलिनी या नावाने प्रसिद्ध आहे; कारण ती कुंडलासारखा आकार धारण करते. ती प्राण्यांची परमशक्ती आहे. ती प्राण, इंद्रिये, बुद्धी इत्यादि सर्वांच्या शक्तींना सत्ता व स्फूर्ती देऊन त्यांची प्रवृत्ती करते. अतिशय रागावलेल्या नागिणीप्रमाणे ती एकसारखी आपल्या तोंडाने प्राणाला वर फेकते व अपानाला खाली ओढते. याप्रमाणे ती सदा निःश्वासरूप होऊन राहिली आहे. ज्यावेळी हृदयात स्थित असलेला प्राण कुंडलिनीने आकर्षण केला असता अपानवृत्तीने कुंडलिनीपदास प्राप्त होतो त्यावेळी अपंचीकृत पंचतन्मात्राच ज्याचे उपादान आहे अशा अंतःकरणात असलेली जीवसंविद् स्मरण, संकल्प, निश्चय, अभिमान, राग इत्यादि वृत्तिभेदांनी आत उदय पावते. कमलात जशी भ्रमरी त्याप्रमाणे कुंडलिनी देहात स्फुरण पावते."

**सर्व वृत्तींचे बीज :-**

"कुंडलिनी शक्ती सर्व वृत्तींचे बीज असल्याने प्राणामध्ये क्रियाशक्ती व बुद्धीमध्ये ज्ञानशक्ती उत्पन्न करते. नंतर देहात ज्याचा मृदुस्पर्श-विषयसंनिकर्ष आहे अशा चक्षुरादिकांचा उदय करून ती देहात जीवाच्या पूर्व कर्मानुसार जशी जशी सामग्रीवैचित्र्याने स्फुरण पावते तशी तशी त्या त्या इंद्रियांनी विशेष विषयाची स्फूर्ती व त्यांचा फलभोग इत्यादि आकाराची संवित् बनते. कुंडलिनी पुढीलप्रमाणे आकार धारण करते. मृदु चक्षुरादिकांच्या योगाने विषयस्पर्शन प्रथम उदय पावते. नंतर

वृत्तीच्या द्वारा बाहेर निघालेल्या प्रमात्याचा बाह्य विषयाशी संसर्ग होतो. त्यावेळी ती कुंडलिनी विषय व विषयी यांच्या दृष्टीने एकरस व एकरूप होते. वृत्तिव्याप्तीमुळे तिची व्याप्ती उदय पावते. त्या व्याप्तीने विषयावरणाचा भंग झाला असता जशीजशी अगदी स्पष्ट घटादि प्रभा उदय पावते त्या त्या प्रकाराने कुंडलिनी वेगाने स्फुरते. मूलाधारात स्थित असलेल्या तिच्यापासून चक्षुरादि इंद्रियांची प्रवृत्ती होण्यास हृदयकोशात असलेल्या नाड्या हे द्वार आहे. कारण त्या सर्व नाड्या तिच्याशी संबद्ध आहेत. त्या तिच्यापासून विस्तार पावतात. महासागरात जशा नद्या विलय पावतात त्याप्रमाणे तिच्यामध्ये सर्व नाड्या विलय पावतात. प्राणरूपाने ऊर्ध्वगमन करण्यास उत्सुक झालेल्या व अपानरूपाने अधोगमन करण्यास उत्सुक झालेल्या नाड्यांचा तिच्या योगाने विस्तार व संकोच होतो. ती एक कुंडलिनीच सर्व वृत्तींचे बीज आहे. तिला "सामानी" म्हणजे सर्वांना साधारण असलेली असे म्हटले आहे." **(श्रीयोगवासिष्ठ- निर्वाण प्रकरण-पूर्वार्ध-सर्ग ८०)**

**चैतन्याचा निरनिराळा आविर्भाव :-**

"कल्पाच्या आरंभापासून कल्पाच्या अंतापर्यंत एकच अपरिच्छिन्न असे चैतन्य अस्तित्वात असते. परंतु हे चैतन्य मूलाधारात परिच्छिन्न, परिमित होऊन कुंडलिनी या नावाने राहते. हे कसे घडते हा खरा प्रश्न आहे. खरे पाहिले असता सर्वत्र, सर्वदा व सर्वरूपाने चित्संविदच विद्यमान आहे. परंतु भूततन्मात्रांच्या योगाने कुंडलिनीचा उदय होतो. ती संविद् सर्वत्र विद्यमान जरी असली तरी ती देहामध्ये बुद्धीने अवच्छेद व प्रतिबिंब यांच्या योगाने द्विगुणित होऊन प्रवेश केल्यामुळे विस्तार पावते. अर्थात् बुद्धिचांचल्यामुळे जलातील चंद्राप्रमाणे ती चंचल होते. सूर्याचे ऊन सर्व आकाशाला व्यापीत असले तरी ते भिंत, डोंगर, झाडे, घरे इत्यादिकांवरच व्यक्त होते. अर्थात् उपाधीच्या योग्यतेप्रमाणे व्यापक वस्तूची न्यूनाधिक अभिव्यक्ती होते. चिद्वस्तू माती, दगड इत्यादिकात व्यक्त होत नाही तर त्यातील जाड्यामुळे तिचा अभिभव होतो. त्यामुळे त्या जड पदार्थात तापलेल्या पाण्यातील शीतत्वाप्रमाणे

चित्त दिसत नाही. पण ती देव-मनुष्यादि लिंग शरीरात स्पष्ट अभिव्यक्त होते. ती वृक्षादिकांच्या लिंगात अगदी गुप्त अशी असते. ती बाहेर व्यक्त होत नाही. पण आतल्या आत अनुभव घेते. मात्र चिदंशामध्ये हा तारतम्यभाव जसा दिसतो तसा सत्ता या अंशी दिसत नाही. तर त्या सर्व उपाधीत सत्ता त्या त्या रूपाने व्यक्त झालेली दिसते." **(श्रीयोगवासिष्ठ-निर्वाण प्रकरण-पूर्वार्ध-सर्ग ८०)**

**प्राणपंचकरूपाने स्फुरणारी अत्युत्तम जीवशक्ती :-**

"मनुष्याच्या स्थूलदेहरूप पंचकाच्या आत मूलाधारामध्ये कुंडलिनीत या लिंगात्मक पंचकाचे बीज म्हणजे उपादानरूप सूक्ष्मभूत प्रथम प्राणपंचकरूपाने सर्वदा स्फुरण पावते. ती प्राणरूपाने आत स्फुरण पावलेली कुंडलिनी वायुधर्माने व स्वधर्माने स्पंद, स्पर्श व संविद् अशी त्रिरूप शुद्ध कल्पना बनते. तिला कल्पनेमुळे कला, चेतनेमुळे चित्, जीवनामुळे जीव व मननामुळे मन असे म्हणतात. संकल्पामुळे ती संकल्परूप झाली आहे. बोधामुळे बुद्धी झाली आहे. "अहं" अशा अभिमानामुळे अहंकार झाली आहे. ती पुर्यष्टक या नावाची आहे. ही कुंडलिनीच देहात अत्युत्तम जीवशक्ती होऊन राहिली आहे. ती अपानत्वास प्राप्त होऊन सतत अधोभागी वाहते. समानरूप होऊन नाभीमध्ये स्थित होते. उदान नावाने ती ऊर्ध्वभागी स्थित आहे. तिला खाली अपानवृत्ती व वर उदानवृत्ती जरी ओढीत असल्या तरी ती स्वतः निश्चलच राहते आणि मधल्या समानवृत्तीने घट्ट धरून ठेवल्यामुळेच ऊर्ध्ववृत्ती जरी अत्यंत बलाढ्य असली तरी ती उदानरूपच बनून स्वस्थ राहते. लिंग शरीराला बाहेर घालवीत नाही." **(श्रीयोगवासिष्ठ-निर्वाण प्रकरण-पूर्वार्ध-सर्ग ८१)**

**कुंडलिनी म्हणजे लक्ष्मी व स्पंदधर्मिणी :-**

"मूलाधारात कुंडलिनी राहते. ती सर्व शरीरेंद्रिय समुदायाला प्राण देणारी असल्यामुळे लक्ष्मी आहे. जप करताना फिरविल्या जाणाऱ्या रुद्राक्षादि फळांच्या माळेप्रमाणे ती प्राण व अपान यांच्या ऊर्ध्व व अधोगतीने कंपित होऊन अव्यक्त शब्द उत्पन्न करते. ती दंडाचा प्रहार

केलेल्या नागिणीप्रमाणे ऊर्ध्वमुख होऊन उलटणारी आहे. स्वर्ग व पृथ्वी या दोन लोकांमध्ये प्राण्यांची ऊर्ध्वगती व अधोगती होण्यास विहित व निषिद्ध क्रिया जशी कारण होते, त्याप्रमाणे ती प्राण व अपान यांच्या ऊर्ध्व व अधोगमनास कारण होते. त्यामुळे ती स्पंदधर्मिणी आहे. ती चक्षुरादि इंद्रियाच्या द्वारा होणारा जो रूपादि विषयांचा अनुभव, त्याचा विकास करविणारी आहे अर्थात् कमलांचा विकास करणाऱ्या सूर्यासारखी ती स्थित आहे." **(श्रीयोगवासिष्ठ-निर्वाण प्रकरण-पूर्वार्ध-सर्ग ८१)**

**प्रणवादि सर्व मंत्रांची निर्माती :-**

प्राणशक्तिस्वरूप मूलाधारस्थ कुंडलिनीपासूनच प्रणवादि सर्व मंत्रांची उत्पत्ती होते. "**प्रपंचसारतंत्रामध्ये**" प्रकृतीचे वर्णन करताना श्रीमदाद्यशंकराचार्य यांनी असे म्हटले आहे की -

**प्रकृतिः निश्चला परावाग्रूपिणी परप्रणवात्मिका कुण्डलिनी शक्तिः।**

याचा अर्थ असा आहे की, प्रकृती ही अत्यंत निश्चल आहे. परावाणी हे तिचे स्वरूप आहे. पर-प्रणवाची उत्पत्ती तिच्यापासून होत असल्याने ही प्रकृती श्रेष्ठ स्वरूपाच्या ॐकारमंत्राशी एकरूप झालेली कुंडलिनी शक्तीच आहे.

गायत्री मंत्राची उत्पत्ती कुंडलिनीपासून होते हे सांगतांना "**योगचूडामणी उपनिषदात**" असे म्हटले आहे की-

**कुण्डलिन्यां समुद्भूता गायत्री प्राणधारिणी।**
**प्राणविद्या महाविद्या यस्तां वेत्ति स वेदवित्।।३५।।**

कुंडलिनी ही प्राणशक्तियुक्त अशा गायत्रीचे उत्पत्तिस्थान आहे. प्राणविद्यारूपाने ज्या गायत्रीची उपासना केली जाते ती खरोखर कुंडलिनीच्या रूपाने साकार झालेली महाविद्याच आहे. जो या महाविद्येला जाणतो तोच खरे वेदविद्येचे रहस्य जाणतो.

"**सा देवी वायवी शक्तिः।**" अर्थात् ती कुंडलिनी देवी ही वायवी म्हणजे प्राणशक्ती आहे असे "**रुद्रयामलतंत्रात**" म्हटले आहे. प्राणशक्ती म्हणजे जीवाची जीवनीशक्तीच होय. या शक्तीपासूनच "अ"कारापासून

"क्ष"कारापर्यंत सर्व अक्षरांची आणि अक्षरयुक्त मंत्रांची शक्तीसह उत्पत्ती होते, असे "**योगशिखोपनिषदाच्या**" तिसऱ्या अध्यायात सांगितले आहे.

**अक्षरं परमो नादः शब्दब्रह्मेति कथ्यते।**
**मूलाधारगता शक्तिः स्वाधारा बिन्दुरूपिणी।।२।।**
**तस्यामुत्पद्यते नादः सूक्ष्मबीजादिवाङ्कुरः।**
**तां पश्यन्तीं विदुर्विश्वं यया पश्यन्ति योगिनः।।३।।**
**हृदये व्यज्ञते घोषो गर्जत्पर्ज्यन्यसन्निभः।**
**तत्र स्थिता सुरेशान मध्यमेत्यभिधीयते।।४।।**
**प्राणेन च स्वराख्येन प्रथिता वैखरी पुनः।**
**शाखापल्लवरूपेण ताल्वादिस्थानघट्टनात्।।५।।**
**अकारादिक्षकारान्तान्यक्षराणि समीरयेत्।**
**अक्षरेभ्यः पदानि स्युः पदेभ्यो वाक्यसम्भवः।।६।।**
**सर्वे वाक्यात्मका मन्त्रा वेदशास्त्राणि कृत्स्नशः।**
**पुराणानि च काव्यानि भाषाश्च विविधा अपि।।७।।**
**सप्तस्वराश्च गाथाश्च सर्वे नादसमुद्भवाः।**
**एषा सरस्वती देवी सर्वभूतगुहाश्रया।।८।।**

अनाहत हा अक्षर म्हणजे कधीही क्षरण न पावणारा परमश्रेष्ठ असा ध्वनी आहे. या अनाहतनादालाच शब्दब्रह्म असे म्हणतात. मूलाधारात दुसऱ्या कोणाचाही आधार नसलेली व स्व म्हणजे फक्त आत्म्याचाच आधार असलेली बिंदुरूपाने राहणारी कुंडलिनी नावाची शक्ती आहे. या कुंडलिनीच्या आधारानेच जीवात्मा राहत असतो. सूक्ष्म बीजापासून ज्याप्रमाणे अंकुराची उत्पत्ती होते त्याप्रमाणे कुंडलिनीच्या रूपाने राहणाऱ्या या सूक्ष्म अशा प्राणशक्तीतून नादाची उत्पत्ती होते. योगी लोक या नादाच्या द्वाराच नादाच्या विश्वरूप अवस्थेचे दर्शन घेतात. नादाच्या या अवस्थेचे नाव पश्यंती असे आहे. मेघासारखा गर्जना करणारा जो नाद हृदयात व्यक्त होतो त्या नादाला हे विधात्या! मध्यमा असे म्हणतात. प्राणवायूमुळे कंठातून

जो स्वर, आवाज किंवा शब्द ध्वनीच्या रूपाने बाहेर येतो त्याला वैखरी अशी संज्ञा आहे. शाखा व पर्णपुष्पादिकांमुळे वृक्ष जसा फोफावतो त्याप्रमाणे तालुदंतादि संबंधामुळेही वैखरी वाणी विस्तारलेली दिसते. "अ" पासून "क्ष" पर्यंतच्या ध्वनीला अक्षरे म्हणतात. अक्षरांपासून पदे व पदांपासून वाक्ये होतात. सर्व मंत्र, वेद, शास्त्र, पुराणे, काव्ये, नाना प्रकारच्या भाषा, सप्तस्वर, कथा वगैरे सर्व या नादापासून उत्पन्न झाल्या आहेत. सर्व प्राण्यांच्या हृदयरूप गुहेमध्ये वास करणारी ही देवी साक्षात् सरस्वतीच आहे.

जाग्रत (स्थूल), स्वप्न (सूक्ष्म), सुषुप्ती (कारण) व तुरीय ह्या आत्म्याच्या चार अवस्था आहेत. त्याचप्रमाणे नादाच्याही चार अवस्था आहेत. परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी अशी त्यांची नावे आहेत. मूलाधारात बिंदुरूपाने पराशक्ती कुंडलिनी असते. तिलाच "परा" असे म्हटले जाते. ही परा नादाची तुरीयावस्था आहे. याच्यापुढे नाद जेव्हा स्वाधिष्ठानामध्ये उपस्थित होतो तेव्हा त्याची जी अवस्था होते त्याला "पश्यंती" असे म्हणतात. ही पश्यंती नादाची सुषुप्ती किंवा कारणावस्था आहे. जेव्हा हा नाद हृदयापर्यंत पोहोचतो तेव्हा त्याला "मध्यमा" असे म्हणतात. ही नादाची स्वप्न किंवा सूक्ष्मावस्था होय. शेवटी नाद जेव्हा कंठात पोहोचतो तेव्हा त्याचा शब्दरूपाने स्पष्ट उच्चार होतो. यावेळी त्याला "वैखरी" असे म्हणतात. वैखरी ही नादाची जाग्रत किंवा स्थूलावस्था आहे. मध्यमा नादाला अनाहतनाद असेही म्हटले जाते. याचे कारण असे आहे की, हृदयप्रदेशामध्ये कोणत्याही आघाताशिवाय हा नाद स्वतःच प्रकट होत असतो. नादाच्या परा व पश्यंती या दोन अवस्था योग्यांनाच अनुभवावयास मिळतात. जे योगमार्गात पुढे जातात त्यांना मध्यमा अवस्थेचे अनुभव येत असतात. म्हणजे अनाहत ध्वनी ऐकावयास मिळतो.

**दोन मुखांनी युक्त :-**

सर्पाला जशी दोन तोंडे असतात त्याप्रमाणे कुंडलिनीला अंतर्मुख व बहिर्मुख अशी दोन मुखे आहेत.

**द्विवक्त्रा कुंडलिन्यभिधा नित्यानन्दस्वरूपा**
**परमा कला प्रकृति वर्तते।**

कुंडलिनी नावाची नित्यानंद स्वरूपाची परमप्रकृती आहे. तिला दोन मुखे आहेत. ती एका मुखाने म्हणजे एका बाजूने ब्रह्मद्वार किंवा ब्रह्मविवराला अडवून निद्रा घेते. दुसऱ्या मुखाने ती श्वास-प्रश्वास करते. हाच जीवाचा श्वासोच्छ्वास होय. या मुखाने ही कुंडलिनी शक्ती नेहमी जागृत असते. या जागृतीमुळेच जीवाला बाह्यज्ञान किंवा चेतना चांगल्या रीतीने होते. कुंडलिनीच्या या बहिर्मुख गतीमुळेच एकत्वाची जाणीव न होता जीवाला भिन्नतेची जाणीव होते. कुंडलिनी शक्तीचे अंतर्मुख सुप्त किंवा बद्ध असल्यामुळे जीवाला आपण खरोखरी कोण आहोत हे कळत नाही. त्याच्या ठिकाणी अंतर्ज्ञान, आत्मज्ञान किंवा ब्रह्मज्ञान याचा कायम अभाव असतो. श्रीस्वात्मारामयोगींद्र यांनी "**हठयोगप्रदीपिकेमध्ये**" याबद्दल असे म्हटले आहे की-

**येन मार्गेण गन्तव्यं ब्रह्मस्थानं निरामयम्।**
**मुखेनाच्छाद्य तद्द्वारं प्रसुप्ता परमेश्वरी।।३-१०६।।**

साधक सुषुम्णामार्गाने गेला म्हणजे निरामय अशा ब्रह्मस्थानी जाऊन पोहोचतो व आत्मसाक्षात्कार करून घेतो. या सुषुम्णेच्या शिखेकडील टोकामध्ये परमात्मा असतो असे श्रुतीतही म्हटले आहे. "**तस्याः शिखाया मध्ये परमात्मा व्यवस्थितः।। महानारायणोपनिषद् ।।२१.१३।।**" असे वेदांनीच म्हटले आहे. या सुषुम्णानाडीच्या मुखापाशीच म्हणजे ब्रह्मद्वारापाशीच ते द्वार अडवून ही परमेश्वरी शक्ती कुंडलिनी निद्रा घेत असते.

**सूर्यासारखी व विजेसारखी तेजस्वी :-**

"**अद्वयतारकोपनिषदात**" कुंडलिनीचे वर्णन करताना ऋषींनी असे म्हटले आहे की, "**देहमध्ये ब्रह्मनाडी सुषुम्णा सूर्यरूपिणी पूर्णचन्द्रभा वर्तते। सा तु मूलादारभ्य ब्रह्मरन्ध्रगामिनी भवति। तन्मध्ये तडित्कोटिसमानकान्त्या मृणालसूत्रवत् सूक्ष्माङ्गी कुण्डलिनीति प्रसिद्धास्ति। तां दृष्ट्वा मनसैव नरः सर्वपापविनाशद्वारा मुक्तो भवति।।५।।**"

देहामध्ये सूर्यासारखी तेजस्वी रूप असलेली व पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणे शीतल असलेली सुषुम्णा नावाची ब्रह्मनाडी आहे. तिचा आरंभ मूलाधारापासून होऊन ती ब्रह्मरंध्रापर्यंत जाते. या नाडीमध्ये कोटी कोटी विजेप्रमाणे तेजस्वी व कमलांच्या तंतूप्रमाणे सूक्ष्म असलेली कुंडलिनी नावाची प्रसिद्ध अशी शक्ती वास करते. मनाने या शक्तीचे दर्शन घेतले असता मनुष्य सर्व पापांपासून सुटून मुक्त होतो.

**"महानारायण उपनिषदामध्ये"** कुंडलिनीचे पुढीलप्रमाणे फारच सुंदर वर्णन आले आहे.

**तस्य मध्ये वह्निशिखा अणीयोर्ध्वा व्यवस्थिता।।११.११।।**
**नीलतोयमध्यस्था विद्युल्लेखेव भासुरा।**
**निवारशूकवत्तन्वी पीताभा स्यात्यनूपमा।।११.१२।।**

ही कुंडलिनी शक्ती दोन ढगांमध्ये प्रकट होणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणे तेजस्वी आहे. विजेपेक्षाही ही शक्ती अत्यंत बलवान् अशी आहे. तिचे कार्य खनिज, वनस्पती, पशू, पक्षी, इत्यादिकांमध्येही थोडे थोडे दिसून येते.

**आधारशक्ती :-**

एका कुंडलिनीचे ज्ञान झाले की, ब्रह्मांडातील यच्चयावत् तत्त्वांचे ज्ञान होते. योगशास्त्राच्या दृष्टीने कुंडलिनी, मन, प्राण, नाद व बिंदू या पाच विषयांमुळे सर्व पिंड-ब्रह्मांडाच्या तत्त्वांचा उलगडा स्पष्ट रीतीने होतो. शेवटचे चार विषय कुंडलिनीच्या अधीन असल्यामुळे तिच्या संबंधी ज्ञान झाले की, साधक कृतकृत्य होतो. हे ज्ञान होणे याचा अर्थच ती श्रीगुरुकृपेने जागृत होणे होय. **"हठयोगप्रदीपिकेमध्ये"** या अर्थानेच असे म्हटले आहे की-

**सशैलवनधात्रीणां यथाधारोऽहिनायकः।**
**सर्वेषां योगतन्त्राणां तथाधारो हि कुण्डली।।३.१।।**

वन, पर्वत, नदी, सरोवर आणि समुद्रासहित सर्व पृथ्वीचा शेषनाग म्हणजे ब्रह्माची शक्ती हीच आधार आहे. त्याप्रमाणेच सर्व योगाचा व सर्व तंत्रांचा आधार कुंडलिनी शक्तीच आहे.

**"योगशिखोपनिषदाच्या"** सहाव्या अध्यायात या आधाररूप कुंडलिनी शक्तीचा महिमा पुढीलप्रमाणे वर्णन केला आहे.

**आधाराज्जायते विश्वं विश्वं तत्रेव लियते।।२२।।**
**तस्मात् सर्वप्रयत्नेन गुरुपादं समाश्रयेत्।।२३।।**
**आधारं यो विजानाति तमसः परमश्नुते।।२४।।**
**तस्य विज्ञानमात्रेण नरः पापैः प्रमुच्यते।।२५।।**
**आधारचक्रमहसा विद्युत्पुञ्जसमप्रभा।**
**तदा मुक्तिर्न सन्देहो यदि तुष्टः स्वयं गुरुः।।२६।।**
**केचिद्वदन्ति चाधारं सुषुम्णा च सरस्वती।।२२।।**
**महामाया महालक्ष्मीर्महादेवी सरस्वती।**
**आधारशक्तिरव्यक्ता यया विश्वं प्रवर्तते।।११-२।।**

या आधारशक्तीच्या सामर्थ्यानेच सर्व विश्व उत्पन्न होते व तेथेच ते लीन होते. हे सर्वविषयक ज्ञान होण्यासाठी सर्वप्रयत्नाने श्रीगुरुचरणांची सेवा करून श्रीगुरुकृपेचा आश्रय प्राप्त केला पाहिजे. आधारशक्ती झोपली की, सर्व विश्वही निद्राधीन होते. ती जागृत झाली की, त्रैलोक्य जागे होते. जो या आधारशक्तीला विशेष रूपाने जाणतो तो अज्ञानरूपी अंधकाराच्या पलीकडे जाऊन ज्योतिर्मय चिदात्म्याला जाणून ज्ञानवान् होऊन परमसुखी व कृतार्थ होतो. केवळ आधार-शक्तीच्या ज्ञानाने मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. मूलाधारकमलात राहणाऱ्या विद्युल्लतेच्या पुंजाप्रमाणे तेजस्वी असलेल्या प्रकाशमान् अशा आत्मशक्तीच्या केवळ ज्ञानाने अगर अवलोकनाने मोक्ष निःसंशय मिळतो. जर श्रीगुरू संतुष्ट झाले तर मुक्तीबाबत कसलाही संदेह बाळगण्याचे कारण नाही. हिलाच कोणी आधार, कोणी सुषुम्णा, कोणी कुंडलिनी, कोणी सरस्वती किंवा आधारशक्ती असे म्हणतात. हीच महामाया, महालक्ष्मी, महादेवी, सरस्वती किंवा अव्यक्त आधारशक्ती आहे. या शक्तीमुळेच मन, प्राण, शरीर इत्यादींच्या क्रिया होत असतात. इतकेच काय सर्व विश्व या शक्तीमुळे प्रवृत्त झालेले दिसते.

इतका महिमा सांगून झाल्यावर "**योगशिखोपनिषदात**" पुढे असे सांगितले आहे की -

**आधारशक्तिनिद्रायां विश्वं भवति निद्रया।।६.२३।।**
**तस्यां शक्तिप्रबोधेन त्रैलोक्यं प्रतिबुध्यते।।२३-१/२।।**
**सृष्टिधारमाधारमाधारे सर्वदेवताः।।**
**आधारे सर्ववेदाश्च तस्मादाधारमाश्रयेत्।।२९।।**
**आधारे पश्चिमे भागे त्रिवेणी सङ्गमो भवेत्।**
**तत्र स्नात्वा च पीत्वा च नरः पापात् प्रमुच्यते।।३०।।**
**आधारे पश्चिमं लिङ्गं कवाटं तत्र विद्यते।**
**तस्योद्घाटनमात्रेण मुच्यते भवबन्धनात्।।३१।।**

आधार म्हणजे कुंडलिनी शक्ती झोपली की, सर्व विश्वही निद्राधीन होते. ज्यावेळी ती जागृत होते त्यावेळी त्रैलोक्य जागे होते. ही शक्ती मूलाधारात निवास करते. तिच्या अस्तित्वामुळेच सृष्टीचा आधार मूलाधार आहे. या आधाराच्या म्हणजे शक्तीच्या ठिकाणीच सर्व देवता राहतात. या आधाराच्या पश्चिम भागात इडा, पिंगला व सुषुम्णा यांचा संगम होतो. ज्यावेळी श्रीगुरुकृपेने शक्ती जागृत होते त्यावेळी मन व प्राण एकत्र होऊन साधकाला दिव्य स्नान व पान घडते. असे घडले म्हणजे साधक सर्व पापांपासून मुक्त होतो. आधाराच्या पश्चिमभागामध्ये स्वयंभू लिंग असून तेथेच सुषुम्णेचा प्रवेशमार्ग म्हणजे ब्रह्मद्वार आहे. हा मार्ग जेव्हा मोकळा होतो तेव्हा साधक सर्व प्रकारच्या संसारबंधनातून विमुक्त होतो.

**चैतन्याची परमप्रेमरूपशक्ती :-**

वस्तूची शक्ती वस्तूशी समव्याप्त असते. पण ज्याप्रमाणे जलाशयातील पाणी वाहू लागले असताना मर्यादित होते त्याप्रमाणे वस्तूची शक्तीही कार्यरूप होताना मर्यादित होते. तशीच जीवाची शक्ती जेव्हां कार्यरूप होते तेव्हा ती मर्यादित होते. वाहणारे पाणी मर्यादित होण्याचे कारण जसा जमिनीचा बांध असतो त्याप्रमाणे जीवाची शक्ती सूक्ष्म नाड्यांमधून वाहत असल्यामुळे मर्यादित होते.

या नाड्या मांसमय नसल्यामुळे मन ज्याप्रमाणे शस्त्राने तुटत नाही त्याप्रमाणे या नाड्या शस्त्राने तुटत नाहीत व अग्नीने जळतही नाहीत. प्रेत जाळल्यावरही त्या जळत नाहीत. या नाड्यांच्या योगाने जीव सर्व लोकात गमनागमन करीत असतो. या नाड्यांची साडेतीन वेढ्यांची जी गुंडाळी आहे तिला कुंडलिनी म्हणतात. ही कुंडलिनी केवळ योगाभ्यासानेच दृश्य होणारी आहे. या भगवच्छक्ती कुंडलिनीचे साडेतीन वेढे आहेत. ॐकाराच्या अ, उ, म व अर्धमात्रा अशा साडेतीन मात्रांच्या मूळ स्थितीप्रमाणे आहेत. ॐकार मूळस्थितीत कुंडलिनी शक्तीशी एकरूप असतो. शक्ती ही परमेश्वराप्रमाणे शुद्ध चैतन्यरूपच आहे. पण "मी" या वृत्तिरूपाने स्फुरण पावून अज्ञानभ्रमाने ती आपले चैतन्यस्वरूप विसरली म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे **"तैसी अज्ञानांगीकारें। निघाली वृत्ति विखुरे। ते सत्त्वरजद्वारें। तमही होये।। (श्रीज्ञानेश्वरी अ.१४-१४४)"** त्रिगुणात्मक होते. सत्त्वगुणाने ती शक्ती प्रकाशरूप असते, रजोगुणाने क्रियारूप होते व तमोगुणाने जड पदार्थरूप होते. अशा या शक्तीपासून शब्दद्वारा स्थूल, सूक्ष्म व कारणरूप सृष्टी उत्पन्न होते. कुंडलिनी निजलेली असते म्हणजे आपले चैतन्यस्वरूपाशी असलेले ऐक्य विसरलेली असते. अधोमुख असते म्हणजे सृष्टीचे कारण जो परमात्मा त्याला विसरून नामरूपात्मक कार्यरूप सृष्टीच्या अभिमुख असते. सारांश, शक्ती अधोमुख असते तेव्हा जगत् प्रसवते व ऊर्ध्वमुख झाली असता जगाचा नाश करून ब्रह्मरूप होते.

शक्ती जागी झाली म्हणजे ती तेजोमय होते. अशी ही परमप्रेमरूप चैतन्याची शक्ती परमप्रेमरूपच असते. चैतन्याच्या ठिकाणी तिच्याशी ऐक्य पावण्याची प्रेमोत्कंठा व शक्तीच्या ठिकाणी आपल्या स्वरूपभूत चैतन्याशी ऐक्य पावण्याची प्रेमोत्कंठा साहजिकच असते. जेव्हा श्रीगुरुकृपेने शक्तिपात होतो तेव्हा शक्ती जागृत होऊन जो श्रीशिवाला मिळविण्यासाठी विलास होतो त्यालाच रासलीला म्हटले जाते व ती श्रीराधाकृष्णांच्या रूपाने साकारलेली दिसते.

**सार्वभौम चैतन्याचे ऐश्वर्य व जीवाची सावली :-**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीच्या**" सहाव्या अध्यायात कुंडलिनीचे अपूर्व वर्णन केले आहे. ते तेथे असे म्हणतात की-

**नागिणीचें पिलें। कुंकुमें नाहलें।**
**वळण घेऊन आलें। सेजे जैसें।।६-२२२।।**
**तैशी ते कुंडलिनी। मोटकी औट वळणी।**
**अधोमुख सर्पिणी। निदेली असे।।२२३।।**
**विद्युल्लतेची विडी। वह्नीज्वाळांची घडी।**
**पंधरेयाची चोखडी। घोटीव जैसी।।२२४।।**
**ते कुंडलिनी जगदंबा। जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा।**
**जया विश्वबीजाचिया कोंभा। साउली केली।।२७२।।**
**जे शून्य लिंगाची पिंडी। जे परमात्मया शिवाची करंडी।**
**जे प्रणवाची उघडी। जन्मभूमी।।२७३।।**
**हें असो ते कुंडलिनी बाळी। हृदयाआंतु आली।**
**तंव अनाहताची बोली। चावळे ते।।२७४।।**
**तया हृदयाच्या परिवरीं। कुंडलिनिया परमेश्वरी।**
**तेजाची शिदोरी। विनियोगिली।।२८१।।**
**बुद्धीचेनि शाकें। हातबोनें निकें।**
**द्वैत तेथ न देखे। तैसें केलें।।२८२।।**
**निजकांती हारविली। मग प्राणुचि केवळ जाहाली।**
**ते वेळीं कैसी गमली। म्हणावी पां?।।२८३।।**
**हो कां जे पवनाची पुतळी। पांघुरली होती सोनसळी।**
**ते फेडूनियां वेगळी। ठेविली तिया।।२८४।।**
**ना तरी वायूचेनि आंगें झगटली। दीपाची दिठी निवटली।**
**का लखलखोनि हारपली। वीजु गगनीं।।२८५।।**
**तैसी हृदयकमळवेऱ्हीं। दिसे जैसी सोनियाची सरी।**
**ना तरी प्रकाशजळाची झरी। वाहत आली।।२८६।।**
**मग ते हृदयभूमी पोकळे। जिराली कां एके वेळे।**

**तैसें शक्तीचें रूप मावळे। शक्तीचिमाजीं।।२८७।।**

**तेव्हां तरी शक्तीचि म्हणिजे। येऱ्हवी तो प्राणु केवळ जाणिजे।**

**आता नादुबिंदु नेणिजे। कळाज्योती।।२८८।।**

कुंकवाने किंवा केशराने न्हालेले नागीणसर्पाचे पिलू वेटोळे घालून निजलेले असावे त्याप्रमाणे मूलाधारात ती लहानशी सर्पासारखी कुंडलिनी साडेतीन वेढे घालून खाली तोंड करून निजलेली असते. ती विजेच्या कंकणाप्रमाणे किंवा अग्निज्वालेच्या घडीप्रमाणे अथवा घोटून चकचकीत केलेल्या सोन्याच्या वेढ्याप्रमाणे नाभिस्कंदात नीट घट्ट व संकोचून साडेतीन पुटात दाटून बसलेली असते. ती कुंडलिनी जगदंबा आहे. जगाची माता आहे. सार्वभौम चैतन्याची ती ऐश्वर्यरूप शोभा आहे. ती जगद्बीजाचा अंकुर जो जीव त्याच्यावर सावली धरते. ती निराकार ब्रह्माची साकार मूर्ती, परमात्मा शिवाची संबळी व ॐकाराची जन्मभूमीच आहे. असो. ही कुंडलिनी बाला हृदयाच्या ठिकाणी आली म्हणजे अनाहतनाद साधकाला ऐकू येऊ लागतो.

कुंडलिनी शक्ती जेव्हा हृदयापाशी येते तेव्हा ती आपल्या तेजाची शिदोरी चैतन्याला अर्पण करते म्हणजे ती हृदयस्थ प्राणरूप आत्म्याशी आपल्या तेजासकट एकरूप होते. अर्थात् कुंडलिनी आपली तेजरूप कांती टाकून जेव्हा प्राणवायुरूप होऊन राहते त्यावेळी तिचे स्वरूप पुढीलप्रमाणे दिसून येते. एखाद्या वायूच्या केलेल्या बाहुलीला सोन्याचा पितांबर पांघरावा व तो सोडून मग तिला वेगळे करून ठेवावे त्याप्रमाणे ती दिसते. वाऱ्याची झुळुक लागून दिव्याची ज्योत विझली जावी किंवा वीज चमकून एकदम आकाशात नाहीशी व्हावी त्याप्रमाणे हृदयकमळापर्यंत जाऊन ती सोन्याच्या सरीसारखी किंवा प्रकाशरूप पाण्याच्या तेजाचा झरा वाहत आल्याप्रमाणे दिसते. तो शक्तिरूप तेजाचा झरा हृदयरूपी भूमीच्या पोकळीत एकदम जिरतो व शक्तीचे रूप शक्तीतच मावळते. शिवाशी एकरूप झाल्याने ती प्राणरूपानेच जाणली जाते. त्या अवस्थेत नाद, बिंदू, कला व ज्योती हे प्रकार किंवा भेद त्या समरसतेच्या अवस्थेत शिल्लक राहत नाहीत.

★★★★★

# - आधार नववा -

# शक्तिपातयोगाची दिव्य व अलौकिक वैदिक परंपरा

**शक्तिपाताने स्वसुखधनप्राप्ती**

**२३) श्रीशिवाजीमहाराजांना शक्तिपातयोगदीक्षेने श्रीसमर्थांकडून आत्मारामप्राप्ती**

**२४) श्रीरघुनाथस्वामींकडून श्रीआनंदमूर्ती ब्रह्मनाळकरांना शक्तिपाताने अद्वयस्थिती**

**२५) श्रीतुकामाईकडून श्रीगोंदवलेकरमहाराजांना शक्तिपाताने ब्रह्मचैतन्यप्राप्ती**

**२६) श्रीनारायणतीर्थदेवांना श्रीगंगाधरतीर्थांकडून सिद्धयोगदीक्षा**

**२७) श्रीनारायणतीर्थांकडून श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थांना शक्तिसंक्रमण**

**२८) श्रीगुळवणीमहाराजांना प.प. श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराजांकडून स्वप्न व प्रत्यक्ष दीक्षा**

भारताच्या अध्यात्मिक संस्कृतीची जी अनेक वैशिष्ट्ये आहेत त्यात शक्तिपातयोगाचे स्थान अनुपमेय आहे; कारण अध्यात्माच्या वाटचालीत सर्व मार्गांचे मूर्धन्यस्थान या मार्गाला लाभले आहे. या अपूर्वतेमुळेच श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी या मार्गाला पंथराज असे म्हटले आहे. दिव्य अशा परमेश्वरी-शांभवी-शक्तीचा ब्रह्मप्राप्तीसाठी शिष्यावर केलेला अनुग्रह म्हणजे शक्तिपात होय. भगवत्स्वरूप श्रीगुरूंच्या अनुग्रहाशिवाय म्हणजेच शक्तिपात होऊन कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय अध्यात्मजीवनाची खरी वाटचाल सुरू होऊ शकत नाही. सुप्त भगवच्छक्ती जोपर्यंत पूर्णपणे जागृत होत नाही तोपर्यंत मनुष्यजीवनाचे खरे सार्थकही होत नाही. याकरिता वेदकाला-पासून तो आजपर्यंत अवतारी पुरुष, ऋषी, मुनी, संत, महंत इत्यादि सर्वांनी या मार्गाची कास धरलेली दिसून येते. या सर्वांनी आपल्याला परंपरेने प्राप्त झालेल्या या विद्येचा साधकांवर अनुग्रह करून त्यांना परमेश्वर प्राप्तीसाठी मार्गस्थ केले. परंपरा व पद्धत कोणतीही असली तरी साधकात शक्तिसंक्रमण घडून येणे हे खरे मूळ तत्त्व होय. भक्ती, कर्म, उपासना, जप, तप, नेम, यंत्र, मंत्र, तंत्र, ज्ञान इत्यादि मूळ तत्त्वाचा तपशील होय. तपशीलात न शिरता शक्तिपातयोगाचा प्रवाह युगानुयुगे

कशा रीतीने वाहत आला व त्याने देव, ऋषी, मुनी, संत, महंत, साधू, तापसी, संन्यासी व शेकडोशे साधकांना कसे धन्य केले हे पाहिले म्हणजे भारताच्या अध्यात्मिक संपन्नतेची कल्पना येऊन मन कृतार्थ होते. शक्तिपातयोगाच्या दिव्य व अलौकिक परंपरेचा इतिहास पाहिला म्हणजे आपणही या प्रवाहात स्नान करून धन्य व्हावे अशी इच्छा झाल्यास नवल नाही. तशी इच्छा व्हावी हाच या पुस्तकाचा खरा हेतू आहे.

**१. वेदातील शक्तीचे माहात्म्य व दीक्षेने मुक्तता :-**

**सदाकारा परानन्दा संसारोच्छेदकारिणी।**
**सा शिवा परमादेवी शिवाभिन्ना शिवङ्करी**
**(सूतसंहिता-यज्ञवैभव खंड-अध्याय १३/३)**

अशा शक्तीचे माहात्म्य ब्रह्मप्राप्तीच्या मार्गात फार मोठे आहे. "**अथर्ववेदाच्या**" १० व्या कांडातील ८ व्या सूक्तात ऋषी असे म्हणतात की -

**एषा सनत्नी सनमेव जातैषा पुराणी परि सर्वं बभूव।**
**मही देव्युषसो विभाती सैकेनैकेन मिषता विचष्टे।।१०-८-३०।।**

"ही शक्ती सनातन आहे. सनातन काळापासून ती विद्यमान आहे. तीच फार प्राचीन शक्ती सर्व होऊन राहते. हीच महान् शक्तिदेवी उषःकालांना प्रकाशित करते. ती एकेकट्या प्राण्यांच्या बरोबर दिसते."

अशी ही सनातन शक्ती प्रत्येक मनुष्यप्राण्याच्या ठिकाणी असूनही ती निद्रिस्थ स्वरूपात असते. ज्ञानी व शक्तियुक्त पुरुष शक्तिजागृतीची दीक्षा देऊन लोकांचा उद्धार करतात. "**अथर्ववेदातील**" कांड २ सूक्त ३४ मध्ये मुक्तीच्या सरळ मार्गाचे वर्णन करताना शक्तिपात-योगदीक्षेने ज्ञानी पुरुष बद्धांना कसे मुक्त करतात याचे वर्णन आले आहे. ऋषी असे म्हणतात की -

**ये बध्यमानमनु दीध्याना अन्वैक्षन्त मनसा चक्षुषा च।**
**अग्निष्टानग्रे प्र ममोक्तु देवो विश्वकर्मा प्रजया संरराणः।।**
**।।२-३४-३।।**

तेजस्वी व ज्ञानी पुरुष स्वतःच्या मनाने व डोळ्यांनी बद्ध स्थितीत असलेल्या प्राण्यांकडे दयादृष्टीने पाहतात. (त्यांच्या पाहण्यामुळे शक्तिसंक्रमण घडून येते.) त्यांनाच विश्वास व आनंद निर्माण करणारा देव सर्व प्रथम मुक्त करतो. (अशा प्रकारे शक्तिसंक्रमणाचे कार्य करणारे पुरुष स्वतः मुक्त होतातच; पण त्यांच्यामुळे साधक व बद्धजीवही मुक्तीची वाटचाल करू लागतात. याशिवाय दुसरा सोपा मार्ग नाही.)

**"अथर्ववेदातील"** ब्रह्मा प्रकरणातील १९ व्या कांडातील ४३ व्या सूक्तात दीक्षेचे व तपाचे माहात्म्य वर्णन करताना ऋषी असे म्हणतात की -

**यत्र ब्रह्मविदो यान्ति दीक्षया तपसा सह।**
**ब्रह्मा मां तत्र नयतु ब्रह्मा ब्रह्म दधातु मे।।१९.४३.८।।**

दीक्षा आणि तपासह जेथे ब्रह्मज्ञानी जातात तेथे ब्रह्मा मला घेऊन जावो आणि ब्रह्मा मला ज्ञान देवो.

**"ऋग्वेदाच्या"** प्रथम मंडलातील १६४ व्या सूक्तात शक्तिपातयोग-दीक्षेचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे.

**यत्रा सुपर्णा अमृतस्य भागमनिभेषं विदथाभिस्वरन्ति।**
**इनो विश्वस्य भुवनस्य गोपाः स मा धीरः**
**पाकमत्रा विवेश।।१-१६४-२१।।**

ज्या स्थानावर महान् पुरुष ब्रह्मतेजाचा प्रकाश नेहमी पसरवीत असतात तेथे माझ्यासारख्या व्यग्रचित्त माणसात सर्व भुवनांचा स्वामी व दक्ष अशा सर्वज्ञ ईश्वराने प्रवेश केला.

सामान्य माणूस नेहमीच व्यग्रचित्त असतो. त्याची व्यग्रचित्तता जाऊन त्याला मनःशांती मिळावी म्हणून सिद्धपुरुष ब्रह्मतेज साधकात संक्रमित करून शक्ती जागृत करतात. त्यामुळे अज्ञान दूर होऊ लागते. शरीर व मन शुद्ध होते. अशा साधकाच्या अंतःकरणात ईश्वराचा निवास होतो व शेवटी साधक ईश्वरस्वरूप होऊन मुक्त होतो.

याशिवाय वेदात कितीतरी ठिकाणी या शक्तिपातयोगसाधनेचा उल्लेख केलेला आढळून येतो. महापुरुषांनी आपल्या दिव्य शक्तीचा

पात करून बद्धांना जीवन्मुक्त करण्याची ही परंपरा वेदकालापासून सुरू झालेली दिसून येते. अनेक धारांनी ही परंपरा आजतागायत वाहत आली आहे. या परंपरेतील काही महान् विभूतींच्या जीवनातील दीक्षेचे प्रसंग पाहिले म्हणजे शक्तिपातयोगाचे दिव्यत्व व अलौकिकत्व सहज ध्यानात येईल.

**२. कूर्मपुराणातील महायोगाची परंपरा :-**

प्रथम **"कूर्मपुराणाच्या"** उत्तरार्धातील अकराव्या अध्यायात महायोगाची जी परंपरा सांगितली आहे ती पाहणे इष्ट ठरेल.

"हा परम पावन सर्वोत्तम महायोग प्रथम श्रीमहेश्वर श्रीशंकरांनी भगवान् श्रीनारायणांना दिला व असे सांगितले की, ब्रह्मवादी लोकांना देण्यासाठी हा महायोग मी आपल्याला दिला आहे. यासाठी जे शिष्य शांतचित्त असतील त्यांनाच या योगाची दीक्षा दिली पाहिजे. असे सांगून झाल्यावर श्रीशंकरांनी भगवान् श्रीवासुदेवांना दिव्यालिंगन दिले. त्यामुळे संसारबंधन नाहीसे करणारे दिव्यज्ञान श्रीनारायणांना झाले.

श्रीनारायणांपासून प्राप्त झालेल्या या महायोगाचे दान महामुनी भगवान् श्रीसनत्कुमारांनी श्रीसंवर्तांना दिले व त्यांनाही त्या ज्ञानाचा अनुभव आला. अशा प्रकारे योगींद्र श्रीसनंदनांनी श्रीमहादेवांपासून चालत आलेल्या या महायोगाचे दान महर्षी श्रीपुलहांना ज्ञान देऊन केले. हाच महायोग प्रजापती श्रीपुलहांनी श्रीगौतमांना दिला, श्रीअंगिरा ऋषींनी वेदज्ञाते श्रीभारद्वाज ऋषींना दिला व हेच ज्ञान योगीराट् सिद्ध श्रीकपिलमुनींनी योगी श्रीजैगीषव्यांना व श्रीपंचशिखाचार्यांना दिले."

भगवान् श्रीवेदव्यास पुढे म्हणतात, "श्रीमहेश्वरांनी सांगितलेल्या या महायोगाचे ज्ञान ऋषी मुनींनी आपापसात चर्चा करून एकमेकांना दिले व घेतले. माझे वडील श्रीपराशर ऋषी हे सर्व तत्त्वांचे ज्ञाते होते. त्यांना हे परम पावन ज्ञान भगवान् श्रीसनकमुनींनी दिले. त्यांच्यापासून श्रीवाल्मीकी ऋषींना त्याची प्राप्ती झाली. अगदी प्रथम

हा महायोग परमश्रेष्ठ ज्ञानी अशा श्रीशंकराच्या तेजापासून व सतीच्या देहापासून प्रकट झालेल्या भगवान् श्रीवामदेवांनी मला दिला. भगवान् श्रीनारायण देवकीपुत्र श्रीकृष्णांनीही स्वत: साक्षात् या महायोगाचे परमश्रेष्ठ ज्ञान अर्जुनाला दिले. अशा तऱ्हेनी ही परंपरा चालू झाली."

**३. श्रीवसिष्ठऋषींकडून श्रीप्रभुरामचंद्रांची दीक्षा :-**

एकदा श्रीरामांचे मन संसार असार आहे असा बुद्धीचा पूर्ण निश्चय झाल्याने अत्यंत उद्विग्न झाले. त्यांना कशातही गोडी वाटेना. सर्व गोष्टींबद्दल त्यांना अनास्था वाटू लागली. जीवनाची सार्थकता तरी कशात आहे असा त्यांना प्रश्न पडला. श्रीरामांची ही स्थिती पाहून दशरथाने श्रीवसिष्ठ ऋषींना बोलावून आणले. श्रीरामांना ज्ञानोपदेश करून त्यांचे मन शांत करण्याबद्दल दशरथाने श्रीवसिष्ठऋषींना विनंती केली. श्रीरामांनी श्रीवसिष्ठांना आत्मसमाधान होण्यासाठी अनेक प्रश्न विचारले. त्याची उत्तरे श्रीवसिष्ठ देत होते. ही तत्त्वज्ञानाची चर्चा ऐकण्यासाठी अनेक ऋषीमुनी तेथे जमा झाले होते. त्यामध्ये श्रीभरद्वाज ऋषीही होते. त्यांनी श्रीवाल्मीकी ऋषींना असा प्रश्न केला की -

**इति वरमुनिनोक्तं ज्ञानसारं पुराणं।**
**सकलमनुनिशम्य श्रीरघूणां कुलाग्र्यः।।**
**विमलमतिरपृच्छत्किञ्चिदन्यत्स्वयं वा।**
**समसुखपरिपूर्णः पूर्णबोधस्थितोऽसौ।।**

**।। योगवासिष्ठ-निर्वाणप्रकरण-पूर्वार्ध -१२७.१।।**

"हे गुरो! श्रीराम हा श्रीरघूच्या कुलातील अत्यंत श्रेष्ठ व शुद्धबुद्धी असलेला महापुरुष आहे. त्याला श्रीवसिष्ठ ऋषींनी ब्रह्मादि महर्षींच्या संप्रदायाने प्राप्त झालेले ज्ञानसार अनेक प्रकारांनी सांगितले. परंतु ते ऐकूनही श्रीराम श्रीवसिष्ठांना जिज्ञासेने पुनःपुन्हा प्रश्न विचारीत होता; कारण तेवढ्या उपदेशाने त्याचे पूर्ण समाधान झाले नव्हते. एवढे तत्त्वज्ञान ऐकूनही त्याचा संदेह गेला नव्हता. मोह दूर होऊन मनाला शांतता प्राप्त झाली नव्हती. अशा वेळी श्रीरामाला आत्मसुख कसे मिळाले? पूर्ण बोध कशाने झाला? त्याचे सर्व संशय व

व्यामोह दूर होऊन तो अखंड आत्मानंदात कोणत्या उपायाने राहू शकला, ते मला सांगा." त्यावर महामुनी श्रीवाल्मीकींनी श्रीभरद्वाज-ऋषींना असे सांगितले की -

**इति श्रुत्वा वसिष्ठस्य वाक्यं वेदान्तसङ्ग्रहम्।**
**विदिताखिलविज्ञानो रामः कमललोचनः।।१२७.३।।**
**शक्तिपातवशोन्मेषप्रकटामलचिद्धनः।**
**मुहूर्तमासीदुद्बुद्धश्चैतन्यानन्दसागरः।।४।।**
**प्रश्नोत्तरविभागादिपरिपाटीविवर्जितः।।**
**आनन्दामृतपूर्णासु रोमकण्टकिताङ्गकः।।५।।**
**महासामान्यरूपत्वाच्चिद्व्यापकतया स्थितः।**
**नित्यमष्टगुणैश्वर्यतृणप्रायमनोरथः।।६।।**
**न किंचिदूचे संपन्नः शिवे परिणतः पदे।।**

**श्रीभरद्वाज उवाच।**

**अहो खलु ममाश्चर्यं रामः प्राप्तो महत्पदम्।।७।।**

"सर्व वेदान्ताचे सार ज्यात साठविलेले आहे असा श्रीवसिष्ठांचा उपदेश ऐकून कमलनयन श्रीरामाला सर्व विज्ञान ज्ञात झाले. (इतके झाले; तरी) श्रीरामाची अविद्या शक्तिपातयोगानेच दूर झाली. शक्तिपाता-मुळे श्रीरामाला उन्मेष प्राप्त होऊन त्याचे शुद्ध स्वरूप प्रकट झाले. स्वस्वरूपाचा विकास होऊन त्यात पूर्ण जागृती आली. तो चैतन्यानंद सागरच झाला. त्याची प्रश्नोत्तरे संपली. मन, बुद्धी व इंद्रियांचे व्यापार जागच्याजागी स्थगित झाले. त्याचे प्राण आनंदामृताने पूर्ण झाले. शरीरावर रोमांच उभे राहिले. आपण सामान्य जीव नसून ब्रह्मच आहोत व चैतन्यरूपाने आपण सर्वत्र भरून राहिलेले आहोत असा अनुभव त्याला आला. तो अणिमादि अष्टसिद्धींना तृणाप्रमाणे तुच्छ समजू लागला. तो निरतिशय अशा ब्रह्मानंदात निमग्न झाल्याने काहीही बोलला नाही. त्यावर श्रीभरद्वाजऋषी असे म्हणाले की, "खरोखर राम केवळ या शक्तिपातयोगानेच मोठ्या पदाला पोहोचला

या गोष्टीचे मला मोठे आश्चर्य वाटते."

त्यावेळी जे अनेक ऋषी जमले होते त्यात श्रीविश्वामित्र ऋषीही बसले होते. शक्तिपातयोगाने श्रीरामाचे चित्त ब्रह्माकार होऊन तो आपल्या स्वरूपात रममाण झाल्याचे पाहून त्यांना फारच समाधान वाटले. तेव्हा श्रीविश्वामित्र ऋषिश्रेष्ठ श्रीवसिष्ठांची व शक्तिपातयोगाची स्तुती करताना असे म्हणाले की-

**हे वसिष्ठ महाभाग ब्रह्मपुत्र महानसि।**
**गुरुत्वं शक्तिपातेन तत्क्षणादेव दर्शितम्।।१२८.६०।।**
**दर्शनात्स्पर्शनाच्छब्दात्कृपया शिष्यदेहके।**
**जनयेद्यः समावेशं शाम्भवं स हि देशिकः।।६१।।**

"हे महाभाग ब्रह्मपुत्र वसिष्ठा! तू फार थोर आहेस. वर सांगितल्याप्रमाणे अनुग्रहयुक्त दृष्टी टाकून शक्तिपाताने शिष्याला ब्रह्मरूप करून तू आपले गुरुत्व, शिष्योद्धारसामर्थ्य, आताच्या आताच आम्हाला दाखविले आहेस. दर्शन, स्पर्श, शब्द किंवा केवळ कृपादृष्टी यांच्या योगाने जे शिष्याच्या देहात शांभव शक्तीचा समावेश करतात व स्वशरीरातून न निघताच शिष्याची कुंडलिनी जागृत करून षट्चक्रांचा भेद करून ब्रह्मरंध्रात राहणाऱ्या परशिवाशी श्रीशक्तीचे ऐक्य घडवून आणून जीवाचे जीवत्व नाहीसे करून त्याला ब्रह्मत्व प्राप्त करून देणारा शक्तिपात करतात तेच खरे सद्गुरू होत."

"**योगवासिष्ठात**" स्थिती प्रकरणात श्रीरामाला महायोगाचे माहात्म्य सांगताना स्वतः श्रीवसिष्ठऋषी असे म्हणतात की -

**सुजनेन वितृष्णेन विदुषा महता सह।**
**प्रविचार्य महायोगात्पदमासाद्यते परम्।।**

आतील व बाहेरील द्वंद्वे सहन करणाऱ्या म्हणजे शिष्यापराध पोटात घालणाऱ्या महात्म्याला शरण जाऊन शास्त्रविचार करावा; कारण सुजन, निरीच्छ, विद्वान् आणि उदार मनाच्या ब्रह्मनिष्ठांच्या सहवासात श्रवणमननादि साधनांचा आश्रय करून महायोगाचा अभ्यास करीत गेले म्हणजे परमपदाची प्राप्ती होते.

**४. श्रीध्रुवाला श्रीमहाविष्णूंकडून शंखस्पर्शद्वारा शक्तिपात :-**

श्रीध्रुवाच्या गालाला श्रीमहाविष्णूंनी शंखाचा स्पर्श करून शक्तिपात-योगदीक्षा कशी दिली याचे वर्णन महर्षी वेदव्यासांनी "**श्रीमद्भागवत महापुराणात**" चतुर्थ स्कंधाच्या नवव्या अध्यायात रोचकतेने केले आहे.

**स वै धिया योगविपाकतीव्रया हृत्पद्मकोशे स्फुरितं तडित्प्रभम्।**
**तिरोहितं सहसैवोपलक्ष्य बहि:स्थितं तदवस्थं ददर्श।।४.९.२।।**
**तद्दर्शनेनागतसाध्वसः क्षिताववन्दताङ्गं विनमय्य दण्डवत्।**
**दृग्भ्यां प्रपश्यन्प्रपिबन्निवार्भकश्चुम्बन्निवास्येन भुजैरिवाश्लिन्।।३।।**
**स तं विवक्षन्तमतद्विदं हरिर्ज्ञात्वास्य सर्वस्य च हृद्यवस्थितः।**
**कृताञ्जलिं ब्रह्ममयेन कम्बुना पस्पर्श बालं कृपया कपोले।।४।।**
**स वै तदैव प्रतिपादितां गिरं दैवीं परिज्ञातपरात्मनिर्णयः।**
**तं भक्तिभावोऽभ्यगृणादसत्वरं परिश्रुतोरुश्रवसं ध्रुवक्षितिः।।५।।**

त्यावेळी श्रीध्रुव तीव्र योगाभ्यासाने एकाग्र झालेल्या बुद्धीने श्रीभगवंतांचे विजेसारख्या दैदीप्यमान मूर्तीचे आपल्या हृदयकमलामध्ये ध्यान करीत होता. ती मूर्ती त्याच्या हृदयातून एकाएकी नाहीशी झाली. त्यामुळे घाबरून जाऊन त्याने डोळे उघडले. त्याबरोबर हृदयात ध्यान करीत असलेली श्रीभगवंतांची साक्षात् मूर्ती आपल्यासमोर उभी असलेली त्याने पाहिली. श्रीप्रभूंचे प्रत्यक्ष दर्शन मिळाल्याने श्रीध्रुवाला अत्यंत कुतूहल वाटले. तो प्रेमाने अगदी अधीर झाला. त्याने श्रीभगवंतांना साष्टांग नमस्कार घातला. अत्यंत प्रेममय दृष्टीने तो श्रीभगवंतांकडे पाहू लागला. श्रीभगवंतांना नेत्रांनी पिऊन टाकावे, मुखाने त्यांचे चुंबन घ्यावे व त्यांना दृढ आलिंगन द्यावे असे त्याला वाटू लागले. तो हात जोडून श्रीप्रभूसमोर उभा होता. श्रीभगवंतांची स्तुती करावी असे त्याला मनापासून वाटत होते. परंतु स्तुती कशा प्रकारे करावी हे त्याला माहीत नव्हते. सर्वांतर्यामी श्रीहरीने त्याच्या मनातील गोष्ट ओळखली. श्रीभगवंतांनी अत्यंत कृपापूर्वक आपल्या वेदमय शंखाचा त्याच्या गालाला स्पर्श केला. श्रीध्रुवाला पुढे अविचलपद प्राप्त होणार

होते. या वेळी शंखाचा स्पर्श झाल्याबरोबर त्याला वेदमयी दिव्य वाणी प्राप्त झाली. जीव व ब्रह्माच्या स्वरूपाचाही निश्चय झाला. अत्यंत भक्तिभावाने व धैर्याने तो विश्वविख्यात श्रीहरींची स्तुती करू लागला.

श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी या प्रसंगाचे "**श्रीज्ञानेश्वरीत**" एका ओवीत वर्णन केले आहे.

**ना तरी मधुवनीं ध्रुवासी केलें। जैसें कपोल शंखें शिवतलें।**
**आणि वेदांचियेही मतीं ठेलें। तें लागला बोलों।।११.१८४।।**

**५. श्रीदत्तात्रेयांची श्रीयदुराजाला आलिंगन देऊन स्पर्शदीक्षा :-**

श्रीदत्तात्रेयांनी श्रीयदुराजाला आलिंगन देऊन स्पर्शदीक्षा कशी दिली व आत्मबोधाचा अनुभव कसा दिला याचे अत्यंत हृदयस्पर्शी वर्णन श्रीसंत श्रीएकनाथमहाराजांनी "**श्रीनाथभागवताच्या यदु-अवधूत संवादात**" पुढीलप्रमाणे केले आहे.

**याहीपरी पाहतां। माझा गुरू एकुलता।**
**एक तेथें दुजेपणाची वार्ता। नाहीं सर्वथा यदुराया।।९.४२२।।**
**ऐशी सद्गुरूकथा। तुज सांगितली परमार्था।**
**हरिखें आलिंगलें नृपनाथा। दोघां ऐक्यता निजबोधें।।४२३।।**
**जींवीं जींवा पडली मिठी। आनंदें ओसंडली सृष्टी।**
**तेणें वाचेसी पडली बेलवटी। बोलों उफराटी विसरली।।**
**हरिखु न संटवे हृदयभवनीं। बाहेर वोसंडे स्वेदेजोनी।**
**आनंदघन वोळला नयनीं। स्वानंदजीवनीं वर्षतु।।४२५।।**
**तुटली अहंकाराची बेडी। पावलों भवार्णव परथडी।**
**म्हणौनि रोमांचीं उभविली गुढी। जिंतली गाढी अविद्या।।**
**समूळ देहभावो पळाला। यालागीं गात्रकंपू चळचळा।**
**संकल्पविकल्प निमाला। मनेंसी बुडाला मनोरथू।।४२७।।**
**जीवभावो उखिता। यदूनें अर्पिला गुरुनाथा।**
**तें चिह्न बाहेरी तत्त्वतां। दावी सर्वार्था निजांगीं।।४२८।।**
**तो अवधूत जाण दत्तात्रेया। तेणें आलिंगूनि यदुराया।**
**निजरूपाचा बोधू तया। अनुभवावया दीधला।।४२९।।**

"हे यदुराजा! अशा रीतीने पाहिले म्हणजे माझे श्रीगुरू एकुलते एकच आहेत. तेथे दुजेपणाची वार्ताही नाही. श्रीसद्गुरूंची कथा मी तुला परमार्थप्राप्तीसाठी सांगितली." असे बोलून श्रीअवधूतांनी आनंदाने राजाला आलिंगन दिले. आत्मज्ञानामुळे ते दोघेही तद्रूप झाले. सृष्टीला आनंदाचे भरते आले. त्यामुळे वाचा बंद पडली व उलट पक्ष घेऊन बोलण्याचे विसरली. अंतःकरणात आनंद न मावल्यामुळे तो घामाच्या रूपाने बाहेर वाहू लागला म्हणजे आनंदातिशयामुळे त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहून घाम सुटला. आनंदरूपी मेघ डोळ्यात भरून आला व तो प्रेमाश्रूंचा वर्षाव करू लागला. अहंकाराची बेडी तुटली. आम्ही भवसमुद्राच्या परतीराला जाऊन पोहोचलो म्हणून रोमांचरूपी पताका उभारली. अविद्येला पार जिंकले. देहभाव पळून गेल्याने शरीर चळचळा कापू लागले. संकल्पविकल्प नाहीसा झाला. मनोरथ मनासह बुडाला. यदुराजाने सर्व जीवभाव श्रीसद्गुरूंना अर्पण केला. त्याचे चिह्न तत्त्वतः आपल्या देहावर तो दाखवू लागला. ते श्रीअवधूत साक्षात् श्रीदत्तात्रेयच होते असे जाण. त्यांनी यदुराजाला आलिंगून त्याला आत्मस्वरूपाच्या ज्ञानाचा अनुभव दिला.

**६. श्रीहनुमंतांची शक्तिपाताने कृतार्थता :-**

श्रीप्रभूरामचंद्रांनी श्रीमारुतीरायांना शक्तिपातानुग्रहाने कृतार्थ केले. तामीळ महाकवी कंबन यांनी आपल्या **"कंबरामायणात"** या प्रसंगाचे फार सुरेख वर्णन केले आहे. महाकवी लिहितात- श्रीरामाला राज्याभिषेक झाला. त्यानंतर त्याने सर्व वानरांना व श्रीहनुमंतांना किष्किंधेला पाठविण्याचे ठरविले. प्रत्येक वानराच्या कामगिरीप्रमाणे त्याला बक्षीस देण्यात आले. परंतु श्रीहनुमंतांना काय द्यावे हा श्रीरामांपुढे प्रश्न पडला. श्रीहनुमंतांच्या अजोड व्यक्तिमत्त्वामुळे व कामगिरीमुळे निरोप देताना श्रीरामांचे डोळे भरून आले. अंतःकरण प्रेमाने उचंबळून आले. त्या अवस्थेत श्रीरामांनी श्रीहनुमंतांना आलिंगनाची अपूर्व भेट दिली. या आलिंगनद्वारा शक्तिसंक्रमण करून श्रीरामांनी श्रीहनुमंतांना आपले सर्वस्व दिले. श्रीरामांनी उभ्या

आयुष्यात सीतेशिवाय कोणालाही आलिंगन दिले नव्हते. ऋषींना सुद्धा हे भाग्य लाभले नाही. श्रीहनुमंतांना ते मिळाले. श्रीरामांच्या आलिंगनाने शक्तिपात होऊन श्रीहनुमंत कृतार्थ झाले.

मूळ "**वाल्मीकी रामायणात**" महर्षी श्रीवाल्मीकींनी हा प्रसंग युद्धकांडातील प्रथम सर्गात पुढीलप्रमाणे वर्णिला आहे. श्रीहनुमंत सीतेचा शोध लावून आल्यावर श्रीराम असे म्हणाले की-

**अहं च रघुवंशश्च लक्ष्मणश्च महाबलः।**
**वैदेह्या दर्शनेनाद्य धर्मतः परिरक्षिताः।।११।।**
**इदं तु मम दीनस्य मनो भूयः प्रकर्षति।**
**यदिहास्य प्रियाख्यातुर्न कुर्मि सदृशं प्रियम्।।१२।।**
**एष सर्वस्वभूतस्तु परिष्वङ्गो हनूमतः।**
**मया कालमिमं प्राप्य दत्तस्तस्य महात्मनः।।१३।।**
**इत्युक्त्वा प्रीतिहृष्टाङ्गो रामस्तं परिषस्वजे।**
**हनूमन्तं कृतात्मानं कृतकार्यमुपागतम्।।१४।।**

आज हनुमंत सीतेचा शोध लावून परत आला. त्याने तिला आपल्या डोळ्यांनी समक्ष पाहिले. त्यामुळे धर्मानुसार त्याने समस्त रघुवंशाचे, माझे व महाबली लक्ष्मणाचे रक्षण केले आहे. त्याने माझ्याकरिता जी मोठी कामगिरी केली याबद्दल बक्षीस देण्यायोग्य वस्तू आज माझ्याजवळ नाही. ज्याने मला अत्यंत प्रिय गोष्ट सांगितली त्याच्याकरिता मी कोणतेही प्रिय कार्य करू शकत नाही, याचा माझ्या मनाला अतिशय खेद होत आहे. तेव्हा यावेळी या महात्मा हनुमंताला मी केवळ माझे प्रगाढ आलिंगनच देऊ शकतो; कारण तेच माझे सर्वस्व आहे. (आलिंगनामुळे शक्तिसंक्रमण होऊन श्रीरामांचे सर्वस्व जे आत्मस्वरूप ते श्रीहनुमंतांना प्राप्त होऊन ते श्रीरामस्वरूप होणार हा भावार्थ ) असे म्हणता म्हणता श्रीरामांचे अंगप्रत्यंग प्रेमाने पुलकित झाले. आपल्या आज्ञेप्रमाणे वागून सफलता प्राप्त करून आलेल्या श्रीहनुमंतांना त्यांनी दृढ आलिंगन देऊन कृतार्थ केले.

## ७. श्रीअंगिरसऋषींच्या कृपेने श्रीकृष्णांना तृष्णाहीनता :-

श्रीकृष्ण तृष्णाहीन कसे झाले याचे वर्णन **"छांदोग्य उपनिषदातील"** अध्याय ३ खंड १७ मंत्र ६ मध्ये पुढीलप्रमाणे केले आहे.

**तद्धैतद् घोर आङ्गिरसः कृष्णाय**
**देवकीपुत्रायोक्त्वोवाचापिपास एव स बभूव।**

श्रीघोरआंगिरसऋषींनी देवकीपुत्र श्रीकृष्णांना शक्तिपातयोगदीक्षा देऊन हे ज्ञान सांगितले. त्यामुळे श्रीकृष्णांच्या आशा, आकांक्षा व विषयांची ओढ संपून ते तृष्णाहीन झाले व त्यांना परम शांती प्राप्त झाली.

## ८. श्रीकृष्णांकडून मिळालेल्या शक्तिपातयोगदीक्षेने श्रीउद्धवाची स्वानंदनिमग्नता :-

श्रीसंत श्रीएकनाथमहाराजांनी **"श्रीएकनाथी भागवतात"** २९ व्या अध्यायात उद्धवाला शक्तिपातयोगदीक्षा देऊन स्वानंदनिमग्नता कशी प्राप्त करून दिली व हेच एकमेव साधन कसे श्रेष्ठ आहे याचे अनुपम वर्णन केले आहे.

**उद्धवा जे मज अनन्यशरण। त्यांचा धर्म अर्थ मी आपण।**
**त्यांचा काम तोही मीचि जाण। मोक्ष संपूर्ण मी त्यांचा।।६०७।।**
**अभक्तां भोगक्षयें पुनरावृत्ती। भक्तांसी भोग भोगिता नित्यमुक्ती।**
**एवढी माझ्या भक्तीची ख्याती। जाण निश्चितीं उद्धवा।।६०८।।**
**ऐशी ऐकतां देवाची मात। उद्धव प्रेमें वोसंडला अद्भुत।**
**तेणें प्रेमें लोधला कृष्णनाथ। हर्षें बोलत तेधवां।।९।।**
**उद्धवा तुझे चारी पुरुषार्थ। तो मी प्रत्यक्ष श्रीभगवंत।**
**ऐसें बोलोनि हर्षयुक्त। हृदयाआंत आलिंगी।।१०।।**
**हर्षें देता आलिंगन। कृष्ण विसरला कृष्णपण।**
**उद्धव स्वानंदनिमग्न। उद्धवपण विसरला।।११।।**
**कैसें अभिनव आलिंगन। दोघांचे गेले दोघेपण।**
**पूर्ण चैतन्यपरिपूर्ण। स्वानंदघन स्वयें झाले।।१२।।**
**तेथ विरोनि गेला हेतू। वेदेंसहित बुडाली मातू।**

एकवटला देवी भक्तू। एकीं एकांतू एकत्वें।।१३।।
तेथ मावळले धर्माधर्म। क्रियेसहित उडाले कर्म।
भ्रम आणि निर्भ्रम। दोहींचें नाम असेना।।१४।।
भेद घेऊनि गेला अभेदा। बोध घेऊनि गेला निजबोधा।
आनंद लाजला आनंदा। ऐशिया निजपदा उद्धव पावे।।१५।।
मी जाहलों परब्रह्म। हाही मुख्यत्वें जेथ भ्रम।
कृष्णालिंगनाचा हा धर्म। जाहला निरुपम निजवस्तू।।१६।।
यावरी कृष्ण सर्वज्ञ। सोडोनियां आलिंगन।
ऐक्यबोधें उद्धवासी जाण। निजभक्तपण प्रबोधी।।१७।।
तेव्हां उद्धव चमत्कारिला। अतिशयें चाकाटला।
परम विस्मयें दाटला। तटस्थ ठेला ते काळीं।।१८।।

**९. श्रीअर्जुनाला शक्तिपाताने स्वरूपप्राप्ती :-**

जे ज्ञान श्रीकृष्णांना श्रीघोरआंगिरसऋषींकडून मिळाले तेच ज्ञान श्रीकृष्णांनी श्रीअर्जुनाला आलिंगन देऊन संक्रमित केले. त्यामुळे श्रीअर्जुनाला स्वरूपप्राप्ती झाली. श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीअर्जुनाला मिळालेल्या दीक्षेचे अत्यंत भावस्पर्शी वर्णन "**श्रीज्ञानेश्वरीत**" पुढील-प्रमाणे केले आहे.

मग सांवळा सकंकणु। बाहु पसरोनि दक्षिणु।
आलिंगिला स्वशरणु। भक्तराजु तो।।१८.१४१८।।
न पवतां जयातें। काखे सूनि बुद्धीतें।
बोलणें मागौतें। वोसरलें।।१४१९।।
ऐसें जें कांहीं एक। बोलाबुद्धीसिही अटक।
तें द्यावया मिष। खेवाचें केलें।।१४२०।।
हृदया हृदय एक जाले। ये हृदयींचें तें हृदयीं घातलें।
द्वैत न मोडता केलें। आपणाऐसे अर्जुना।।१४२१।।
दीपें दीपु लाविला। तैसा परिष्वंगु तो जाला।
द्वैत न मोडतां केला। आपणपे पार्थु।।१४२२।।
तेव्हां सुखाचा मग तया। पूरू आला तो धनंजया।

**तेथ वाडु तऱ्ही बुडोनियां। ठेला देवो।।१४२३।।**
**सिंधू सिंधूतें पावों जाये। तें पावणें ठाके दुणा होये।**
**वरी रिगे पुरवणिये। आकाशही।।१४२४।।**
**तैसें तया दोघांचे मिळणें। दोघां नावरे जाणावें कवणें।**
**किंबहुना श्रीनारायणें। विश्व कोंदलें।।१४२५।।**

कंकणांनी युक्त असलेला आपला श्यामवर्णाचा उजवा हात पुढे करून आपल्यास शरण आलेल्या भक्तराज अर्जुनाला श्रीकृष्णांनी आलिंगन दिले. बुद्धीला व शब्दाला आकलन न झाल्याने जेथे बोलणे खुंटून जाते ते स्वरूप अर्जुनाला देण्याकरिता देवांनी आलिंगनाचे निमित्त केले. श्रीकृष्णांचे हृदय व अर्जुनाचे हृदय एकमेकांना भिडले. श्रीकृष्णांनी आपल्या हृदयातील ज्ञान अर्जुनाच्या हृदयात घातले व देवभक्तांचे द्वैत न मोडता अर्जुनाला आपल्यासारखे करून सोडले. एका दिव्याने दुसरा दिवा लावल्यावर जसे द्वैत कायम राहून ऐक्य मोडत नाही तसाच प्रकार या आलिंगनाचा होऊन द्वैत न मोडता श्रीकृष्णांनी पार्थाला आपलेपणा दिला. मग त्यावेळेस अर्जुनाला त्या आनंदाच्या सुखाचा पूर आला. त्या पुरात भगवान् सर्वव्यापक असूनही ते बुडून गेले. समुद्राला समुद्र मिळाल्यावर पाणी दुप्पट वाढते. त्या वाढीमुळे जसे आकाशही व्यापून जाते तसे श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या आलिंगनाचे प्रेम दोघांनाही आवरेना. ते कोणी जाणावे? फार काय सांगावे! सर्व विश्व श्रीनारायणरूप होऊन गेले.

श्रीध्रुवाला ज्याप्रमाणे शंखस्पर्शद्वारा श्रीमहाविष्णूंकडून शक्तिपातदीक्षेचा अनुग्रह मिळाला तसाच अनुग्रह अर्जुनाला श्रीकृष्णांनी दिला. या अनुग्रहाच्या परिणामाचे चित्र श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी **"श्रीज्ञानेश्वरीच्या"** ११ व्या अध्यायात अपूर्वपणे रेखाटले आहे.

**ना तरी मधुवनीं ध्रुवासि केलें। जैसें कपोल शंखें शिवतलें।**
**आणि वेदांचियेही मतीं ठेलें। तें लागला बोलों।।११.१८४।।**
**तैसा अनुग्रहो पैं राया। श्रीहरि केला धनंजया।**
**आतां कवणेकडेही माया। ऐसी भाष नेणेंचि तो।।१८५।।**

**एकसरें ऐश्वर्यतेजें पाहलें। तया चमत्काराचें एकार्णव जाहले।**
**चित्त समाजीं बुडोनि ठेलें। विस्मयाचिया।।१८६।।**
**जैसा आब्रह्म पूर्णोदकीं। पोहे मार्कंडेय एकाकी।**
**तैसा विश्वरूप कौतुकीं। पार्थु लोळें।।१८०।।**
**म्हणे केवढें गगन एथ होतें। तें कवणें नेलें पां केउतें।**
**तीं चराचरें महाभूतें। काय जाहलीं?।।१८८।।**
**दिशांचे ठावही हारपले। अधोर्ध्व काय नेणों जाहलें।**
**चेइलिया स्वप्न तैसे गेले। लोकाकार।।१८९।।**
**ना ना सूर्यतेज प्रतापें। सचंद्र तारांगण जैसें लोपे।**
**तैसीं गिळिली विश्वरूपें। प्रपंचरचना।।१९०।।**
**तेव्हां मनासी मनपण न स्फुरे। बुद्धि आपणपें न सांवरे।**
**इंद्रियांचे रश्मी माघारे। हृदयवरी भरलें।।१९१।।**
**तेथ ताटस्थ्या ताटस्थ्य पडिलें। टकासी टक लागलें।**
**जैसें मोहनास्त्र घातलें। विचारजातां।।१९२।।**
**तैसा विस्मितु पाहे कोडें। तंव पुढां होतें चतुर्भुज रूपडें।**
**तेंचि नानारूप चहूंकडे। मांडोनि ठेलें।।१९३।।**
**जैसे वर्षाकाळींचे मेघौडे। कां महाप्रळयींचें तेज वाढे।**
**तैसें आपणावीण कवणीकडे। नेदीचि उरों।।१९४।।**

देवाचे दर्शन व्हावे म्हणून ध्रुव मधुवनात तपश्चर्या करीत होता. जेव्हा त्याला देवाचे दर्शन झाले तेव्हा देवाची स्तुती करावी अशी उत्कट इच्छा त्याला उत्पन्न झाली. परंतु स्तुती कशी करावी हे त्याला माहीत नव्हते. तेव्हा भगवंताने स्तुती करू इच्छिणाऱ्या ध्रुवाच्या गालाला आपल्या हातातील शंखाचा स्पर्श केला. त्याबरोबर वेदांनाही जी स्तुती करता आली नाही ती तो करू लागला. (शक्तिपात अनुग्रह झाला की, अशी दिव्य वाणी स्फुरू लागते.) संजय म्हणाला, "हे राजा धृतराष्ट्रा! भगवान् श्रीकृष्णांनी अर्जुनावर तशीच कृपा केली. या कृपेमुळे माया कोणीकडे गेली त्याचा पत्ताही लागला नाही. एकसारखे जिकडे तिकडे ऐश्वर्यतेजच प्रकाशमान झालेले

दिसू लागले. आश्चर्याचा समुद्रच सर्वत्र पसरलेला आहे असे अर्जुनाला वाटू लागले. त्याचे चित्त त्या आश्चर्याच्या समुद्रात बुडून गेले. ब्रह्मलोकापर्यंत संपूर्ण ब्रह्मांड जलमय झाले असता ज्याप्रमाणे एकटे मार्कंडेय ऋषीच त्या जलात पोहत असतात, त्याप्रमाणे विश्वरूपाच्या दर्शनाने झालेल्या विस्मयसमुद्रावर अर्जुनही लोळू लागला. अर्जुन म्हणतो, "मी विश्वरूप पाहण्यापूर्वी येथे खूप मोठे आकाश होते. ते आता कोणी कोठे नेले समजत नाही. आणि त्या आकाशात दिसणारी ती भूतसृष्टीही काय झाली कोणाला माहीत? दिशांचा पत्ता, ठावठिकाणा राहिला नाही. आकाश पाताळ कोणीकडे गेले हे समजेना. ज्याप्रमाणे स्वप्नात पाहिलेले पदार्थ दृष्टीस पडत नाहीत; त्याप्रमाणे एवढा वेळ दृष्टीस पडणारी सृष्टी नाहीशी झाली. सूर्य उगवल्याबरोबर त्याच्या प्रखर तेजाने ज्याप्रमाणे चंद्रासह सर्व नक्षत्रे त्याच्यात लोपून जातात त्याप्रमाणे शक्तिपातयोगदीक्षेमुळे विश्वरूपदर्शनाचा दिव्य अनुभव येऊन सर्व प्रपंचभाव नाहीसा झाला." या अवस्थेत अर्जुनाला मनाचे मनपण स्फुरत नव्हते म्हणजे त्याच्या मनाचा बाह्य विषयाविषयी होणारा संकल्पविकल्पात्मक सर्व व्यापार बंद पडला. बुद्धीचे स्वतःला सावरण्याचे सामर्थ्य नाहीसे झाले. इंद्रियांच्या प्रवृत्ती मागे फिरत हृदयामध्ये विलीन झाल्या. या अवस्थेत स्तब्धतेला स्तब्धता प्राप्त झाली म्हणजे ताटस्थ्यही तटस्थ राहिले. अर्थात् साक्षित्वही आठवेनासे झाले. एकाग्रतेस एकाग्रता आली. मोहिनी अस्त्र घातल्याप्रमाणे सर्व विचार बंद पडले. आश्चर्यचकित होऊन अर्जुन कौतुकाने पाहू लागला. तेव्हा त्याला असे दिसले की, आपल्या समोर भगवान् श्रीकृष्णाची जी चतुर्भुज मूर्ती होती तीच सर्वत्र अनेक नामरूपाने शोभू लागली. ज्याप्रमाणे वर्षाऋतूत जिकडेतिकडे मेघच दिसतात किंवा महाप्रलय-कालचे तेज एकदम चहूकडे पसरते त्याप्रमाणे श्रीभगवंतांनी आपल्याशिवाय कोणीकडेही दुसरे काही उरू दिले नाही.

**१०. श्रीचैतन्यमहाप्रभूंना शक्तिपातामुळे भक्तीचा उन्मेष :-**

श्रीचैतन्यमहाप्रभूंनी आपले सद्गुरू श्रीपुरीजीमहाराज यांना हात

जोडून अनन्य शरण होऊन प्रार्थना केली की, "भगवन्! अब तो हमें बहुत दिन इन बाह्य वृत्तिके जीवनको बिताते हो गयें, अब हमें अपने चरणोंकी शरण प्रदान कीजिये।"

या प्रार्थनेला होकार देऊन श्रीपुरीजीमहाराजांनी श्रीचैतन्यांना मंत्रदीक्षा दिली. या दीक्षेमुळे शक्तिसंक्रमण कसे झाले याचे बहारदार वर्णन श्रीप्रभुदत्त ब्रह्मचारी यांनी "**श्रीचैतन्य चरितावली**" खंड एक मध्ये पुढीलप्रमाणे केले आहे.

**"नियत तिथी आ गयी। निमाई पंडित नवीन उल्लास और आनंदके साथ मंत्रदीक्षा लेनेके लिये तैयार हो गये। इनके सभी साथियोंने उस दिन दीक्षोत्सवके उपलक्ष्यमें खूप तैयारियाँ की थीं। नियत समयपर पुरी महाशय आ गये। उनकी पदधूली इन्होंने मस्तकपर चढायी और स्वस्त्ययनके पुण्यश्लोक पढकर और भगवानके मधुर और मंजुल नामोंका संकीर्तन करनेके अनन्तर पुरी महाशय नें इनके कानमें "गोपीजनवल्लभाय नमः" इस दशाक्षर मंत्रका उपदेश कर दिया। मंत्रके श्रवणमात्रसेही ये मूर्छित होकर पृथ्वीपर गिर पडे और इन्हें अपने शरीरका बिल्कुल होश नहीं रहा।**

**साथियोंने भाँति-भाँतिके उपचार करके इन्हें सावधान किया। बहुत देरके अनन्तर उन्हें कुछ होश हुआ। अब तो इनकी विचित्रही दशा हो गयी। कभी तो खूब जोरोंके साथ हँसते, कभी रोते और कभी "हा कृष्ण! हा पिता!" ऐसा कहकर जोरोंसे रुदन करते। कभी यह कहते हुए कि "मैं तो श्रीकृष्ण के पास व्रजमें जाऊँगा" व्रजकी ओर भागते। इनके साथी इन्हें पकड पकड लाते। किंतु ये पागलोंकी भाँति उनसे अपने शरीरको छुडाछुडाकर भागते। कभी फिर उसी भाँति जोरोंसे प्रलाप करने लगते। रोते-रोते कहते, "प्यारे! मुझे छोडकर तुम कहाँ चले गये? मेरे कृष्ण! मुझे अपने साथ ही ले चलो। इतना कहकर फिर जोरोंसे रोने लगते।"**

**११. श्रीशंकरांकडून श्रीहरिनाथांना शक्तिपाताने निजानंद :-**

श्रीमुकुंदराजांचे आजेगुरू श्रीहरिनाथ यांना प्रत्यक्ष श्रीशंकरांकडून

शक्तिपाताची दीक्षा मिळाली. श्रीमुकुंदराजांनी "**विवेकसिंधूत**" याचे फार सुंदर वर्णन केले आहे. श्रीहरिनाथांनी ईश्वरी अनुग्रहासाठी खूप उग्र तपश्चर्या केली. त्यामुळे श्रीशंकर प्रसन्न होऊन प्रकट झाले व त्यांनी श्रीहरिनाथांवर कृपा केली.

**असो हे तियें ज्वाळेसी आंतु। शंभू प्रकटला ना भी म्हणतु।**
**जो भक्तांचा वेळाइतु। करुणासिंधू।।१८.५८।।**
**तिन्ही देव गुणमूर्ति। जेया देवांचिया शक्ति।**
**तो देखिला स्वयंज्योती। श्री आदिनाथु।।५९।।**
**मग हरिसी गाढालिंगण। दीधले जगदीश्वरें आपण।**
**मग क्षणु येकू दोघै जालै लीन। आनंदसागरीं।।६०।।**
**सुखासी महासुख भेटलें। किं स्वानुभवासी पडप जोडलें।**
**तैसें दोघै आनंदें फुंजों लागले। हरिशंकर ते।।६१।।**
**जैसा जालेया विद्युत्पातु। जनु होये विह्वळतु।**
**तैसा रुद्राचेंनि तेजें मूर्छितु। ऋत्विजगणु।।६२।।**
**मग सदाशिवें वरु माग म्हणितले। तंव श्रीहरीनें विनविलें।**
**जी प्रेम देई आपुले। कैवल्यदानी।।६४।।**
**तुझीये कृपेचेनि लवलेंशें। जीवाचें फिटे अज्ञान पिसें।**
**कैवल्यपदींचे साम्राज्य आपैसे। गींवसीत पावे।।६५।।**
**बुडाले संसारवारिधी। जीवु नेणती आपुली बुद्धी।**
**जी स्वामी करुणानिधी। तुवां तारावे।।७५।।**
**तरी ज्ञान देयावें स्वानुभव। जेणे चुकती भविंचे पराभव।**
**भेटे निराकार निर्वेव। परब्रह्म जें।।७६।।**
**ऐसे श्रीहरियें विनविलें। तंव महेशें हास्य केलें।**
**हें सिद्धचि काय मागितलें। सर्वज्ञा राया।।७७।।**
**तथापि तुझा विनोदु। तरी देयिजैल निजबोधु।**
**आणिकही वरु सीधु। तू मागसील जो।।७८।।**
**संप्रदायाची उंडी। पडैल जयाचेया मुखीं फुडी।**
**तेयासी ज्ञानाची सांकडी। न पडे देहांतिही।।७९।।**

**तुझिये मार्गी जे धरीति विश्वासु। तेयांसि नव्हैल गर्भवासु।**
**तेथींचा अभिमानी मी महेशु। म्हणौनिया।।८०।।**
**माझिये तेज प्रगटैल। तुझिये मुखी प्रवेशैल।**
**ते शिष्यदेहीं संक्रमैल। गुरुकृपाद्वारें।।८१।।**
**ऐसे आदिनाथें बोलिलें। तंव हरिये श्रीमुख पसरिले।**
**तेथ तेजोमय प्रवेशले। जगदीश्वरें।।८२।।**
**तेथ तेज शंभूचेनि कृपावशें। शांभव तेजाचेनि समावेशें।**
**तेवेळीं चित्त समरसें। श्रीहरीचे परब्रह्मीं।।८३।।**
**निर्विकल्प समाधी प्रवर्त्तली। दृष्टी अर्धोन्मीलित जाली।**
**अहंता निःशेष विराली। परमानंदसागरीं।।८४।।**
**प्राणाचियेनि परिस्पंदन। मनासरीसें जाले लीन।**
**तेथींचेया आनंदातें कवण। निवडी कैसा।।८५।।**

हे असो. त्या ज्वाळेतून भक्तांचा ऋणाईत व कृपासागर श्रीशंकर भिऊ नकोस असे म्हणत प्रकट झाला. सत्त्व, रज व तम या तीन गुणांनी बनलेला व देवांना शक्ती देणारा स्वयंप्रकाशी श्रीआदिनाथ श्रीहरीने पाहिला. मग त्या जगदीश्वराने आपण होऊन श्रीहरीला गाढ आलिंगन दिले आणि एक क्षण ते दोघे आनंदसागरात लीन होऊन गेले. सुखाला जसे महासुख भेटले किंवा स्वानुभवाला जसा दुसरा स्वानुभव जोडला तसे हे दोघे श्रीहरिनाथ व श्रीशंकर आनंदाने पूर्ण भरून गेले. विद्युत्पात झाल्यावर ज्याप्रमाणे लोक विह्वळ होतात, त्याप्रमाणे रुद्राच्या प्रखर तेजाने सर्व ऋत्विज मंडळी मूर्च्छित झाली. मग श्रीशंकर त्याला असे म्हणाले की, "तू वर माग." तेव्हा श्रीहरीने अशी विनंती केली की, "हे कैवल्यदात्या! मला आपले प्रेम द्या. तुझ्या कृपेच्या एवढ्याशा लवलेशाने देखील जीवाचे अज्ञानाचे वेड नाहीसे होते. कैवल्याचे साम्राज्य त्याला आपोआप हुडकत येते. संसार सागरात जीव बुडून गेल्यामुळे जीवांना आपल्या बुद्धीची जाणीव नाहीशी झाली. त्यामुळे हे करुणानिधे! स्वामी!! तुम्ही जीवांना तारावे. त्यांना स्वानुभवाचे ज्ञान प्राप्त करून द्यावे. त्यामुळे

त्यांचे संसारातील पराभव चुकतील व निराकार निरवयव असे परब्रह्म त्यांना प्राप्त होईल." अशी श्रीहरिनाथाने प्रार्थना केली. तेव्हा श्रीशंकर हसले व म्हणाले, "अरे सर्वज्ञा! ते तर आहेच आहे. यात तू काय मागितलेस? तथापि तुझ्यावर प्रसन्न होऊन मी तुला निजबोधाने परब्रह्मप्राप्ती करून दिली. आणखीही एखादा वर मागितलास तरी तो तुला दिला आहे असे समज. तुझ्या संप्रदायाचा ठेवा ज्याच्या मुखात पडेल त्याला ज्ञानाची अडचण कधी देहान्तानंतरही पडणार नाही. तुझ्या उपदेशमार्गावर (या शक्तिपातयोगमार्गावर) जे विश्वास ठेवतील, त्यांना कधीही गर्भवास सोसावा लागणार नाही; कारण मी महेश त्याचा अभिमानी आहे. माझे तेज प्रकट होऊन ते तुझ्या मुखात प्रवेश करील व श्रीगुरूंच्या कृपेने ते शिष्यांमध्ये संक्रमित होईल." श्रीआदिनाथ असे बोलल्यानंतर श्रीहरिनाथांनी आपले तोंड उघडले. त्यात जगदीश्वर श्रीशंकर तेजोमय होऊन शिरले. श्रीशंभूंच्या कृपेमुळे श्रीहरिनाथांमध्ये तेज आले. त्या शांभव तेजाच्या प्रवेशाने श्रीहरिनाथांचे चित्त परब्रह्माशी तन्मय झाले. त्यांची निर्विकल्प समाधी लागली. दृष्टी अर्धोन्मीलित झाली. अहंता तर परमानंद सागरात पार बुडून गेली. प्राणाचे स्फुरण पावणे तर मनाबरोबरच लयास गेले. त्या तेथील आनंदाला कोण कसा निवडणार?

**१२. श्रीज्ञानेश्वरामहाराजांची सिद्धपंथाच्या दीक्षेने कृतार्थता :-**

श्रीसंतनिवृत्तिनाथांना श्रीगैनीनाथांनी शक्तिपाताची दीक्षा देऊन कृतार्थ केल्यावर श्रीनिवृत्तिनाथांनी श्रीज्ञाननाथांना दीक्षा देऊन कृतार्थ केले. या सिद्धयोगाचे माहात्म्य त्यांनी स्वतः पुढीलप्रमाणे सांगितले आहे -

**महेशें शिवेसी निजखूण दाविली। हंसें लाधविली कमलासना।।१।।**
**सनकादिक तृप्त ज्या सुखेसी जाले। योगी आनंदले, युगायुगीं।।२।।**
**तेचि मज केलें करतळामळ। निवृत्ति कृपाळ काय वानू।।३।।**

शिवशंकर श्रीमहेशांनी शक्तिसंक्रमण करून पार्वतीला स्वात्मप्रचीती दाखविली व मीच ते परमतत्त्व आहे असा आत्मसाक्षात्कार त्यांनी

ब्रह्मदेवास प्राप्त करून दिला. हेच ज्ञान शक्तिपातपरंपरेने सनकादिकांना प्राप्त झाल्याने, त्यांना निरतिशय सुख प्राप्त होऊन ते तृप्त झाले. याच मार्गाने अनेकानेक योगी युगायुगांमध्ये परमतत्त्वाची प्राप्ती करून घेऊन आनंदी झाले. श्रीनिवृत्तिनाथांनी अत्यंत कृपाळूपणे शक्तिपात दीक्षा देऊन हेच बोधरहस्य तळहातावरील आवळ्याइतके स्पष्टपणे मला प्राप्त करून दिले. त्याची महती मी काय वर्णन करू? असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात.

हे ज्ञान सिद्धयोगमार्गाच्या परंपरेने आपल्याकडे कसे आले याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज आपल्या एका अभंगात असे म्हणतात की -

**आदिनाथें बीज सांगितलें कानीं। सोहं हे शिराणी कैवल्याची।।१।।**
**मच्छेंद्र गोरक्ष पावले या सुखा। उजळिल्या आशंका ज्ञानाचिया।।२।।**
**निवृत्तीनें गूज स्वतंत्र ओतिलें। अपार पावले सिद्धपंथें।।३।।**
**सोहं या मंत्राचा वेदाचा गव्हर। म्हणे ज्ञानेश्वर राजयोगी।।४।।**

श्रीआदिनाथ श्रीशंकरांनी **'सोऽहं'** हा शक्तिसंक्रमणाचा बीजमंत्र कैवल्याची खूण म्हणून सांगितला. श्रीआदिनाथांकडून श्रीमत्स्येंद्रनाथांना व श्रीमत्स्येंद्रनाथांकडून श्रीगोरक्षनाथांना शक्तिपातयोगदीक्षा मिळाली. त्यामुळे ते सुखरूप झाले. या दीक्षेमुळे त्यांच्या ठिकाणी असलेल्या सर्व शंका मावळून आत्मज्ञानाचा प्रकाश उत्पन्न झाला. श्रीनिवृत्तिनाथांनी माझ्यावर कृपा करून हे परंपराप्राप्त शक्तिपातरयोगहस्य मला स्वतंत्रपणे सांगून कृतार्थ केले. या सिद्धयोगाच्या पंथाने हजारो योगी कृतकृत्य झाले आहेत. श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, "सोऽहं" हा मंत्र संपूर्ण वेदाचे हृद्गत असून मी याचमुळे राजयोगी बनलो आहे.

शक्तिपातयोगाने आपणांस शाश्वत सुख प्राप्त होऊन आपण आत्मज्ञानी कसे झालो याचे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढील अभंगात केले आहे.

**जें अगम्याचें ध्यान। जें मननाचें मनन।**
**जें पुण्याचें पावन। वस्तुरूप।।१।।**

**कैसें वरिष्ठांचे सार। जों आदिअंतीं विचार।**
**हें जाणले अवतार। मानव होती।।२।।**
**जें गुह्याचे मौन्यमाळा। तें मज केलें करतळमळा।**
**अचळादि अचळा। सुख असें।।३।।**
**ऐसाचि सत् शिष्यें उदय जाला।**
**कैसें अवयव प्रकाशें फावला।**
**कीं माझेचि घरिचा जाला। ठेवणाइत।।४।।**
**जागृति स्वयंभ दिसे। निजलिया प्रकाशें ।**
**कैसा समाधिचा विलासे। संपादिला।।५।।**
**निवृत्ति सुखाचा टेका। पावोनी आलों आपल्या मठा।**
**ज्ञान येकला निका। ज्ञानदेव।।६।।**

**१३. श्रीनामदेवांना शक्तिपाताने कृपेची सावली :-**

श्रीसंतनामदेवराय संतश्रेष्ठ श्रीविसोबा खेचरांना शरण गेल्यावर त्यांनी श्रीनामदेवांना शक्तिपातयोगदीक्षा देऊन कृतार्थ केले व त्यांच्यावर अखंड कृपेची साउली केली. त्याचे वर्णन श्रीनामदेवांनी पुढील अभंगात केले आहे.

**श्रवणीं सांगितली मात मस्तकीं ठेवियेला हात।**
**पदपिंडाविवर्जित केला नामा।।१।।**
**खेचरु विसा प्रेमाचा पिसा। तेणें नामा कैसा उपदेशिला।।२।।**
**सांगितलें गुज दाखविले निज। आता पाल्हाळीं तुज काय चाड।।**
**खेचरु म्हणे मज ज्ञानराज हेंचि गुरू। तेणे अगोचरु केला नामा।।४।।**

संतश्रेष्ठ श्रीविसोबा खेचरांनी श्रीनामदेवांच्या कानामध्ये मात म्हणजे **"तत्त्वमसि"** महावाक्याचा उपदेश केला व त्याच्या डोक्यावर हात ठेवून शक्तिपातयोगदीक्षा दिली. पद म्हणजे ब्रह्म व पिंड म्हणजे जीव होय. शक्तिपाताने श्रीनामदेवांचे हे जीवभाव व ब्रह्मभाव दोन्ही घालवून श्रीविसोबांनी त्यांना केवळ ब्रह्मरूप दिले. त्यांना विदेहस्थिती प्राप्त करून देऊन कैवल्यपदावर बसविले. प्रेमाने धुंद असलेल्या स्थितीत संतश्रेष्ठ श्रीविसोबा खेचरराय यांनी श्रीनामदेवरायांना हा

अद्भुत उपदेश सांगितला. हे नामदेवा! तुला गुह्य ज्ञान सांगितले व आत्मस्वरूपाचा प्रत्यय आणून दिला आहे. तेव्हा (शक्तिपातयोगाचे अपूर्व साधन तुला मिळाल्याने) आता अन्य साधनाच्या खटपटीची तुला काय आवश्यकता आहे? हे नामया! श्रीज्ञानराज हेच माझे गुरू आहेत. त्यांनीच मला सिद्धयोगपंथाची दीक्षा देऊन ही अतींद्रिय अवस्था प्राप्त करून दिली असे श्रीखेचरराय म्हणतात.

**१४. श्रीजनार्दनस्वामींना श्रीदत्तात्रेयांकडून शक्तिपाताने आत्मबोध :-**

श्रीदत्तात्रेयांनी आपले गुरू श्रीजनार्दनस्वामी यांच्या मस्तकावर हात ठेवून स्पर्शदीक्षा कशी दिली व आत्मबोध कसा प्राप्त करून दिला याचे भावस्पर्शी वर्णन संत श्रीएकनाथमहाराजांनी "**श्रीनाथ-भागवताच्या**" नवव्या अध्यायातील यदुअवधूत संवादात पुढीलप्रमाणे केले आहे.

**दत्तात्रेय शिष्यपरंपरा। सहस्त्रार्जुन यदु दुसरा।**
**तेणें जनार्दन तिसरा। केला खरा कलियुगीं।।४३०।।**
**गुरुप्राप्तीलागीं सर्वथा। थोर जनार्दनासी चिंता।**
**विसरला तिन्ही अवस्था। सद्गुरु चिंतितां चिंतनीं।।४३१।।**
**देवो भावाचा भोक्ता। दृढ जाणोनी अवस्था।**
**येणें जाहलें श्रीदत्ता। तेणें हातु माथां ठेविला।।४३२।।**
**हातु ठेवितांचि तत्काळ। बोधू आकळिला सकळ।**
**मिथ्या प्रपंचाचें मूळ। स्वरूप केवळ स्वबोधें।।४३३।।**
**कर्म करूनि अकर्ता। तोंचि अकर्तात्मबोधु झाला देता।**
**देहीं असोनि विदेहता। तेंही तत्त्वतां आकळली।।४३४।।**
**गृहाश्रमू न सांडिता। कर्मरेखा नोलांडितां।**
**निजव्यापारीं वर्ततां। बोधू सर्वथा न मैळे।।४३५।।**
**तो बोधू आकळतां मना। मन मुकले मनपणा।**
**अवस्था नावरेचिं जनार्दना। मूर्च्छापन्न पडियेला।।४३६।।**
**त्यासी सावध करूनि तत्त्वतां। म्हणे प्रेमा राहे सत्त्वावस्था।**
**तोही गिळोनी सर्वथा। होई वर्तता निजबोधें।।४३७।।**

**पूजाविधी करोनियां। जंव जनार्दनु लागला पायां।**
**तंव अदृश्य जाला दत्तात्रेया। योगामायेचेनि योगें।।**

श्रीदत्तात्रेयांची शिष्यपरंपरा अशी आहे. पहिला श्रीसहस्रार्जुन, दुसरा श्रीयदू व या कलियुगात त्यांनी श्रीजनार्दनाला तिसरा शिष्य केले. श्रीगुरुप्राप्तीसाठी श्रीजनार्दनाला मोठी चिंता लागून राहिली होती. पण श्रीसद्गुरूंच्या चिंतनात तो जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तिन्ही अवस्था विसरला. देव भावाचा भुकेला आहे. त्याची स्थिती जाणून साक्षात् श्रीदत्तात्रेयच त्याच्यापाशी आले. त्यांनी त्याच्या मस्तकावर हात ठेवला. हात ठेवताक्षणीच त्याला आत्मज्ञान झाले. त्या आत्मज्ञानानेच त्याने प्रपंचाचे मूळ मिथ्या केले. श्रीदत्तात्रेय कर्म करून अकर्ता होते. तोच आपला अकर्तेपणाचा बोध त्यांनी श्रीजनार्दनाला दिला. देहवान् असून विदेह अवस्था त्याने तत्त्वतः स्वीकारली. गृहस्थाश्रम न सोडता, कर्ममर्यादेचे उल्लंघन न करता व आपल्या व्यवहारात वागत असता त्याचे आत्मज्ञान मलीन झाले नाही. ते ज्ञान मनाने जाणताच त्याचे मनपण नाहीसे झाले. ती अवस्था श्रीजनार्दनाला आवरता न आल्याने तो मूर्च्छित होऊन पडला. तेव्हा त्याला सावध करून श्रीदत्तात्रेय असे म्हणाले की, "सत्त्वावस्थेत प्रेम राहते. यास्तव तेही टाकून तू आत्मज्ञानाने वागत जा." त्यानंतर जेव्हा श्रीजनार्दनाने यथाविधी पूजा करून त्यांच्या पायावर मस्तक ठेवले तेव्हा श्रीदत्तात्रेय योगमायेने अदृश्य झाले.

**१५. श्रीएकनाथांना श्रीगुरुकृपेने परिपूर्ण ब्रह्मप्राप्ती :-**

श्रीजनार्दनस्वामींना श्रीदत्तात्रेयांकडून जी परंपरा व शक्ती मिळाली ती त्यांनी श्रीएकनाथांच्या ठिकाणी संक्रमित केली. श्रीनाथ याबद्दल असे म्हणतात की -

**आदिनाथ ठेवणे सिद्ध परंपरा। जनार्दनीं वेव्हारा एकनाथी।।**

श्रीआदिनाथांचे ठेवणे म्हणजे शक्तिपातयोग होय. तो सिद्ध परंपरेने श्रीजनार्दनांकडून श्रीएकनाथांना प्राप्त झाला. ही परंपरा सांगताना श्रीनाथ असे म्हणतात की -

जनार्दनाचा गुरु। स्वामी दत्तात्रेय दातारू।।१।।
त्यांनी उपकार केला। स्वानंदाचा बोध दिला।।२।।
सच्चित्सुखाचा अनुभव। दाखविला स्वयमेव।।३।।
एका जनार्दनी दत्त। वसो माझ्या हृदयांत।।४।।
**श्रीसकलसंतगाथा भाग २ पृ. २१९-अ.क्र.१९००।।**

शक्तिपातयोगदीक्षेने आपली स्थिती काय झाली व आपल्याला कोणते अनुभव आले याचे वर्णन श्रीनाथांनी फारच सुंदर केले आहे. "**सकल संतगाथा,**" भाग २, पृष्ठ २०८ वर पुढील वर्णन आले आहे.

सांगा स्वामी मज कृपा हो करुनी। शिष्य विनवणी करी ऐशी।।८२।।
करी ऐशी दया मज गुरुराया। लागतसे पाया शिष्यराज।।८३।।
शिष्यराजा झाली अष्टभाव प्राप्ती। सद्गुरूनी हातीं धरियेला।।८४।।
धरियेला करी नेला एकांतात। अंकीं बैसवीत सद्‌गुरुराव।।८५।।
सद्गुरुराव बोलती त्या क्षणीं। लागली उन्मनी तयां लागीं।।८६।।
तयालागीं नाहीं देहींचा आठव। स्थूल सूक्ष्म भाव मावळले।।८७।।
मावळले चारी देह चारी अवस्था। शिष्य तो तत्त्वता ब्रह्म झाला।।
ब्रह्म झाला त्याचा देह आत्मस्थिती। द्वैताद्वैतप्रतीति नाहीं जया।।
नाहीं जया सुखदु:खाची भावना। समूळ वासना निरसली।।
निरसली त्याची अहंकार कल्पना। सुखदु:ख यातना नाहीं तया।।
नाहीं तया जीव शिव भेदाभेद। समूळ हे वाद मिथ्या झाले।।९२।।
मिथ्या झालें ज्ञान, ज्ञेय आणि ज्ञाता।भोज्य भोग भोक्ता मावळला।।
मावळला तेव्हां सद्वैत प्रपंच। एक ब्रह्म साच अनुभविलें।।९४।।
अनुभविले तेणें अनुभव वेडावला। विचार निमाला जिये ठायीं।।
जिये ठायीं गती नाहीं षट्‌प्रमाणा। साधन लक्षणा ठाव कैंचा।।
ठाव कैंचा तेथें परादिका वाचा। जेथें त्या शब्दाचा लाग नाहीं।।
लाग नाहीं तेथें उपपत्ति युक्ति। अपरोक्ष प्रतीति लया गेली।।
लया गेली तया स्थानीं मज ठेविलें। सद्गुरुदयाळे दीनानाथें।।९९।।
दीनानाथें तया ठायीं निजविलें। नवजाती वर्णिले गुण तया।।१००।।
एका जनार्दन गुरुपायीं लीन। ब्रह्म परिपूर्ण अनुभविलें।।१०१।।

**१६. महर्षी श्रीव्यासांकडून श्रीराघवचैतन्यांना शक्तिपातयोगदीक्षा :-**

श्रीनिरंजनरघुनाथांनी **"केशवचैतन्यकथातरु"** या प्रकरण ग्रंथात संतश्रेष्ठ श्रीतुकाराममहाराज यांचे आजेगुरू श्रीराघवचैतन्य यांना महर्षी श्रीव्यासांकडून शक्तिपातयोगदीक्षा कशी मिळाली याचे अत्यंत मनोज्ञ वर्णन केले आहे.

**श्रीविष्णू जो वैकुंठासी। तो चतुश्लोकें ब्रह्मयासी।**
**भागवतमिसें उपदेशी। आत्मतत्त्वालागीं पैं।।अध्याय १-२१।।**
**ब्रह्मयानें नारदा कथिलें। नारदें व्यासासी बोधिलें।**
**पुढे कलियुग प्राप्त जालें। तंव शिष्य न मिळे अधिकारी।।**
**व्यास चिंतिती मानसी। जें सर्व सुखाची राशी।**
**तें आत्मतत्त्व कोणासी। सांगू आतां या काळीं?।।२३।।**
**तंव राघव नामें द्विजसत्तम। जो उत्तमामाजीं उत्तम।**
**अनुष्ठानांतीं अति निस्सीम। व्रतालागीं आचरे।।२४।।**
**उत्तम नाम नगरी। मांडवी पुष्पावतीचें तीरीं।**
**राहोनियां बहुकाळवरी। तप आचरता जाहला।।२५।।**
**व्हावे व्यासांचें दर्शन। हेंचि इच्छा धरुनी पूर्ण।**
**वातांबु पर्णाशन। करुनि देह शुष्क केला।।२६।।**
**जाल्या नखांच्या चुंबळी। आंगावरी वाढली धुळी।**
**जटा लोंबती भूतळीं। देह शुष्क जाहला।।२७।।**
**तंव सत्यवतीहृदयनंदन। श्रीव्यास येऊनि आपण।**
**देऊनियां अभयदान। मस्तकीं हस्त ठेविला।।२८।।**
**जो तत्त्वज्ञानाचा उपाय। "नमो भगवते वासुदेवाय।"**
**प्रणवयुक्त हा मंत्रराय। कर्णामाजीं सांगितला।।२९।।**
**परमहंसदीक्षा देऊन। बोधिते झाले तत्त्वज्ञान।**
**तेणें मूळ अविद्या निरसुन। परमानंद जाहला।।३०।।**
**उठलें अष्ट सात्त्विक भाव। चंचळ मनाची मोडली धांव।**
**कल्पनेने सांडिली हांव। ब्रह्मवस्तु अनुभवितां।।३१।।**
**अष्टांगयोगाच्या कळा। द्वैपायनें कथिल्या सकळा।**

अगोचरी मुद्रां डोळां। आखंडित बाणली।।३२।।
मावळोनि गेली बुद्धी। जाली निर्विकल्प समाधी ।
गेल्या सर्वही आधिव्याधी। सुखसमृद्धि जालिया।।३३।।
मग जयजयकार बोलून। केले श्रीगुरूचें स्तवन।
करूनिया साष्टांग वंदन। चरणीं मस्तक ठेविले।।३४।।
शिष्य पाहुनी परम धन्य। नाम ठेविले राघवचैतन्य।
संपूर्ण जगीं होशील मान्य। ऐसा वर दिधला।।३५।।

**१७. श्रीकेशवचैतन्यांना शक्तिपातप्रभावाने आत्मसाक्षात्कार :-**

श्रीराघवचैतन्यांनी श्रीकेशवचैतन्यांना शक्तिपातयोगदीक्षा देऊन आत्मसाक्षात्कार कसा घडविला याचे वर्णन श्रीनिरंजनरघुनाथांनी **"केशवचैतन्यकथातरु"** या प्रकरण ग्रंथात फार रसाळपणे केले आहे -

वैराग्यें चित्त शुद्ध जालें। स्त्रीचें ऋणही फिटलें।
ऐसें पाहुनि प्रसन्न झाले। राघवचैतन्य ते काळीं।।
अध्याय २-४९।।

संन्यासपद्धतीचे प्रकारें। माझें नामाचेनि अनुसारें।
केशवचैतन्य नाम बरें। विचार करुनी ठेविलें।।५०।।
मग शिष्यातें सन्मुख बैसवून। करिती महावाक्याचें बोधन।
शक्तिपातप्रभाव करून। साक्षात्कार केला पैं।।५१।।
होतां ब्रह्माकार वृत्ती। मनाची मोडली प्रवृत्ती।
मावळून गेली देहस्मृती। जीवभ्रांती उडाली।।५२।।
जाली निर्विकल्प समाधी। विलया गेली चित्तबुद्धी।
सुख पावले निरवधी। केशवचैतन्य ते काळीं।।५३।।
ऐसे बहुत दिवस गेले। कोणाते ठाऊकें नाहीं जालें।
पुनरपि स्मृति विसरले। करूं आदरिलें स्तवनासी।।५४।।

**१८.संतश्रेष्ठ श्रीतुकाराममहाराजांची शक्तिपाताने खेदरहित स्थिती :-**

श्रीनिरंजनरघुनाथ यांनी लिहिलेल्या **"केशवचैतन्यकथातरु"** या प्रकरण ग्रंथात संतश्रेष्ठ श्रीतुकाराममहाराजांना शक्तिपातदीक्षा कशी झाली याचे अत्यंत सुंदर वर्णन केले आहे.

आपणांस घडावें आचार्य सेवन। यास्तव गुरु करावा कोण।
हें पुसावें देवालागून। म्हणूनी गेला पंढरीसी।।
अध्याय ६-७३।।
करुनी साष्टांग नमस्कार। उभा राहिला जोडूनी कर।
विनंती करी वारंवार। श्रीविठ्ठलमूर्तीस।।७४।।
देवा! तूंचि माझी माता। आणि तूंचि माझा पिता।।
तूं माझा बंधु चुलता। आप्त सोईरा तूं सर्व।।७५।।
देवा ! तूं परम गुरू। करावा माझा अंगिकारू।
मज उपदेश करूनि परिकरु। जन्म मरण चुकवावें।।७६।।
मग बोले रुक्मिणीकांत। माझेच स्वरूप असे ओतुरांत ।
तेथें केशवचैतन्य साक्षात। उपदेश करतील तुजलागीं।।७७।।
म्यां वेदवाणी करून। मर्यादा केलीं असे जाण।
जावें महानुभावासीं शरण। माझें स्वरूप समजावया।।७८।।
म्यां रामावताराचे ठायीं। वसिष्ठ गुरु केला पाही।
तैसा कृष्णावताराचें समयीं। संदिपन गुरु केला।।७९।।
माझी वेदआज्ञापालन। मियाची केली असे जाण।
गुरुरूपही मीच होऊन। उद्धार करी जगताचा।।८०।।
नामया माझा भक्त पाही। तयासी मी सांगितलें लवलाही।
विसोबा खेचरास जाई। शरण गुरूपदेशा।।८१।।
ऐसें देवें सांगितल्यावरी। तुकया येता जाला ओतुरीं।
बाजारांत जानु तेल्याचे द्वारीं। बखळेमध्यें राहिला।।८२।।
हा वेडा आहे म्हणून। तयासी कोणी न देती ठिकाण।
मुखें करितो नामस्मरण। अन्य भाषण न करितां।।८३।।
रात्रौ तेथें करिता शयन। स्वप्नीं येऊनि एक ब्राह्मण।
पावशेर तूप भोजनालागुन। मागता जाला तुकयासी।।८४।।
मग उठोनियां प्रातःकाळीं। जाऊं लागला समाधीजवळीं।
तंव मार्गीं भेटले तयेवेळीं। केशवचैतन्य आपण।।८५।।
जात होते मांडवीस्नाना। तेव्हां तुकयानें केलें साष्टांगनमना।

आणि करिता जाला प्रार्थना। उपदेश करावा म्हणौनि।।
तुकयाचा उत्तम अधिकार। पाहुनि मस्तकीं ठेविला कर।
"रामकृष्णहरि" हा मंत्र। तयालागीं सांगितला।।८७।।
त्या मंत्राचा अर्थ सांगून। तुकयासी ठसविलें पूर्ण ज्ञान।
जेथें मायेचें नसे आवर्ण। तेंचि स्वरूप दाखविले।।८८।।
तुकयाते जाला परमानंद। सरला देवभक्तांचा खेद।
साध्यसाधनाचा खेद। सर्वापरि मावळला।।८९।।

**१९. श्रीनिळोबांना श्रीतुकारामांकडून शक्तिपातयोगदीक्षेने निजात्मस्थिती :-**

श्रीतुकाराममहाराजांना परंपरेने मिळालेली शक्तिपातयोगदीक्षा त्यांनी श्रीनिळोबारायांना देऊन कृतार्थ केले. श्रीनिळोबाराय असे म्हणतात की -

येऊनियां कृपावंतें। तुकयास्वामी सद्गुरुनाथें।।१।।
हात ठेविला मस्तकीं। देउनि प्रसाद केलें सुखी।।२।।
माझी वाढविली मती। गुणवर्णावया स्फूर्ती।।३।।
निळा म्हणे मी बोलता। दिसे परि हे त्याची सत्ता।।४।।

श्रीसंत निळोबांचा गाथा-१५७९

दीक्षा झाल्यावर आपल्याला कोणते अनुभव आले व आपली स्थिती कशी झाली याचे वर्णन करतांना श्रीनिळोबाराय असे म्हणतात की -

डोळियाचाही डोळा बुद्धी। माझी उघडूनियां कृपानिधी।
देखणी करुनियां त्रिशुद्धी। निजात्मपदीं स्थापिली।।१।।
तेणें दिसती ठायां ठावो। हृदय सकळांचेही भाव।
संत दाविती जे अनुभव। आणखीही सर्व मायाकृत।।२।।
नवल कृपेची हें जाती। फिटली मोह ममता भ्रांती।
उत्पत्ति स्थिती प्रळय होती। तें तें निगुती आटलें।।३।।
देखणें झालें नयनानयन। देखती आपुलेंही वर्तन।
राहिले ठायींच ते जडोन। अभेद होऊन देखती।।४।।

**निळा म्हणे स्वामी सद्गुरुनाथा। देखणा तूंचि मी नाहीं आतां।**
**तोडूनि मी हे माझी ममता।**
**आपणा आतौता मेळविलों।।५।।७९०।।**

**२०. श्रीसोहिरोबानाथ अंबिये यांना**
**श्रीगोरक्षनाथांकडून शक्तिपातयोगदीक्षा :-**

प्रसिद्ध संत श्रीसोहिरोबानाथ अंबिये यांना श्रीसद्गुरुकृपेचा लाभ शक्तिपातपूर्वक कसा झाला याचे मोठे चित्तवेधक वर्णन श्रीराजाराम-प्रासादी यांनी "**भक्तमंजिरीमाला**" खंड ३, या ग्रंथांत अध्याय ९४, पृ.७३० वर त्यांचे चरित्र "**त्रिविध लीलासंत**" या प्रकरणात कथन करीत असताना पुढीलप्रमाणे केले आहे.

**ऐसे प्रकारें ब्रह्मनिष्ठ। सोहिरोबा आंबे साधु श्रेष्ठ।**
**जगरीती वर्तती स्पष्ट। भावनिष्ठ सद्गुरुपदा।।८४।।**
**नित्य शेताकडे जावें। येईल त्याचे आतिथ्य करावें।**
**सर्वाभूतीं आत्मत्व पाहावे। भोजन द्यावें क्षुधार्था।।८५।।**
**कोणे एके दिनीं अरण्यांत। बैसले एका वृक्षाखालते।**
**जवळी असती शेतेंभातें। उदक वाहत निर्मळ पैं।।८६।।**
**प्राप्तीवेळ समय आला। अद्भुत वर्तली तेथ लिळा।**
**योगीयांचा स्वामी पातला। गोरक्ष ज्याला म्हणती पैं।।८७।।**
**आकाशपंथें दैदिप्यमान। नाथजींचे जालें आगमन।**
**मूर्ति पाहतां झांकले नैन। तेज पूर्ण दाटलें।।८८।।**
**सडपातळ दिव्य पुरुष। भस्मोद्धूलित अंगीं प्रकाश।**
**प्रसन्नवदन मुद्रा विलसे। आले योगेश त्या ठाया।।८९।।**
**एकत्र होता उभय दृष्टी। हारपोनी गेली सहजत्रिपुटी।**
**मंत्रोपदेश कर्णपुटीं। कृपादृष्टी नाथजींची।।९०।।**
**पद्मकर तो पडता शिरीं। देहभान कैंचें शरीरीं।**
**ताटस्था वरिली बरी। नाहीं सरी दुजी तया।।९१।।**
**घेरिला सोयरा महद्भुतानें। अचेतन पडला सहजी जाण।**
**अलक्ष मुद्रा बाणली पूर्ण। कोण जाणे तया सुखे।।९२।।**

**२१. श्रीनिरंजनांना श्रीरघुनाथांकडून चैतन्यघनस्वरूप प्राप्ती :-**

महान् दत्तोपासक व स्वप्रयत्नाने श्रीदत्तात्रेयांचे गिरनार पर्वतावर प्रत्यक्ष दर्शन घेतलेल्या श्रीनिरंजन अवधूतांनी श्रीरघुनाथस्वामींकडून शक्तिपातयोगदीक्षा झाल्यावर जे अनुभव आले त्याचे वर्णन "**स्वात्म-प्रचिती**" या आपल्या आत्मचरित्रात पुढीलप्रमाणे केले आहे-

**मग मी बहु नम्र होऊन। पुसता लागलों गुरुलागून।**
**सच्चिदानंद हे ज्ञान। सर्वीं कैं पहावें।।अ.४-४०।।**
**ऐसें देतां प्रत्युत्तर। सद्गुरु चातुर्यरत्नाकर।**
**मग होऊन बहु उदार। आनंदलहरी प्रसवले।।४१।।**
**म्हणे एक वो चातुर्यभरिता। सोडूनी पश्चात्तापव्यथा।**
**मनइंद्रियांचा करोनी लोथा। वचन माझें परियेसी।।४२।।**
**टाकोनिया शब्दविभाग। सांडूनि पोकळी दिशावलंब।**
**त्यागोनि आधार प्रकाश। चिदाकाश तें घेईं।।४३।।**
**आकाश सर्व व्यापक आहे। बाह्य दृष्टीसी न दिसताहे।**
**जेंवि हृदयांतरीं पाहे। ज्ञानदृष्टी करुनिया।।४४।।**
**मग मी तैसाच पाहूं गेलो। पाहतां तदाकारची जालों।**
**देहस्फूर्तीनें विसरलों। कोठें आहे नेणवें।।४५।।**
**कवण ध्याता कवण ध्यान। कोण श्रोता वक्ता करून।**
**पाहतां हारपुनी गेलें मन। तीव्र ध्यान लागलें।।४६।।**
**शरीरामाजीं आकाश भरलें। वाटे मस्तक भेदूनी गेलें।**
**ब्रह्मकटाहामाजीं मीनलें। स्वरूप माझें सर्वही।।४७।।**
**अंतरीं एकचि जाला गोळ। वाटे हृदयींच आहे भूगोळ।**
**खालीं वरी मध्यें निर्मळ। मीच अवघा व्यापलों।।५०।।**
**स्वरूपीं नाहीं देहभान। गुरूसी न बोलवें वचन।**
**ऐसे वृत्तीतें पाहून। सद्गुरु जाले बोलते।।५१।।**
**हेंचि ब्रह्म निराकार। निरंजन निराधार।**
**निःप्रपंच निर्व्यापार। हेंचि तुझें स्वरूप पैं।।५२।।**
**निर्मळ निष्कळंक निर्गुण। अनादि स्वरूप चैतन्यघन।**

स्वप्रकाश आत्मा आनंदघन। तें हें स्वरूप तुझें पै।।५३।।
तुझें स्वरूप निराकार। तुझेंचि रूप अजरामर।
तुज जन्म मृत्यूचा घोर। येथून आतां नसेचि।।५४।।
आतां निर्भय होय अंतरीं। सांडी द्वैताची कर्तरी।
नांदे एकपणाचे घरीं। स्वानंदेंसी सर्वदा।।५५।।
ऐंसें ऐकुनी गुरुवचन। हर्षयुक्त जालें मन।
मोठ्यानें हास्य करून। प्रेमटाळी पीटिली।।५६।।
तेथें गुरुशिष्यांचें भाषण। निघालें ब्रह्मनिरूपण।
एकाग्र चित्तीं करिता श्रवण। उन्माददशा पैं झाली।।८४।।
नेत्र भ्रुकुटी एकचि जाली। मस्तकाप्रती कळ लागली।
आकाशमय वृत्ति जाहली। भान नाहीं देहाचें।।८५।।
वाटे आकाशींच उडावें। कीं समुद्रापलीकडे जावें।
कीं ब्रह्मांडची गिळावें। तोंड पसरून आवघें।।८६।।
जैं वीर निघे युद्धाप्रती। भाट सवाया बोलती।
स्फुरण चढे वीराप्रती। बाहु उडती तटतटा।।८७।।
तैसें झालें मजलागून। वाटे मीच ब्रह्म निर्गुण।
शास्त्र वेद आणि पुराण। माझे गुण वर्णिती।।८८।।
ऐकुनि ब्रह्मींचा सोहळा। हास्य येतसे वेळोवेळा।
कंठ दाटून आला सगळा। नेत्रांलागीं दिसेना।।८९।।
आपुलें न दिसेचि शरीर। अवघें दिसे निर्विकार।
सृष्टी जाहली धूम्राकार। नाहीं आकार कोठेंही।।९२।।
क्षणक्षणिं नेत्र उघडुनि पाहे। तंव तें तैसेंचि दिसताहे।
भूमीवरी पाय न राहे। वाटे उडूनि चालिलों।।९३।।
स्फुंद स्फुंद असे रडत। पोटांत तिडिक उठती बहुत।
वायू उर्ध्वपथें चालत। शेंबूड येतसे बहुतसा।।९८।।
एक घटिकापर्यंत। अंतरीं होउनि भयभीत।
उठूनि भूमीसी पडत। उभा राहत क्षणक्षणीं।।९९।।
तंव गुरू पहाती कृपादृष्टी। म्हणती जाहली संतुष्टी।

आतां उघडुनिया पाहे दृष्टी। देहावरी येई कां।।१००।।
ऐकुनि ऐसे कृपावचन। सर्वेचि केले हास्यवदन।
सर्व शरीर शीतळपण। होऊनिया राहिलें।।१०१।।
तंव नेत्रीं बहुत निद्रा आली। मग तेथेंचि क्षणैक शय्या केली।
गाढ समाधि लागली। तुर्या म्हणती जियेसी।।१०२।।
ऐसा गुरुप्रसाद जाला। राज्यीं अभागी स्थापिला।
किं रोगिया जीवन्मुक्त केला। तैसें मजला जहाले।।१०३।।

**२२. श्रीप्रभुरामचंद्रांकडून श्रीसमर्थरामदासस्वामीमहाराजांना शक्तिपाताने स्वसुखधामप्राप्ती :-**

श्रीप्रभुरामचंद्रांनी शक्तिपाताने श्रीसमर्थांना स्वसुखधामप्राप्ती कशी करून दिली याचे वर्णन श्रीराजारामप्रासादीकृत "**भक्तमंजिरीमाला**" खंड १ ला, या ग्रंथातील श्रीसमर्थचरित्रात पृष्ठ १२ वर आले आहे.

पुढे कांही दिवसानंतर। नारायणानि केला विचार।
परब्रह्म निर्विकार। श्रीरघुवीर भेटावया।।१.१७६।।
येतद्विषयीं स्वग्रामांत। जागृतस्थान श्रीहनुमंत।
जाउनि तेथे देवालयांत। अनुष्ठानातें आरंभिले।।७७।।
करुणापर अभंग करूनि। पठण करिता मधुरध्वनि।
तयेवेळी कोदंडपाणि। प्रगटले वनीं श्रीराम।।७८।।
मग जगद्गुरु श्रीरामराया। उचंबळलें प्रेम हृदया।
नारायणाची कवळोनि काया। सुचविती कराया प्रश्नाते।।
सावध म्हणतां सावध जाहला। श्रीचरणीं मस्तक ठेविला।
बोलवेना कंठ दाटला। बळावला पश्चात्ताप।।८४।।
नंतर सावरोनि निजप्रेमा। प्रश्न केला श्रीरामा।
मेळवावे स्वसुखधामा। करपद्मा ठेवुनि शिरीं।।८५।।
ऐकूनि ऐसे कैवल्यदानी। हासिनले चापपाणि।।
मग सांप्रदायक्रमें करूनि। मंत्रकर्णीं उपदेशिला।।८६।।
दासा म्हणती सावध होई। आपआपणा तूंचि पाही।
अणुपासून ब्रह्मांड गेही। दुजा ठाईं नसे पैं।।८७।।

**येकात्मता सर्व भूतीं। गर्जता हे वेदश्रुती।**
**वशिष्ठकृपें जे आत्मप्रचीति। तेचि युक्ति निरोपिली।।८८।।**
**आत्मस्तुति ऐशा प्रकारें। सांगताचि श्रीरघुवीरें।**
**जाहली वृत्ति तदाकार। अखंडकार ब्रह्मरूप।।८९।।**
**उदकिं उदक जेवि मिळतां। नये कदापि ते निवडतां।**
**तयापरी एकात्मता। बाणली साम्यता सहजी तें।।९०।।**

**२३. श्रीशिवाजीमहाराजांना शक्तिपातयोगदीक्षेने श्रीसमर्थांकडून आत्मारामप्राप्ती :-**

छत्रपती श्रीशिवाजीमहाराज आपणास अनुग्रह व्हावा म्हणून मुद्दाम शिंगणवाडी येथे श्रीसमर्थांना भेटले. त्यावेळी श्रीसमर्थांनी त्यांना दीक्षा देऊन कृतार्थ कसे केले याचे अत्यंत रसाळ वर्णन **"भक्तमंजिरीमाला"** खंड १, पृष्ठ ४९ वर श्रीराजारामप्रासादी यांनी पुढीलप्रमाणे केले आहे.

**तों शिंगणवाडीसी आहे समर्थ। ऐसा कळला राजासी वृत्तांत।**
**शिवाजी पायउतारा तेथें। गेले चालत अनुग्रहासी।।५.१३७।।**
**कल्याणस्वामी समर्था जवळी। अष्टौप्रहर असती सर्वकाळीं।**
**अनुग्रहार्थ विनंती केली। गुरुमाउली दाखवी म्हणुनि।।१३८।।**
**अधिकार पाहुनी कल्याणस्वामी। कळवळले बहु अंतरयामीं।**
**बैसले होते जेथें स्वामी। प्रार्थिले सप्रेमीं जाऊनि तेथें।।१३९।।**
**हास्य करूनि श्रीरामदासें। म्हणति कल्याणा सांगतोसि पैं।**
**तें कळले असे। येऊ द्या येथे शिवाजीस**
**आज्ञा असे आमुचि पैं।।१४०।।**
**असो सांप्रदायक्रमें करूनि। अनुग्रह दिधला शिवाजी लागोनी।**
**मंत्र सांगता निजकर्णीं। लाधली उन्मनि राजासी।।१४४।।**
**जैसा स्फुलिंग दारूत पडतां। आवाज उठे तो तत्त्वतां।**
**नातरि सूर्य प्राप्त होता। आंधार सर्वथा न उरेचि।।१४५।।**
**असो फार काय दृष्टान्त घेणे। अधिकारी शिवाजी मुळींचा पूर्ण।**
**रामदासस्वामी सद्गुरु जाण। जीवन सकळ संतांचे।।१४६।।**

**मस्तकीं ठेविता वरदपाणि। वरिले सहजीं तेणें उन्मनि।**
**प्रकट जाले स्वरूप नैनिं। अंत:करणीं निर्द्वंद्व।।१४७।।**
**द्वैताद्वैत सरला भ्रम। अन्वय व्यतिरेक कैंचा नेम।।**
**आपुला आपण आत्माराम। लाधले वर्म गुरुकृपें।।१४८।।**

## २४. श्रीरघुनाथस्वामींकडून श्रीआनंदमूर्ती ब्रह्मनाळकरांना शक्तिपाताने अद्वयस्थिती :-

श्रीरघुनाथस्वामींची परीक्षा पाहावी म्हणून समर्थपंचायतनातील श्रीआनंदमूर्ती त्यांच्याकडे गेले होते. परंतु पुढे त्यांनी स्वत: श्रीस्वामींकडे दीक्षेची याचना "श्रीगुरुमाय करुणाघन। शिरीं हस्त ठेविजे।।१।।" या शब्दात केली. श्रीरघुनाथस्वामींनी त्यांची इच्छा पूर्ण केली. श्रीस्वामींनी श्रीआनंदमूर्तींना शक्तिपातयोगदीक्षा दिली. त्यावेळी श्रीआनंदमूर्तींची स्थिती कशी झाली याचे वर्णन श्रीराजारामप्रासादी यांनी **"भक्तमंजिरीमाला"** खंड १, अध्याय २२, पृष्ठ २१६ वर केले आहे.

**रघुनाथस्वामीसी पाहाता नैनीं। आनंदमूर्ती पडिले मेदिनी।**
**दृष्टिपात तत्क्षणीं धरिले उन्मनी। नयन ते।।२२.२१।।**
**कैंचि डांग कैंचे भाषण। विरोनि गेले देहभान।**
**ठाईच गळाला अभिमान। मी तूं पण न दिसे तें।।२२।।**
**कर्पूर वह्नी येकवटला। अवघाचि जाहला बंबाळा।**
**तैसी गती आनंदमूर्तिला। साधले स्थितीला गुरुदर्शने।।२३।।**
**नातरी दारूचा पर्वत। अग्निस्पर्शें उडोनी जात।**
**किंबहुना पिशाञ्च पळत। पडतां श्रवणांत हरिनाम।।२४।।**
**पश्चात्ताप बळावला। विरक्तीनें घातली माळा।**
**कोण वर्णि त्या वैभवाला। संशय पळाला दिगंतरीं।।२७।।**
**मग सांप्रदायक्रमें श्रीगुरुनाथें। उपदेश केला आनंदमूर्तिते।।**
**ते वाच्यांशद्वारें ग्रंथातें। लेखन केउते करूं मी।।२८।।**
**श्रवणीं पेरिलें निजबीज। नैनिं उगविले सतेज।।**
**अंतर्बाह्य फाकले सहज। नवल चोज गुरुकृपेचें।।२९।।**

**सहज समाधि अद्वय स्थिती। नसेचि तेथें दिवाराती।**
**नित्योदय आनंदमूर्ती। अद्वयस्थिती भोगिली ते।।३०।।**
**पिंड ब्रह्मांड निरसलें। तत्त्वीं तत्त्व विभागले।**
**जीवशीव मावळले। तया सोज्वळ चिद्गगनीं।।३१।।**
**अहंसोहं भेदभाव। आनंदीं विरालें निजस्फुरण।**
**उमस खाऊ नेंदी क्षण। वृत्ती लीन परब्रह्मीं।।३२।।**
**ऐसा होता स्वरूपानुभव। कर्म धर्म जाहले वाव।**
**आपीं आप स्वयमेव। वासुदेव परमात्मा।।३३।।**
**प्रवृत्ति भाग राहिला। देहस्मृती नसे ज्याला।**
**स्वइच्छा वर्ते योगी भला। परमपदाला मीनला तो।।३४।।**

**२५. श्रीतुकामाईकडून श्रीगोंदवलेकरमहाराजांना शक्तिपाताने ब्रह्मचैतन्यप्राप्ती :-**

"**श्रीगोंदवलेकरमहाराज चरित्र व वाङ्मय**" या ग्रंथात प्रा.श्री.के.वि. बेलसरे यांनी पृष्ठ ५६ वर श्रीतुकामाईकडून श्रीगोंदवलेकरमहाराजांना शक्तिपातयोगदीक्षा कशी झाली याचे अत्यंत हृद्य वर्णन केले आहे.

श्रीमहाराज देहाभिमानशून्य झाले आहेत अशी श्रीतुकामाईंची खात्री झाली. येहळेगावला येऊन श्रीमहाराजांना नऊ महिने झाले होते. या कालामध्ये त्यांना गोंदवल्याची किंवा आपल्या मातापित्यांची आठवण झाली नाही. श्रीगुरूच्या अखंड सेवेमध्ये ते स्वतःचे भान विसरले. त्यांच्या मनाचे व्यापार स्तब्ध झाले. भूक, तहान, झोप वगैरे देहधर्म सुटले. अंतःकरण पूर्ण निर्वासन झाले आणि खऱ्या चित्तशुद्धीचे तेज त्यांच्या शरीरावर झळकू लागले. लवकरच श्रीरामनवमी आली. आपल्या बरोबरच्या इतर मंडळींना श्रीतुकामाईंनी उत्सवासाठी उमरखेडला पाठवून दिले. श्रीरामनवमीच्या दिवशी भर उन्हात दोघे गुरु-शिष्य रानात गेले. जवळच्या एका शेतामध्ये दोघांनीही स्नाने केली. एका अशोकवृक्षाखाली श्रीतुकामाईंनी श्रीमहाराजांना हात धरून आपल्यासमोर बसविले आणि बोलले "मी तुला आजपर्यंत फार कष्ट दिले. पण पूर्वी श्रीवसिष्ठांनी

श्रीरामचंद्राला जे दिले ते मी तुला आज याक्षणी देतो!" असे सांगून त्यांनी श्रीमहाराजांच्या डोक्यावर हात ठेवला. श्रीमहाराजांना तत्काळ समाधी लागली. पुष्कळ वेळानंतर जेव्हा समाधी उतरली तेव्हा ब्रह्मचैतन्य असे त्यांचे नाव ठेवले आणि त्यांना अत्यंत प्रेमाने आलिंगन दिले. "श्रीराम जय राम जय जय राम" - हा त्रयोदशाक्षरी मंत्र जपून श्रीरामोपासना करावी असे सांगून श्रीतुकामाईंनी श्रीमहाराजांना रामदासी दीक्षा दिली व अनुग्रह देण्याचा अधिकार दिला.

**२६. श्रीनारायणतीर्थदेवांना श्रीगंगाधरतीर्थांकडून सिद्धयोगदीक्षा :-**

श्रीनारायणतीर्थस्वामीमहाराजांचे नाव संन्यास घेण्यापूर्वी कालीकिशोर असे होते. त्यांना शक्तिपातयोगदीक्षा कशी झाली याचे वर्णन **"श्रीनारायण उपदेशामृत"** या पुस्तकात श्रीस्वामी शिवोम्तीर्थमहाराज यांनी केले आहे.

"कालीकिशोर का स्वामीजीके दर्शनार्थ नित्य नियमित आना-जाना आरंभ हो गया। एक दिन कालीकिशोरने निवेदन किया कि महाराज मुझे कुछ सिखलाइये। श्रीस्वामीजीने जपपर बल देते हुए कहा कि मंत्र जपसे सब कुछ हो जाता है।" कालीकिशोरने कहा कि, "मैंने बहुत मंत्रजप किये है; परन्तु कोई प्रत्यक्ष फल अनुभव नहीं हुआ।" तब श्रीस्वामीजीनें एक छोटीसी पुराणी गीतामेंसे कुछ श्लोक पढवाये और फिर एक साधूसे छोटीसी दूसरी गीता मंगवाकर कालीकिशोरको पढनेंको दी। इन्होंने एक महीनेमें कितनेही श्लोक याद कर लिये। तब राजयोग ब्रह्मविद्याके लिये श्रीस्वामीजी महाराजसे प्रार्थना की। किंतु कुछ उत्तर न मिला।"

एकदिन फिर प्रार्थना करनेपर श्रीस्वामीजी बोले- "क्या मांगता है, रे। हम तुमको हमारे माफक कर देंगे। सर्व प्रकारके साधनोंके लिए यह गीता सबसे मुख्य है। इसमें कर्म, ज्ञान, भक्ति, योग सब वर्णित है।"

सन १८८९ इसवी की अक्षयतृतीया को शुक्रवार था। स्वामीजीने कालीकिशोर को स्नानादि क्षौर करवाया और कुछ पुष्प लेकर

आनेको कहा। हाथोंके पुष्प श्रीस्वामीजीनें दक्षिणारूपमें ग्रहण करके कहा की, तुमको मंत्रसहित योगकी दीक्षा देते हैं। योग, ज्ञानकी विभिन्न भेदपूर्ण बातें बतलाये हुये कहा - "यह जो कुछ देखता हूँ, मैं ही हूँ यह भाव तेरेमें प्रस्फुटित हो गया है। जब यह भाव मनमें परिपक्व अवस्थामें आ जाय तो समझना की तेरेमें ज्ञान की पराकाष्ठा आ गई। ज्ञान का यही लक्षण है। तत्काल कालीकिशोरके अंदर मंत्रजप होने लगा तथा स्वामीजीके ज्ञान भरे शब्द उनके अंदर ज्ञानशक्तिका संचार करने लगे। वे एक अपूर्व अनिर्वचनीय आनंदका अनुभव करने लगे। उनके मन और शरीरमें बडा बल संचारित हो गया तथा हृदय आनंदसे परिपूर्ण हो गया और एक सहज अव्यक्त ज्ञान उत्पन्न हुआ। (पृ.७-८)"

## २७. श्रीनारायणतीर्थांकडून श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थांना शक्तिसंक्रमण :-

श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थस्वामीमहाराजांचे पूर्वाश्रमीचे नांव रोहिणीकुमार असे होते. त्यांना श्रीनारायणतीर्थस्वामीमहाराजांकडून दीक्षा कशी झाली व अनुभव काय आले याचे वर्णन **"योगविभूति"** या पुस्तकात श्रीस्वामी शिवोम्तीर्थमहाराजांनी केले आहे.

"सन १९१० के मार्गशीर्ष द्वितीयाको रोहिणीकुमार की दीक्षा हुई। पहले दिन उन्हें मूलाधारमें वामावर्त घुमावटमें एक पेच खुलतासा प्रतीत हुआ। आगे घर जाकर कमरेमें आसनपर बैठकर जप करनें लगे। शीघ्रही बाह्य ज्ञान लुप्त हो गया। किंतु अंतर्ज्ञान बना रहा। जिसप्रकार बांस नलीमें कोई वस्तु उपर निचे चलती है ऐसेही प्राणशक्तिका चालन नीचेसे उपर और उपरसे नीचे अनुभवमें आने लगा। जब शक्ति ऊपरसे नीचे उतरती तो मूलाधार में खट् सा शब्द होता और फिर कुछ उपर चढता हुआसा प्रतीत होता। शक्तिके इस प्रकार चढने उतरनेकी क्रिया पर आपका मन एकाग्र हो गया। साथही साथ श्वास प्रश्वास प्रक्रिया भी अंदर बाहर न होकर अंदर ही अंदर हो रही थी। थोडी देरमें फिर बाह्य ज्ञान लुप्त हो गया। और

अंतमें स्वतः जप होने लगा। देखा, एक अपूर्व ज्योती नभसे भूतक फैली हुई है। और फिर उसीके अंदर अपनी मंत्रप्रतिपादित शक्ति प्रकट हो गई। दर्शन करके शरीर पुलकित हो गया और रोमांच हो उठा - "अहा! कैसा दिव्य रूप और अपूर्व ज्योती है।"

थोडी देरके बाद आप उसी भावावस्थामें उठ बैठें और बाहर निकल आये। ऐसा अनुभव हुआ कि सकल दृश्यमान् जगत् मधुमय है। जिधर जिधर और जहाँ जहाँ दृष्टि जाती सब मधुमयही प्रतीत होता। मंदिरके सामने आमका पेड, बगीचेमें लगे नानाविध पुष्प, मकान, खेत, सब मधुमयी जीवन धारण किये दिखाई दे रहे थे। कौएकी आवाज भी मधुर सुनाई दी। ऐसा लग रहा था जैसे सर्वत्र आनंद की धारा प्रवाहित हो रही हो।" (५६ ते ६२)

याचप्रकारे श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थस्वामीमहाराजांकडून श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराजांना व त्यांच्याकडून माझे गुरुदेव परमपूजनीय श्रीगुळवणीमहाराज यांना शक्तिपातयोगाची दीक्षा मिळाली. श्रीगुरुदेवांनी हिंदुस्थानातील हजारो साधकांना ही दीक्षा देऊन परमेश्वरप्राप्ती सुलभ करून दिली आहे व आजही परंपरेच्या द्वारा ते हे दीक्षादानाचे कार्य माझ्याकडून करवून घेत आहेत.

**२८. श्रीगुळवणीमहाराजांना श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराजांकडून स्वप्न व प्रत्यक्ष दीक्षा :-**

माझे सद्गुरू योगिराज श्रीसंतगुळवणीमहाराज यांना श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराज यांच्याकडून स्वप्नात व मागाहून प्रत्यक्ष रीतीने शक्तिपातयोगदीक्षा कशी झाली याचे वर्णन श्री.अच्युत सिद्धनाथ गोटभरे यांनी श्रीस्वामींच्या "**चैतन्य चक्रवर्ती**" या चरित्रात पुढीलप्रमाणे मोठ्या रसाळ व आकर्षक पद्धतीने केले आहे.

"१९२२ साली श्रीगुरुदेव प्राणायामाने कुंडलिनी शक्ती जागृत करण्यासाठी हुशंगाबाद येथे जाऊन राहिले होते. तेथेच त्यांची श्रीस्वामींशी भेट झाली. त्यांनी श्रीस्वामींना योगदीक्षा मागितली.

त्यावेळी स्वामी म्हणाले, "वेळ आल्यावर दीक्षा जरूर होईल." त्यामुळे श्रीस्वामींच्या कृपेची वाट पाहण्याशिवाय गत्यंतर नव्हते. परंतु त्यांना फार दिवस वाट पाहावी लागली नाही.

१९२२ सालातील कार्तिक कृष्ण एकादशीस पहाटेच्या वेळी श्रीगुरुदेवांना एक स्वप्न पडले. हुशंगाबादेच्या निवासस्थानात श्रीगुरुदेव बसले आहेत. श्रीस्वामीजी पलंगावर बसलेले आहेत. श्रीस्वामीजी एकदम उभे राहिले आणि हळूहळू श्रीगुरुमहाराजांकडे येऊ लागले. श्रीस्वामीजींच्या मुखावरील तेज तळपू लागले. भगव्या वस्त्रांनी व भस्मांकित भालप्रदेशाने संपूर्ण घरभर दिव्यतेज पसरले होते. श्रीस्वामी श्रीगुरुमहाराजांच्या जवळ येऊन एकटक रोखून पाहत म्हणाले, "वामन! बैस तुला आताच येथे दीक्षा होईल. बघ तुझी कुंडलिनी शक्ती जागृत होते की नाही!"

श्रीस्वामीजींचे बोलणे संपते न संपते तोच श्रीगुरुमहाराजांचे भान हरपले. तेवढ्यात स्वामींचे आणखी एक वाक्य त्यांच्या कानावर पडले. ते म्हणाले, "डोळे मिट." असे म्हणता म्हणताच श्रीस्वामीजींनी त्यांच्या मस्तकावर हात ठेवला. आज्ञाचक्राला अंगुलीस्पर्श केला. मेरुदंडावरून खालून वर हात फिरविला. मूलाधारापासून सहस्रारा-पर्यंतचा मार्ग मोकळा केला. श्रीगुरुमहाराजांना खूप मोकळे वाटले. हळूहळू त्यांना क्रिया सुरू झाल्या. क्रियांचा वेग जेव्हा खूप वाढला तेव्हा झोप आपोआप संपून डोळे उघडले गेले. पुढे पाहतात तो श्रीस्वामीजी समक्षच पलंगावर ध्यानमग्न अवस्थेत बसलेले दिसले. उत्तररात्रीची वेळ होती. स्वप्न चांगले होते. चांगले स्वप्न पडले की, झोपू नये असे शास्त्र असल्याने श्रीगुरुमहाराज झोपले नाहीत. या स्वप्नाची प्रचीती आपल्याला प्रत्यक्षात येऊन जीवित धन्य व्हावे अशी ओढ लागून त्यांच्या मनात खूप विचार मंथन झाले.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी श्रीस्वामीजी फिरून आल्यावर पलंगा-वर बसले. श्रीगुरुदेव त्यांच्या समोरच बसले होते. त्यांच्याबरोबर त्यांचे मित्र व आईही तेथे होती. त्या वेळी श्रीस्वामीजींनी श्रीगुरुदेवांची

विचारपूस केली. श्रीस्वामीजींनी "प्राणायामाच्या अभ्यासाने काही लाभ होतो का? व कुंडलिनी शक्तीची जागृती व्हावी या उद्देशाने प्राणायामाचा अभ्यास सुरू केला होता त्याचे काय झाले?," असे विचारले. त्यावर श्रीगुरुमहाराज असे म्हणाले की, "शरीर हलके वाटते, यापेक्षा सांगण्यासारखा विशेष लाभ जाणवत नाही व अजून शक्तीची जागृती काही झाली नाही." हे उत्तर ऐकून श्रीस्वामीजी असे म्हणाले की, "किती कष्ट पडतात हे! हे कष्ट पाहूनच मला तुझी दया येते. तू फार सहनशील आहेस हेच खरे. पण असे कष्ट किती दिवस करीत बसणार?" त्यावर श्रीगुरुमहाराज असे म्हणाले की, "आपली कृपा जोपर्यंत होत नाही तोपर्यंत असे कष्ट करणे भागच आहे. आपल्या कृपेने मला काही अनुभव येईल का?" हे ऐकल्याबरोबर श्रीस्वामीजी एकदम म्हणाले, "अरे! अनुभव का येणार नाही? सूर्य पाहण्यासाठी दिवटी का न्यावी लागते? हातातल्या कांकणासाठी आरसा थोडाच लागतो? तुला अनुभवच घ्यावयाचा आहे ना? मिट डोळे नि घे अनुभव!"

श्रीस्वामीजींनी सांगितल्याप्रमाणे श्रीगुरुदेवांनी डोळे मिटले. त्याबरोबर शक्तिसंचार सुरू झाला. त्या आदिमाया कुंडलिनीच्या जागृतीने त्यांना बेभान करून टाकले. विद्युल्लतेने मेघपंक्तीना चिरून टाकावे व जणू काही आकाश फाडून टाकावे असा शक्तिसंचार श्रीगुरुदेवांच्या ठिकाणी झाला. मुसळधार जलवृष्टीने व झंझावाती वाऱ्याने प्रलय करावा तसा तो शक्तिसंचार होता. पर्वतप्राय उसळणाऱ्या सागरी लाटांनी आकाश-पाताळ एक करून टाकावे असे त्याचे रौद्रस्वरूप होते. साऱ्या त्रिभुवनाला घुसळून टाकणारी महान् शक्ती जागृत झाली होती.

प्राणायामाने शुद्ध झालेल्या शरीरात नानातऱ्हेच्या क्रियांचा तीव्र आवेश होत होता. शरीर इकडून तिकडे उसळून पडत होते. उंच उंच उसळत होते. अक्षरशः जमिनीपासून दीडदीड फूट उंच सर्व शरीर एखाद्या चेंडूप्रमाणे उसळत होते. काही वेळाने ही क्रिया कमी

झाल्यावर बंधत्रय लागले आणि भस्त्रिका सुरू झाली. श्वासोच्छ्वासाचा वेग वाढत चालला. श्वासांच्या क्रियांनी पुन्हा सर्व शरीराला घुसळून काढले. श्रीगुरुमहाराजांचे अशा प्रकारे एकतास साधन झाले. स्वप्नाप्रमाणे प्रत्यक्ष दीक्षानुभव आल्याने त्यांना समाधान वाटले."

येथपर्यंत जी उदाहरणे दिली आहेत, त्यावरून हे स्पष्ट होते की, शक्तिपातयोग ही वैदिक साधना आहे. तत्काल अनुभव देणारे व ब्रह्मप्राप्ती सुलभ करणारे इतके प्रभावी साधन दुसरे नाही. भगवद्भक्तीचा उन्मेष हे शक्तिपाताचे मुख्य लक्षण आहे. नुसत्या पौरुषप्रयत्नाने भगवत् प्राप्ती होणे शक्य नाही. यासाठी शक्तिपात हा झालाच पाहिजे. यालाच श्रीभगवंताचा अनुग्रह किंवा कृपा असे म्हणता येईल.



# - आधार दहावा -

## ★शक्तिपातयोगाची साधनसंपत्ती★

१) साधनसंपत्तीचा महिमा

२) साधनसंपत्तीच्या समुच्चयाची अपरिहार्यता

३) श्रीगुरुभक्ती -

अ) श्रीगुरू शब्दाचा अर्थ

ब) श्रीगुरुतत्त्व म्हणजे काय?

क) श्रीगुरूंचे खरे स्वरूप व कार्य-

श्री) अनुग्रह करणे

ना) आनंदाची मंगलमय अनुभूती

रा) योग्य शिष्याचा उद्धार व अयोग्याला योग्य करणे

य) समभावसंपन्नता

णा) दुःखनिवृत्ती

य) शक्तिजागरण

न) ज्ञानदान

मः) दिव्यचक्षूंचे उन्मीलन

ड) आदर्श श्रीगुरूंची लक्षणे

द) अनुभूतीची प्राप्ती त्त) विविध गुणलक्षणे

इ) सत् शिष्याची लक्षणे

रा) शरणागती म) विविधगुण

ई) श्रीगुरुभक्तीचा उच्च आदर्श

भ) श्रीगुरुपादुकापूजन

वा) सेवा

नी) साधनरतता

उ) श्रीगुरुशिष्यसंबंधाची परिणती

४) साधन चतुष्टय

ए) नित्यानित्यवस्तुविवेक ऐ) वैराग्य

**ओ) शमदमादि षट्संपत्ती**

**श्री) शम कृ) दम ष्णा) उपरती**

**य) तितिक्षा न) श्रद्धा मः) समाधान**

**औ) मुमुक्षुता**

**५) यम व नियम -**

**यम -**

**श्री) अहिंसा गो) सत्य पी) अस्तेय**

**ज) आर्जव न) क्षमा व) धृती**

**ल्ल) अपरिग्रह भा) दया य) शौच**

**न) आहार मः) ब्रह्मचर्य**

**नियम -**

**द) संतोष त्ता) तप**

**त्रे) साधनाभ्यास य) ईश्वरप्रणिधान**

**६) विविध गुणयुक्त साधनसंपत्ती**

**श्री) शास्त्रावर निष्ठा**

**पा) साधनावर विश्वास**

**द) साधनातील विघ्ने**

शक्तिपातयोगसाधनेने अध्यात्ममार्गाची वाटचाल करणाऱ्या किंवा करू इच्छिणाऱ्या प्रत्येक साधकाला असे वाटत असते की, आपले मन लवकरात लवकर एकाग्र व्हावे, विषयांचा विसर तत्काल पडावा, इंद्रियांचे चांचल्य त्वरित् नाहीसे व्हावे, मनाचे मनपण अविलंब संपावे व त्याची हाव शीघ्र नाहीशी होऊन ते हृदयात विलीन होऊन जावे. काही काही साधकांना तर असे वाटते की, साधन सुरू झाल्याबरोबर मनातील सर्व विचार संपून अत्यंत शीघ्रतेने मन एकाग्र व्हावे व ब्रह्मज्ञान प्राप्त होऊन अनिर्वचनीय सुखाचा लाभ व्हावा. शक्ती जागृत झाल्यावर ती एकदम सहस्रारात पोहोचावी व समाधी लागावी. परंतु प्रत्यक्षात असे एकदम घडत नाही. हे असे का होते? याचे कारण असे आहे की, साधकाजवळ पुरेशी साधनसंपत्ती नसते. जर शास्त्राने

सांगितलेली फले पूर्णांशाने मिळावी असे वाटत असेल तर तितक्याच दर्जाची साधकाची तयारीही अपेक्षित असते. अन्यथा परिणामात साधनसंपत्तीच्या न्यूनाधिक्याने तफावत दृष्टीस पडते. या दृष्टीने प्रथम साधनसंपत्तीचा महिमा पाहून मग प्रत्यक्ष साधन-संपत्तीकडे वळू.

**साधनसंपत्तीचा महिमा :-**

साधनसंपत्तीचे पहिले वैशिष्ट्य हे आहे की, ही संपत्ती जर साधकाजवळ नसेल तर त्याची एखाद्या भिकाऱ्यासारखी स्थिती होते. श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी **"एकवीस समासीच्या"** पाचव्या अध्यायात असे म्हटले आहे की -

**अथवा गुरू पूर्ण कृपा करी। शिष्य जाहला अनधिकारी।**
**भाग्य पुरुषाचा भिकारी। पुत्र जैसा।।५।।**
**तैसें एकाविण एक। होतसे निरर्थक।**
**परलोकींचें जें सार्थक। तें तरी दुरावे।।६।।**
**म्हणोनि सद्गुरू आणि सच्छिष्य। तेथें न लागती सायास।**
**त्या उभयतांचा हव्यास। पुरे एकसरां।।७।।**

श्रीगुरू आपली शक्ती शिष्याच्या ठिकाणी संक्रमित करून त्याच्यावर पूर्ण कृपा करतात. परंतु साधनसंपत्तीच्या अभावी शिष्याचा अधिकार कमी पडल्याने त्याची स्थिती श्रीमंत माणसाच्या भिकारी मुलासारखी होते. श्रीगुरू शिष्यावर कृपा करताना पूर्ण कृपाच करतात. परंतु शिष्याच्या योग्यतेनुसारच कृपास्वीकृतीचे प्रमाण स्वाभाविकपणे निश्चित होत जाते. ज्या जीवाचा जसा अधिकार असतो तसा त्याला लाभ होतो. श्रीसद्गुरूंच्या कृपारूप गंगेचा प्रवाह वाहत असूनही साधकाचे भांडे लहान असल्याने, त्याची झोळी फाटकी असल्याने व त्याची पूर्वजन्माची तितकी तयारी नसल्याने त्याला पूर्ण समाधान मिळत नाही. अधिकारी श्रीगुरू व अधिकारी शिष्य असल्याशिवाय संपूर्णांशाने फलनिष्पत्ती होत नाही व सर्व गोष्टी निरर्थक होतात. शिष्याची इच्छा तयारीअभावी अपूर्ण राहते. जीवनाचे सार्थक घडले नाही असे त्याला वाटते. परंतु ज्यावेळी श्रीसद्गुरू व सच्छिष्य एकत्र येतात त्यावेळी

कसलेही श्रम पडत नाहीत. त्रास होत नाही. आपल्याला चांगला अधिकारी शिष्य मिळून परंपराप्राप्तज्ञानाचे संक्रमण होऊन बोधाची अतुट परंपरा सिद्ध व्हावी ही श्रीसद्गुरूंची इच्छा पूर्ण होते व आपल्याला श्रीसद्गुरूंकडून ब्रह्मज्ञान प्राप्त व्हावे ही शिष्याची आकांक्षा सफल होते. यावरून हे स्पष्ट दिसते की, शक्तिपातयोगाचे जे फल शास्त्राने सांगितले आहे ते प्राप्त होण्यासाठी शिष्य हा साधनसंपत्तीचा अधिकारी असला पाहिजे.

**साधनसंपत्तीच्या समुच्चयाची अपरिहार्यता :-**

विमलज्ञानप्राप्तीसाठी साधनसंपत्तीच्या समुच्चयाची उपस्थिती नितांत आवश्यक आहे असे श्रीसमर्थांनी "**श्रीदासबोधाच्या**" पाचव्या दशकाच्या तिसऱ्या समासात पुढीलप्रमाणे सांगितले आहे.

**म्हणौनी साधन अभ्यास आणि सद्गुरू।**
**सच्छिष्य आणि सच्छास्त्र विचारू।**
**सत्कर्म आणि सद्वासना पारू। पाववी भवाचा।।१२।।**
**सदुपासना आणि सत्कर्म। सच्छिष्य सत्क्रिया आणि स्वधर्म।**
**सत्संग आणि नित्यनेम। निरंतर।।१३।।**
**ऐसें हें अवघेंचि मिळे। तरीच विमळ ज्ञान निवळे।**
**नाहीं तरी पाषांड संचरे बळें। समुदायीं।।१४।।**

श्रीसंत तुकाराममहाराजांनीही ज्ञानप्राप्तीसाठी, श्रीगुरुकृपेसाठी व त्रिगुणातीत होण्यासाठी साधनसमुच्चयाची नितांत आवश्यकता आहे हे पुढील दोन अभंगात सांगितले आहे.

**साधकाची दशा उदास असावी। उपाधी नसावी अंतर्बाहीं।।१।।**
**लोलुप्यता काय निद्रेतें जिणावें। भोजन करावें परिमित।।२।।**
**एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं भाषण। प्राण गेल्या जाण बोलों नये।।३।।**
**संग सज्ञनांचा उच्चार नामाचा। घोष कीर्तनाचा अहर्निशीं।।४।।**
**तुका म्हणे ऐशा साधनी जो राहे। तोचि ज्ञान लाहे गुरुकृपा।।५।।**

**- अभंग दुसरा -**

**निर्वाहापुरतें अन्न आच्छादन। आश्रमासी स्थान कोपी गुहा।।१।।**

**कोठेंही चित्तासी नसावें बंधन। हृदयीं नारायण साठवावा।।२।।**
**नये बोलों फार बैसों जनामधीं। सावधान बुद्धी इंद्रियें दमी।।३।।**
**तुका म्हणे घडी घडीनें साधावी। त्रिगुणांची गोवी उगवोनि।।४।।**

**"हठयोगप्रदीपिकेतही"** योगाभ्यास प्रतिबंधक गोष्टींचा उल्लेख करून साधनसंपत्तीचा महिमा सूचित केला आहे.

**अत्याहारः प्रयासश्च प्रजल्पो नियमग्रहः।**
**जनसङ्गश्च लौल्यञ्च षड्भिर्योगो विनश्यति।।१.१५।।**
**वर्जयेद् दुर्जनप्रान्तं वह्नीस्त्रीपथिसेवनम्।**
**प्रातःस्नानोपवासादि कायक्लेशविधिं तथा।।१.६१।।**

भुकेपेक्षा जास्त भोजन करणे, व्यायामादि खूप श्रम करणे, अतिशय बोलणे किंवा बडबडणे, प्रातःकालचे स्नान, फलाहार, नक्त इत्यादि नियम व बंधने स्वतःवर लादून घेणे, लोकांच्या संगतीत राहणे व लोलुपता असणे या सहा गोष्टी घडल्या की, योगाचा नाश होतो. यासाठी साधकाने उपरोक्त निषेधादि गोष्टी टाळून साधन केले पाहिजे.

साधकाने दुःसंगती टाळावी. दुर्जनांशी प्रीती करू नये. वाईट जागी जाऊ नये. अग्नीपाशी बसून सतत शेक घेऊ नये. अत्यंत कामासक्त व स्त्रीसक्त असू नये. फार चालू नये, प्रातःस्नान करू नये. अत्यंत कडक उपवास करू नयेत. फार कष्टाचा व्यायाम करू नये. अर्थात् आपापल्या वर्णाश्रमधर्मांशी, शरीरप्रकृतीशी, स्वभावाशी प्राप्त-परिस्थितीशी व देशकाल वर्तमानाशी मेळ घालून नियमांचे पालन करावे.

श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनीही **"परी हें तरीच घडे। जरी संयमाचीं अखंडें। सर्वद्वारीं कवाडें। कळासती।।८.११२।। हें सर्वस्व आमुचें गूढ। परि दाविलें तुज उघड। आतां इंद्रियां देऊनि कवाड। हृदयीं भोगीं।।९.१३५।। हा दंशु जंव नये हातां। तंव माझे साचोकारपण पार्था। न संपडे गा सर्वथा। जेंविं तुषीं कणु।।१३६।।"** असे सांगून **"श्रीज्ञानेश्वरीत"** साधनसंपत्तीचा महिमा गायिला आहे.

**श्रीगुरुभक्ती :-**

शक्तिपातयोगाच्या साधनसंपत्तीत श्रीगुरुभक्तीला अनन्यसाधारण महत्त्व आहे; कारण श्रीगुरुभक्ती हा साधनसंपत्तीच्या सर्व गुणातील सर्वश्रेष्ठ गुण आहे. श्रुती, स्मृती, पुराणे, अवतारी पुरुष, ऋषी, मुनी, संत महंत यांनी शेकडोशे प्रकारे व अनंत पद्धतीने श्रीगुरुभक्ती या एकाच विषयाचे माहात्म्य सांगितले आहे. श्रीगुरुभक्तीच्या असामान्य महिम्याने, श्रेष्ठत्वाने, भव्यत्वाने, दिव्यत्वाने व अलौकिकत्वाने प्राप्त झालेल्या अनुभूतीच्या वैभवाने या सर्वांना इतकी मोहिनी घातलेली दिसून येते की, या विषयाचे वर्णन करताना त्यांच्या प्रतिभेचे जे नवनवीन उन्मेष प्रकट झालेले दिसतात त्यामुळे मन स्तिमित होऊन जाते. श्रीगुरुभक्तीचे सामर्थ्य ज्यांनी ओळखले व त्यांच्या कृपेच्या वर्षावात जे न्हाऊन निघाले त्या त्या सर्वांनी श्रीगुरुभक्ती या एकाच विषयाला अत्युच्च स्थान देऊन आपले वाङ्मयकौशल्य पणाला लावल्याचे दृष्टिगोचर होते. भारतीय वाङ्मयाच्या कानाकोपऱ्यात या दिव्य विषयाचे वैभव आपला रंग उधळीत असल्याचे पाहिले की, याचे अपरंपार महत्त्व लक्षात आल्यावाचून राहत नाही. या विषयाच्या रंगामध्ये खूप विविधता आहे. त्या विविधतेचे दर्शन साधकाला होणे जरूर आहे; कारण हा श्रीसद्गुरुमहिमा अंतरंगात बिंबला म्हणजे **"ऐसा माझा श्रीसद्गुरुस्वामी। तोडूनि टाकिली माझी मी मी। आपुलिया निजपदयुग्मीं। ऐक्यता केली।। एकवीस समासी १.२४।।"** या श्रीसमर्थोक्तीप्रमाणे धन्योद्धार निघून जीवन सर्वार्थाने कृतार्थ होते.

श्रीसद्गुरूंचा हा महिमा **"भारतीय संस्कृति और साधना"** या ग्रंथातील **"मनुष्यत्त्व"** या लेखात म.म.श्रीगोपीनाथ कविराज यांनी फार सुंदर वर्णन केले आहे. ते असे म्हणतात की, "श्रीभगवान् शंकराचार्यांनी देखील महापुरुषांच्या आश्रयाचा महिमा मुक्तकंठाने गायिला आहे. ते महापुरुष म्हणजे दुसरे तिसरे कोणी नसून श्रीसद्‌गुरूच होत. असे हे मानव देहधारी श्रीसद्गुरूच भ्रांत जीवांना आपल्या मूळ स्वरूपाकडे पोहोचते करून त्यांना चैतन्यरूप करणारे खरे अधिकारी असतात.

एखाद्या साधकाला दुर्लभ असे तीव्र वैराग्य, तीव्रतर निवृत्तिभाव व मुक्तीची तीव्रतम आकांक्षा पूर्वपुण्याईने उत्पन्न झाली तरीसुद्धा त्याने अत्यंत दुर्लभ अशा श्रीसद्गुरुकृपेची प्राप्ती करून घेणे अगदी अपरिहार्य व आवश्यक ठरते. भ्रांत जीवांना ब्रह्मानंद प्राप्त करून देण्याचा हा अधिकार देवतांनाच काय; परंतु मुक्त पुरुषांनाही असत नाही. एकमात्र श्रीसद्गुरूच हे कार्य करू शकतात.

साधकाला श्रीसद्गुरूंचा शोध करीत फिरावे लागत नाही. मात्र कधी कधी आपल्या कर्मक्षयासाठी प्रयत्न करणे आवश्यक असते. मग वेळ आली की श्रीसद्गुरूच स्वतः मुमुक्षू जीवांना दर्शन देतात. **( ऐसीं कर्मे साम्य दशा। होय तेथ वीरेशा। मग श्रीगुरु आपैसा। भेटेचि गा।। श्रीज्ञानेश्वरी १८-९६६।।)** श्रीसद्गुरूंशिवाय कोणताही जीव मार्गप्राप्ती करू शकत नाही. मग मार्गक्रमण करणे तर फार दूर राहिले. त्यांच्या आश्रयाशिवाय मार्गावर चालण्याची शक्ती कोणाही जीवामध्ये नसते. इतकेच नव्हे; तर श्रीमहालक्ष्मीचा साक्षात् परिचय त्यांच्याशिवाय इतरांना असत नाही. जीव अल्पज्ञ असल्याने मायेमुळे मोहित होऊन दिग्भ्रांत झाल्यामुळे अनंत जन्म भटकतच राहतो. त्यामुळे श्रीसद्गुरूंची प्राप्ती होणे मोठे दुष्कर ठरते. श्रीसद्गुरू हे वास्तविक श्रीभगवानच असतात. श्रीगुरूंच्या अनुग्रहशक्तीलाच गुरुपद म्हणतात. ते उपेय आहेत म्हणजे उपायांच्या सहयोगाने त्यांची प्राप्ती होते. परंतु श्रीसद्गुरूच प्रत्यक्ष उपाय आहेत. त्यांनी भ्रांत जीवांना आपल्याकडे येण्याचा मार्ग जर दाखविला नाही तर त्यांना शोधून काढणे केवळ अशक्य असते. श्रीसद्गुरूच मार्ग आहेत व त्या मार्गावरून जाताना शेवटचे पोहोचावयाचे ठिकाणही तेच आहेत. हा मार्ग मोठा आहे की लहान हे सुद्धा तेच, फक्त तेच, एकमात्र जाणू शकतात. त्यांचा अनुग्रह झाला की, अत्यंत मोठा मार्गही छोटा होतो. त्यांचा अनुग्रह जर झाला नाही तर अत्यंत लहान मार्गही मोठा आहे असे वाटू लागते. मात्र ज्यावेळी साधकावर महान् अनुग्रह होतो त्यावेळी एका क्षणात सर्व मार्ग अदृश्य होतो. मग एकमात्र स्वयंप्रकाश श्रीसद्गुरूच

अखंड भावाने विराजमान होतात."

**श्रीगुरू शब्दाचा अर्थ :-**

श्रीसरस्वती गंगाधरांनी लिहिलेल्या "**श्रीगुरुचरित्र**" या ग्रंथाच्या दुसऱ्या अध्यायात श्रीगुरू शब्दाचा अर्थ पुढीलप्रमाणे सांगितला आहे.

**कली विनवी ब्रह्मयासी। गुरू शब्द म्हणजे आहे कैसी।**
**कवण गुरु स्वरूपें कैसीं। विस्तारावें मजप्रती।।२.१२८।।**
**ऐकोनि कलीचें वचन। ब्रह्मा सांगतसे आपण।**
**गु कार म्हणजे सिद्ध जाण। रेफः पापस्य दाहकः।।१२९।।**
**उ कार विष्णू अव्यक्त। ब्रह्मरुद्र गुरु निश्चित।**
**त्रितयात्मक श्रीगुरु सत्य। म्हणोनी सांगे कलीसी।।१३०।।**

कलीने श्रीब्रह्मदेवास अशी विनंती केली की, आपण मला श्रीगुरू शब्दाचा अर्थ समजावून सांगावा. त्यावेळी श्रीब्रह्मदेवाने असे सांगितले की, "गुरू" या शब्दातील "गु" या शब्दाने श्रीगुरू हा सिद्ध असतो हे सूचित केले आहे. दुसऱ्या "रू" ह्या शब्दाने असे सूचित केले आहे की, शक्तिपात करून शिष्याच्या पापाचे दहन करण्याचे अद्भुत सामर्थ्य श्रीगुरूंच्या ठिकाणी असते. अव्यक्त ब्रह्म हे विष्णू, ब्रह्मदेव व रुद्र यांच्या रूपाने साकार झालेले दिसते. त्या तिघांचेही सामर्थ्य श्रीगुरूंमध्ये सामावलेले असते असे "उ" कार या तिसऱ्या शब्दाने सूचित होते.

"**श्रीगुरुगीतेमध्ये**" श्रीगुरू या शब्दाची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे.

**गुकारस्त्वन्धकारस्य रुकारस्तेज उच्यते।**
**अज्ञानग्रासकं ब्रह्म गुरुरेव न संशयः।।२३।।**
**गुकारः प्रथमो वर्णो मायादिगुणभासकः।**
**रुकारो द्वितीयो ब्रह्म मायाभ्रान्तिविनाशनम्।।२४।।**

"गु" कार म्हणजे अज्ञानरूपी अंधकार होय व "रू" कार म्हणजे प्रत्यक्ष तेज किंवा सूर्य होय. स्वयंप्रकाश तेजासमोर एक क्षणभरसुद्धा अंधार टिकू शकत नाही. त्याप्रमाणेच श्रीगुरूंच्या पुढेही अज्ञान टिकू शकत नाही. त्यामुळे श्रीगुरू हे अज्ञान नाहीसे करणारे

ब्रह्मस्वरूप असे आहेत यात तिळमात्र शंका नाही. मायादि गुण दाखविणारा "गु" हा प्रथम शब्द असून "रू" हा दुसरा शब्द ब्रह्मानंद निदर्शक असून तो मायेचा नाश करणारा आहे.

श्रीगुरू शब्दाचा अर्थ आपण पाहिला. त्या शब्दाचे सामर्थ्य "**श्रीगुरुतंत्रम्**" या पुस्तकात पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे.

**गकारोच्चारमात्रेण ब्रह्महत्या विनश्यति।**
**उकारोच्चारतोदेवि मुच्यते जन्मपातकात्।।३२।।**
**रेफोच्चारमात्रेण उकारोच्चारणात्पुनः।**
**विसर्गोच्चारणात् कोटिजन्मगं पातकं हरेत्।।३३।।**

"ग" काराच्या उच्चाराने ब्रह्महत्येचे पाप नष्ट होते. "उ" काराच्या उच्चाराने जन्मभर केलेल्या पापापासून मनुष्य मुक्त होतो. रेफ, उकार व विसर्ग या तीन वर्णांच्या उच्चाराने कोटीकोटी जन्मांची पापे नाश पावतात.

**श्रीगुरुतत्त्व म्हणजे काय :-**

श्रीगुरुतत्त्व म्हणजे ईश्वरी तत्त्वच होय. या ईश्वरीतत्त्वाचा साक्षात्कार श्रीगुरुरूपाने कसा होतो हे "**कुलार्णवतंत्राच्या**" १३ व्या उल्लासात पुढील-प्रमाणे सांगितले आहे. परमात्मा शिव, अनंत, अव्यय, अज, निष्कल, व्योमाकार, मनरहित व सर्वत्र सूक्ष्म रूपाने असतो. त्यामुळे त्याची पूजा करणे शक्य होत नाही. यासाठी साक्षात् श्रीशिवच श्रीगुरुरूपाचा आश्रय करून या भूलोकावर वावरतात. त्यामुळे भक्तिद्वारा त्यांचे पूजन करता येते. या भक्तीमुळे ते संतुष्ट होऊन भुक्ती व मुक्ती देतात. परमेश्वरी तत्त्वाने युक्त असलेली शिवरूप आकृती मनुष्याला दृष्टिगोचर होऊ शकत नाही. यासाठी श्रीशिवशंकर स्वतः श्रीगुरुरूप धारण करून युगायुगात शिष्यांचे रक्षण व उद्धार करतात.

साक्षात् परशिवच स्वतः आपल्या शिष्यांवर अनुग्रह करण्याकरिता मनुष्यरूपाच्या आवरणाखाली पृथ्वीवर संचार करीत असतात. हे परम शिवतत्त्व अत्यंत निरामय असूनसुद्धा सद्भक्तांना व साधकांना मार्गदर्शन करण्याकरिता व शक्तिपातयोगाची दीक्षा देण्याकरिता श्रीगुरुरूपाने

साकार होऊन आपल्या कृपेचा साठा मुक्त हस्ताने देत एखाद्या संसारी माणसाप्रमाणे राहताना दृष्टोत्पत्तीस येते. जे लोक पापी असतात ते श्रीगुरुतत्त्वाला समजू शकत नाहीत. त्यांची दृष्टीच अगदी संकुचित असते. परंतु जे लोक पुण्यवान् असतात त्यांना श्रीगुरुतत्त्वाच्या रूपाने साकार झालेले शिवतत्त्व ज्ञात होते.

ज्याप्रमाणे अंधळा मनुष्य उगवलेल्या सूर्याला पाहू शकत नाही त्याप्रमाणे साक्षात् परमतत्त्वस्वरूप श्रीगुरू दृष्टीसमोर वावरत असून-सुद्धा भाग्यहीन माणसांना त्यांचे खरे स्वरूप कळत नाही. हे अगदी नितांत व त्रिकालाबाधित सत्य आहे की, श्रीगुरू अगदी साक्षात् श्रीसदाशिवस्वरूपच असतात. याबद्दल कसलीही शंका बाळगण्याचे कारण नाही. श्रीसद्गुरू हे अशा प्रकारे श्रीसदाशिवतत्त्वस्वरूप नसते तर त्यांच्यात भुक्ती आणि मुक्ती देण्याचे सामर्थ्य आले नसते. याकरिता श्रीसदाशिव व श्रीगुरू या दोघांमध्ये कोणताही भेद असत नाही. ते तत्त्वतः एकच असतात. या अर्थानेच शास्त्रात असे म्हटले आहे की-

**यस्मान्महेश्वरः साक्षात् कृत्वा मानुषविग्रहम्।**
**कृपया गुरुरूपेण मग्नाः प्रोद्धरति प्रजाः।।**

प्रत्यक्ष श्रीमहेश्वरच मनुष्यरूप धारण करून श्रीगुरुरूपाने मायामग्न जीवांवर कृपावर्षाव करून त्यांचा उद्धार करतात. ही गोष्ट अन्यथा दुसऱ्या कोणालाही शक्य नाही; कारण एक बद्धजीव दुसऱ्या बद्धजीवाचा उद्धार करू शकत नाही.

**श्रीगुरूंचे खरे स्वरूप व कार्य :-**

श्रीगुरूंचे खरे स्वरूप काय असते हे आता पाहावयाचे आहे. श्रीगुरूंच्या वास्तविक कार्यावरून त्यांचे स्वरूप, महिमा व अध्यात्म जीवनातील त्यांच्या स्थानाची निश्चिती होणार असल्याने श्रीगुरूंच्या खऱ्या कार्याचा परिचय करून घेऊ.

**अनुग्रह करणे :-**

शरण आलेल्या शिष्यावर शक्तिपातयुक्त दीक्षानुग्रह करणे हे श्रीसद्गुरूंचे खरे कार्य आहे. असा दीक्षानुग्रहयुक्त शिष्य साधनसंपन्न

होऊन कृतकृत्य होतो. या अनुग्रहामुळेच आनंदाची मंगलमय अनुभूती, योग्य शिष्याचा उद्धार व अयोग्याला योग्यता देऊन उद्धार, समभाव-संपन्नता, दु:खनिवृत्ती, ज्ञानदान, शक्तिजागरण, भाव-भक्तिदान, दिव्यचक्षूंचे उन्मीलन इत्यादि सर्व कार्ये आपोआप घडून येतात. एका अनुग्रहातच ही कार्ये अनुस्यूत असतात. ही कार्ये म्हणजे श्रीसद्गुरूंनी शिष्यावर केलेल्या दिव्य दीक्षानुग्रहाचे एकएक अलौकिक व अद्भुत पैलूच आहेत. त्यांचे स्वतंत्र दर्शन आपण क्रमशः घेणार असलो तरी शक्तीच्या जागृतीशिवाय ही सर्व कार्ये कधीही घडून येणे शक्य नाही, हे विसरता कामा नये. या अर्थानेच **"कुलार्णवतंत्राच्या"** १४ व्या उल्लासात अगदी निक्षून असे सांगितले आहे की -

**शक्तिपातानुसारेण शिष्योऽनुग्रहमर्हति।**
**यत्र शक्तिर्न पतति तत्र सिद्धिर्न जायते।।३८।।**

शक्तिपाताच्या मार्गानेच शिष्याला खराखुरा अनुग्रह होत असतो. ज्या अनुग्रहामध्ये शक्तीचा पात म्हणजे शक्तिसंक्रमण होऊन शक्ती जागृत होत नाही त्या ठिकाणी मोक्षसिद्धी कदापीही होऊ शकत नाही. त्याचप्रमाणे उपरोक्त कार्येही संपन्न होत नाहीत. यामुळे ज्याच्या-जवळ शक्तिपातानुसार शिष्याला अनुग्रह देण्याचे सामर्थ्य असत नाही त्या श्रीगुरूकडून शिष्याचे मंगल होणे कधीही शक्य नाही. कोणी कितीही सांगितले व शब्द जंजाळाने भुलविले तरी त्या अनुग्रहात अनुभूती देण्याचे सामर्थ्य नसते. असा अनुग्रह हा कवडीमोल किंमतीचा ठरतो. यासाठी उपासनेचा मार्ग व दीक्षेचा प्रकार कोणताही असला तरी ज्यावेळी परंपराप्राप्त सामर्थ्याने श्रीसद्गुरू शिष्यावर शक्तिपात करतात तेव्हा आत्मज्ञानाची प्राप्ती होऊन शिष्य मोक्षाधिकारी होतो.

हा शक्तिपातानुग्रह ईश्वरच श्रीगुरुरूपाने शिष्यावर करून त्याच्या सर्व बंधनांचा नाश कसा करतात हे **"कुलार्णवतंत्राच्या"** १४ व्या उल्लासात पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे. श्रीगुरूच उपदेश करणाऱ्याचे रूप ग्रहण करून जीवाच्या बंधनांना अगदी मुळापासून उखडून तोडून टाकून परमपद प्राप्त करून देतात. याचे कारण असे आहे की,

सर्वांवर अनुग्रह करणारा करुणानिधी ईश्वरच आचार्यरूप धारण करून दीक्षेच्या द्वारा जीवांना मुक्तीचा मार्ग मोकळा करून देतो.

श्रीगुरूंच्या या अनुग्रहरूप मूळ कार्याचा महिमा "**भारतीय संस्कृती और साधना**" खंड एक या ग्रंथातील "**अध्यात्मजीवनमें गुरुका स्थान**" या लेखात म.म.श्रीगोपीनाथ कविराज यांनी विस्तृतपणे वर्णन केला आहे. त्याचा सारांश पाहू. "अनादि कालापासून अनंत जीव मुक्तीची प्रतीक्षा करीत आलेले आहेत. मात्र जीवावर असे एक आवरण आहे की, ते अनादि कालापासून विद्यमान असल्यामुळे जीव मुक्त होऊ शकत नाही. या आवरणालाच जीवत्व किंवा पशुत्व म्हटले जाते. याचेच नाव मल आहे. हे आवरण किंवा मल जर जीवावर राहिला नसता तर जीवाला शिवरूपत्वच प्राप्त झाले असते व त्याचे पशुरूपत्व नाहीसे झाले असते. जीव, शिव व्हावा म्हणून श्रीगुरूंचा जेव्हा अनुग्रह होतो तेव्हा शक्ती सक्रिय होते व हा भेद मिटावा म्हणून प्रवृत्त होते. ही शक्ती किंवा पराशक्ती परशिवाची स्वतःची शक्ती आहे. शिव अर्थात् श्रीगुरू सच्चिदानंदमयस्वरूप असतात. त्यांच्या ठिकाणी जी नित्य शक्ती किंवा पराशक्ती अभिन्नरूपाने विराजमान असते तीही सच्चिदा-नंदस्वरूपच असते. ही शक्तीच श्रीगुरुकृपेने सक्रिय झाली की, अखंड अनुग्रहरूप किंवा विशाल करुणारूप धारण करून जीवाला शिवत्व प्राप्त करून देण्याच्या कार्यात अग्रेसर होते. ही महाकरुणा म्हणजेच श्रीभगवंताचे महाप्रेम आहे. श्रीभगवंत प्रेमाने व करुणेने भिजून जेव्हा अनुग्रहरूपाने पाझरू लागतो तेव्हा तो कुंडलिनी शक्तीच्या सक्रिय रूपाने अनादि कालापासून बद्धजीवांना मुक्त करून आपल्या बरोबर पूर्णपणे मिसळून टाकतो. श्रीभगवंत निष्क्रिय राहूनही अशा प्रकारे निरंतर क्रिया करीत राहतात. ज्यावेळी शक्तिपातानुग्रह होऊन शक्तीच्या क्रिया बाह्यरूपाने जरी निरनिराळ्या तऱ्हेच्या होताना दिसल्या तरी त्या क्रियांचे मूळ रूप एक व अभिन्न आहे. हाच मूळरूपातील अनुग्रह आहे. ही शक्ती परम अनुग्रहरूप असल्यामुळे तिला सर्वमंगला असे म्हटले जाते. सृष्टी, स्थिती व संहार या अवस्था म्हणजे या

शक्तीचा आत्मप्रकाश किंवा विलास याशिवाय दुसरे काही नाही. शास्त्र म्हणते की, अनुग्रहशक्तीच श्रीगुरूंचे खरे स्वरूप आहे. परमशिव हेच श्रीगुरू आहेत व अनुग्रहशक्ती ही त्यांची पराशक्ती आहे. ही अनुग्रहशक्तीच अणुरूपी जीवांना मुक्त करून त्यांना आपल्या मूळच्या श्रीशिवस्वरूपात पुनः प्रतिष्ठित करते."

**आनंदाची मंगलमय अनुभूती :-**

जे शक्तिसंचार करतात ते श्रीगुरू व ज्याच्यामध्ये शक्तिसंचार होतो तो शिष्य होय. असे जेथे घडत नाही तेथे सर्व खटपट व्यर्थ जाते. याचे खरे कारण असे आहे की, ज्यांच्याजवळ परंपरेने प्राप्त झालेली शक्ती नसते ते स्वसामर्थ्याने शिष्याला आनंदाची मंगलमय अनुभूती शक्तिसंचाराने देऊ शकत नाहीत. ते नुसता उपदेश व शास्त्रचर्चा करीत राहतात. परंतु त्याचा काडीमात्रही उपयोग होत नाही. यासाठीच "**योगवासिष्ठाच्या**" निर्वाणप्रकरणाच्या पूर्वार्धातील १२८ व्या प्रकरणात पुढीलप्रमाणे श्रीगुरूंची व्याख्या केली आहे.

**दर्शनात् स्पर्शनात् शब्दात् कृपया शिष्यदेहके।**
**जनयेद्यः समावेशं शाम्भवं स हि देशिकः ।।६१।।**

जे दर्शनाने, स्पर्शाने, शब्दाने व कृपापूर्वक शिष्याच्या देहामध्ये शिवभावाची मंगलमय अनुभूती करू शकतात त्यांनाच श्रीगुरू असे म्हणतात. अशा प्रकारे शिष्याचा उद्धार करण्याची जी अद्भुत शक्ती श्रीगुरूंजवळ असते तीच त्यांचे खरे लक्षण आहे. सत्यसंकल्प श्रीगुरू केवळ एकवार कृपापूर्ण दृष्टिक्षेप करताच उपरोक्त महान् कार्य परिपूर्ण होते; कारण त्यांच्या दृष्टिपाताबरोबर कुंडलिनी शक्ती जागृत होऊन शिष्याला आनंदावेशाची मंगलमय अनुभूती प्राप्त होते.

परमानंदप्राप्तीचा महिमा असा असल्याने "**कुलार्णवतंत्राच्या**" १३ व्या उल्लासात श्रीशंकरांनी श्रीपार्वतीला असा उपदेश केला आहे की -

**गुरोर्यस्यैव संस्पर्शात् परानन्दोऽभिजायते।**
**गुरुं तमेव वृणुयात् नापरं मतिमान्नरः ।।११०।।**

**यस्यानुभवपर्यन्तं बुद्धिस्तत्र प्रवर्तते।**
**तस्यालोकनमात्रेण मुच्यते नात्र संशयः।।१११।।**

ज्यांची बुद्धी आत्मज्ञानापर्यंत पोहोचली आहे, ज्यांची कृपादृष्टी शिष्याला मुक्त करणारी आहे व ज्यांचा करस्पर्श परमानंद देणारा आहे अशी माणसे श्रीगुरू होण्याला योग्य आहेत. बुद्धिमान् शिष्याने अशाच श्रीगुरूंची कास धरावी.

आनंदाची मंगलमय अनुभूती देणे हे श्रीगुरूंचे कार्य किती महत्त्वाचे आहे हे सांगताना म.म.श्रीगोपीनाथ कविराज आपल्या "**भारतीय संस्कृती और साधना**" खंड १ ला, या ग्रंथातील "**अध्यात्मजीवनमें गुरुका स्थान**" या लेखात असे म्हणतात की, "मनुष्य अनादि कालापासून संसारात पडलेला असून कालचक्राबरोबर फिरत राहतो. त्याचे बहिर्मुख चित्त आपल्या कर्मांच्या संस्काराप्रमाणे बाह्यजगतामध्ये सुखप्राप्तीसाठी वारंवार धडपड करीत असते. परंतु त्याच्या धडपडीला यश येत नाही. त्याची सर्व मनोरथे धुळीला मिळतात. पण असे होऊनही संसाराची विरक्ती मात्र त्याला येत नाही. जन्ममृत्यूच्या चक्रात सापडून विषयसुखाचा शोध घेत घेत त्याचे चित्त सतत भटकत राहते. यालाच प्रवृत्तीचा प्रवाह असे म्हणतात. जोपर्यंत प्रवाहाचा वेग मंद होत नाही तोपर्यंत त्याबरोबर वाहत जाणे माणसाला भाग पडते."

अशा जीवांना हात देऊन प्रवृत्तीच्या प्रवाहातून बाहेर काढून त्यांच्या जीवनात आनंद निर्माण करणे आवश्यक असते. दुःखी, कष्टी, थकलेल्या, भागलेल्या व निराश झालेल्या जीवांना जेव्हा असा आधार मिळतो तेव्हा त्यांच्या भाग्याला सीमा राहत नाही. या अर्थानेच श्रीगोपीनाथ कविराज असे म्हणतात की, "आनंदापासून वंचित झालेल्या हताश मनुष्याला नित्य आनंदाचा मार्ग दाखविणे हेच श्रीगुरूंचे खरे कार्य आहे. जो त्रितापदग्ध जीव अनन्यभावाने श्रीगुरूंना शरण जातो त्याला ते अभयदान देऊन त्याच्या इष्टप्राप्तीचा उपायही सांगतात. इष्ट याचा अर्थ संसारातील सर्व दुःखाची निवृत्ती असाच घेतला पाहिजे. इतकेच नव्हे; तर परमानंदाची अभिव्यक्ती सुद्धा इष्ट या शब्दात अभिप्रेत आहे.

वास्तविक निर्मल व अपरिच्छिन्न आनंदाची प्राप्ती करणे हेच मनुष्याचे इष्ट असते; कारण प्रत्येक मनुष्य त्याची आकांक्षा करीत असतो. दुःखनिवृत्ती हे त्याचे फक्त आनुषंगिक फल आहे. जाणतेपणाने किंवा अजाणतेपणाने का होईना पण आनंदाची प्राप्ती व्हावी ही प्रत्येक मनुष्याची इच्छा असते. माणसाच्या सर्व अभिलाषा व इच्छांचे आनंद हेच एकमात्र लक्ष्य असते. श्रीगुरू जो उपाय सांगतात किंवा जे साधन देतात त्याचा दृढ आश्रय करून संपूर्ण आनंदाची प्राप्ती करून घेणे हे शिष्याचे कर्तव्य असते." ही आनंदाची प्राप्ती श्रीसद्गुरू करून देत असल्याने त्यांचे वर्णन करताना "**श्रीदासबोधाच्या**" सातव्या दशकातील पहिल्या समासात श्रीसमर्थ असे म्हणतात की -

**आता आठवीन समर्था। सद्गुरूसी।।११।।**
**जयाचेनि कृपादृष्टी। होये आनंदाची वृष्टी।**
**तेणें गुणें सर्व सृष्टी। आनंदमय।।१२।।**
**कीं तो आनंदाचा जनक। सायुज्यमुक्तीचा नायक।**
**कैवल्यपददायक। अनाथबंधू।।१३।।**
**मुमुक्षुचातकीं सुस्वर। करुणा पाहिजे अंबर।**
**वोळे कृपेचा जळधर। साधकांवरी।।१४।।**
**कीं तें भवार्णवीचें तारूं। बोधें पाविजे पैलपारू।**
**महाआवर्ती आधारू। भाविकांसीं।।१५।।**
**कीं तो काळाचा नियंता। नानासंकटीं सोडवितां।**
**कीं ते भाविकांची माता। परम स्नेहाळू।।१६।।**
**कीं तो परत्रींचा आधारू। कीं तो विश्रांतीचा थारू।**
**नातरी सुखाचे माहेरू। सुखस्वरूप।।१७।।**
**ऐसा सद्गुरू पूर्णपणीं। तुटे भेदाची कडसणी।**
**देहेविण लोटांगणीं। तया प्रभूसी।।१८।।**

**योग्य शिष्याचा उद्धार व अयोग्याला योग्य कारणे :-**

योग्य शिष्याचा उद्धार करणे व अयोग्य शिष्याला योग्य करून तारणे हे श्रीसद्गुरूंचे दुसरे महत्त्वाचे कार्य आहे. "**बोधसार**" या ग्रंथामध्ये

श्री.नरहरी यांनी असे लिहिले आहे की, श्रीगुरू विवेक-वैराग्ययुक्त वेदान्तयुक्तीच्या साहाय्याने अयोग्य शिष्याला योग्यता प्राप्त करून देतात आणि नंतर त्याच्यावर शक्तिपाताचा अनुग्रह करून त्याला त्याच क्षणी जागृत करतात. "**ललिता सहस्त्रनामाच्या**" भाष्यात श्रीभास्करराय यांनी असे म्हटले आहे की, खरे श्रीसद्गुरुरूपी सूर्य अयोग्य शिष्याला योग्य करून आपल्या अमोघ अशा शक्तिपाताच्या सामर्थ्याने त्याला प्रबुद्ध करतात.

या दृष्टीनेच "**नवचक्रेश्वर**" तंत्रामध्ये श्रीसद्गुरूंची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे.

**पिण्डं पदं तथा रूपं रूपातीतं चतुष्टयम्।**
**यो वा सम्यग् विजानाति स गुरुः परिकीर्तितः।।**

जे पिंड, पद, रूप व रूपातीत या चारही गोष्टी सम्यक् रीतीने जाणतात तेच खरे श्रीगुरू होत.

"**श्रीगुरुगीतेमध्ये**" उपरोक्त चार गोष्टींचे लक्षण पुढीलप्रमाणे सांगितले आहे.

**पिण्डं कुण्डलिनीशक्तिः पदं हंसः प्रकीर्तितः।।**
**रूपं बिन्दुरिती ज्ञेयं रूपातीतं निरञ्जनम्।।**

पिंड म्हणजे कुंडलिनी शक्ती होय. पदाला हंस म्हणतात. बिंदू म्हणजे रूप व निरंजन म्हणजे रूपातीत ब्रह्म होय.

**समभावसंपन्नता :-**

शिष्याला स्वतःच्या भावासारखी व अनुभूतीसारखी संपन्नता श्रीसद्गुरू दीक्षारूप कार्याने प्राप्त करून देतात. श्रीसद्गुरूंचे हे तिसरे अलौकिक कार्य आहे. "**कुलार्णव तंत्राच्या**" १४ व्या उल्लासामध्ये यादृष्टीने पुढील वर्णन आले आहे.

**गुरूपदिष्टमार्गेण वेधं कुर्याद्विचक्षणः।**
**पापमुक्तः क्षणाच्छिष्यश्छिन्नपाशस्तथा भवेत्।।५९।।**
**बाह्यव्यापारनिर्मुक्तो भूमौ पतिति तत्क्षणात्।**
**सञ्जात दिव्यभावोसौ सर्वं जानाति शाम्भवी।।६१।।**

**यदस्ति वेधकं तत्तत्स्वयमेवानुभूयते।।६२।।**

श्रीमहेश्वरांपासून परंपरेने प्राप्त झालेल्या श्रीगुरूपदेशाच्या म्हणजे शक्तिपातयोगाच्या अर्थात् शक्तिसंक्रमणाच्या मार्गानुसार जेव्हा ज्ञानी पुरुष वेधदीक्षा देतात तेव्हा शक्तिपातामुळे शिष्य पापरहित व पापमुक्त होतो. या दीक्षेमुळे बाह्य व्यापार विसरून तो तत्काल भूमीवर पडतो. त्याला दिव्यभाव प्राप्त होतात. तो या शांभवी शक्तीच्या आधाराने श्रीसद्गुरू ज्या दिव्य भावाने संपन्न असतात, त्याचा तो स्वतःच अनुभव घेतो. अशा प्रकारे निजबोधरूपच स्वशक्तीच्या संचाराच्या द्वारा शिष्याला आपल्या बरोबरीची समभावसंपन्नता प्राप्त करून देणे हे अनुग्रहाचे खरे लक्षण आहे.

**तं ये पश्यन्ति ताद्रूप्यक्रमेणामलसंविदः।**
**तेऽपि तद्रूपिणस्तावत्येवास्यानुग्रहात्मता।।**

**दुःखनिवृत्ती :-**

शिष्यरूपी जीवाची दुःखनिवृत्ती करणे हे श्रीसद्गुरूंचे फार महत्त्वाचे असे चौथे कार्य आहे; कारण संपूर्ण योगशास्त्रच यासाठी प्रवृत्त झालेले आहे. **"योगशिखोपनिषदाच्या"** सुरुवातीलाच श्रीब्रह्मदेवांनी श्रीमहादेवांना असा प्रश्न केला की, "हे श्रीशंकरा! सर्व जीव सुख-दुःखाच्या मायाजालात गुरफटून गेले आहेत. त्यापासून त्यांची मुक्ती कशी होईल हे कृपा करून सांगावे. ज्या मार्गाने सर्व सिद्धी प्राप्त होतील, मायाजाल तुटून जाईल, जन्म, मृत्यू, जरा, व्याधी इत्यादि सर्व दुःखांचा नाश होईल व ज्यापासून मोठे सुख होईल असा मार्ग दाखवा."

यासाठी दुःख निवृत्त होणे नितांत आवश्यक आहे. **"अध्यात्म जीवनमें गुरुका स्थान"** या लेखात म.म.श्रीगोपीनाथ कविराज असे म्हणतात, "शिष्यरूपी जीवाच्या दुःखाच्या निवृत्तीची व्यवस्था करणे हे श्रीसद्गुरूंचे पहिले काम आहे. या मायिक जगात द्वैतज्ञानाने, कर्मसंस्काराने व कर्तृत्त्वाभिमानाने भरलेला जीव अनादि कालापासून कर्म करीत व त्याचबरोबर केलेल्या कर्मांची फळे भोगीत आलेला असतो. जन्मजन्मांतरापासून संसाराचा हा प्रवाह असाच वाहत आलेला दिसून

येतो. भेदज्ञान व कर्तृत्त्वाभिमान जोपर्यंत नष्ट होत नाही तोपर्यंत या संसारलीलेचा कधीही अंत होत नाही. इतकेच नव्हे; तर जन्ममृत्यूच्या व कालचक्राच्या आवर्तनातूनही जीवाची निवृत्ती होत नाही. जीव चिदात्मक आहे यात काहीही शंका व संदेह नाही. परंतु मायेच्या प्रभावामुळे जीव जडसत्तेलाच आपली चित्सत्ता मानून भयंकर चूक करीत आलेला आहे. वरच्या देवलोकापासून खालच्या तिर्यक् व स्थावर योनीपर्यंत असंख्य प्रकारचे जीव आहेत. हे सर्व जीव दुःखमय संसाराच्या येरझाऱ्यात सापडून भ्रमण करीत असतात. तात्पुरती ऊर्ध्वगती झाली किंवा अधोगती झाली तरी त्यामुळे खरा मार्ग कोणता हे बिल्कुल कळत नाही. जोपर्यंत चेतन आत्मा "मी जडाहून वेगळा आहे" हे जाणणार व अनुभवणार नाही तोपर्यंत या दुःखमय कालचक्रातून निसटण्याची व उद्धार होण्याची आशाच नाही. अनुग्रहपूर्वक जे ज्ञानदान करून अज्ञानापासून जीवाला मुक्त होण्याला साहाय्यता करतात तेच खरे श्रीगुरू होत. "ज्यावेळी ही दुःखनिवृत्ती व्हावी म्हणून श्रीसद्गुरू शक्तिपातपूर्वक कृपानुग्रह करतात त्यावेळी साधकाची पूर्वी अनुभविलेली सर्व दुःखे नाहीशी होतात व त्याच्या ठिकाणी मूलतःच असलेला अपार आनंद उसळून येऊन त्याची उत्तम अभिव्यक्ती होते. अशा प्रकारे झालेल्या शक्तीच्या जागृतीमुळे साधक ऐश्वर्यसंपन्न होतो व त्याची सर्व कमतरता, अपूर्णता, अभाव, त्रुटी इत्यादि कायम दूर होतात.

**शक्तिजागरण :-**

श्रीसद्गुरू शिष्यावर अनुग्रह करतात म्हणजे ते शक्तिपात करून शक्ती जागृत करतात. श्रीसद्गुरूंकडून होणाऱ्या या शक्तिजागरणाच्या कार्याला तोड नाही; कारण मोक्ष हे मनुष्य जीवनाचे वास्तविक लक्ष्य त्याशिवाय प्राप्त होऊ शकत नाही. इतकी या शक्तिजागरणाची अपरिहार्यता आहे. ती पटविताना "**भारतीय संस्कृति और साधना,**" खंड एक, या ग्रंथातील "**जीवनका लक्ष्य**" या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज असे म्हणतात की, "ज्या अज्ञानाच्या प्रभावाने आत्मा मायेच्या अधीन

होऊन त्याला अपरिहार्यपणे देह ग्रहण करावा लागतो, त्या अज्ञानाची निवृत्ती जोपर्यंत होत नाही तोपर्यंत आत्म्याचा शिवत्वरूप धर्म प्रकट होत नाही. या मूळ अज्ञानालाच पौरुष अज्ञान असे म्हटले जाते. या अज्ञानाची निवृत्ती व्हावी म्हणून जो अत्यंत आवश्यक उपाय आहे त्यामध्ये कर्म व ज्ञान या उपायांची गणना तर होत नाहीच; परंतु भक्तीचीही गणना होत नाही. अज्ञान दूर करण्याच्या उपायांमध्ये यांची गणना केलेली दिसली तरी हे उपाय म्हणजे केवळ बुद्धीचे व्यापार आहेत यात काही शंकाच नाही. जी गोष्ट बुद्धीच्या आधी झाली ती दूर करण्याची क्षमता यांपैकी कोणत्याही उपायात तिलप्राय असत नाही. याकरिता जोपर्यंत मनुष्याचे मूळ अज्ञान दूर होत नाही तोपर्यंत मनुष्य जीवनाचा परम आदर्श कदापीही प्रत्यक्षपणे प्राप्त होऊ शकत नाही."

"यासाठी मूळ अज्ञान कसे मिटेल याचाच विचार केला पाहिजे. मी हे प्रथम सांगितले आहे की, अज्ञान दूर करण्याचे जे जे मार्ग आहेत त्यापैकी कर्म, ज्ञान व भक्ती यांची कोणत्याही प्रकारे तशी उपयुक्तता दिसत नाही; कारण ही सर्व साधने मुळाला स्पर्शही करू शकत नाहीत. एकमात्र श्रीभगवंताच्या कृपाशक्तीच्या द्वारा मनुष्याच्या मूळ अज्ञानाची निवृत्ती होऊ शकते. अन्य कोणत्याही उपायांनी हे शक्य नाही. श्रीभगवत्कृपा स्वभावसिद्ध असून ती अहेतुक असल्यामुळे आधाराच्या योग्यतेप्रमाणे तिची कार्यक्षमता दिसून येते."

"यावरून शक्तीचे जागरण करणे हे अनुग्रहात अनुस्यूत असून श्रीसद्गुरूंच्या कार्याची महत्ता त्यात सामावलेली असते; कारण कैवल्य, मुक्तिलाभ अगर महेश्वरत्व प्राप्तीसाठी अंतर्निहित अनंत शक्तीच्या परिपूर्ण जागृतीची नितांत आवश्यकता असते. ही शक्ती जोपर्यंत जागृत होत नाही तोपर्यंत आत्मा शुद्ध असला तरी त्याची योग्यता शवा इतकीच असते. श्रीशिवाची नसते. याचे कारण असे आहे की, श्रीशिव कधीही शक्तिहीन असत नाही. खरे पाहिले तर श्रीशिव व श्रीशक्ती अगदी अभिन्न आहेत. त्यामुळे श्रीशिवाच्या व्यक्त व अव्यक्त भावात पृथकता दिसत नाही. एका दृष्टीने श्रीशिव महाप्रकाशात्मक

असल्याने नित्य व्यक्त आहेत. परंतु शक्ती जोपर्यंत अव्यक्तता सोडून व्यक्तभाव धारण करीत नाही व आपला व्यक्तभाव क्रमाक्रमाने अगर क्रमाशिवाय जोपर्यंत पूर्णरूपाने प्रकट करीत नाही तोपर्यंत शक्ती शिवाशी एकरूप असूनसुद्धा त्याच्या बरोबर एकाच आसनावर बसू शकत नाही. मग प्रत्यक्ष एकरूपतेची प्राप्ती होणे ही अत्यंत दूरची गोष्ट म्हटली पाहिजे. जेव्हा अध्यात्म जीवनाचा संपूर्ण विकास होतो तेव्हा श्रीशिवशक्तीचे ऐक्य होते यात शंकाच नाही. त्यावेळी श्रीशिव व श्रीशक्ती आणि जीव व शिव यांच्यात भेद राहत नाही. त्यावेळी एकच अभिन्न व अखंड आत्मस्वरूप व्यक्त होते. या परमस्थितीमध्ये पुन्हा प्रतिष्ठित होण्याला जे साहाय्यता देतात तेच खरे श्रीसद्गुरू होत. खरे पाहता आत्माच श्रीसद्गुरू आहे. तोच श्रीसद्गुरूच्या रूपाने मायांध जीवाला मायेपासून त्याच्या ठिकाणी असलेल्या सुप्त शक्तीला अत्यंत उत्तम प्रकारे जागृत करून आपल्या स्वरूपामध्ये म्हणजेच श्रीशिवस्वरूपामध्ये घेऊन येतो. यालाच संकोचरहित पूर्ण स्वातंत्र्य असे म्हणतात."

शक्तीच्या जागृतीची नितांत आवश्यकता पटवून देताना "**भारतीय संस्कृती और साधना**" खंड एक या पुस्तकातील "**कुंडलिनी तत्त्व**" या लेखात म.म.श्रीगोपीनाथ कविराज असे म्हणतात की, "जीव स्थूल तत्त्वांच्या आवरणाने वेष्टिलेला असल्यामुळे सूक्ष्म अशा सुषुम्णामार्गात त्याचा प्रवेश होऊ शकत नाही. पूर्वसंस्कार किंवा वासना, अभिमान किंवा कर्तृत्त्वबोध आणि फलाकांक्षा किंवा जिला कामना म्हणतात ती भोगाभिलाषा या तीनही आवरणांमुळे जीवाला स्थूलत्त्व प्राप्त होते. विषय व इंद्रियादि रूप स्थूलावरणयुक्त जीवाला आपल्या मूळ स्वरूपाकडे परत जाऊ देत नाहीत. प्रत्येक जीव ज्ञान, आनंद व अमरत्वाची इच्छा करीत असतो. इतकेच नव्हे; तर आपल्याला ब्राह्मी स्थिती प्राप्त व्हावी अशी त्याला तीव्र आकांक्षा असते. हे सर्व घडावे म्हणून जरी त्याला वाटत असले तरी ते सर्व मनात ठेवून तो विषयांमध्ये अगदी दंग होऊन जातो. वास्तविक पाहता विषयप्राप्ती हे काही त्याचे ध्येय असत नाही. ध्येय असते आनंदाची प्राप्ती. या आनंदाच्या प्राप्तीसाठीच मनुष्य

गौण साधना करून विषयादींची इच्छा, आकांक्षा करीत असतो. परंतु युगयुगांतरात व कल्पकल्पांतरात भ्रमण करूनसुद्धा जीव आपल्या आकांक्षांची तृप्ती करू शकत नाही. याचे खरे कारण असे आहे की, तो सर्व जन्मांमध्ये आपली वासना व कर्तृत्वाचा अभिमान यांना न सोडताच परिभ्रमण करीत राहतो. वास्तविकपणे जोपर्यंत एक पळभरही वासनेचा नाश होत नाही तोपर्यंत जीवाला सुषुम्णेमध्ये प्रवेश मिळू शकत नाही; कारण स्थूल वस्तू सूक्ष्म मार्गामध्ये प्रवेश करू शकत नाही. भूतशुद्धी व चित्तशुद्धीसाठी साधनात ज्या ज्या क्रिया होतात त्यांचा खरा हेतू किंवा तात्पर्य हेच असते की, स्थूलतेचे विसर्जन व्हावे. ज्यावेळी पंचभूतांचे शुद्धीकरण होते तेव्हा पंचीकरणाची स्थिती राहत नाही. इतकेच नव्हे; तर पंचबिंदू सुद्धा एका बिंदूच्या रूपात परिणत होतात. त्यानंतर चित्तशुद्धी होते. एक बिंदू शुद्ध झाला की, ज्ञानचक्षूंचे म्हणजेच तृतीय नेत्राचे उन्मीलन होते. या अवस्थेतून पुढे जात जात जीवाला ब्रह्मज्ञान प्राप्त होऊन सर्वश्रेष्ठ अशी साम्यावस्था प्राप्त होते. हे सर्व घडून येण्यासाठी कुंडलिनी शक्तीचे उद्बोधन होणे नितांत आवश्यक असते; कारण त्याशिवाय अन्य कोणत्याही प्रकाराने जीवाची ऊर्ध्वगती होऊ शकत नाही."

**ज्ञानदान :-**

श्रीसद्गुरूंचा शक्तिपातयुक्त कृपाप्रसादरूप अनुग्रह म्हणजे ज्ञानदान होय. जीवाला मुक्तीसाठी हे ज्ञानाचे दान श्रीसद्गुरूंकडून मिळालेच पाहिजे; कारण "**ऋते ज्ञानान्न मुक्तिः**" असा शास्त्राचा त्रिकालाबाधित सिद्धान्त आहे. ज्ञान ही दानाची वस्तू आहे हे मागे सांगितलेच आहे. हे महान् कार्य श्रीसद्गुरूंकडून मिळणाऱ्या दीक्षानुग्रहाने सुसंपन्न होत असल्यामुळे ज्या प्रक्रियेद्वारा असे ब्रह्मज्ञानाचे दान केले जाते व सर्व पाश आणि कर्मबंधनांचा नाश केला जातो त्या प्रक्रियेला तत्त्वचिंतन करणाऱ्या विभूतींनी व ज्ञानी लोकांनी दीक्षा असे म्हटले आहे.

अशा प्रकारे ज्या दीक्षेत ज्ञानाचे अपूर्व दान शिष्याला मिळते त्या दीक्षेला वेदान्तात शांभवी दीक्षा असे म्हणतात. "**शिवपुराणात**"

शास्त्रकार असे म्हणतात की -

**गुरोरालोकमात्रेण भाषणात्स्पर्शनादपि।**
**सद्यः सञ्जायते ज्ञानं सा दीक्षा शाम्भवी मता।।१३.७।।**

परम कृपाळू श्रीगुरुदेव दृष्टिक्षेपाने, भाषणाने म्हणजे मंत्राने, "तत्त्वमसि" वाक्याने अथवा स्पर्शद्वारा शक्तिपातयोगाची दीक्षा देतात. त्यामुळे श्रीगुरूंची शक्ती शिष्यामध्ये संक्रमित होते. ही प्रक्रिया झाल्याबरोबर तत्काळ शिष्याच्या ठिकाणी दिव्य ज्ञान उत्पन्न होते. यालाच शांभवी दीक्षा असे म्हणतात. ज्ञानदानाचे हे कार्य कसे घडते व त्याची अपरिहार्यता किती आहे हे सांगताना श्रीसंत ज्ञानेश्वर-महाराज "**श्रीज्ञानेश्वरीच्या**" १८ व्या अध्यायात असे म्हणतात की -

**तरी अविद्येचिया निदा। विश्वस्वप्नाचा हा धांदा।**
**भोगीत होता प्रबुद्धा। अनादि जो।।४०३।।**
**तो महावाक्याचेनि नांवें। गुरुकृपेचेनि थांवें।**
**माथां हातु ठेविला नव्हे। थापटिला जैसा।।४०४।।**
**तैसा विश्वस्वप्नेसीं माया। नीद सांडूनि धनंजया।**
**सहसा चेइला अद्वैया-। नंदपणें जो।।४०५।।**

"हे प्रबुद्धा अर्जुना! जीव अविद्यारूपी निद्रेत विश्वरूपी स्वप्न-व्यवहाराचा अनुभव अनादि काळापासून घेत असतो. ज्यावेळी त्याला श्रीसद्गुरू भेटतात तेव्हा ते शक्तिपातपूर्वक "तत्त्वमसि" महावाक्याचा उपदेश करतात. यालाच शब्ददीक्षा असे म्हणतात. ते त्याच्यावर कृपादृष्टी टाकतात. याला कृपादीक्षा असे म्हणतात. किंवा श्रीसद्गुरू शिष्याच्या मस्तकावर नुसता हात ठेवीत नाहीत तर प्रत्यक्ष थापटी मारून ते आत्मशक्तिस्वरूप कुंडलिनी शक्ती जागृत करून ज्ञानदान करतात. याला स्पर्शदीक्षा म्हणतात. श्रीगुरूंच्या नुसत्या दर्शनानेही शिष्याची आत्मशक्ती जागृत होते. अशा प्रकारे ज्ञानदान घडले की, माया म्हणजे अनादि शक्ती जगरूपी स्वप्नासह अज्ञानरूपी निद्रा टाकून देते. ही प्रक्रिया घडली की, या शक्तीच्या सामर्थ्याने आपण अद्वयानंदादि निजस्वरूप आहोत असा यथार्थबोध साधकाला होतो.

यासाठी श्रीसद्गुरूंकडून ज्ञानदानाचे कार्य दीक्षाद्वारा झालेच पाहिजे हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, "हे अर्जुना! या चारही प्रकारांनी तुझ्यावर माझी कृपा होईल तेव्हा अभेदरूपी सेवेने तुझे चित्त भरून जाईल म्हणजे तू मद्रूप होशील. असे झाले म्हणजेच तुझ्यावर माझा पूर्ण प्रसाद झाला असे समज. जन्म व मृत्यू ही तर दु:खाची निवासस्थाने आहेत. ती जीवमात्रांकडून भोगली जातात. या अनादि कालचक्ररूप परंपरेचा नाश होणे अतिशय दुर्घट असते. परंतु माझ्या या शक्तिपातयोगदीक्षेच्या प्रसादप्राप्तीमुळे तुला ही दु:खे सुखकारक व सोपी होतील. जेव्हा सूर्यप्रकाशाची साह्यता डोळ्यांना मिळते तेव्हा त्यांना अंधाराची किंमत वाटत नाही. त्याचप्रमाणे श्रीसद्गुरूंच्या साहाय्याने माझा हा शांभवी विद्येचा प्रसाद मिळून ज्याची जीवपणाची हीनदशा जाऊन व विभुदशा म्हणजे ब्रह्मप्राप्ती होते तो संसाररूपी बागुलबुवाच्या भीतीने घाबरणे कधीही शक्य नाही. म्हणून हे धनंजया! माझा योगदीक्षाप्रसादच ज्ञानोपलब्धी झाल्याने या संसाररूपी दुर्गतीपासून तुला तारून नेईल. मात्र अशा प्रकारच्या दीक्षाप्रसादाची अहंकाराने व अभिमानाने तू अवहेलना करशील व अशा प्रकारच्या ज्ञानदानानेच जीव संसारसागर तरून जातो हे तू नुसते आपल्या कानामनाला स्पर्शही करू देणार नसशील तर तू वस्तुत: जरी नित्यमुक्त व अव्यय असलास तरी अशी कृपादीक्षा न मिळाल्याने ते सर्व व्यर्थ होईल. मग देहतादात्म्यसंबंधीचे घाव तुझ्या अंगावर आदळून ते तुला सोसावेच लागतील; कारण शक्ती जागृत झाल्याशिवाय ती ज्ञानाचा उदय घडवून आणीत नाही व देहतादात्म्य-संबंधाचा विच्छेदही होत नाही. (१८.१२६९ ते १२७५)

असा ज्ञानदानाचा महिमा आहे. आत्मस्वरूपाची उपलब्धी ज्ञानाने होते. वास्तविक पाहता हा आत्मा एकमात्र श्रीगुरू आहे "**आत्मा वै गुरुरेक:।**" व तो प्राचीन श्रीगुरूंचा श्रीगुरू आहे; कारण तो कालाने मर्यादित नाही. **"स एष पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्" (पातंजल योगसूत्र १-२६)** असे शास्त्रकारांचे मत आहे. त्या आत्म्याचे तत्त्व

व स्वरूप जाणण्यासाठीच मनुष्यरूपी श्रीगुरू करावा लागतो. अर्थात् जर एका मनुष्यरूपी श्रीगुरूंकडून तत्त्वपिपासा शमली नाही तर अन्य श्रीगुरूंचा आश्रय करण्यात अपराध, दोष किंवा आपत्ती नाही हे सांगताना "**कुलार्णवतंत्राच्या**" १३ व्या उल्लासामध्ये असे म्हटले आहे की -

**अनभिज्ञं गुरुं प्राप्य संशयच्छेदकारकम्।**
**गुर्वन्तरं तु गत्वा स नैतद्दोषेण लिप्यते।।१३१।।**
**मधुलब्धो यथा भृङ्गः पुष्पात् पुष्पान्तरं व्रजेत्।**
**ज्ञानलुब्धस्तथा शिष्यः गुरोर्गुर्वन्तरं व्रजेत्।।१३२।।**

अज्ञानी श्रीगुरूंच्यामुळे जर संशयाचा नाश झाला नाही तर जो आपल्या संशयाचा नाश करील अशा समर्थ श्रीगुरूंपाशी शिष्य गेल्यास त्यात त्याला कोणताही दोष लागत नाही. ज्याप्रमाणे मध मिळावा म्हणून मधमाशी एका फुलावरून दुसऱ्या फुलावर जाते त्याप्रमाणे जो ज्ञानार्थी शिष्य आहे तो ज्ञानप्राप्ती होईपर्यंत एक श्रीगुरू सोडून दुसरे श्रीगुरू करू शकतो.

"**शिवपुराणातही**" श्रीशंकरांनी हाच नियम सांगितला आहे.

**यत्रानन्दः प्रबोधो वा नाल्पमप्युपलभ्यते।**
**संवत्सरादपि शिष्येण सोऽन्यं गुरुमुपाश्रयेत्।।१३.४८।।**

दीक्षा झाल्यानंतर जर शिष्याला अल्पमात्रही आनंद व प्रबोध प्राप्त झाला नाही तर दीक्षेनंतर एक वर्षभर वाट पाहावी. श्रीगुरूंनी सांगितल्या प्रमाणे साधन करूनही जर एका वर्षात आनंद व प्रबोध प्राप्त झाला नाही तर दुसऱ्या श्रीगुरूंचा अवश्य आश्रय करावा. श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी "**श्रीदासबोधाच्या**" पाचव्या दशकाच्या दुसऱ्या समासात "ज्ञानदान करतात तेच खरे श्रीसद्गुरू होत" असे वर्णन केले आहे.

**जो ब्रह्मज्ञान उपदेशी। अज्ञान अंधार निरसी।**
**जीवात्मया शिवात्म्यासी। ऐक्यता करी।।९।।**
**विघडले देव आणि भक्त। जीवशिवपणें द्वैत।**

**तया देवभक्ता एकांत। करी तो सद्गुरू।।१०।।**
**भवव्याघ्रें घालूनि उडी। गोवत्सांस तडातोडी।**
**केली देखोनि शीघ्र सोडी। तो सद्गुरु जाणावा।।११।।**
**वासनानदी महापुरीं। प्राणी बुडतां ग्लानी करी।**
**तेथें उडी घालूनि तारी। तो सद्गुरु जाणावा।।१२।।**
**प्राणी मायाजाळीं पडले। संसारदु:खें दुखविलें।**
**ऐसें जेणें मुक्त केलें। तो सद्गुरु जाणावा।।१३।।**
**गर्भवास अतिसांकडी। इच्छाबंधनाची बेडी।**
**ज्ञान देऊनि शीघ्र सोडी। तो सद्गुरु जाणावा।।१४।।**
**जो कोणी ज्ञान बोधी। समूळ अविद्या छेदी।**
**इंद्रियदमन प्रतिपादी। तोचि सद्गुरु जाणावा।।२२।।**

इतके सांगून झाल्यावर जे ज्ञानप्राप्तीने साधन देऊ शकत नाहीत त्या श्रीगुरूंचा त्याग करावा हे सांगताना श्रीसमर्थ असे म्हणतात की -

**शिष्यासी न लाविती साधन। न करविती इंद्रियदमन।**
**ऐसे गुरु अडक्याचे तीन। मिळाले तरी टाकावे।।२१।।**

**दिव्यचक्षूंचे उन्मीलन :-**

खऱ्या श्रीसद्गुरूंच्या अनुग्रहाची परिणती दिव्यचक्षूंच्या उन्मीलनात होऊन शिष्य खऱ्या अर्थाने कृतार्थ होत असल्याने श्रीगुरुगीतेत या श्रीसद्गुरूंच्या अलौकिक कार्याच्या दृष्टीकोनातूनच अपूर्व प्रार्थना केलेली आढळते.

**अज्ञानतिमिरान्धस्य ज्ञानाञ्जनशलाकया।**
**चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरवे नमः।।३४।।**

अज्ञानरूपी तिमिराने अंध झालेल्या व्यक्तीचे नेत्र ज्ञानरूपी अंजन-शलाकेच्या द्वारा जे उघडतात तेच खरे श्रीगुरू होत. अशा श्रीगुरुदेवांना नमस्कार असो. आपण देहस्वरूप आहो, जग सत्य आहे, आपले मूळ स्वरूप काय आहे याचे स्मरण नाही व कल्पना हे अज्ञानाचे स्वरूप आहे. या अज्ञानामुळे मनुष्य संसाराला प्रवृत्त करणाऱ्या अवगुणांच्या समुदायात गुरफटून गेल्यामुळे अंध बनतो. त्याची नित्या-

नित्यविववेकबुद्धी नाहीशी होते. अनादि कालापासून या संसारात रमल्यामुळे विशुद्ध शक्तीचे स्फुरण कधी जीवाला जाणवत नाही. जीव नित्य, शुद्ध, बुद्ध व मुक्त असूनही तो आपण स्वतः अल्पज्ञ व अल्पशक्ती आहो अशी कल्पना करतो. संसाराचे सोंग घेऊन तो मायिक जगतात आपापल्या अधिकाराप्रमाणे वावरत असतो. त्यामुळे चैतन्यशक्ती वास्तविक जागृत असूनही ती जणू काही लुप्त झाली आहे असे वाटते. अशा या अवस्थेलाच अज्ञानतिमिरांधत्व किंवा कुंडलिनीची निद्रावस्था असे म्हणतात. जीवाची ही घोरतम निद्रावस्था ज्ञानांजनशलाकेने दूर होते. ज्ञानांजनशलाका म्हणजे ज्ञानरूपी अंजन शिष्याच्या डोळ्यात घालणारे साधन. हे साधन, ही शलाका म्हणजेच शक्तिपात होय. वेदान्तज्ञान अनुभवगम्य होण्यासाठी शक्तिपाताशिवाय दुसरा मार्ग नाही. शक्तिपात करून श्रीसद्गुरू शिष्याला ज्ञानचक्षू प्राप्त करून देतात. त्यामुळे श्रीभगवंतांनी "**श्रीमद्भगवद्गीतेत**" असे म्हटले आहे की -

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम्।।१३.३४।।**

जड, विकारी, क्षणिक व नाशवंत गोष्टीला क्षेत्र म्हणतात. नित्य चेतन, अविकारी व अविनाशी गोष्टीला क्षेत्रज्ञ म्हणतात. या दोन गोष्टींमधील भेद व अंतर लक्षात आले पाहिजे. तसेच भूतमात्रांची मूळ प्रकृती जी अविद्या तिच्यापासून सुटण्याचा मार्ग जाणला पाहिजे. जड व चैतन्य यातील अंतर कळून मुक्तीचा उपाय हा ज्ञानचक्षूंमुळेच प्राप्त होतो. जे साधक ज्ञाननेत्रांनी अर्थात् श्रीसद्गुरूंच्या कृपेमुळे जागृत झालेल्या शक्तीमुळे ही गोष्ट तत्त्वतः जाणतात ते महात्मे साधक परब्रह्म परमात्म्याशी सामरस्य प्राप्त करून घेतात.

**सन्मार्ग प्रदर्शक :-**

सन्मार्ग दाखविणे हे श्रीगुरूंचे फार मोठे असे कार्य आहे. "**सिद्ध-सिद्धान्तसंग्रहकार**" श्री.बलभद्रांनी श्रीगुरूंच्या या कार्याचा परिचय करून देताना असे म्हटले आहे की, "जे परंपरेने प्राप्त झालेला

सन्मार्ग दाखविण्यात अत्यंत समर्थ असतात तेच वास्तविक श्रीगुरू म्हणण्यास पात्र आहेत. आत्मविश्रांतीचे दान साधकाला करण्याचे सामर्थ्य अशा श्रीसद्गुरूंमध्येच असते. ते जो मार्ग दाखवितात त्याचा अवलंब करून निष्ठेने जो साधक वाटचाल करतो त्यालाच स्वसंवेद्याचे दर्शन होते. याकरिताच श्रीगुरूंचे देवस्वरूपात चिंतन केले पाहिजे. अशा प्रकारे श्रीसद्गुरूंच्या कृपादृष्टीनेच मुनी लोक सर्व सिद्धींच्या फलाचा त्याग करून स्वतःच स्वतःला जाणणाऱ्या स्वरूपापासून पुन्हा निरुत्थान दशेमध्ये येतात तेव्हा कृतार्थ होतात. एवढेच नव्हे; तर पिंडाला समरस करण्यात समर्थ होतात." (५.७,८)

**आदर्श श्रीगुरूंची लक्षणे :-**

श्रीगुरुभक्ती ही सर्वश्रेष्ठ अशी साधनसंपत्ती असल्याने श्रीगुरु-भक्तीचाच आश्रय सर्वश्रेष्ठ होय हे **"श्रीमद्भागवताच्या"** एकादश स्कंदावरील तिसऱ्या अध्यायातील २१ व्या श्लोकाच्या पूर्वार्धात सांगून, आदर्श श्रीगुरू कसे असावेत हे श्रीव्यासांनी उत्तरार्धात कथन केले आहे.

**तस्माद् गुरुं प्रपद्येत जिज्ञासुः श्रेय उत्तमम्।**
**शाब्दे परे च निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम्।।११.३.२१।।**

ज्याला परमश्रेयाला जाणण्याची इच्छा असेल त्याने वेदाख्य ब्रह्मामध्ये व शक्तिपातयोगाने परब्रह्माचा साक्षात्कार घडविणाऱ्या कलेमध्ये प्रवीण असलेल्या व निवृत्तीमार्गाचा आश्रय असलेल्या श्रीगुरूंना शरण जावे.

**अनुभूतीची प्राप्ती :-**

उपरोक्त श्लोकावर टीका करताना **"श्रीएकनाथी भागवतामध्ये"** श्रीनाथांनी अनुभूतीची प्राप्ती करून देणे हे आदर्श श्रीगुरूंचे सर्वश्रेष्ठ लक्षण आहे असे स्पष्ट केले आहे. श्रीनाथमहाराज असे म्हणतात की, "जे श्रीगुरू पूर्ण अनुभवी असतात तेच सच्छिष्याला सद्भावाने तारू शकतात. आदर्श श्रीसद्गुरूंच्या लक्षणाबद्दल जगामध्ये नानाप्रकारची मतमतांतरे आहेत. परंतु जे शिष्याला अनुभवाची प्राप्ती करून

देतात त्यांनाच श्रीसद्गुरुस्वामी म्हणतात. ज्यांच्या वाक्याने शक्ति-संक्रमण घडून आल्याने शिष्याची मिथ्या जगद्भावना तत्त्वतः निःशेष मावळते त्यांनाच श्रीसद्गुरुत्व आहे असे वेद व शास्त्रे यात प्रतिपादन केले आहे. जे मंत्रतंत्रांचा उपदेश करतात तेही फार थोर व पूज्य होत; परंतु पूज्य व पूजक हा विकार मावळून टाकणारे साधन जे देतात तेच खरे श्रीसद्गुरुस्वामी होत.

अशा प्रकारची दुसऱ्याला अनुभूती देणारे श्रीसद्गुरू स्वतः पूर्णपणे आत्मानुभवी असतात. त्यांचे ब्रह्मज्ञान शुद्ध असते. ब्रह्मवस्तूला पाहून त्यांचे मन विरून गेलेले असते. त्यांचे द्वैताचे भान मावळून गेलेले असते. त्यांच्या चारही वाणींना मौन पडते. सर्व इंद्रिये तटस्थ होतात. परम अद्भुत वस्तूच्या अनुभूतीने त्यांचे प्राण पांगळून त्यांच्या देहभावाला ताटस्थ्य प्राप्त झालेले असते. अशा आत्मानुभवी श्रीगुरूंना जेव्हा शिष्य सद्भावाने अनुग्रहार्थ प्रार्थना करतो तेव्हा असले श्रीगुरू त्या शिष्याला काही विचारीत नाहीत व काही समजून सांगत नाहीत. तर ते अगदी तटस्थपणे मौन धरून बसतात. त्यांच्या या मौनानेच सर्व कार्य घडून येते. शिष्याचे कल्याण व्हावे असा भाव श्रीसद्गुरूंच्या मनात उत्पन्न झाल्याबरोबर त्यांच्या कृपानुग्रहरूप शक्तिपाताने शिष्याला ब्रह्मानुभव प्राप्त होऊन त्याचा बाध्यबाधकतेचा भ्रम निवृत्त होतो. द्वैतभावाचे कर्म थांबते. जगातील विषमभाव जातो. अशा प्रकारे कोठेही आसक्त न होता जगात राहून दुसऱ्या कोणालाही करता येणार नाही असे अनुभूतिदानाचे कार्य श्रीसद्गुरू करतात.

अशा प्रकारे श्रीसद्गुरू दीन शिष्यावर शरीर, वाणी व मन यांनी अतिशय कृपा करतात. ते शिष्याची सर्व बंधने तोडतात व अहंकार नाहीसा करतात.

ब्रह्मानुभूतीची प्राप्ती शिष्याला करून देणे हे श्रीसद्गुरूंचे असामान्य, एकमेवाद्वितीय, अपूर्व, व आवश्यक लक्षण कसे आहे हे श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी ग्रंथराज "**श्रीदासबोधात**" जागोजागी पुनःपुन्हा प्रतिपादन केले आहे.

**जेथें शुद्ध ब्रह्मज्ञान। आणि स्थूळ क्रियेचें साधन।**
**तोचि सद्गुरु निधान। दाखवी डोळां।।५.२.२८।।**
**सद्गुरुकृपेचेनि बळें। अपरोक्षज्ञानाचेनि उसाळें।**
**मायेसहित ब्रह्मांड सगळें। दृष्टीस न ये।।५.३.४८।।**
**ब्रह्म दृष्टीस दिसेना। ब्रह्म मूर्खासी असेना।**
**ब्रह्म साधूविण येईना। अनुभवासी।।७.२.५।।**
**आतां मनासि जें अप्राप्त। तें कैसेंनि होईल प्राप्त।**
**ऐसें म्हणाल तरी कृत्य। सद्गुरुविण नाहीं।।७.२.१२।।**
**भांडारगृहें भरलीं। परी असतीं अडकिलीं।**
**हातास न येता किल्ली। सर्वही अप्राप्त।।७.२.१३।।**
**तरी ते किल्ली ते कवण। मज करावी निरूपण।**
**ऐसा श्रोता पुसे खूण। वक्त्यासी।।१४।।**
**सद्गुरुकृपा तेचि किल्ली। जेणें बुद्धी प्रकाशिली।**
**द्वैतकपाटें उघडलीं। एकसरीं।।१५।।**

**विविध गुणलक्षणे :-**

अनुभूतीची प्राप्ती करून देणे या श्रीसद्गुरूंच्या अनन्यसाधारणत्वाबरोबरच त्यांच्या ठिकाणी इतरही नानाविध गुणांचा साठा असावा म्हणून शास्त्रकारांनी परोपरीने सांगितले आहे. **"कुलार्णवतंत्राच्या"** १३ व्या उल्लासात श्रीसद्गुरूंच्या विविध गुणलक्षणांचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे. श्रीशंकर श्रीपार्वतीला असे म्हणाले की, "योगदीक्षा देणाऱ्या सामर्थ्यसंपन्न श्रीगुरूंची लक्षणे मी तुला सांगतो. श्रीसद्गुरूंचा वेष चांगला असतो. त्यांची वस्त्रे शुद्ध व सुशोभित असतात. त्यामुळे त्यांना मनोहरत्व प्राप्त होते. त्यांचे सर्व शारीरिक अवयव सुंदर व सर्व शुभ लक्षणांनी युक्त असतात. ते सर्व शास्त्रांचे खरे सार व तत्त्वे जाणत असतात. त्याचप्रमाणे शास्त्रांनी कथन केलेल्या क्रियाकर्मादींची व्यवस्था व विधान यांचेही त्यांना ज्ञान असते. श्रीसद्गुरूंवर लोक मोहित होतात. त्यांचे दर्शन सर्वांना अत्यंत प्रिय असते. त्यांच्याकडे येणाऱ्या सर्वांना ते अत्यंत प्रसन्न व आनंदित

करतात. श्रीसद्गुरूंचा चेहराही नेहमी प्रसन्न असतो. शास्त्राचे जे सिद्धान्त असतात त्याबद्दल अनुकूल व प्रतिकूल विचार करण्यात ते मोठे विलक्षण असतात. ते नुसत्या इशारतीने तत्त्व समजून देऊ शकतात. एखादा अत्यंत कठिणातील कठीण विषयसुद्धा ते समजावून देऊ लागले की, सोपा होऊन साधकाचा संशय व भ्रम दूर होतो. अशी लक्षणे ज्यांच्या ठिकाणी आढळतात तेच पुरुष तत्त्वज्ञानाची दीक्षा देण्याला योग्य असतात."

"श्रीसद्गुरूंची दृष्टी बाहेर असली तरी त्यांचे सर्व लक्ष अंतरंगात असते. ते सर्वज्ञ असून देशकालादींचे त्रिकालदर्शी ज्ञाते असतात. सिद्धी त्यांच्या आज्ञेत असतात. ते ज्या कोणाला जशी आज्ञा देतात ती त्याचप्रकारे फलद्रूप होऊन सिद्धीला जाते. ते कृपा व दंड करण्यात समर्थ असतात. श्रीसद्गुरू आपले सामर्थ्य स्वेच्छेने देऊन परतही घेऊ शकतात. ते षड्रिपू जिंकून जितेंद्रिय झालेले असतात. सर्व कार्यात ते अग्रगण्य राहतात. त्यांची प्रकृती अत्यंत गंभीर असते. पात्र कोण व अपात्र कोण हे ते विशेषत्त्वाने जाणतात. श्रीशिव, श्रीविष्णू इत्यादि सर्व देवतांच्याबद्दल त्यांची बुद्धी सम असते. असे श्रीसद्गुरू सद्गुणांनी विभूषित झालेले असल्याने साधूंचे भूषणच असतात. त्यामुळेच योगदीक्षा देण्यास ते योग्य असतात."

"श्रीसद्गुरू अंतस्थपणे अक्षरशः ममतारहित असतात. ते नेहमी संतुष्ट, स्वतंत्र व अनंत शक्तिशाली असतात. जेव्हा सद्भक्त श्रीसद्गुरूपाशी येतात तेव्हा ते त्यांना प्रेम, धीर, कृपा देऊन व हास्यपूर्ण सुखप्रद बोलून संतुष्ट करतात. राग, द्वेष, भय, क्लेश, दंभ, अहंकार इत्यादिंपासून अलिप्त असलेले श्रीसद्गुरू नेहमी नित्य नैमित्तिक व आनंदित अशा काम्यकर्मात रत असतात. ते आपल्या विद्यानुष्ठानामध्ये निमग्न राहून धर्म व ज्ञानदानाचे कार्य सतत करतात. गुणदोषादि भेदांचे ज्ञान त्यांच्या ठिकाणी विशेषप्रकारे दिसून येते. जे काही दैवाने मिळेल त्यातच ते संतुष्ट असतात. अशा उत्तम लक्षणांनी संपन्न असलेले महापुरुषच ब्रह्मज्ञानाची दीक्षा देण्याला योग्य असतात."

"श्रीसद्गुरू स्त्री व धन इत्यादिंमध्ये कधीच आसक्त होत नाहीत. दुःसंगती व दुर्व्यसन यापासून ते नेहमी दूर असतात. ते निर्द्वंद्व, नियत, व्रतधारी व संयमी असून आपल्यामध्येच संतुष्ट असतात. ते तृष्णारहित, संकल्पशून्य, अपक्षपाती, विचक्षण, संगरहित, विकल्पशून्य, आत्मतत्त्वसाक्षात्कारी, अत्यंत धार्मिक, निंदास्तुती समान मानणारे व मननशील असतात. ते कोणाची व कशाचीही अपेक्षा करीत नाहीत. आपल्या आत्मबलाने ते दुसऱ्यांना सहजासहजी नियंत्रित करू शकतात. अशा शुभलक्षणांनी जे युक्त असतात ते श्रीसद्गुरूच आत्मज्ञानदीक्षा देण्यास योग्य ठरतात."

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनीही "**श्रीदासबोधात**" खऱ्या, ज्ञानी व सामर्थ्यसंपन्न श्रीसद्गुरूंची लक्षणे फार अपूर्व पद्धतीने वर्णन केली आहेत. श्रीसमर्थ म्हणतात, "अनादि इच्छेमुळे माणूस बंधनात पडून जन्ममरण परंपरादि तीव्रतर दुःखे सोसत असतो. अशा प्रकारे अनंत जन्म दुःख भोगल्यावर जेव्हा ईश्वरकृपेने तो अनन्यभावाने श्रीसद्गुरूंना शरण जातो तेव्हा श्रीसद्गुरू आपल्या शक्तिपातयोगाच्या सामर्थ्याने शिष्याला ज्ञान देऊन तत्काळ सोडवितात. हे कार्य जे करतात तेच श्रीसद्गुरू होत. श्रीसद्गुरू नुसती वाचिक बडबड करीत नाहीत तर ते आपल्या सामर्थ्याने "तत्त्वमस्यादि" महावाक्यांचा खरा अर्थ व मर्म ज्यामध्ये दडलेले असते ते आत्मतत्त्व किंवा ती ब्रह्मवस्तू शिष्याला दाखवून अनुभवगम्य करून देतात. अशी अलौकिकता ज्यांच्या ठिकाणी असते तेच अनाथांचे माहेर मायबाप असे श्रीसद्गुरू होत. एकदेशीपणाच्या म्हणजे आपण श्रीशिव नसून जीव आहोत, विभू नसून अणू आहोत व श्रीब्रह्मासारखे सर्वव्यापी नसून अल्पव्यापी आहोत अशा कल्पनेने माणूस दीन होतो. परंतु श्रीसद्गुरू शक्तिपातयोगाने साधकाला तत्काळ साक्षात् ब्रह्मरूप करून टाकतात. त्यामुळे संसार खरा आहे असे वाटल्यामुळे त्याला जे दुःख होत असते ते या शब्ददीक्षेने नाहीसे होते. वेद, शास्त्रे व संत या तिघांचा अनुभव एकच असतो. या अनुभवाशी जे ऐक्य करून देतात ते श्रीगुरुराज

होत. श्रीसद्गुरू संशय अजिबात जाळून टाकतात. ते स्वतः स्वधर्माचे प्रतिपालन आदरपूर्वक करतात आणि वेदबाह्य आचरण करून बाष्कळपणा करीत नाहीत. इतके सांगून झाल्यावर श्रीसमर्थ असे म्हणतात की -

**मुख्य सद्गुरूंचे लक्षण। आधीं पाहिजे विमळ ज्ञान।**
**निश्चयाचें समाधान। स्वरूपस्थिती।।५.२.४५।।**
**याहीवरी वैराग्य प्रबळ। वृत्ति उदासीन केवळ।**
**विशेष आचरें निर्मळ। स्वधर्माविषयीं।।४६।।**
**याहीवरी अध्यात्मश्रवण। हरिकथानिरूपण।**
**जेथें परमार्थविवरण। निरंतर।।४७।।**
**जेथें सारासार विचार। तेथें होय जगदुद्धार।**
**नवविधा भक्तीचा आधार। बहुत जनांसी।।४८।।**
**म्हणौनी नवविधा भजन। जेथें प्रतिष्ठीले साधन।**
**हें सद्गुरूंचें लक्षण। श्रोतीं वोळखावें।।४९।।**
**अंतरीं शुद्ध ब्रह्मज्ञान। बाह्य निष्ठेचें भजन।**
**तेथें बहुत भक्तजन। विश्रांती पावती।।५०।।**
**नाहीं उपासनेचा आधार। तो परमार्थ निराधार।**
**कर्मेविण अनाचार। भ्रष्ट होती।।५१।।**
**म्हणौनी ज्ञान वैराग्य आणि भजन। स्वधर्मकर्म आणि साधन।**
**कथानिरूपण श्रवणमनन। नीति न्याय मर्यादा।।५२।।**
**यांमध्यें एक उणे असे। तेणें तें विलक्षण दिसें।**
**म्हणोनि सर्वहि विलसे। सद्गुरूपाशीं।।५३।।**

"**श्रीएकनाथी भागवताच्या**" तिसऱ्या अध्यायात श्रीनाथांनीही श्रीसद्गुरूंची विविध लक्षणे पुढीलप्रमाणे सांगितली आहेत. "आता श्रीसद्गुरूंची जी स्वाभाविक लक्षणे असतात ती मी तुला सांगतो. ती ऐकून तुझे अंतःकरण सद्भावाने सुखी होईल. श्रीसद्गुरू दीनांवर शरीराने स्पर्शदीक्षा देऊन, वाणीने शब्ददीक्षा देऊन व मनाने कृपादीक्षा देऊन अत्यंत कृपा करतात. ते शिष्यांची संसारबंधने तोडतात व

अहंकार समूळ नाहीसा करतात. ते शब्दज्ञानामध्ये पारंगत असतात. ब्रह्मानंदाने सदा डुलत असतात आणि शिष्याला आत्मभावाने अधिकाराप्रमाणे बोध करण्यास समर्थ असतात. ज्याचा जसा भाव असतो तशीच प्रतीती शिष्याला श्रीसद्गुरू आणून देतात. ते गुरुत्वाचा अहंभाव अणुमात्रही धरीत नाहीत. शिष्यापासून सेवा करून घेण्याची कल्पना कधी स्वप्नातही त्यांच्या चित्तात उद्भवत नाही. उलट स्वतः शिष्याची सेवा करणे व आपल्या शिष्याला पूज्यत्वाने पाहणे हा श्रीसद्गुरूंचा स्वभावच आहे. "शिष्याला पुत्रासमान पाहणे," हे स्मृतिवाक्य याविषयी प्रमाण आहे. त्यामुळे शिष्याला कमी समजणे हे त्यांना ठाऊकच नसते. त्याला ते पूर्ण ब्रह्मभावाने पाहतात. शिष्य आपल्या भावनेनेच श्रीसद्गुरूंची सेवा करतो. पण श्रीसद्गुरू त्याला आपला सेवक म्हणत नाहीत; कारण ज्यांना सर्व भूते भगवद्रूप झालेली असतात त्यांना शिष्य हा सेवक आहे ही भावनाच राहत नाही. मी हा असा एक महायोगी आहे असेही ते जगात मिरवीत नाहीत. ते आपल्या अंगी श्रीसद्गुरुत्वाचा ताठा केव्हाही भरू देत नाहीत व आपल्या चरितार्थाचा भार स्वप्नातही शिष्यावर घालीत नाहीत. उलट शिष्याचे अत्यंत मोठे संकटही ते स्वतःच निवारण करतात. मी एक अकर्ता आत्मयोगी आहे अशा अभिमानाने ते विषयांचा भोग घेत नाहीत व स्वतः त्याचा त्यागही करीत नाहीत. असे श्रीसद्गुरू प्रारब्धाच्या अनुसार जे प्राप्त होईल ते देहाकडून करवून परब्रह्मचिंतनात निमग्न असतात. देह पालखीत बसला किंवा विष्ठेत पडला तरी त्या दोहोंचेही सुखदुःख त्यांच्यापुढे "मी" म्हणून कधीच उभे राहत नाही. देहात असूनही त्यांना अहंकार व गृहासक्ती असत नाही. उलट ते व्यवहारात लौकिक स्थितीला अनुसरून लोकांप्रमाणे सुखाने वागतात. श्रीसद्गुरूंची पत्नी त्यांना हा माझा पती असे म्हणते, पुत्र हे माझे वडील आहेत असे म्हणतात व शिष्य हे माझे गुरू आहेत असे म्हणतात. परंतु श्रीसद्गुरू हे तत्त्वतः त्या सर्वांपासून अलिप्त राहून त्यांच्यात असतात. अशा प्रकारे आपल्या पूर्ण प्रतीतीने ते ईश्वराची भक्ती करून दाखवितात

आणि सर्व भूतांमध्ये हरीचे भजन करावे असाच शिष्यांना उपदेश करतात."

"श्रीसद्गुरूंची ही स्वाभाविक लक्षणे पंडितांना पांडित्याच्या अभिमानामुळे कळत नाहीत. जे पूर्णानुभवी असतात ते श्रीसद्गुरूंची खूण ओळखतात. इतरांचे ज्ञान त्यांच्या ठिकाणी कुंठित होते. पूर्ण शांती ही श्रीसद्गुरूंची खरी खूण आहे. तेच श्रीसद्गुरुत्वाचे मुख्य लक्षण व भूषण आहे." (३.२९५ ते ३१२)

**सत् शिष्याची लक्षणे :-**

शक्तिपातयोगाचे साधन करणाऱ्या साधकाच्या ठिकाणी उत्तमोत्तम लक्षणे असणे आवश्यक असते. अशी लक्षणे ज्या साधकाच्या ठिकाणी मूलतः असतात त्याला शास्त्राने सांगितलेली फले त्वरित मिळतात. ज्या साधकाच्या ठिकाणी ही लक्षणे नसतात त्याने ती लक्षणे अंगी बाणविण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**शरणागती :-**

श्रीसद्गुरूंना सर्वार्थाने शरण जाणे हे सत् शिष्याचे सर्वात मोठे लक्षण आहे. कारण अशा प्रकारे शिष्य शरणागत झाल्याशिवाय शक्तिसंक्रमणाची भूमीच उपलब्ध होऊ शकत नाही. शरणागती हे एक रहस्य आहे. "**सर्व साधनहीनस्य पराधीनस्य सर्वथा। पापहीनस्य दीनस्य कृष्ण एव गतिर्मम।।**" हे श्रीगुरुराया मी अगदी साधनहीन मनुष्य आहे. मायेमुळे सर्वार्थाने पराधीन झालो आहे व पापांच्या भाराखाली दबून गेलो आहे. असा मी दीन आहे. तूच माझी गती आहेस, "असे म्हणून शिष्य जेव्हा श्रीसद्गुरूंना शरण जातो तेव्हाच तो दीक्षेला पात्र ठरतो. ही दीनता व शरणागतता म्हणजे खरी निरभिमानता व अहंकारशून्यता होय. या अर्थानेच "**कुलार्णवतंत्रात**" शिष्याची व्याख्या करताना असे म्हटले आहे की-

**शरीरमर्थं प्राणांश्च सद्गुरुभ्यो निवेद्य यः।**
**गुरुभ्यः शिक्षते योगं शिष्य इत्यभिधीयते।।**

जो साधक तन, मन, धन व प्राण श्रीगुरूंना समर्पण करून

योगाचा अभ्यास करतो व योग शिकतो त्यालाच वास्तविक शिष्य म्हटले जाते.

श्रीसमर्थांनीही शरणागतीला अनन्यसाधारण महत्त्व देऊन "**श्रीदासबोधात**" सच्छिष्याची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे. त्यावरून हे लक्षण किती श्रेष्ठ व महत्त्वाचे आहे हे स्पष्ट होते.

**मुख्य सच्छिष्याचें लक्षण। सद्गुरुवचनीं विश्वास पूर्ण।**
**अनन्यभावें शरण। त्या नांव सच्छिष्य।।५.३.१९।।**
**लागतां सद्गुरुवचनपंथें। झालें ब्रह्मांड पालथें।**
**तरी जयाच्या शुद्ध भावार्थें। पालट न धरिजे।।५१।।**
**शरण सद्गुरूसि गेले। सच्छिष्य ऐसे निवडिले।**
**क्रियापालटें झालें। पावन ईश्वरीं।।५२।।**

**विविधगुण :-**

इतरही अनेक गुण सच्छिष्याचे ठिकाणी असावेत म्हणून शास्त्र-कारांनी त्यांचा परोपरीने व आवर्जून निर्देश केला आहे. "**कुलार्णव-तंत्राच्या**" त्रयोदश उल्लासात पुढील लक्षणे सांगितली आहेत. "जो साधक श्रीसद्गुरूंनी दिलेल्या समाधीच्या साधनात सतत निमग्न असतो, गुण व शीलादि शुभलक्षणांनी युक्त असतो तोच शिष्य तत्त्वज्ञानाची दीक्षा देण्यास उत्तम अधिकारी असतो. शुद्ध मनाचा, श्रद्धाभक्तियुक्त, शास्त्राचा जाणकार, चांगल्या सुदृढ शरीराचा, स्वच्छ वस्त्र धारण करणारा, विचारपूर्वक कर्म करणारा, उदारचित्त, गंभीर, मिताहारी, सर्व कार्यात दक्ष, निरभिमानी व निष्काम सेवा करणारा जो साधक असतो तोच योगदीक्षेला अधिकारी सच्छिष्य असतो.

सच्छिष्य सर्व कार्यात कुशल असतो. स्वच्छता, कृतज्ञता, पापभिरुता, सर्वांवर उपकार करण्याची वृत्ती व साधुसज्जनांना अनुकूल वर्तन करणे, विश्वास, विनय, आस्तिकता, दानशीलता, सर्वांचे हित पाहण्याची वृत्ती, विचक्षणता, उत्साह, प्रयत्नशील, असाध्य साध्य करणारा, अनुकूल कार्य करणारा, प्रमादरहित व तपस्या करणारा असा वीर पुरुषच ब्रह्मज्ञानाची दीक्षा देण्याला योग्य असतो.

सच्छिष्य हा सर्वांशी हितकर, दूषणरहित, परिमित व आनंदप्रद भाषण करतो. तो अत्यंत बुद्धिमान् व चतुर असतो. त्याला एखादी गोष्ट एकदा सांगितली की, त्याचा अर्थ त्याला त्वरित समजतो. असा बुद्धिमान् शिष्यच दीक्षेचा अधिकारी असतो. सच्छिष्याला आपली स्तुती व दुसऱ्याची निंदा ऐकणे आवडत नाही. तो नेहमी अत्यंत प्रसन्न असतो. दुसऱ्यांचे आवडते व चांगले काम करण्यात तो तत्पर असतो. असा जितेंद्रिय, संतुष्ट, बुद्धिमान् व ब्रह्मचारी सच्छिष्य योगदीक्षेचा अधिकारी असतो. सच्छिष्य मनस्ताप, दुश्चितादि अंतःकरणाची पीडा, शारीरिक रोग, चंचलता, दुःख, भ्रांती व संशय यांपासून मुक्त असतो. तो नेहमी श्रीगुरूंचे ध्यान, स्तुती, कथा व देवतार्चनामध्ये निमग्न असतो.

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनीही सच्छिष्याची लक्षणे ग्रंथराज **"श्रीदासबोधात"** फार सुंदर कथन केली आहेत. ते असे म्हणतात की -

**शिष्य पाहिजे निर्मळ। शिष्य पाहिजे आचारशीळ।**
**शिष्य पाहिजे केवळ। विरक्त अनुतापी।।५.३.२०।।**
**शिष्य पाहिजे निष्ठावंत। शिष्य पाहिजे शुचिष्मंत।**
**शिष्य पाहिजे नेमस्त। सर्व प्रकारीं।।२१।।**
**शिष्य पाहिजे साक्षेपी विशेष। शिष्य पाहिजे परम दक्ष।**
**शिष्य पाहिजे अलक्ष। लक्षी ऐसा।।२२।।**
**शिष्य पाहिजे अतिधीर। शिष्य पाहिजे अति उदार।**
**शिष्य पाहिजे अतितत्पर। परमार्थाविषयीं।।२३।।**

याप्रमाणे पुढील लक्षणेही श्रीसमर्थांनी आवर्जून सांगितली आहेत. सच्छिष्य हा परोपकारी, निर्मत्सरी, अर्थाकडे लक्ष देणारा, अत्यंत शुद्ध, परम सावध, अपार गुणांचा, प्रज्ञावंत, प्रेमळ भक्त, नीतिवंत, मर्यादाशील, युक्तिवंत, बुद्धिवंत, सद्सद् व नित्यानित्य विचारी, दृढ व्रताचा, उत्तम कुळाचा, पुण्यशील, सात्त्विक, भजनशील, उत्तम साधक व साधनकर्ता, विश्वासू, शरीर क्लेश सोसणारा, परमार्थ

वाढविणारा, स्वतंत्र, जगन्मित्र व सत्पात्र असावा. इतके सांगून श्रीसमर्थ पुढे असे म्हणतात की -

**याकारणें दृढ विश्वास। तोचि जाणा सच्छिष्य।**
**मोक्षाधिकारी विशेष। अग्रगण्यु।।५.३.३८।।**
**जो सद्गुरुवचनें निवाला। तो सायुज्यतेचा आंखला।**
**संसारपांगें पांगिला। न वचे कदा।।३९।।**
**सद्गुरुहूनि देव मोठा। जयास वाटे तो शिष्य करंटा।**
**सुटला वैभवाचा फाटा। सामर्थ्य पिसें।।४०।।**

**श्रीगुरुभक्तीचा उच्च आदर्श :-**

शक्तिपातयोगाचे खरे रहस्य श्रीगुरुभक्तीत आहे. हे रहस्य आत्मसात करून साधकाने आपण ज्या परिस्थितीत आहोत त्या परिस्थितीत राहून श्रीगुरुभक्ती केली पाहिजे. अनुकूलताभेदाने श्रीगुरुभक्तीच्या अंगोपांगात फरक दिसला तरी फलप्राप्ती मात्र एकच राहणार असल्याने न्यूनाधिक्य न मानता आपल्याला सोयीचा, साजेलसा व झेपेलसा प्रकार अंगिकृत करून शरणागती पत्करली म्हणजे श्रीगुरुभक्तीचे म्हणजेच पर्यायाने ब्रह्मप्राप्तीचे रहस्य आत्मसात् केल्यासारखे होईल.

**श्रीगुरुपादुकापूजन :-**

श्रीसद्गुरूंच्या पादुकांचे पूजन करणे हा श्रीगुरुभक्तीचा सर्वश्रेष्ठ मार्ग आहे. या देवदुर्लभ मार्गाचे माहात्म्य कथन करताना "**कुलार्णव-तंत्राच्या**" द्वादश उल्लासात पुढील वर्णन आले आहे. श्रीपार्वती असे म्हणाली की, "हे कुलेशा! दयाळू महादेवा! श्रीगुरुपादुकांच्याबद्दल साधकाच्या अंतःकरणात भक्ती व आचार कसा असावा हे ऐकण्याची माझी इच्छा आहे. तरी आपण कृपा करून त्यासंबंधी मला सांगावे." श्रीमहादेव असे म्हणाले की, "हे देवी! तू मला जो प्रश्न विचारलास त्याचे उत्तर सांगतो ते ऐक. माझे म्हणणे नुसते ऐकले तरीसुद्धा साधकाच्या अंतःकरणात भक्ती उत्पन्न होते. कोट्यावधिमहाज्ञानांहून, कोट्यावधिमहाव्रतांहून व कोट्यावधिमहादानांहूनही श्रीसद्गुरूंच्या पादुकांचे स्मरण श्रेष्ठ आहे. तसेच कोटीकोटी मंत्रांच्या जपाहून, कोटीकोटी

पुण्यतीर्थांच्या स्नानाहून व कोटीकोटी देवांच्या पूजनाहूनही श्रीसद्गुरुमहाराजांच्या पादुकांचे स्मरण श्रेष्ठ आहे. मोठेमोठे रोग, उत्पात, दोष, भय, पाप व महाभयानक आपत्तीतून श्रीसद्गुरूंच्या पादुकांचे नुसते स्मरण केले तरी संरक्षण होते. तसेच दुष्टाचार, दुष्कीर्ती, दुःसंगती, दुष्टखाद्य, दुःसंग्रह आणि दुष्टबुद्धी यांपासूनही पादुकांचे नित्य स्मरण करणाऱ्या साधकाचे रक्षण होते. ज्याची वाणी नित्य श्रीगुरुपादुकास्मरण करीत असते त्याने सर्व वेदांचे अध्ययन केले, स्मृती पाहिल्या, सर्व देवांचे पूजन केले, सर्व काही पाहिले, यच्चयावत् सर्व दिले आणि समस्त जाणले आहे असे म्हणावयास काहीही हरकत नाही असे निश्चित समज. भक्तिभावाने एकवेळ जरी श्रीगुरुपादुकांचे स्मरण केले तरी सर्व पातकांचा नाश होऊन श्रेष्ठ गती मिळते. शुची किंवा अशुची अशा कोणत्याही अवस्थेत पादुकांचे स्मरण केल्यास धर्मादि चतुर्विध पुरुषार्थांची प्राप्ती अगदी अनायासाने होते. श्रीगुरुचरणकमल जेथे आहेत त्या दिशेला दररोज भक्तीने नमस्कार करावा. हे पार्वती! श्रीगुरुपादुकास्मरणापेक्षा श्रेष्ठ मंत्र नाही. श्रीगुरूपेक्षा श्रेष्ठ देव नाही. शास्त्रापेक्षा श्रेष्ठ ज्ञान नाही आणि कुलपूजनाइतके श्रेष्ठ पुण्य नाही. श्रीगुरुमूर्तीचे ध्यान हे सर्व ध्यानात म्हणजे ध्येयवस्तूंमध्ये श्रेष्ठ आहे. श्रीगुरुचरणपूजा ही सर्व पूजेत श्रेष्ठ पूजा आहे; कारण सर्व पूज्य वस्तूत श्रीगुरुपाद अतिशय पूज्य आहेत. श्रीगुरुवचन हे सर्व मंत्रांहून श्रेष्ठ आहे आणि मोक्षप्राप्तीचे श्रेष्ठ कारण श्रीगुरुकृपाच आहे. हे कुलनायके! या जगात श्रीगुरूवाचून दुसरे काहीच नाही म्हणून भक्तियुक्त अंतःकरणाने सिद्धीसाठी म्हणजे मोक्षासाठी श्रीगुरूंचीच सेवा करावी."

श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनीही मोक्षप्राप्तीसाठी श्रीगुरूंच्या पादुकांची पूजा कशी करावी याचे "**श्रीज्ञानेश्वरीच्या**" १५ व्या अध्यायात फार बहारीचे वर्णन केले आहे. ते असे म्हणतात की, "आता आपले हृदय चांगले स्वच्छ व शुद्ध करून त्यावर श्रीगुरूंच्या पादुकांची स्थापना करू म्हणजे हृदयकमलाच्या ठिकाणी श्रीगुरूंचे चरण दृढ

धारण करू. नंतर मनातील सर्व भेद नाहीसा करून ऐक्यभावाच्या ओंजळीत सर्व इंद्रियांच्या फुललेल्या कळ्या भरून त्यांच्या चरणांवर वाहू. म्हणजे सर्व इंद्रियांना एकवटवून त्यांचे व्यापार त्या चरणांच्या ठिकाणीच अनन्यभावाने समर्पण करू. श्रीगुरुचरणांना अनन्यभावरूपी स्वच्छ उदकाने स्नान घालून नंतर श्रीगुरुचरणनिष्ठारूप वासनेच्या सुवासिक चंदनाचे बोट लावू. प्रेमरूपी सोन्याचे पैंजण घडवून ते श्रीगुरूंच्या सुकुमार पायात घालू. दृढप्रेमाची एक व शुद्ध अव्यभिचारी प्रेमाची एक अशा दोन उत्तम अंगठ्या श्रीगुरूंच्या दोन चरणांच्या बोटात घालू. आनंदरूपी सुगंधाने परिपूर्ण भरलेले व अष्टसात्त्विक भावांनी भरलेल्या कळीच्या सर्व पाकळ्या उमललेले अष्टदळात्मक कमळ श्रीगुरुचरणांवर वाहू. श्रीगुरूंच्या पूजेच्या वेळी अहंकाररूपी धूप जाळू. मी नाही, सर्व एक श्रीगुरूच आहेत, या अद्वैतबुद्धिरूप दीपाने त्यांच्या चरणांची आरती करू व शेवटी श्रीगुरूंच्या प्रेमाने साक्षित्वही सोडून देऊन श्रीगुरूंशी समरस होऊ व त्यांचे चरण पोटाशी कवटाळून धरू. आपले शरीर व प्राण यांच्या पादुका करून श्रीगुरुचरणी घालू व त्या चरणांवरून भोग व मोक्ष हे दोन्ही ओवाळून टाकू. जो कोणी परम भाग्यवान् असेल त्यालाच याप्रकारची श्रीगुरुचरणांची सेवा प्राप्त होईल. मोक्षासकट सर्व अर्थांची प्राप्ती करून देणे हे या सेवेचे फल आहे.

**"तांत्रिक वाङ्मय में शाक्तदृष्टि"** या ग्रंथातील **"सामरस्य या महामिलन"** या आपल्या लेखात म.म.श्रीगोपीनाथ कविराज यांनी श्रीगुरुपादुकांचे एक चरम रहस्य सांगितले आहे. ते असे म्हणतात की, "परमतत्त्वाच्या बरोबर होणारे जे सामरस्य त्याच सर्वोत्तम श्रीगुरुपादुका होत. स्वप्रकाशित असे जे शिवरूप आहे ते रूपसुद्धा श्रीगुरुपादुका या नावानेच ओळखले जाते. विमर्श किंवा शक्तीलाही श्रीगुरुपादुकाच म्हटले जाते. परंतु ज्या ठिकाणी श्रीशिवशक्तीचे ऐक्य किंवा सामरस्य होते त्यालाच श्रेष्ठ श्रीगुरुपादुका म्हणतात. श्रीगुरू हे परमशिवस्वरूप आहेत. श्रीशिवसुद्धा श्रीगुरूंची पादुका

आहे व श्रीशक्तीही पादुकाच आहे. या दोहोंची समरसता म्हणजे परा पादुका होत.

**स्वप्रकाशशिवमूर्तिरेकिका तद्विमर्शतनुरेकिका तयोः।**
**सामरस्यवपुरिष्यते परा पादुका परशिवत्मनो गुरोः।।**

**सेवा :-**

श्रीगुरुभक्तीच्या उच्च आदर्शातील "सेवा" हा प्रकार अत्यंत मधुर, गोड, गहन व कठीण असा आहे; कारण या प्रकारात इतक्या संमिश्र भावनांचा व अनुभवांचा मिलाफ झालेला असतो की, त्याचे वर्णन करणे कठीण आहे. असे असले तरी श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीच्या**" १३ व्या अध्यायात आचार्योपासन या पदावर टीका करताना या प्रकाराचे फार बहारीचे वर्णन केले आहे. ते असे म्हणतात की, "हे चतुर पुरुषांमध्ये श्रेष्ठ अशा अर्जुना! आता यानंतर श्रीगुरुभक्तीचा प्रकार सांगतो. तो तू ऐक. ही श्रीगुरुसेवा म्हणजे संपूर्ण सद्भाग्याला जन्म देणारी माता आहे; कारण ती त्रिविध दुःखाने पोळलेल्या जीवाला अविनाशी सुखस्वरूप असे ब्रह्म करून सोडते. ती श्रीसद्गुरूंची सेवा कशी करायची हे तुला आता सविस्तर सांगतो. तेथे तुझे संपूर्ण लक्ष एकाग्र होऊ दे. ज्याप्रमाणे श्रीगंगा संपूर्ण पाण्याचे ओघ घेऊन समुद्राला मिळते, संपूर्ण श्रुतीचा अभिप्राय ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणीच सामावून गेलेला असतो किंवा पतिव्रता स्त्री आपल्या ठिकाणी असलेले सर्व गुणावगुण योग्यायोग्यतेचा विचार न करता आपल्या प्रिय पतीस समर्पण करते त्याप्रमाणे साधकाने आपले अंतर्बाह्य श्रीगुरुकुलाला समर्पण करून आपल्या मनाला श्रीगुरूंच्या प्रेमभक्तीचे घर केले पाहिजे. ज्याप्रमाणे पतिव्रता स्त्री पतीचा विरह झाला असताना मनात अखंड पतीचेच चिंतन करते त्याप्रमाणे श्रीगुरुभक्ताच्या अंतःकरणात ज्या देशात श्रीगुरूंच्या राहण्याचे घर असेल त्या देशाचेच सारखे चिंतन असते. ज्या दिशेस श्रीगुरू राहतात त्या दिशेकडून वारा येत असेल तर त्या वाऱ्यासही साधक सामोरा धावतो व त्या वाऱ्याला लोटांगण घालून "आपण

माझ्या घरी आगमन करावे," अशी प्रार्थना करतो. निर्व्याज प्रेमाने वेडा झाल्याने साधकाला त्या दिशेशीच बोलावेसे वाटते. साधक आपला जीव श्रीगुरुगृही कायम अडकवून ठेवतो. ज्याप्रमाणे वासराला दावे अडकवून बांधले की, त्याचा देह जरी गोठ्यात असला तरी त्याचे सर्व लक्ष गाईकडेच लागलेले असते त्याप्रमाणे श्रीगुरूंनी आज्ञा दिलेली असल्यामुळे शिष्य देहाने जरी आपल्या गावी राहत असला तरी त्याचे सर्व लक्ष सतत श्रीगुरुगृहाकडेच असते. त्यामुळे त्याला सतत असे वाटत असते की, संसारबंधनाचे हे दावे केव्हा तुटेल? हे बंधन सुटून श्रीसद्गुरुस्वामींची भेट केव्हा होईल? अशी चिंता सतत लागलेली असल्यामुळे साधकाला एकएक क्षणही एकएक युगापेक्षा मोठा भासत असतो. अशा स्थितीत श्रीगुरूंच्या राहत्या गावाहून कोणी आल्यास किंवा श्रीगुरूंनीच त्याच्याकडे एखादा मनुष्य पाठविला तर आयुष्य संपलेल्या माणसाला आयुष्य प्राप्त व्हावे तशी त्याची स्थिती होते."

"सुकत असलेल्या अंकुरावर अमृताचा वर्षाव झाला की, त्याला नवजीवन प्राप्त होते. डबक्यातील मासा समुद्रात आला की, त्याची डबके आटून गेल्यामुळे मरणाची भीती नाहीशी होते व भव्यता प्राप्त होते. दरिद्री माणसाला धनाचा हंडा सापडला की, निरतिशय आनंद होतो, अंधळ्याला डोळे प्राप्त झाले की, नवे विश्व त्याच्यापुढे उभे राहते व भिकाऱ्याला इंद्रपद प्राप्त झाले की, त्याचे मूळ स्वरूपच पालटते. वरील गोष्टींप्रमाणेच श्रीगुरूंच्या कुळाचे नाव ऐकताक्षणीच साधकाची स्थिती होते. त्याला निरतिशय सुख होते. त्यामुळे तो इतका मोठा होतो की, त्याला वाटते आकाशही सहज कौतुकाने कवटाळता येईल. याप्रमाणे श्रीगुरुकुळादिकांच्या ठिकाणी ज्याची अशी प्रीती व तळमळ असलेली दिसेल त्याच्यापाशी ज्ञान हे त्याची सेवा करीत आहे असे समजावे."

येथपर्यंत स्मरणसेवेचे वर्णन केल्यावर पुढे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अर्चनसेवेचे वर्णन केले आहे. "श्रीगुरूंविषयी साधकाच्या अंतःकरणात नितांत प्रेम असते. या प्रेमाच्या बळाने तो श्रीगुरूंचे रूप ध्यानात

आणून उपासना करतो. प्रथम साधक शुद्ध अशा हृदयाचा किंवा अंतःकरणाचा तट अगर आवार उभे करतो. मग आराध्य अशा श्रीगुरूंच्या रूपाला तो ध्रुवाप्रमाणे अंतःकरणात अचलपणे स्थापन करतो. नंतर सर्व मनोभाव व सेवासाहित्य यांच्या रूपाने आपणच आहोत अशी बुद्धी धारण करून चैतन्याच्या चौथऱ्यावर ब्रह्मानंदाचे देऊळ उभारून व त्या देवळात श्रीगुरुरूपी शिवलिंगाची स्थापना करून त्याच्यावर ध्यानरूपी अमृताचा अभिषेक करतो. अशा प्रकारच्या पूजेने प्रातिभज्ञानाचा सूर्य उगवतो. त्यामुळे त्याला अद्वैतज्ञान होते. अशा ऐक्यज्ञानरूप बुद्धीच्या परडीत अष्टसात्त्विकभावांची लाखलाख कमळे भरून ती तो साधक श्रीगुरुरूप त्र्यंबकाला वाहतो. प्रातःकाळ, मध्याह्नकाळ व सायंकाळ असे जे श्रीशिवपूजेकरिता म्हणजे साधनाकरिता तीन शुद्ध काळ सांगितले आहेत त्या तिन्हीकाळी साधक उदित शक्तीच्या साहाय्याने जीवदशेचा धूप जाळीत असतो आणि ज्ञानदीपाने श्रीगुरूंना अखंड ओवाळतो. श्रीगुरूंच्या ऐक्याने प्राप्त झालेल्या समरस स्थितीचा नैवेद्य साधक अखंड अर्पण करीत असतो व याप्रमाणे श्रीगुरूंना श्रीशिवलिंग करून आपण पुजारी होतो."

यानंतर सख्यभक्तीने सेवा कशी करावी हे सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज असे म्हणतात की, "एखाद्या वेळी साधक जीवरूप शय्येवर श्रीगुरुरूप श्रीशिवाला पती करून त्याचा भोग घेतो. अशी नानाप्रकारे साधकाची बुद्धी प्रेमाच्या उल्हासाने स्फुरत असते. साधनरत असताना जेव्हा साधकाच्या अंतःकरणात एखाद्यावेळी प्रेम दाटून आले की, त्या प्रेमाला साधक दुधाचा सागरच समजतो. तेथे ध्येय, ध्यान व अपार सुख ही त्रिपुटीच निर्दोष अशी शेषरूप गादी आहे व त्यावर शयन करणारे भगवान् श्रीविष्णू हे श्रीगुरूच आहेत अशी भावना करतो. मग साधक त्या श्रीगुरुरूपी श्रीविष्णूची सेवा करणारी श्रीलक्ष्मी आपण होतो आणि आपणच गरूडही होऊन हात जोडून सन्मुख उभा राहतो. नाभीपासून जन्मलेला ब्रह्मदेव मीच होय अशी साधक भावना करतो. याप्रमाणे श्रीगुरुमूर्तीच्या प्रेमाने आपल्या ठिकाणी नानाप्रकारच्या

सेवकाच्या भावना करून ध्यानाचे सुख उपभोगतो. एखाद्या वेळी श्रीगुरूंना प्रेमाच्या बळावर आपली आई समजून मी तिचे स्तनपान करीत आनंदाने तिच्या मांडीवर लोळत आहे अशी भावना करतो. किंवा चैतन्यवृक्षाचे खाली बसणारे श्रीगुरू हे गायीसारखे असून आपण तिच्या पोटाशी बसत असलेले वासरू होतो. एखाद्या वेळी श्रीगुरूंच्या कृपाप्रेमरूप पाण्यातील आपण मासोळी आहोत अशी साधक भावना करतो. माझे श्रीगुरू कृपारूप अमृताची वृष्टी असून त्याखाली आपण सेवावृत्तिरूप रोप आहोत असे साधकाला वाटते."

साधक दास्यभक्तीने सेवा कशी करतो हे सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज असे म्हणतात की, "साधक श्रीगुरूंची अशी सेवा करतो की, त्याच्या सेवेचे कौतुक करून ते प्रसन्न होऊन "इच्छित वर माग," असे म्हणतील. मग साधक अशी प्रार्थना करतो की, "हे श्रीगुरुदेवा! तुमच्या सेवेला जेवढा काही सेवकवर्ग लागतो तो संपूर्ण एक मीच व्हावे आणि आपल्या सेवेला साहाय्यभूत होणारी जेवढी काही उपकरणे व सामग्री आहे ती सर्व माझीच रूपे व्हावीत," असा वर मी मागेन व श्रीगुरू प्रसन्न होऊन "हो" म्हणतील. मग त्यांचा सर्व परिवार व उपचार सामग्री मीच होईन. अशा प्रकारे देह असेपर्यंत व देहपातानंतरही मी सेवा करीन अशी साधकाची बुद्धी असते. पृथ्वीच्या ज्या भागावर श्रीगुरूंचे चरण उभे राहतील त्या मातीत मी शरीरातील मातीचा अंश मिळवीन असे साधक म्हणतो. माझे श्रीगुरुस्वामी ज्या पाण्याला कौतुकाने स्पर्श करतात त्या पाण्यामध्ये मी आपल्या शरीरातील जलाच्या अंशाचा लय करीन. ज्या दिव्याने श्रीगुरूंना ओवाळले जाईल किंवा जे दिवे श्रीगुरूंच्या घरी उजळले जातील त्या दिव्यांच्या तेजात मी आपल्या शरीरातील तेजाचा अंश मिळवीन. श्रीगुरूंना वारा घालण्याकरिता असलेली चवरी किंवा पंखा यांच्यात मी आपल्या प्राणवायूचा लय करून श्रीगुरूंच्या अंगाला वारा घालणारा सेवक होईन. ज्या ज्या पोकळीत आपल्या परिवारासह श्रीगुरू असतील त्या त्या पोकळीत मी आपल्या शरीरातील पोकळीचा लय करीन पण जिवंतपणी आणि

मेल्यावरही श्रीगुरूंची सेवा केल्याशिवाय मी राहणार नाही. एक क्षणदेखील लोकांकरिता खर्च करणार नाही. याप्रमाणे कोट्यवधी काल मी सेवा करीन असे साधक म्हणतो."

"कालाचा विचार ज्याच्या मनात येत नाही त्या साधकाच्या मनात अपार धैर्य असते. तो प्रत्यक्ष तशी अपार सेवाही करतो. साधक सेवारत असताना आता दिवस उगवला व रात्र झाली असे म्हणत नाही. त्याचे तिकडे लक्षही नसते. त्याच्या मनात ही सेवा थोडी झाली व ही जास्त झाली असे येत नाही. उलट श्रीगुरूंची आज्ञा वारंवार होत असताना त्याला सेवेचा अधिक हुरूप येतो. श्रीगुरूंची अशा प्रकारची सेवा करताना श्रीगुरूंच्या मुखातून अमुक काम कर असे निघाल्याबरोबर तो आनंदाने आकाशापेक्षा मोठा होतो आणि एकटाच संपूर्ण सेवा एकाकाळीच करू लागतो. साधकाचे शरीर अंतःकरणवृत्तीच्यापुढे धाव घेते व सेवा करण्याची प्रत्यक्ष कृती ही मनाशी पैज मारते."

"श्रीगुरूंच्या सेवेने साधक कृश होतो. मात्र तो श्रीगुरूंच्या प्रेमाने पुष्ट होतो. श्रीगुरूंची आज्ञा पालन करणे एवढेच त्याला माहीत असते. आपल्या कुलाच्या कुलीनपणामुळे तो आपल्याला कुलीन न समजता केवळ श्रीगुरूंच्या कुलीनपणामुळे तो आपल्याला कुलीन समजतो. आपल्या बांधवांच्या सौजन्यामुळे आपण सज्जन आहो असे न समजता श्रीगुरुबंधूंच्या सौजन्यामुळे आपण सज्जन आहो असे साधक समजतो. त्याला निरंतर एकमात्र श्रीगुरुसेवेचेच व्यसन लागलेले असते. श्रीगुरुसंप्रदायात परंपरेने चालत आलेले व विहित केलेले धर्म, आचार हेच आपले वर्णाश्रमधर्म आहेत असे साधकाला वाटते. श्रीगुरूंची सेवा हे त्याचे नित्यकर्म असते. श्रीगुरू हे त्याचे पुण्यक्षेत्र असून श्रीगुरू हीच त्याची उपास्य देवता असते. त्याचे मातापिता श्रीगुरूच असतात. त्याला श्रीगुरुसेवेवाचून परमार्थमार्गच माहीत नसतो. श्रीगुरूंचे द्वार हे साधकाचे सारसर्वस्व असते. आपल्याप्रमाणेच जो श्रीगुरुसेवा करतो त्याच्यावर साधक सख्ख्या

भावाप्रमाणे प्रेम करतो. साधकाच्या मुखातून रात्रंदिवस श्रीगुरुनामाचा मंत्रोच्चार सारखा चालू असतो. श्रीगुरूंच्या वचनावाचून साधकाला दुसरे कोणतेही शास्त्र माहीत नसते. ज्या पाण्यास श्रीगुरूंच्या चरणाचा स्पर्श झाला आहे ते पाणी कसलेही असले तरी त्यात संपूर्ण ब्रह्मांडाची तीर्थे साठविली असून ते सर्व तीर्थात श्रेष्ठ आहे असे श्रीगुरुभक्त समजतो. साधकाला अकस्मात् श्रीगुरूंचा उच्छिष्ट प्रसाद प्राप्त झाला तर त्या लाभापुढे त्याला समाधी नकोशी वाटते. श्रीगुरू चालत असताना त्यांच्या पायामागून जे धुळीचे रजःकण उडतात ते साधक आपल्या मस्तकावर धारण करतो व त्या लाभामुळे आपल्याला कैवल्यसुखाची प्राप्ती झाली आहे असे समजतो."

**साधनरतता :-**

ज्या साधकांना अशा प्रकारची प्रत्यक्ष सेवा करण्याची संधी लाभत नाही त्यांनी निरंतर साधनरत राहून श्रीगुरूंची सेवा केली पाहिजे. शक्तिपातयोगाची दीक्षा मिळाल्यावर जागृत शक्ती श्रीगुरूंच्या रूपाने साधकांमध्ये निरंतर वास करीत असते. तिला सर्वार्थाने शरण गेले म्हणजे ती आतून मार्गदर्शन करते. अशावेळी साधन करणे हीच सर्वात मोठी सेवा होय.

**श्रीगुरुशिष्यसंबंधाची परिणती :-**

श्रीगुरुशिष्य भावाची म्हणजे संबंधाची अखेर परिणती कोठे होते हे पाहिले म्हणजे श्रीगुरुभक्तिरूप साधनसंपत्तीचे महत्त्व लक्षात घेऊन सुरुवातीला म्हटल्याप्रमाणे श्रीगुरुभक्तीला मूर्धन्य स्थान का प्राप्त झाले आहे याचाही उलगडा होईल **"तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टी"** या ग्रंथातील **"सामरस्य या महामिलन"** या लेखात म.म.श्रीगोपीनाथ कविराज असे म्हणतात की, "श्रीशिव आणि श्रीशक्तीच्या सामरस्या-इतकेच श्रीगुरू व शिष्य यांचे सामरस्य महत्त्वाचे व आवश्यक आहे. श्रीप्रभुदेवांनी आपल्या **"वचनामृतात"** असे म्हटले आहे की, शिष्य ज्या प्रकाराने श्रीगुरुस्वरूपात विश्रांती प्राप्त करून घेतो त्याचप्रमाणे श्रीगुरूसुद्धा शिष्यरूपात विश्रांती प्राप्त करून घेतात.

शिष्य ज्याप्रमाणे आपले सर्वस्व अर्पण करून आपल्या स्वतःला हरवून बसतो व श्रीगुरूंमध्ये राहण्याच्या स्थितीचा लाभ करून घेतो त्याचप्रमाणे श्रीगुरूसुद्धा शिष्याला आत्मसमर्पण करतात. त्यांच्या या कृतीमुळेच शिष्य श्रीगुरुस्वरूपाला प्राप्त होऊ शकतो. श्रीगुरूंनी जर अशा प्रकारे आपल्या स्वतःचा असा त्याग केला नाही अथवा स्वतःला समर्पित केले नाही तर शिष्याला खरा श्रीगुरू प्राप्त होऊ शकत नाही आणि शिष्यानेही आपणा स्वतःला सर्वार्थाने समर्पित केले नाही तर श्रीगुरूंना खरा शिष्य प्राप्त होत नाही. शिष्याच्या हृदयसिंहासनावर जसे श्रीगुरू विराजमान झालेले असतात त्याचप्रमाणे श्रीगुरूंच्या हृदयात सुद्धा शिष्य विराजमान झालेला असतो. ऐक्यतेच्या म्हणजेच समरसतेच्या बोधावर प्राप्त होण्याचा हाच एकमेव मार्ग आहे."

सारांश, जीवाला ब्रह्मप्राप्ती होण्यासाठी प्रथम विश्रांती आवश्यक आहे. या विश्रांतीचे मूळ श्रीसद्गुरू स्वतःच असतात. श्रीसद्गुरू वाक्याने, दृष्टीने, स्पर्शाने, कृपा करून एका क्षणात शरणार्थी शिष्याला चित्तविश्रांती प्राप्त करून देतात.

**किमत्र बहुनोक्तेन शास्त्र कोटिशतेन वाच।**
**दुर्लभा चित्तविश्रान्तिर्विना गुरुकृपां पराम्।।**

या विषयाबद्दल खूप सांगितले किंवा करोडो शास्त्रवचने उद्धृत केली तरी कोणताही लाभ व फायदा होणार नाही कारण श्रीगुरूंच्या परम कृपेशिवाय चित्तविश्रांती कदापिही प्राप्त होऊ शकणार नाही.

**अध्यात्म जीवनात श्रीगुरूंचे स्थान :-**

येथपर्यंत श्रीगुरुभक्तीच्या सर्वांगाची चर्चा यावच्छक्य केली. त्यावरून अध्यात्म जीवनात श्रीगुरूंचे स्थान काय आहे याची कल्पना साधकाच्या मनात स्पष्टपणे उभी राहण्यास मदत होईल. श्रीसमर्थांनी **"श्रीदासबोधाच्या"** अनेक अध्यायांमध्ये अध्यात्माच्या वाटचालीत श्रीसद्गुरूंची अपरिहार्यता सिद्धान्त मांडून, दृष्टान्त देऊन व फलप्राप्ती सांगून उत्तम रीतीने पटविली आहे. त्यादृष्टीने श्रीसमर्थ असे म्हणतात की -

सगुण भक्ती ते चळे। निर्गुण भक्ती ते न चळे।
हें आवघे प्रांजळ कळे। सद्गुरु केलीया।।४.१०.३१।।
जयजयाजी सद्गुरु पूर्णकामा। परमपुरुषा आत्मयारामा।
अनिर्वाच्य तुमचा महिमा। वर्णिला न वचे।।५.१-१।।
जें वेदांसी सांकडें। जें शब्दासी कानडें।
जें सच्छिष्यासी रोकडें। अलभ्य लाभे।।२।।
जें योगियांचें निजवर्म। जें शंकराचें निजधाम।
जें विश्रांतीचें निजविश्राम। परम गुह्य अगाध।।३।।
तें ब्रह्म तुमचेनि योगें। स्वयें आपणचि होइजे आंगें।
दुर्घट संसाराचेनि पांगें। पांगिजेना सर्वथा।।४।।
सद्गुरूविण ज्ञान कांहीं। सर्वथा होणार नाहीं।
अज्ञान प्राणी प्रवाहीं। वाहतचि गेले।।५.१.२१।।
ज्ञानविरहित जें जें केलें। तें तें जन्मासि मूळ झालें।
म्हणोनी सद्गुरूचीं पाउलें। सदृढ धरावी।।२२।।
जयास वाटे देव पाहावा। तेणें सत्संग धरावा।
सत्संगेविण देवाधिदेवा। पाविजेत नाहीं।।२३।।
नाना साधनें बापुडीं। सद्गुरूविण करिती वेडीं।
गुरुकृपेविण कुडकुडी। व्यर्थची होती।।२४।।
सद्गुरूविण जन्म निर्फळ। सद्गुरूविण दुःख सकळ।
सद्गुरूविण तळमळ। जाणार नाही।।३९।।
सद्गुरूचेनि अभयकरें। प्रकट होईजे ईश्वरें।
जन्मदुःखे अपारें। नासूनि जाती।।४०।।
मागां झाले थोरथोर। संत महंत मुनीश्वर।
तयांसही ज्ञानविचार। सद्गुरूचेनि।।४१।।
श्रीरामकृष्णादिकरूनी। अतितत्पर गुरुभजनीं।
सिद्ध साधू आणि सज्ञनीं। गुरुदास्य केलें।।४२ ।।
सकळ सृष्टीचे चाळक। हरिहर ब्रह्मादिक।
तेही सद्गुरुपदीं रंक। महत्त्वा न चढती।।४३।।

असो जयास मोक्ष व्हावा। तेणें सद्गुरु करावा।
सद्गुरूविणे मोक्ष पावावा। हे कल्पांती न घडे।।४४।।
आता न लगे संस्कृत। अथवा ग्रंथ प्राकृत।
माझा स्वामी कृपेसहित। हृदयीं वसे।।५.६.३४।।
न करितां वेदाभ्यास। अथवा श्रवणसायास।
प्रयत्नेंविण सुरस। सद्गुरुकृपा।।३५।।
याकारणें ज्ञाता पाहावा। त्याचा अनुग्रह घ्यावा।
सारासार विचारें जीवा। मोक्ष प्राप्त।।६.१.३१।।
दिसेना जें गुप्त धन। तयास करणें लागे अंजन।
गुप्त परमात्मा सज्जन। संगतीं शोधावा।।६.९.१९।।
रायाचे सन्निध होतां। सहजचि लाभे श्रीमंतता।
तैसा हा सत्संग धरिता। सद्वस्तु लाभे।।२०।।
सांगता नये तें सांगणें। गोडी कळाया गूळ देणें।
ऐसें हें सद्गुरुविणें। होणार नाहीं।।६.१०.१०।।
सद्गुरुकृपा कळे त्यासी। जो शोधील आपणासी।
पुढे कळेल अनुभवासी। आपेआप वस्तु।।११।।
आतां आठवीन समर्थां। सद्गुरूसी।।७.१.११।।
जयाचेनि कृपादृष्टी। होय आनंदाची वृष्टी।
तेणें गुणें सर्व सृष्टी। आनंदमय।।१२।।
कीं तो आनंदाचा जनक। सायुज्यमुक्तीचा नायक।
कैवल्यपददायक। अनाथबंधु।।१३।।
मुमुक्षी चातकीं सुस्वर। करुणा पाहिजे अंबर।
वोळे कृपेचा जळधर। साधकांवरी।।१४।।
कीं तें भवार्णवीचे तारूं। बोधें पाविजे पैलपारू।
महाआवर्तीं आधारू। भाविकांसी।।१५।।
कीं तों काळाचा नियंता। नानासंकटीं सोडवितां।
कीं ते भाविकांची माता। परम स्नेहाळू।।१६।।
कीं तो परत्रीचा आधारू। कीं तो विश्रांतीचा थारू।

**नातरी सुखाचें माहेरू। सुखस्वरूप।।१७।।**
**ऐसा सद्गुरु पूर्णपणीं। तुटे भेदाची कडसणी।**
**देहेविण लोटांगणीं। तया प्रभूसी।।१८।।**
**आता मनासि जें अप्राप्त। तें कैसेंनि होईल प्राप्त।**
**ऐसें म्हणाल तरी कृत्य। सद्गुरूविण नाहीं।।७.२.१२।।**
**भांडारगृहें भरलीं। परी असती अडकलीं।**
**हातास न येता किल्ली। सर्वही अप्राप्त।।१३।।**
**तरी ते किल्ली ते कवण। मज करावी निरूपण।**
**ऐसा श्रोता पुसे खूण। वक्त्यासी।।१४।।**
**सद्गुरुकृपा तेचि किल्ली। जेणें बुद्धी प्रकाशली।**
**द्वैतकपाटें उघडली। एकसरा।।१५।।**

**साधन चतुष्टय :-**

नित्यानित्यवस्तुविवेक, वैराग्य, शमादि षट्संपत्ती व मुमुक्षत्व या चार साधनांना साधन चतुष्टय असे म्हणतात. ही साधनसंपत्ती शक्तिपातयोगाचे साधन करताना क्रमशः वाढत असली तरीसुद्धा शक्तिपातयोगाचे साधन करणाऱ्या प्रत्येक साधकाने ती अंगी बाणविण्याचा खूप प्रयत्न केला पाहिजे; कारण उपरोक्त साधनसंपत्ती साधकाजवळ असली म्हणजे ब्रह्मानुभवाची प्राप्ती त्वरित होण्यास खूपच मदत होते. आपण क्रमशः साधन चतुष्टयाचा विचार करू.

**१) नित्यानित्यवस्तुविवेक :-**

एकमात्र अखंडचैतन्यरूप ब्रह्मच नित्य असून त्याच्याशिवाय इतर सर्व अनित्य आहे असे जे निश्चयाचे ज्ञान असते त्यास नित्यानित्यविवेक असे म्हणतात. कूटस्थ केवळ परब्रह्म आहे असा जो विचार त्यास नित्यानित्यवस्तुविवेक म्हणतात. "**सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रहामध्ये**" श्रीमदाद्यशंकराचार्यांनी नित्यानित्यवस्तुविवेकाची व्याख्या हीच केली आहे.

**ब्रह्मैव नित्यमन्यत्तुह्यनित्यमिति वेदनम्।**
**सोऽयं नित्यानित्यवस्तुविवेक इति कथ्यते।।१६।।**

**२) वैराग्य :-**

साधनसंपत्तीत वैराग्याला फार वरचे स्थान आहे. याची व्याख्या करताना श्रीमदाद्यशंकराचार्य असे म्हणतात की -

**ऐहिकामुष्मिकार्थेषु ह्यनित्यत्वेन निश्चयात्।**
**नैस्पृह्यं तुच्छबुद्ध्या यत्तद्वैराग्यमितीर्यते।।२२।।**

या लोकातील व परलोकातील सर्व सुखे विनाशी असल्यामुळे ती तुच्छ आहेत अशा भावनेने त्या सर्व सुखांविषयी जी वितृष्णता त्यास वैराग्य असे म्हणतात. नित्यानित्यवस्तूच्या विचाराने सर्व अनित्य पदार्थांच्या ठिकाणी पुरुषास तत्काळ वैराग्य उत्पन्न होते. सर्व पदार्थांच्या ठिकाणी काकविष्ठेप्रमाणे जी किळस उत्पन्न होते त्यास तीव्र वैराग्य असे म्हणतात. ज्या पदार्थांच्या ठिकाणी पुरुषास दोष दिसतात तेथे त्याची प्रवृत्ती होत नाही. म्हणून तीव्र वैराग्य होण्यासाठी भोग्य पदार्थांच्या ठिकाणी साधकाने दोष पाहावेत असे श्रीमदाद्यशंकराचार्य म्हणतात.

**शमदमादि षट्संपत्ती :-**

शम, दम, उपरती, तितिक्षा, श्रद्धा व समाधान यांना षट्संपत्ती असे म्हणतात.

**शम :- "श्रवणादिव्यतिरिक्त विषयेभ्यो मनसः निवर्तनं शमः।"** अशी शास्त्रकारांनी शमाची व्याख्या केली आहे. श्रवणादि व्यतिरिक्त विषयांपासून मनाच्या निवृत्तीस शम असे म्हणतात. याचा अर्थच असा आहे की, ब्रह्म व ईश्वर या विषयांशिवाय शेष संसारासंबंधी सर्व विषयांपासून मन निघून केवळ ब्रह्म व ईश्वर यांच्याकडे ते लागणे यालाच शम असे म्हणतात. विषयांकडून मनाला वळवून ते स्वस्वरूपी ठेवणे हाच खरा शम म्हणजे शांती होय.

**"प्रबोधसुधाकर"** या प्रकरण ग्रंथात श्रीमदाद्यशंकराचार्यांनी मनोनिग्रह प्रकरणात शमाची आवश्यकता किती आहे हे सांगताना असे म्हटले आहे की, "ज्याप्रमाणे वाळलेला पोहावयाचा भोपळा जोराने पाण्यात बुडविला तरी तो चटकन् आपोआप वर येतो त्याप्रमाणे मोठ्या प्रयत्नाने

मन हे आत्मस्वरूपाच्या ठिकाणी स्थापन केले तरी अनेक जन्मातील अनात्म संस्कारामुळे ते मन विषयाकडे चटकन वळते. ज्याप्रमाणे गळ्यात लोढणे असलेले जनावर जिकडे गवत दिसेल तिकडे धावते त्याप्रमाणे अंतःकरणरूप पशू अशुभ मार्गाकडेच जातो. या पशूच्या गळ्यात वैराग्याचे लोढणे अडकविले म्हणजे तो ताब्यात येतो. मनोनिग्रहाचे हे एकच साधन परमेश्वराने निर्माण केले आहे. प्राणायाम, सत्संगती, वासनात्याग व हरिचरणभक्ती ही मनोनिग्रहाची चार साधने शास्त्रात सांगितली आहेत. या साधनांच्या अनुष्ठानाने मन हे विषयाकडे न जाता हळूहळू आत्मस्वरूपाच्या ठिकाणी स्थिर होते. यासाठी मनोनिग्रहरूपी शम अवश्य केला पाहिजे."

**दम :-**

**"बाह्येन्द्रियाणां श्रवणादिव्यतिरिक्त विषयेभ्यो निवर्तनं दमः।"**

श्रवणादि व्यतिरिक्त विषयांपासून बाह्येंद्रियांची निवृत्ती यास दम असे म्हणतात. इंद्रिये ही स्वभावत; बाह्य विषयांकडे धावतात. हा त्यांचा स्वभाव आहे. "**कठोपनिषदात**" असे म्हटले आहे की "परमेश्वराने चक्षुरादि इंद्रिये बाह्य विषयांच्या ठिकाणीच प्रवृत्त होणारी अशी निर्माण केली आहेत. म्हणून ती बहिर्विषयाकडेच प्रवृत्त होतात. आत्म्याच्या ठिकाणी प्रवृत्त होत नाहीत. हा त्यांचा स्वभावच आहे. परंतु ब्रह्मचर्यादि साधनसंपन्न, जितेंद्रिय व मोक्षाची इच्छा करणारा असा एखादाच महापुरुष स्वाभाविक अशा इंद्रियांच्या प्रवाहाचा निरोध करून प्रत्यगात्मप्रवण होतो. त्यालाच आत्मसाक्षात्कार होतो. पाण्याचा प्रवाह स्वाभाविक सखल भूमीकडे असतो. तो प्रवाह जर वर चढवावयाचा असेल तर त्या प्रवाहाला बांध घालावा लागतो. त्यासाठी प्रथम बाह्य इंद्रियांचा निरोध केल्याशिवाय मनोनिग्रह होत नाही. यासाठी दम केला पाहिजे.

श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी दम ही फार मोठी साधनसंपत्ती मानून "**श्रीज्ञानेश्वरीमध्ये**" जागोजाग त्याचे वर्णन केले आहे "**आतां आत्मप्रभा नित्य नवी। तेचि करूनी ठाणदिवी। जो इंद्रियांतें चोरूनी जेवी।**

**तयासींचि फावे।।६.२३।।** या एकाच ओवीत दमाचे सार आले आहे. जो साधक नित्य नवे नवे अनुभव घेत जागृत शक्तिरूप व तद्वारा उत्पन्न होणाऱ्या ज्ञानरूप आत्मप्रकाशाचा ठाणदिवीसारखा उपयोग करून इंद्रियांना कळू न देता म्हणजे त्यांचे दमन करून नियमित साधना करतो त्यालाच कैवल्यरसाचा स्वाद घेता येतो व ब्रह्मप्राप्ती होते.

**उपरती :- "निवर्तितानां तेषां तद्व्यतिरिक्तविषयेभ्य उपरमण उपरतिः।"** मनादि सर्व इंद्रिये आत्मप्राप्तीशिवाय सर्व बाबतीत उदासीन होणे याला उपरती असे म्हणतात. त्याचप्रमाणे विषयप्रवृत्तीची एकवेळा निवृत्ती झाल्यावर पुन्हा ती प्रवृत्ती जागृत न होणे याला उपरती असे म्हणतात. शास्त्राज्ञेनुसार कर्मकांडाचा त्याग करून संन्यास ग्रहण करण्याला उपरती असे म्हणतात. शमदमादि साधनांनी बहिर्विषयांपासून निवृत्त केलेली जी इंद्रिये, त्या इंद्रियांचा श्रवणादिव्यतिरिक्त विषयांकडे जो स्वाभाविक प्रवृत्तिप्रवाह तो वळवून त्याचे आत्मस्वरूपात स्थिरीकरण करणे यास उपरती अशी संज्ञा आहे.

**तितिक्षा :- "शीतोष्णादिद्वन्द्वसहिष्णुता तितिक्षा।"** शीत, उष्ण, मानापमान, लाभालाभ, सुखदुःख हे सहन करणे याला तितिक्षा असे म्हणतात. **"सहनं सर्व दुःखानां अप्रतिकारपूर्वकं। चिन्ता विलाप रहितं सा तितिक्षा निगद्यते।।"** चिंता, विलाप व कोणत्याही प्रकारचा प्रतिकार न करता सर्व दुःखे सहन करणे याला तितिक्षा असे म्हणतात. अशी व्याख्या **"पंचदशीकारांनी"** केली आहे. **"सर्ववेदान्त-सिद्धान्तसारसंग्रहामध्ये"** श्रीमदाद्यशंकराचार्यांनी **"अध्यात्मिकादि यद्दुःखं प्राप्तं प्रारब्धवेगतः। अचिन्तया तत्सहनं तितिक्षेति निगद्यते।।१३८।।"** आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक इत्यादि जी दुःखे प्रारब्धामुळे येतात ती चिंता न करता सहन केली असता त्याला तितिक्षा असे म्हणतात.

**श्रद्धा :-** साधनसंपत्तीत श्रद्धेला फार महत्त्व असल्याने याची सविस्तर चर्चा करणे आवश्यक आहे.

**श्रद्धा हीच श्रेष्ठ :-**

साधकाच्या जीवनात श्रद्धेला अनन्यसाधारण महत्त्व आहे; कारण शक्तिपातयोगाचे साधन सिद्ध होण्यासाठी श्रद्धेची नितांत आवश्यकता आहे. श्रद्धा ही पायाभूत गोष्ट आहे. "**ऋग्वेदाच्या**" १० व्या मंडलाच्या १५१ व्या सूक्तात श्रद्धेचे म्हणजे विश्वास-शक्तीचे माहात्म्य सांगितले आहे. मंत्रद्रष्टे ऋषी तेथे असे म्हणतात की, "मी असे निश्चयपूर्वक सांगतो की, अग्निप्रज्वालक आणि हविर्दात्री श्रद्धा देवापेक्षाही श्रेष्ठ आहे. हे श्रद्धे! दानशूर दात्यांना, तसेच दान न देणाऱ्या कृपणांना माझे भाषण प्रिय व्हावे. उदारदाते इंद्रश्रद्ध सामान्य देवतासदृश मजविषयी श्रद्धा ठेवोत. आकाशीय देव तसेच पृथ्वीलोकीचे देवभक्त धनदात्या श्रद्धेचीच उपासना अंतःकरणपूर्वक करतात. प्रातःकाली, मध्याह्नकाली आणि सायंकाळी पाचारलेल्या हे श्रद्धादेवी, तू आम्हास श्रद्धायुक्त कर."

**श्रद्धा हीच संपत्ती :-**

"**बृहदारण्यक उपनिषदातही**" ऋषींनी श्रद्धा हीच संपत्ती मानली आहे. या साधनसंपत्तीचे फल आत्मसाक्षात्कार आहे म्हणून त्यांनी आवर्जून सांगितले आहे. ऋषी म्हणतात, "**तस्मादेवंविच्छान्तो दान्त उपरतस्तितिक्षुः (श्रद्धावित्तो) समाहितो भूत्वाऽऽत्मन्येवात्मानं पश्यति सर्वमात्मनं पश्यति।।४.४.२३।।**" अशा प्रकारे शांत, दांत, उपरत, तितिक्षू व श्रद्धा ही संपत्ती असणारा आत्म्यामध्येच आत्म्याला पाहतो व सर्वत्र आत्मरूप पाहतो. आत्मरूपात स्थिर होण्यासाठी श्रद्धेची किती आवश्यकता आहे याचा साधकाने मनाशी नेहमी विचार केला पाहिजे व ती अंगी बाणविण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**श्रद्धा ही साधनाचा आधार :-**

"**छांदोग्य उपनिषदातही**" श्रीसनत्कुमार-श्रीनारदसंवादात श्रद्धा, निष्ठा व क्रिया यांचे सुंदर वर्णन आले आहे. "**यदा वै श्रद्दधात्यथ मनुते नाश्रद्दधन्मनुते श्रद्दधदेव मनुते श्रद्धा त्वेव विजिज्ञासितव्येति। श्रद्धां भगवो विजिज्ञास इति।।७.१९.१।।**" श्रीसनत्कुमार असे

म्हणतात की, " ज्यावेळी मनुष्य श्रद्धा करतो त्यावेळीच तो मनन (साधनाभ्यास) करतो. श्रद्धेशिवाय कोणीही मनन (साधनाभ्यास) करू शकत नाही. खरोखर श्रद्धा ठेवणाराच मनन (साधनाभ्यास) करू शकतो. तेव्हा श्रद्धेचीच विशेषत्वाने जिज्ञासा केली पाहिजे. (म्हणजे श्रद्धा आपल्या ठिकाणी कशी उत्पन्न होईल हे पाहिले पाहिजे.)" श्रीनारद असे म्हणतात की, "भगवन्! मी श्रद्धेच्या विज्ञानाची इच्छा करतो. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी यावर भाष्य करताना "**आस्तिक्यबुद्धि: श्रद्धा**" म्हणजे आस्तिक्य बुद्धीचे नाव श्रद्धा होय असे म्हटले आहे.

**निष्ठेमुळे श्रद्धा उत्पन्न होते :-**

आता ही श्रद्धा कशी उत्पन्न होते याचे वर्णन करताना "**छांदोग्य उपनिषदात**" ऋषी असे म्हणतात की, "**यदा वै निस्तिष्ठत्यथ श्रद्दधाति नानिस्तष्ठिञ्श्रद्दधाति निस्तिष्ठन्नेव श्रद्दधाति निष्ठा त्वेव विजिज्ञासितव्येति। निष्ठां भगवो विजिज्ञास इति।।७.२०.१।।**" श्रीसनत्कुमार असे म्हणतात की, "ज्यावेळी पुरुषामध्ये निष्ठा उत्पन्न होते त्यावेळी तो श्रद्धा ठेवू लागतो. निष्ठेशिवाय कोणीही श्रद्धा ठेवीत नाही. खरोखर निष्ठा असणाराच श्रद्धा ठेवतो. तेव्हा निष्ठा ही विशेषरूपाने जाणण्याची इच्छा केली पाहिजे. श्रीनारद असे म्हणतात की, "भगवन्! मी निष्ठेला विशेषरूपाने जाणण्याची इच्छा करतो." यावर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी असे म्हटले आहे की, "**निष्ठा गुरुशुश्रूषादिस्तत्परत्वं ब्रह्मविज्ञाय**" म्हणजे श्रीगुरुशुश्रूषा इत्यादि गोष्टींना निष्ठा असे म्हणतात. ज्याला ब्रह्मज्ञान व्हावे असे वाटत असेल त्याने श्रीगुरुसेवा इत्यादिंमध्ये तत्पर असले पाहिजे.

**साधनामुळे निष्ठा उत्पन्न होते :-**

आता निष्ठा कशी उत्पन्न होईल याचे वर्णन करताना "**छांदोग्य उपनिषदात**" ऋषी असे म्हणतात की, "**यदा वै करोत्यथ निस्तिष्ठति नाकृत्वा निस्तिष्ठति कृत्वैव निस्तिष्ठति कृतिस्त्वेव विजिज्ञासितव्येति। कृतिं भगवो विजिज्ञास इति।।**" श्रीसनत्कुमार असे म्हणतात की,

"ज्यावेळी मनुष्य कृती करतो (साधन करतो) त्याचवेळी तो निष्ठा ठेवू लागतो. (साधन) कृती केल्याशिवाय कोणाच्याही ठिकाणी निष्ठा उत्पन्न होत नाही. कृती-साधन केल्यावरच पुरुष निष्ठावान् होतो. याकरिता कृतीची विशेषरूपाने जिज्ञासा केली पाहिजे. (म्हणजे नियमित साधन केले पाहिजे.)" श्रीनारद असे म्हणतात की, "भगवन्! मी कृतीची विशेषरूपाने जिज्ञासा करतो." (प्रत्यक्ष साधन-कृती करण्याचे फार मोठे माहात्म्य आहे,) यावर भाष्य करताना श्रीमदाद्य-शंकराचार्यांनी असे म्हटले आहे की, "**यदा वै करोति। कृतिरिन्द्रिय-संयमश्चित्तैकाग्रताकरणं च। सत्यां हि तस्यां निष्ठादीनि यथोक्तानि भवन्ति विज्ञानावसानानि।।**" म्हणजे ज्यावेळी मनुष्य कृती करतो त्यावेळी त्याचे विशेष महत्त्व आहे. इंद्रियसंयम व चित्ताची एकाग्रता करण्याला कृती असे म्हणतात. (शक्तिपातयोगसाधनेत या दोन्ही गोष्टी आपोआप घडून येतात.) या वरील दोन गोष्टी घडून आल्यावर निष्ठेपासून विज्ञानापर्यंत सर्व साधन आपोआप घडून येते.

**श्रद्धा पापापासून मुक्त करणारी :-**

श्रद्धा ही साधकाला सर्व पापांपासून मुक्त करणारी शक्ती आहे. या तिच्या सामर्थ्याचे "**श्रीमहाभारताच्या**" शांतिपर्वात २६४ व्या अध्यायात जे वर्णन आले आहे ते पाहण्यासारखे आहे :-

**अश्रद्दधान एवैको देवानां नार्हते हविः।**
**तस्यैवान्नं न भोक्तव्यमिति धर्मविदो विदुः।।१४।।**
**अश्रद्धा परमं पापं श्रद्धा पापप्रमोचिनि।**
**जहाति पापं श्रद्धावान् सर्पो जीर्णमिव त्वचम्।।१५।।**
**ज्यायसी या पवित्राणां निवृत्तिः श्रद्धया सह।**
**निवृत्तशीलदोषो यः श्रद्धावान् पूत एव सः।।१६।।**
**किं तस्य तपसाकार्यं किं वृत्तेन किमात्मना।**
**श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः।।१७।।**

जो श्रद्धासंपन्न नसतो त्याला देवांना होमद्रव्य अर्पण करण्याचा अधिकार नाही व त्याचे अन्न भक्षण करण्याला अयोग्य होय असे

धर्मवेत्ते लोक समजतात. अश्रद्धा हे मोठे पाप आहे व श्रद्धा ही पापापासून मुक्त करणारी आहे. ज्याप्रमाणे सर्प आपली जीर्ण झालेली त्वचा टाकून देतो त्याप्रमाणेच श्रद्धासंपन्न पुरुष आपल्या पातकांचा त्याग करतो. श्रद्धापूर्वक जी अकर्मापासून निवृत्ती तीच सर्व पवित्र पदार्थांमध्ये श्रेष्ठ आहे. आचरणाचे जे रागलोभादि दोष त्यांची निवृत्ती झालेला श्रद्धासंपन्न पुरुष हाच पवित्र होय. त्याला तपाशी, आचाराशी अथवा शरीराशी काय करावयाचे आहे? मनुष्य हा श्रद्धेचेच कार्य असतो. ज्याची जशी श्रद्धा असते तो तशा प्रकारचा बनतो.

**श्रद्धेमुळे ज्ञानप्राप्ती :-**

"**श्रीमद्भगवद्गीतेमध्ये**" जागोजाग श्रद्धेची आवश्यकता, श्रद्धेचे माहात्म्य व श्रद्धेचे फल यांचे वर्णन केले आहे. साधकाला श्रद्धेची किती आवश्यकता आहे हे यावरून लक्षात येते.

"**श्रीमद्भगवद्गीतेच्या**" ४ थ्या अध्यायाच्या ३९ व्या श्लोकात श्रद्धेमुळे ज्ञानप्राप्ती होते हे सांगताना भगवान् श्रीगोपालकृष्णनाथ असे म्हणतात की -

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परःसंयतेन्द्रियः।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति।।**

श्रद्धावान् म्हणजे परमविश्वासू, साधनपरायण आणि इंद्रिये जिंकलेल्या पुरुषासच ज्ञान प्राप्त होते आणि ते ज्ञान प्राप्त होताक्षणीच त्याला पूर्ण शांती मिळते.

**श्रद्धायुक्त योगीच श्रेष्ठ :-**

"**श्रीमद्भगवद्गीतेच्या**" ६ व्या अध्यायात ४७ व्या श्लोकात श्रद्धेने निरंतर भजन करणारा योगीच श्रेष्ठ होय हे सांगताना श्रीभगवंत असे म्हणतात की -

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना।**
**श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः।।**

सर्व योग्यांमध्ये जो माझ्या ठिकाणी अंतःकरण लावून श्रद्धेने मला निरंतर भजतो तो योगी मला सर्वात श्रेष्ठ वाटतो.

मनुष्यप्राणी हा श्रद्धाशीलच आहे हे सांगताना अध्याय १६ श्लोक ३ मध्ये श्रीभगवंत असे म्हणतात की -

**सत्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत।**
**श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः।।**

हे अर्जुना! सर्वांची श्रद्धा त्यांच्या त्यांच्या प्रकृतीनुसार बनलेली असते. हा मनुष्यप्राणी श्रद्धाशीलच आहे. ज्याची जशी श्रद्धा असते त्याप्रमाणे तो बनत असतो, हे ओळखून ठेव.

**अश्रद्धेमुळे हानी :-**

अश्रद्धेमुळे साधकाची तीव्र हानी होते. श्रीभगवंतांनी "**श्रीमद्भगवद्गीतेच्या**" अध्याय ४ श्लोक ४० मध्ये याचे वर्णन केले आहे-

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः।।**

अज्ञानी, श्रद्धाहीन व संशययुक्त असा जो असतो तो अधोगतीला जातो. त्या संशयी पुरुषाला इहलोक, परलोक व मोक्षसुख ही प्राप्त होत नाहीत.

अश्रद्धा ही परलोकाची व इहलोकाची हानी करणारी असल्याने अध्याय १७ श्लोक २८ मध्ये श्रीभगवंत असे म्हणतात की -

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत्।**
**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह।।**

हे अर्जुना! अश्रद्धेने केलेले हवन, दिलेले दान, आचरलेले तप किंवा इतर कोणतेही कर्म असत् असे म्हटले जाते. ते परलोकात उपयोगी पडत नाही व इहलोकातही उपयोगी पडत नाही.

श्रद्धाहीन पुरुषाला पुनःपुन्हा संसारात यावे लागते याचे वर्णन करताना अध्याय ९ श्लोक ३ मध्ये श्रीभगवंत असे म्हणतात की-

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परन्तप।**
**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि।।**

शत्रूला ताप देणाऱ्या अर्जुना! या आत्मज्ञानरूपी परमधर्मावर

श्रद्धा न ठेवणारे पुरुष माझी प्राप्ती न होता मृत्युरूपी संसारमार्गातच पुन:पुन्हा परत येतात.

याचा श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीत**" फारच चांगला भावार्थ स्पष्ट केला आहे. ते म्हणतात -

**पाहें पां दूध पवित्र आणि गोड। पासीं त्वचेचिया पदराआड।**
**परि तें अव्हेरूनि गोचीड। अशुद्धचि सेवी।।९.५८।।**
**कां कमलकंदा आणि दर्दुरी। नांदणूक एकेचि घरीं।**
**परी परागु सेविजे भ्रमरीं। येरां चिखलुचि उरे।।५९।।**
**नातरी निदैवाच्या परिवरीं। लोह्या रुतलिया आहाति सहस्त्रवरी।**
**परि तेथ बैसोनि उपवास करी। कां दरिद्रें जिये।।६०।।**
**तैसा हृदयामध्यें मी रामु। असतां सर्व सुखाचा आरामु।।**
**कीं भ्रांतासी कामु। विषयांवरी।।६१।।**

अर्जुना! पाहा. गाईचे पवित्र आणि गोड दूध अगदी जवळ त्वचेच्या पडद्याच्या आडच असते; पण ते टाकून गोचीड रक्ताचेच सेवन करीत असतो. कमळाचा कंद व बेडूक हे एकाच ठिकाणी राहतात; परंतु कमलकंदातील परागाचे सेवन भ्रमर करतात व बेडकांच्या वाट्याला चिखलच राहतो. ज्याप्रमाणे दुर्दैवी पुरुषाच्या घरी हजारो मोहरा पुरलेल्या असल्या तरी त्याला ठिकाण माहीत नसल्यामुळे तो (दरिद्री) तेथेच राहून उपवास करतो व दारिद्र्यात दिवस काढतो त्याप्रमाणे सर्व सुखाचे विश्रांतिस्थान असलेला मी राम मनुष्याच्या हृदयात असता त्या अज्ञानी, अश्रद्ध व भ्रांत पुरुषाची विषयांवर वासना असते.

**सामान्यांना श्रद्धा आवश्यक :-**

महर्षी श्रीपतंजलींनी "**योगदर्शनाच्या**" समाधिपादातील २० व्या सूत्रात सामान्य साधकांना श्रद्धा कशी आवश्यक आहे ते सांगितले आहे. ते असे म्हणतात की, "**श्रद्धावीर्यस्मृतिसमाधिप्रज्ञापूर्वक इतरेषाम्**" म्हणजे ज्यांना नैसर्गिक, स्वयमेव व काही साधन केल्याशिवाय निरोध होत नाही असे लोक श्रद्धा, वीर्य, स्मृती, समाधी व प्रज्ञा या पाच

गुणांच्या साहाय्याने ही कैवल्य अवस्था प्राप्त करून घेतात. या पाचही गुणांची साधकाला आवश्यकता आहे.

**श्रद्धा म्हणजे माता :-**

श्रद्धा म्हणजे शास्त्र, श्रीगुरू व साधनावर विश्वास होय. साधकाने अभ्यास करण्यासाठी श्रद्धा हा गुण महर्षी श्रीपतंजलींनी प्रथम सांगितला आहे. यावर भाष्य करताना श्रीगुलाबरावमहाराज आपल्या **"योगप्रभाव"** या ग्रंथात असे म्हणतात की, "श्रद्धा असली म्हणजे आपल्या हातून योग व्हावा अशी तीव्र अभिलाषा उत्पन्न होते." "ही श्रद्धा साधकाचे मातेप्रमाणे पालन करते." असे श्रीव्यास आपल्या भाष्यात म्हणतात.

**श्रद्धेमुळे पराक्रम :-**

"श्रद्धेमुळे पराक्रम उत्पन्न होतो. हाच दुसरा सांगितलेला "वीर्य" गुण होय. (वीर्य म्हणजे साधनाकरिता उत्तरोत्तर उत्साहाची वृद्धी होय.) घरगुती अनेक कामात मनुष्याचे मन गढलेले असते; परंतु योगाची अभिलाषा (श्रद्धा) उत्पन्न झाली म्हणजे पुढे घरचे काहीही होवो असा पराक्रम अधिक उत्पन्न होतो. योग करीत असतानाही मन हे मनुष्याला अनेक कामात ओढीत असते. श्रीसंततुकाराममहाराज असे म्हणतात की -

**हागताही खोडी। चळण मोडवितें काडी।**
**असे अनावर गुण। आवरावे काय म्हूण।।**

अशा वेळी सार काय व असार काय असा विवेक हवा असतो. तो विवेक करणाऱ्याला श्रद्धेमुळे पराक्रम जास्त येतो. श्रद्धाही याप्रमाणे विवेकाचे पोषण करणारी असल्यामुळे तिला श्रीव्यासांनी "मातेप्रमाणे पालन करणारी," असे म्हटले आहे."

**श्रद्धेमुळे स्मृती :-**

श्रीगुलाबरावमहाराज असे म्हणतात की, "विवेक करणारांचे विशेष लक्ष श्रद्धेमुळे दुसरीकडे जात नाही. अशा प्रकारचा विवेक करता करता त्याला स्मृती उत्पन्न होते. स्मृती म्हणजे आपण अभ्यास करीत आहोत, ही आठवण." (स्मृती म्हणजे ध्येय नेहमी स्मरणात आणून

देणारी बुद्धीची निर्मलता होय.)

**श्रद्धेने एकाग्रता :-**

श्रद्धेमुळे वीर्य व स्मृती प्राप्त होऊन ध्येयाकार बुद्धीची एकाग्रता म्हणजे समाधी प्राप्त होते. मन विषयरहित होते.

**श्रद्धेमुळे प्रज्ञाप्राप्ती :-**

श्रीगुलाबरावमहाराज असे म्हणतात की, "प्रज्ञा म्हणजे बुद्धी नव्हे. प्रज्ञा म्हणजे कोणतीही वस्तू जशीच्या तशी समजणे, तिचे यथार्थ स्वरूप समजणे. स्थूल डोळ्यांनी जसे जड पदार्थ दिसतात तशी ही प्रज्ञा चेतनाला जाणते. ही प्रज्ञा समाधीनंतरच्या स्थितीत उत्पन्न होते. ती शुद्ध परब्रह्माला जाणते म्हणून तिला कोणी ऋतंभरा म्हणतात. "ऋतंभरा" म्हणजे सत्याचे पोषण करणारी."

सारांश, वेद, शास्त्र, ईश्वर, महापुरुषांची वचने व परलोक यांवर प्रत्यक्षपणे विश्वास असणे आणि त्यांच्याबद्दल पूज्यता व श्रेष्ठत्वाची भावना असणे याचे नाव श्रद्धा होय. श्रीभगवंतांच्या सत्तेवर, त्यांच्या अवतारांवर, त्यांच्या वचनांवर, त्यांच्या अचिंत्य अशा अनंत दिव्य गुणांवर, त्यांच्या नामावर, त्यांच्या लीलांवर, त्यांच्या श्रेष्ठत्वावर, शक्तीवर, प्रभावावर आणि ऐश्वर्य आदि गोष्टींवर प्रत्यक्षाप्रमाणे पूर्ण विश्वास जो ठेवतो त्याला श्रद्धावान् म्हणतात. अशा प्रकारची श्रद्धा ज्या साधकाच्या ठिकाणी वास करते त्याची उत्तरोत्तर उन्नती होत जाते. अशी श्रद्धा आपल्या ठिकाणी उत्पन्न व्हावी म्हणून साधकाने भगवच्चरणी नेहमी प्रार्थना केली पाहिजे.

**समाधान :-**

ईश्वराच्या ठिकाणी चित्ताची एकाग्रता होणे याला समाधान असे म्हणतात. श्रीसंततुकाराममहाराजांनी "**सदा राहे समाधान। हेंचि देवाचें दर्शन**" असे म्हणून या गुणाचा महिमा गायिला आहे व "**ठेविलें अनंतें तैसेंचि राहावें। चित्तीं असों द्यावें समाधान।**" असे म्हणून साधकाने प्रयत्नाने हे समाधान बाणवून घेतले पाहिजे म्हणून सांगितले आहे. "**सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रहात**" श्रीमदाद्यशंकराचार्यांनी

समाधानाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की -

**श्रुत्युक्तार्थावगाहाय विदुषा ज्ञेयवस्तुनि।**
**चितस्य सम्यगाधानं समाधानमितीर्यते।।२१९।।**

श्रुतीच्या अर्थाचे पूर्ण अध्ययन करून ज्ञानी मनुष्याच्या चित्ताची ज्ञेय वस्तूच्या ठिकाणी जी सम्यक् धारणा होते त्याला समाधान असे म्हणतात.

**मुमुक्षुता :-**

**"पातंजलयोगदर्शनामध्ये"** कैवल्यपादाच्या शेवटच्या सूत्रात कैवल्य म्हणजे मोक्षाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की, **"पुरुषार्थशून्यानां गुणानां प्रतिप्रसवः कैवल्यं स्वरूपप्रतिष्ठा वा चितिशक्तिरिति ।।४.३४।।**

पुरुषाला चित्तद्वारा भोग देण्याचे गुणांचे कार्य संपले म्हणजे ते गुण पुरुषार्थशून्य होतात. अशा तऱ्हेने त्रिगुणांचे कार्य शून्य म्हणजे निरुपयोगी झाले म्हणजे ते गुण आपल्या मूळ कारणात म्हणजे प्रकृतीत लय पावतात. अर्थात् ते उलट वळून स्वस्वरूपात स्थित होतात. असे वरील "प्रतिप्रसवः" या पदाने सूचित केले आहे. हे जे त्यांचे स्थित होणे व पुरुषास आत्मसाक्षात्कार होणे यास कैवल्य किंवा मोक्ष म्हणतात. अथवा चैतन्यशक्ती कुंडलिनी आपल्या स्वरूपाशी म्हणजे श्रीशिवाशी एकरूप होऊन जाते त्याला कैवल्य म्हणतात. अशा मोक्षाची ज्याला तीव्र तळमळ लागली असेल तोच खरा मुमुक्षू होय. ज्याच्या सर्व इच्छा गेलेल्या असतील असा पुरुषच मोक्षाचा अधिकारी होतो. जीवब्रह्मैक्यविज्ञानाने या संसार बंधनातून लवकर मुक्त व्हावे अशी ज्या विद्वान् पुरुषास तीव्र इच्छा उत्पन्न झालेली असते तोच खरा मुमुक्षू होय.

**यम व नियम :-**

शक्तिपातयोगाच्या साधनेत यमनियमाला इतर सर्व साधनांप्रमाणे अनन्यसाधारण महत्त्व आहे; कारण महर्षी श्रीपतंजलींनी आपल्या योगदर्शनामध्ये यमाचा महिमा सांगताना असे म्हटले आहे की,

**"जातिदेशकालसमयानवच्छिन्नाः सार्वभौमा महाव्रतम्।।२.३१।।** जात, ठिकाण, वेळ, प्रसंग यांची बंधने नसलेले व संपूर्णतया लागू असणारे म्हणजे उपरोक्त कोणत्याही गोष्टीमुळे खंड पडू न देता करीत राहण्याचे हे यमाचे पालन म्हणजे सार्वभौम महान् व्रत आहे. महर्षी श्रीपतंजलींनी "**अहिंसासत्यास्तेय ब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः ।।२.३०।।**" अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह असे पाच यम सांगितले आहेत. "**हठयोगप्रदीपिकेत**" "**अहिंसा सत्यमस्तेयं ब्रह्मचर्यं क्षमा धृतिः। दयार्जवं मिताहारः शौचं चैव यमा दश।।१।।** अहिंसा, सत्य, चोरी न करणे, ब्रह्मचर्य, क्षमा, धैर्य, नम्रता, मिताहार व शुचिता हे दहा यम सांगितले आहेत. आपण ओळीने थोडक्यात त्यांचा विचार करू.

**अहिंसा :-**

"**अहिंसा सर्वथा सर्वदा सर्वभूतानामनभिद्रोहः।**" म्हणजे काम, क्रोध, लोभ, मद व मोह, मत्सर या षड्विकारांच्या अधीन होऊन शरीराने, वाणीने किंवा मनाने अगर आचार, विचार किंवा उच्चारानेही घात करणे, हानी करणे किंवा नुकसान करणे अगर असे करण्यास अनुमती अथवा स्पष्ट किंवा अस्पष्टपणे परवानगी न देणे याला अहिंसा असे म्हणतात. ही अहिंसा जाती, देश, काल व वेळ यांच्यामुळे सुद्धा सीमाबद्ध किंवा परिमित होऊ शकते. आपल्या पोटाच्या धंद्यामुळे कोळी मत्स्याशिवाय इतर जात मारणे सोडू शकला तर त्याची अहिंसा जातीमुळे सीमित होते. कोणी जर तीर्थक्षेत्रातच अहिंसेचे पालन केले व इतर ठिकाणी हिंसेचा त्याग केला नाही तर अशा व्यक्तीची अहिंसा देशामुळे सीमाबद्ध होते. पुण्यकाली चतुर्दशीस हिंसा न करता अहिंसेचे पालन जेव्हा होते तेव्हा ती अहिंसा कालाने सीमित होते. वर सांगितल्या-प्रमाणे जाती, देश व काल यांच्या बंधनात राहून फक्त शिष्ट लोक येतील तेव्हाच जो कोणी हिंसा करतो त्याची अहिंसा समयबद्ध होते. ज्याला शक्तिपातयोगाचे साधन करावयाचे आहे त्याने इष्ट सिद्धी जो मोक्ष तो प्राप्त होण्यासाठी वरीलप्रकारे परिच्छिन्न झालेली अहिंसा

सोडून देऊन अपरिच्छिन्न अहिंसाव्रताचे पालन करणे आवश्यक आहे.

श्रीसंतशिरोमणी ज्ञानेश्वरमहाराजांनी **"श्रीज्ञानेश्वरीच्या"** १६ व्या व १७ व्या अध्यायात अहिंसेचे विवेचन करताना असे म्हटले आहे की-

**आणि जगाचिया सुखोद्देशें। शरीरवाचामानसें।**
**राहाटणें तें अहिंसें। रूप जाण।।१६.११४।।**
**भूतमात्राचेनि नांवें। तृणही नासुडावें।**
**किंबहुना सांडावे। छेद भेद।।१७.२१२।।**

कायावाचामनाने प्राणिमात्रांना सुख व्हावे याच एकमेव हेतूने जे वर्तन करणे तेच अहिंसेचे खरे स्वरूप व लक्षण होय. सर्व भूतमात्रांमध्ये जीव भरलेला आहे याची साधकाने जाणीव ठेवून गवतालासुद्धा हिसका देऊन तोडू नये किंवा कापू नये. फार काय साधकाने कोणाचीही मोडतोड करू नये व कोणालाही वर्मी लागेल असे बोलू नये.

**सत्य :-**

**"सत्यं यथार्थे वाङ्मनसे, यथा दृष्टं यथा अनुमितं यथा श्रुतं तथा वाङ्मनश्चेति परत्र स्वबोधसङ्क्रान्तये वागुक्ता सा यदि न वञ्चिता भ्रान्ता वा प्रतिपत्तिवन्ध्या वा भवदेत्येषा सर्वभूतोपकारार्थम्प्रवृत्ता न भूतोपघाताय। यदि चैवमप्यभिधीयमाना भूतोपघातपरैव स्यान्न सत्यम्भवेत्।"** यथार्थ वाणी म्हणजे जसे पाहिले व ऐकले असेल त्याप्रमाणे विचार व उच्चार करणे ते सत्य होय. याचा अर्थच असा आहे की, मन व वाणी एकरूप होणे हे सत्य होय. तरीपण वेळप्रसंग पाहून पाहिल्याप्रमाणे व ऐकल्याप्रमाणे बोलून जर दुसऱ्याचा घात होत असेल तर तसे न बोलणे हेही सत्य आहे. प्रत्यक्ष डोळ्याने पाहिलेले किंवा शास्त्राने सांगितलेले तेच बोलावे. दुसरे भलतेच काही बोलू नये. मात्र आपण जे सत्य बोलणार आहोत ते सर्वांना प्रिय असावे. जे कोणास अप्रिय असेल व ज्याने कोणाचे मन दुखावेल असे सत्य देखील बोलू नये. असे बोलल्यामुळे कदाचित् दुसऱ्याचे मन दुखावल्यामुळे हिंसा घडते. मग अहिंसेला बाध येतो. म्हणून प्रिय जे असेल तेच बोलावे. अप्रिय जे असेल ते सत्यही बोलू नये. त्याचप्रमाणे प्रिय जरी

असले तरी खोटे बोलणे योग्य नाही. प्रसंगोपात् मौन धरणे किंवा निघून जाणे योग्य ठरते. हाही सनातन धर्म आहे, असे मनुस्मृतीत सांगितले आहे. हा सत्यधर्म पूर्ण साधला म्हणजे वाचासिद्धी होते.

श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी सत्याची व्याख्या करताना "**श्रीज्ञानेश्वरीत**" असे म्हटले आहे की-

**तैसें तोडावया संदेह। तीख जैसें का लोह।**
**श्राव्यत्वें तरी माधुर्य। पायीं घालीं।।१६.११७।।**
**किंबहुना प्रियपणें। कोणातेही झकवूं नेणें।**
**यथार्थ तरी खुपणें। नाहीं कवणा।।१२०।।**
**परि अहितीं कोपोनि सोप। लालनीं मऊ जैसें पुष्प।**
**तिये मातेचें स्वरूप। जैसें कां होय।।१२३।।**
**तैसें श्रवणसुख चतुर। परिणमोनि साचार।**
**बोलणें जें अविकार। तें सत्य येथें।।१२४।।**

सत्यवचन हे संशयनिवृत्ती करण्याच्या बाबतीत लोखंडी शस्त्राप्रमाणे तीक्ष्ण असते. मात्र ते ऐकले असता इतके अमृतमधुर असते की, माधुर्यालाही पायाखाली घालून लाजविते. सत्यवचनाची गोडी इतकी असल्यामुळे ते कोणालाही फसविण्याचे जाणत नाही आणि ते इतके यथार्थ असते की, ते कोणाच्याही मनाला खुपत नाही. मुलाचे अहित होऊ नये म्हणून आई पोकळपणे रागावते व त्याचे योग्य लालन पालन व्हावे म्हणून फुलाप्रमाणे मऊ असते. त्याप्रमाणे सत्यापासून कानाला सुख होते. ते चतुर असून परिणामी गोड असते. ते कोणाचाही मर्मभेद करीत नाही व रागद्वेषादि विकारांपासून सत्य दूर असते.

**अस्तेय :-**

"**अस्तेयं नाम मनोवाक्कायकर्मभिः परद्रव्येषु निस्पृहा।। शाण्डिल्योपनिषद्।।१.७।।**" कायेने, मनाने व वाचेने सर्वथा परद्रव्याचा त्याग करणे याला अचौर्य, अस्तेय किंवा चोरी न करणे असे म्हणतात. याचा अर्थ असा आहे की, कायेने कोणाचे द्रव्य बळेच हरण करू नये. वाचेने कोणाला मागू नये. द्रव्य उत्तम आहे म्हणून ते

मिळाले पाहिजे असे मनाने चिंतू नये. अर्थात् द्रव्य म्हणजे पैसा एवढाच अर्थ मर्यादित नाही. मातीच्या भांड्यापासून ते सुवर्णा-पर्यंत जे काही सामान ते द्रव्यच आहे. या सर्वांचाच कायावाचामनाने त्याग करावा. अशा तऱ्हेने जो हे सत्याचे व्रत पाळील त्याची वाणी वाया जात नाही. तो जे बोलेल ते होते.

**आर्जव :-**

आर्जव म्हणजे मनाचा सरळपणा होय. शक्तिपातयोगसाधनेत या गुणाचे महत्त्व फार मोठे आहे. जितका हा गुण साधकाच्या ठिकाणी आधिक्याने असेल तितकी साधकाच्या आत्मशक्तीच्या विकासाला चालना मिळेल; कारण या गुणामुळे समर्पणाची क्रिया जलद घडून येण्यास मदत होते. या गुणाबद्दल श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज "**श्रीज्ञानेश्वरीत**" असे म्हणतात की -

"वाटेल त्या बऱ्या वाईट अशा सर्व प्राणिमात्रास मग तो कोणीही असला तरी त्यास जसा प्राण एकसारखा अनुकूल असतो त्याप्रमाणे साधकाने मनाने सर्वांशी सरळ असावयास हवे. सूर्य जसा हा चांगला व हा वाईट अशी भेदबुद्धी ठेवून एखाद्याचे तोंड पाहून प्रकाश पाडीत नाही किंवा आकाश हे सर्व जगाला सारखाच अवकाश देते त्याप्रमाणे साधकाचे मन हरएक प्राण्याविषयी निरनिराळे असता कामा नये. उलट वर्तन असे असावयास पाहिजे की, सर्व जग जसे काही पूर्वीपासून त्याच्या ओळखीचे आहे. किंबहुना सर्व जगाबरोबर जसा काही आपला अगदी दाट व जुनाट संबंध आहे असे त्याच्या मनाला वाटले पाहिजे. साधकाला आपपरभावाची भाषाच ओळखीची असता कामा नये. असे आर्जव ज्या साधकाच्या ठिकाणी असते त्याची वाटेल त्याच्याबरोबर मैत्री होते. पाण्याप्रमाणे त्याचा स्वभाव सर्वांशी जुळणारा असतो. कोणाही विषयी त्याचे मन विकल्प घेत नाही. वाऱ्याचे वाहणे जसे सरळ असते त्याप्रमाणे साधकाच्या मनाचा स्वभाव सरळ असावयास हवा. शंका व लोभ त्याच्या चित्तात मुळीच असता कामा नयेत.

आत एक व बाहेर एक अशा विचारास साधकाने मनात थारा देता कामा नये. कोणाबरोबरही साधकाने वाईट बुद्धीने वागता कामा नये. साधकाची दहा इंद्रिये व पंचप्राण सदासर्वदा सरळ, निष्कपट व शुद्धबुद्धीने वर्तन करणारी असली पाहिजेत. अमृताच्या धारेप्रमाणे त्याचे अंत:करण सरळ असले पाहिजे. जो साधक असे वागतो तो पुरुष मूर्तिमंत आर्जव आहे असे म्हणावयास पाहिजे." **(श्रीज्ञानेश्वरी १३.३५५ ते ३६८)**

सारांश, ज्याप्रमाणे आईच्या स्तनातील दूध हे मुलास सर्वतोपरी हितकारक असते किंवा चैतन्य अथवा प्राण हा सर्व भूतमात्रांच्या ठिकाणी सारखाच असतो त्याप्रमाणे प्राणिमात्रांशी सरळ, निष्कपट व सौजन्यपूर्ण वागणे याला आर्जव असे म्हणतात.

**क्षमा :-**

आपल्या शरीरावर केस आहेत व आपण ते धारण केले आहेत याची जाणीव शरीराला नसते. त्याप्रमाणे सर्व सहन करीत असताना देखील मोठेपणाचा गर्व ज्याला वाटत नाही त्याला क्षमा असे म्हणतात. कोणी प्रिय बोलो अथवा अप्रिय बोलो, दंड मारो अथवा सन्मान करो, चंदन लावो अथवा घाण टाको; परंतु ते सहन करून घ्यावे. इतकेच नव्हे; तर मनाने देखील त्याचे नुकसान चिंतू नये. साधकाने वरवर एखादी गोष्ट सहन केली आणि मनाने मात्र नुकसान चिंतिले तर पूर्वी सांगितलेल्या अहिंसेचा भंग होईल आणि योगसिद्धी होणार नाही. यासाठी मनाने देखील कोणाचे वाईट चिंतू नये. ही क्षमा पूर्ण साधली म्हणजे त्रिभुवनात कोणी शत्रू राहत नाही. **(श्रीज्ञानेश्वरी १६.१९१)**

"**श्रीज्ञानेश्वरीच्या**" १३ व्या अध्यायात साधकाच्या ठिकाणी क्षमेची किती नितांत आवश्यकता आहे हे सांगताना श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, "अपेक्षित इच्छित वस्तू प्राप्त झाली असता साधकाला जो संतोष होतो तोच संतोष अनपेक्षित वस्तू त्याला प्राप्त झाली असता त्याने मानला पाहिजे. शिवाय साधकाने मानापमान सहन करून सुखदु:खांनाही सारखीच जागा दिली पाहिजे. त्याने निंदेने किंवा

स्तुतीने मनाची समता दुभंगू देता कामा नये. अनेक प्रकारची सुखदुःखे प्राप्त झाली तरी अंतःकरण डगमगू न देता व श्रमी न होता साधकाने राहिले पाहिजे. नदी व नद यांचे समुदाय पाण्याचे लोटच्या लोट घेऊन जरी आले तरी त्यांना कोठे ठेवावे अशी चिंता न करता ज्याप्रमाणे समुद्र आपल्या पोटात ते सहज सामावून घेतो त्याप्रमाणे साधकाने आपल्याला एखादी गोष्ट सहन करता येत नाही असे कधीही घडू देऊ नये. त्याचप्रमाणे आपण सर्व गोष्टी सहन करतो अशी आठवण ठेवून अभिमानही धरू नये. असे जो वागतो त्याला क्षमारूप साधन संपत्ती प्राप्त होते. **(श्रीज्ञानेश्वरी १३.३४२ ते ३५२)**

**धृती :-**

धृती म्हणजे धैर्य. जो साधक धैर्यवान् असतो त्याने कल्पांतीही आपले सहनशीलतेचे धैर्य सोडता कामा नये. साधन करताना विषय-सेवनाविषयी इंद्रियांची असीम प्रवृत्ती ज्यावेळेस वाढते त्यावेळी मोठ्या धैर्याने साधकाने इंद्रियांना आवर घातला पाहिजे. त्याचप्रमाणे पूर्वप्रारब्धाने रोग खवळले असता किंवा अप्रिय वस्तूचा योग व प्रिय वस्तूचा वियोग झाला असता साधकाने अंतःकरण दगडासारखे कठीण करून धैर्य धारण केले पाहिजे. एवढेच नव्हे; तर वरील सर्व गोष्टींचा एक-समयावच्छेदेकरून पूर जरी आला व त्यांनी एकवटून साधकाला गिळण्याचा प्रयत्न केला तरी साधकाने श्रीअगस्ती ऋषींप्रमाणे अत्यंत दृढतेने उपरोक्त सर्वांना गिळून टाकून त्यांच्याशी अत्यंत धैर्याने सामना केला पाहिजे. ज्याप्रमाणे आकाशात धुराचा महाप्रचंड लोट उठला तरी वारा एका झुळकेसरशी त्याला गिळून नष्ट करतो. त्याप्रमाणे साधकाने आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक हे त्रिविध उपद्रव जरी एकदम प्राप्त झाले तरीही त्याने अमाप धैर्याने त्या सर्वांना गिळून टाकले पाहिजे. याप्रमाणे ज्या ज्या वेळी चित्ताचा क्षोभ होण्याचा प्रसंग उत्पन्न होतो त्या त्या वेळी साधक ज्या सहनशीलतेने ही सर्व दुःखे पेलतो व पचवितो त्या मनोवृत्तीरूप शक्तीला धृती असे म्हणतात. **(श्रीज्ञानेश्वरी १६.१९२ ते १९६)**

**अपरिग्रह :-**

"**पातंजल योगसूत्राच्या**" श्रीव्यासभाष्यात अपरिग्रहाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की - "**विषयाणामर्जनरक्षणक्षयसङ्ग-हिंसादर्शनादस्वीकरणमपरिग्रहः।**" स्वार्थबुध्दीने धन, संपत्ती, ऐश्वर्य, भोगसामुग्री व शरीर रक्षणाच्या अनावश्यक वस्तू मिळविणे, त्यांचे रक्षण करणे, त्या नाश पावू नयेत म्हणून त्यांची काळजी घेणे याला परिग्रह असे म्हणतात. या उलट अशा तऱ्हेच्या संग्रहबुद्धीचा त्याग करण्याचा अभ्यास करणे याला अपरिग्रह म्हणतात. प्राणिघातावाचून भोग नाही म्हणून हिंसा इत्यादि दोष विचारात घेता विषयांचा स्वीकार न करणे यालाच अपरिग्रह असे म्हणतात.

**दया :-**

या साधन संपत्तीचे वर्णन करताना श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, "चंद्राचे चांदणे आपली शीतलता व शांती लोकांना देत असताना हा थोर व हा लहान अशी निवड करीत नाही त्याप्रमाणे साधकाने सर्वांबद्दल अंतकरणात सारखी दया धारण केली पाहिजे." **(श्रीज्ञानेश्वरी १६.१५४)** श्रीसंतगुलाबरावमहाराज यांनी "**योगांगयम-लक्षण**" यात दयेविषयी असे म्हटले आहे की, "सर्वाभूती दया असावी. कोणाचाही द्वेष नसावा. ज्याप्रमाणे आपला प्राण आपल्याला प्रिय आहे त्याप्रमाणेच सर्व जीवांना आपापला प्राण प्रिय आहे. म्हणूनच कोणाचाही घात व द्रोह करू नये. व्याघ्र, सर्प, विंचू इत्यादिकांचाही वध करू नये. मनात देखील त्यांच्या नाशाविषयी इच्छा करू नये. कदाचित् उठलीच तर मागे केलेल्या अहिंसेचा भंग होतो व मग योगसिद्धी होत नाही. महासंकटात शत्रूलाही सोडवावे. मग तो आपला नाश करो वा न करो. ही भूतदया साधली म्हणजेच ईश्वरानुग्रह झाला. दानाहून दया विशेष आहे. कायावाचामने करून सर्व प्राण्यांच्या रक्षणाचा उपाय करावा. म्हणजे कायेने कोणास काही नसेल ते यथाशक्ती पुरवावे. काही जवळ नसेल तर हात जोडून वंदन करावे. सर्व प्राण्यांना आपले शरीर झिजवून संकटातून

रक्षावे. दयेच्या ठिकाणी जाती, वर्ण पाहू नये. सुष्ट-दुष्ट, लहान-मोठा, शत्रू-मित्र, आपले-परावे इत्यादि पाहू नये. ज्याप्रमाणे श्रीगंगेवर गाय व वाघ दोघेही जातात व त्या दोघांची श्रीगंगा सारखी तृप्ती करते त्याप्रमाणे सर्वाभूती समान दया असावी. दयेपेक्षा श्रेष्ठ धर्म नाही. दया हीच साधारण लोकास समाधी आहे. "**सर्वभूतेषु दया ब्रह्म। एतद्ब्राह्मणलक्षणम्।।**" असे "**श्रुतीचे**" वचन आहे. सर्वाभूती एक ब्रह्म आहे असे जाणून जो सर्व भूतांवर दया करतो तो कोणत्याही जातीचा असला तरी खरोखर ब्राह्मण आहे असे "**सामवेदात**" सांगितले आहे. यास आणखी पुष्कळ श्रुती प्रमाण आहेत. दया हे मुक्तीचे मूळ आहे. याविषयी श्रीसंततुलसीदास एके ठिकाणी म्हणतात. "**दया मुकतका मूल है। नरकमूल अभिमान। तुलसी दया न छांडिये। जबलग घटमों प्राण।।**" तसेच दया भक्तीचेही मूळ आहे. श्रीसंत-एकनाथमहाराज असे म्हणतात की, "**ज्याचे अंगीं दया शांती। तया न लगे ईश्वरभक्ती।।** दया हे संतांचे गुह्य आहे. याविषयी श्रीसंत-तुकाराममहाराज असे म्हणतात की, "**भूतांची दया हे भांडवल संतां। आपुलिया ममता नाहीं देहीं।। दया करणें जे पुत्रासी। तेचि दासा आणि दासी।। तुका म्हणे सुख पराविया सुखें। अमृत हें मुखें स्त्रवतसे।।**" याप्रमाणे दया हे योगाचे मूळ आहे. याविषयी श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराज असे म्हणतात की, "**दया जयाचें अंतरीं। त्याला दूर नाहीं हरी। हारवोनि सर्व धन। करा दया हे साधन। रामी रामदास म्हणे। दया सर्वत्र ठेवणे।।**" श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी तर दयेस ब्रह्मच करून ठेवले आहे. ते असे म्हणतात, "**गाईची तृषा हरूं। व्याघ्रा विष होऊनी मारूं। ऐसें नेणेचि गा करूं। तोय जैसें।।१२.१४७।। का घरींचियां उजियेडु करवा । पारखियां आंधारु पाडावा। हें नेणेचि गा पांडवा। दीपु जैसा।।१२.१९८।। जो सर्व भूतांच्या ठायीं। द्वेषातें नेणेंचि कहीं। आपपरु जया नाहीं। चैतन्या जैसा।।१२.१४४।।**"

**शौच :-**

शौच या शब्दाचा अर्थ शुद्धता असा आहे. "**पातंजल योगसूत्रात**" साधनसंपत्तीच्या या गुणाला नियमपंचकात घातले आहे. योगसूत्रावरील श्रीव्यासभाष्यात शुद्धतेची व्याख्या करताना असे म्हटले आहे की, "**शौचं तु द्विविधं प्रोक्तं बाह्याभ्यन्तरं यथा। शौचं मृज्जलादिजनितं मेध्याभ्यवहरणादि च बाह्यम्। आभ्यन्तरं चित्तमलानामाक्षालनम्।। २-३२।।**" ती शुद्धता दोन प्रकारची आहे. बाह्य शुद्धता व आंतर शुद्धता. मातीने, पाण्याने अगर भस्माने जी देहाची शुद्धी ती बाह्य शुद्धी होय आणि मनातील सर्व कृत्रिम भाव काढून टाकणे व वाईट वासनेचा त्याग करणे ही आंतरशुद्धी होय. ही साधली म्हणजे योगी पातकांपासून मुक्त होतो. श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी शुचितेचे वर्णन करताना असे म्हटले आहे की, "कापूर जसा आंतर्बाह्य शुद्ध व स्वच्छ असतो तसे साधकाचे शरीर आंतर्बाह्य शुद्ध व स्वच्छ असावयास हवे. असे म्हणणे हेच खरे शुचित्व होय." **(श्रीज्ञानेश्वरी १३.४६२)** साधकाच्या घरादारामध्ये अशी शुचिता असणे नितांत आवश्यक आहे; कारण याशिवाय योगशास्त्रात साधनाची जी फले मिळतात म्हणून सांगितले आहे ती साधकाला मिळत नाहीत. साधनाची खोली अगदी स्वच्छ असणे, नित्यनियमित स्नानादि करणे हे जितके आवश्यक आहे तितकेच घरात विटाळशीचा विटाळ पाळला जाणे आवश्यक आहे. कालौघात एक अत्यंत चांगली प्रथा समाज सोडून देत आहे; परंतु साधकाने समाजाचा विचार न करता म्हणजे बाहेर कोण काय करतो, नियम कितपत पाळतो हे न पाहता व याचा विचार न करता स्वतःच्या घरात हे नियम पूर्ण पाळलेच पाहिजेत. हे नियम न पाळता साधन करणे कित्येक वेळा घातक ठरते.

वास्तविक रजस्वला स्त्रीने पहिल्या दिवसापासून ब्रह्मचारिणी राहावे. दिवसा झोपू नये. डोळ्यात काजळ घालू नये. कधीही रडू नये. स्नान करणे, चंदनाची उटी लावणे, तेलाने मर्दन करणे, नखे काढणे, धावणे, हसणे, अति बडबडणे, भयानक शब्द ऐकणे, वेणी

घालणे व जोराचा वारा सहन करणे या गोष्टी करू नयेत. "**शतपथ ब्राह्मण**" व "**तैत्तिरीयसंहितेमध्ये**" उपरोक्त नियमांचे रहस्य आवर्जून सांगितले आहे. रजस्वला स्त्रीबरोबर एकासनावर बसणे, एका शय्येवर झोपणे, तिला स्पर्श करणे किंवा तिच्याशी भाषण करणे इत्यादि सर्वांचा तीव्रतम निषेध शतपथ ब्राह्मणामध्ये सुस्पष्टपणे केला आहे. ऋषी म्हणतात, "रजस्वलेला स्पर्श करू नये. सहआसन, सहशयन व सहभाषण करू नये. तिचे निरीक्षणही करू नये. या गोष्टी अत्यंत निषिद्ध आहेत; कारण त्यामुळे मानव मलीन होतो."

भगवान् श्रीव्यासांनी ऋतुमती स्त्रीच्या बाबतीत मुद्दाम स्पष्टपणे असे सांगितले आहे की-

**स्त्रियं पवित्रमतुलं नैता दुष्यन्ति कर्हिचित्।**
**मासि मासि रजस्तासां दुष्कृतान्यपकर्षति।।**

पवित्रतेच्या दृष्टीने स्त्रिया अनुपम आहेत; कारण त्यांच्या शरीरातील, मनातील व बुद्धीतील दोष प्रत्येक महिन्याला रज बाहेर पडून दूर होत असतात. अर्थात् स्त्रियांचे हे परम कर्तव्य आहे की, वस्तूला, अन्नाला, कपड्याला अगर व्यक्तीला स्पर्श न करता बाजूला राहून या दोषांचे संक्रमण उपरोक्त गोष्टीत होणार नाही याची काळजी घेतली पाहिजे. यासाठी त्यांनी नियमबद्ध राहणे आवश्यक आहे.

**रजोदर्शनतो दोषात् सर्वमेव परित्यजेत्।**
**सर्वैरलक्षिता शीघ्रं लज्जितान्तर्गृहे वसेत्।**
**स्त्रीधर्मिणी त्रिरात्रं तु स्वमुखं नैव दर्शयेत्।**
**स्ववाक्यं श्रावयेन्नापि यावत् स्नानान्न शुद्ध्यति।।**

जी स्त्री विटाळशी झाली आहे तिने दुसऱ्या पदार्थांमध्ये आपल्या ठिकाणच्या रजोदोषांचे संक्रमण होऊ नये म्हणून स्वयंपाकपाणी इत्यादि कोणत्याही गृहकार्यापासून तीन दिवस पूर्णपणे दूर राहिले पाहिजे. चौथ्या दिवशी स्नान करून वरवरचे काम करण्यास हरकत नाही. मात्र स्वयंपाक करू नये. पाचव्या दिवशी स्नान करून स्वयंपाकादि करण्यास हरकत नाही. श्रीमनूने मनुस्मृतीत या बाबतीत असे स्पष्ट

लिहिले आहे की -

**नोपगच्छेत् प्रमत्तोऽपि स्त्रियमार्तवदर्शने।**
**समानशयने चैव न शयीत तया सह।।**
**रजसाभिप्लुतां नारीं नरस्य ह्युपगच्छतः।**
**प्रज्ञा तेजो बलं चक्षुरायुश्चैव प्रहीयते।।**
**तां विवर्जयतस्तस्य रजसा समभिप्लुताम्।**
**प्रज्ञा तेजो बलं चक्षुरायुश्चैव प्रवर्धते।।४.४०-४२।।**

कामाने पिडीत झालेल्या पुरुषानेही रजोदर्शन झाले असता पहिले चार दिवस स्त्रीसमागम करू नये व तिच्याबरोबर एका शय्येवर झोपू नये; कारण रजस्वला स्त्रीशी गमन करणाऱ्या पुरुषाची बुद्धी, तेज, बल, नेत्र व आयुष्य ही क्षीण होतात. जो पुरुष अशा स्त्रीला वर्ज्य करतो त्याची बुद्धी, तेज, बल, नेत्र व आयुष्य ही वाढतात.

ज्यांना हे शक्तिपातायोगाचे साधन करावयाचे आहे त्यांनी निदान आपल्या घरात विटाळशीचा विटाळ कटाक्षाने पाळला पाहिजे. तिच्या हातचे अन्न तर कदापीही भक्षण करता कामा नये. प्रोफेसर श्री.शीक याने संशोधनाने सिद्ध केलेले मत साधकाने कायम ध्यानात ठेवले पाहिजे. तो म्हणतो, "विटाळशीच्या विटाळात अत्यंत प्रबल असे रजोविष असते. ती जर उद्यानात गेली तर फुले, पाने व फळे सुकून जातात. फुलांनी बहरलेल्या वेली व वृक्ष मरून जातात. फुले सडतात. इतकेच नव्हे; तर वृक्षावरील किडेसुद्धा मरून पडतात किंवा पळून जातात. विटाळ किंवा रजोविष फार भयंकर आहे. ते निघून जाणेच इष्ट असते. याविषयी सुरुवात पहिल्या दिवशी होऊन दुसऱ्या दिवशी त्याचे प्रमाण खूप वाढते. तिसऱ्या दिवशी हे प्रमाण कमी होऊन चवथ्या दिवशी नाहीसे होते." या अर्थानेच **"श्रीपराशर-स्मृतीमध्ये"** असे म्हटले आहे की,

**प्रथमेऽहनि चाण्डाली द्वितीये ब्रह्मघातिनी।**
**तृतीये रजकी प्रोक्ता चतुर्थेऽहनि शुद्ध्यती।।७.२०।।**

रजस्वला स्त्री पहिल्या दिवशी चांडाळाप्रमाणे अपवित्र, दुसऱ्या

दिवशी ब्रह्महत्या करणाऱ्याइतकी अपवित्र, तिसऱ्या दिवशी परटिणी-इतकी अपवित्र व चवथ्या दिवशी स्नानाने ती पूर्ववत् शुद्ध होते.

**"शाक्तानंद तरंगिणीमध्ये"** तर रजस्वला स्त्री पाचव्या दिवशी गृहकृत्यादि सर्व कार्यास शुद्ध होते असे म्हटले आहे.

**रजस्वला च या नारी विशुद्धा पञ्चमे दिने।**

सारांश, साधकाने साधनात प्रगती होण्याच्या दृष्टीने ही शुचिता पूर्णांशाने सांभाळली पाहिजे. याला दुसरा पर्याय नाही.

शुचितेमध्ये स्पर्शास्पर्श दोषाचा विचारही आवश्यक आहे. साधकाने उगीच कोणालाही सहसा स्पर्श करू नये; कारण जागृत शक्तीच्या रूपाने शरीराची, मनाची व प्राणाची निरंतर शुद्धी चालू असते. ही शुद्धी दुसऱ्याच्या स्पर्शाने कमी होते; कारण त्याच्या विचारादिसंस्कारांचे संक्रमण होण्याची खूपच शक्यता असते.

**आहार :-**

साधनसंपत्तीच्या दृष्टीने आहाराकडे साधकाने निरंतर लक्ष दिले पाहिजे. आहार कसा, किती, कोणता व केव्हा घ्यावा याचा विचार होणे फार आवश्यक आहे.

**मिताहार :-**

साधकाने नेहमी मिताहारच करणे उचित आहे. अत्याहाराने योगाचा नाश होतो असे **"हठयोगप्रदीपिकेत"** सांगितले आहे. **"घेरंड संहितेत"** असे स्पष्ट म्हटले आहे की -

**मिताहारं विना यस्तु योगारम्भं तु कारयेत्।**
**नानारोगा भवेत्तस्य किंचित् योगो न सिध्यति।।५.१६।।**

जो साधक परिमित आहार करण्याचा निश्चय व नियम न करता योगाभ्यासाला सुरुवात करतो त्याला नाना प्रकारचे रोग होतात, त्याची साधनात थोडीसुद्धा प्रगती होत नाही व त्याला योगामध्ये सिद्धी मिळत नाही.

**"श्रीमद्भगवद्गीतेतील"** ६ व्या अध्यायामध्ये साधकाने आहार निद्रादि संबंधाने किती सावध असले पाहिजे हे आवर्जून सांगितले

आहे; कारण त्याशिवाय योगसिद्धी होत नाही.

**नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकान्तमनश्नतः।**
**न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन।।१६।।**
**युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु।**
**युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा।।१७।।**

जितके हवे त्याहून आधिक अन्न खाणाऱ्या पुरुषाला शक्तिपात-योगाभ्यास होत नाही. अगदी मुळीच अन्न न खाणाऱ्या साधकाला अशक्तता आल्यामुळे हा शक्तिपातयोगाभ्यास करता येत नाही. खूप झोप घेण्याचा ज्याचा स्वभाव आहे त्याला व अतिशय जागणाऱ्या पुरुषाला योग घडत नाही व करताही येत नाही.

याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, "जो मनुष्य जिह्वेच्या अंकित होतो किंवा सर्वथैव झोपेला जीवाभावाने विकला जातो तो या योगाचा अधिकारी म्हटला जात नाही. अथवा दुराग्रहाच्या आवेशात जो भूक आणि तहान मारून आहार कमी करतो त्याला योग साधत नाही. साधकाने झोप मुळीच घ्यावयाची नाही असा दुराग्रह धरून नाचू नये व त्यात धन्यताही मानू नये; कारण त्यातच साधकाने धन्यता मानली तर त्याचे शरीरच त्याच्या स्वाधीन राहत नाही. मग त्याला योग कोठून साध्य होणार? यासाठी विषयांचे अतिसेवन करावे अशी साधकाची विरोधी वृत्ती नसावी किंवा त्याचा सर्वथैव त्याग करण्याचा आग्रहही धरणे योग्य नाही." **(श्रीज्ञानेश्वरी ६.३४५ ते ३४८)**

"साधकाने युक्तीच्या मापाने मोजून परिमित असे अन्न सेवन करावे. त्याचप्रमाणे इतर सर्वच्या सर्व क्रियाही युक्तीनेच प्रमाणात कराव्यात. याचा अर्थ असा आहे की, साधकाने थोडे बोलावे. अगदी कमी चालावे. झोप आली म्हणजे योग्यवेळी झोपही घ्यावी. जाग्रण करावयाचे झाले तरी तेही नियमित वेळेपर्यंतच करावे. अशा नियमित रीतीने आचरण केल्यावर शरीरातील रक्तादिक सप्तधातू सहजच समतोल राहतात. अशा प्रकारे बेताबेताने इंद्रियांची तृप्ती

नियमितपणाच्याद्वाराने करीत गेले म्हणजे हळूहळू संतोष वाढत जातो व अंतर्यामी सुख वाढते." **(श्रीज्ञानेश्वरी ६.३४९ ते ३५२)**

**परिमित आहार म्हणजे काय? :-**

साधकाने भोजन करताना प्रथम आपल्या इष्टदेवतेला सर्व अन्न अर्पण करून भोजनास आरंभ करावा. भोजन करताना मन प्रसन्न व संतोषित असावे, निर्मल, सुमधुर, स्निग्ध व सरस भोजनाने पोट अर्धे भरेल इतकेच खावे. नंतर एक चतुर्थांश भाग पाणी प्यावे व एक चतुर्थांश भाग वायूसाठी मोकळा सोडावा. मिताहारासंबंधी एकच विशेष गोष्ट अशी लक्षात ठेवली पाहिजे की, भोजन झाल्यावर पोट थोडेसे मोकळे राहिले पाहिजे आणि मनाला असे वाटले पाहिजे की, आपण आणखी थोडे खाऊ शकू. असे वाटले म्हणजे उत्तम मिताहार झाला असे समजावे. पोटाला तडणी लागेल इतके खाणे योग्य नाही; कारण त्यामुळे शरीराला जडता व आळस येऊन साधन चांगले होत नाही. भूक लागल्यावर साधकाने थोडे अवश्य खावे. परंतु एका वेळेलाच अधिक खाणे साधकाला कधीही योग्य नाही. साधकाने हे लक्षात ठेवले पाहिजे की, जेवण झाल्यावर त्याने तीन तास साधन करता कामा नये. त्याचप्रमाणे अतिशय भूक लागली असताना उपाशी पोटी साधन करणे चांगले नाही. अत्यंत भूक लागली तर थोडेसे हलके खाऊन साधन करण्यास हरकत नाही. भूक लागली असताना मोकळ्या पोटी साधनास बसल्यास चित्त स्थिर होत नाही. नसते विघ्न मात्र उपस्थित होते. श्रीकबिरांनी याबाबतीत असे म्हटले आहे की -

**कबिरा छूधा-कूकडी करत भजनमें भंग।**
**याको टुकडा डारिकै, सुमिरन करो निसंक।**

श्रीकबीर असे म्हणतात की, "भूक ही एखाद्या कुत्रीप्रमाणे साधनभजनात विघ्न करते. यासाठी तिला थोडासा तुकडा खाण्यास दिला की, साधकाला निश्चिंतपणे साधनात निमग्न होता येते."

**भोजन केव्हा करावे? :-**

साधकाने सकाळ संध्याकाळ नियमित वेळी भोजन केले पाहिजे. त्याचप्रमाणे जेवताना उजव्या नाकपुडीने म्हणजे पिंगला नाडीने श्वास चालू असणे अधिक श्रेयस्कर असते. पिंगला नाडीलाच सूर्यनाडी असे म्हणतात. ही नाडी चालू असली म्हणजे श्वासोच्छ्वास उजव्या नाकपुडीने चालू असला की, देहरूपी लघुब्रह्मांडात दिवस होतो. इडा नाडीला चंद्रनाडी असे म्हणतात. जेव्हा प्राणवायू या नाडीतून वाहत असतो तेव्हा देहात रात्र असते. त्यामुळे जेव्हा पिंगला नाडी चालू असून देहात दिवस असतो तेव्हा आहार घेतल्याने शरीररस उत्पन्न न होता अन्नाचे सहज पचन होते. मात्र इडा नाडी चालू असताना म्हणजे देहात रात्र असताना जर भोजन केले तर त्याचे पचन ठीक होत नाही व शरीरात रसाचा खूप संचार होतो. जर भोजन करताना उजव्या नाडीने श्वास चालू नसेल तर डाव्या पायाचा गुडघा बगलेत दाबून धरला की, उजवी नाडी सुरू होईल. डाव्या कुशीवर झोपले किंवा डाव्या बगलेत एखाद्या फडक्याचा बोळा दाबून धरला तरी उजवी नाडी सुरू होते.

**साधकाचे भोजनातील पदार्थ :-**

साधकाच्या भोजनात पुढील पदार्थ विशेषे करून असावेत. साळीचे तांदूळ, गहू, मूग, पडवळ, काकडी, सातू, दूध, तूप, साखर, लोणी, वेलदोडे, तूर, पालक, चवळई, घोळूची भाजी, दुधी भोपळा, घोसाळे, सुरण, साठीभात, देवभात म्हणजे वरई, केळफूल, परवरची भाजी इत्यादि पदार्थ साधकाच्या भोजनात असावेत. शक्तिपातयोगाच्या साधनास सुरुवात झाली की, प्रथम तीव्र शक्तिचालनामुळे शरीरात खूप उष्णता वाढल्याचे अनुभवास येते. अशा वेळी तूप व दुधाचे सेवन करणे उपयुक्त ठरते. त्याचप्रमाणे साधकाचा आहार पौष्टिक, मधुर धातूंचे पोषण करणारा, रुचकर, स्निग्ध व मनाला प्रसन्न करणारा असावा.

"**श्रीमद्भगवद्गीतेत**" सात्त्विक माणसाला प्रिय असणारा जो आहार सांगितला आहे. तोच साधकाने नेहमी घ्यावा.

**आयु:सत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धना: ।**
**रस्या: स्निग्धा: स्थिराहृद्या आहारा: सात्त्विकप्रिया: ।।१७.८।।**

आयुष्य, मानसबल, शरीरबल, आरोग्य, सुख, प्रीती यांना वाढविणारा, रसयुक्त, स्नेहयुक्त, देहात परिणामरूपाने चिरकाल राहणारा व हृदयाला प्रिय वाटणारा असा आहार सात्त्विक लोकांना प्रिय असतो. असाच आहार साधकाने घ्यावा. साधकाने मिताहार करावा म्हणून **"हठयोगप्रदीपिकेत"** मोठ्या कटाक्षाने सागितले आहे.

**सुस्निग्धमधुराहारश्च चतुर्थांशविवर्जित: ।**
**भुज्यते शिवसम्प्रीत्यै मिताहार: स उच्यते ।।१.५८।।**

साधकाने स्निग्ध म्हणजे तूप व दूधयुक्त आणि मधुर असा आहार घ्यावा. जेवताना दोन भाग अन्न व एक भाग पाणी पिऊन एक भाग वायूच्या चलनासाठी मोकळा ठेवावा. त्याचप्रमाणे आपण जे भोजन करतो ते अंत:करणामध्ये ईश्वराबद्दल प्रेम निर्माण व्हावे व त्याची प्राप्ती आपल्याला व्हावी म्हणून करीत असल्याने जेवण देहाकरिता नसून देव जो श्रीमहेश्वर तो भोक्ता आहे, त्याच्या करिता आहे, अशी श्रद्धा मनात बाळगून जे जेवण केले जाते, त्यालाच मिताहार असे म्हणतात.

**भोजनातील वर्ज्य पदार्थ :-**

**"ध्यानबिंदू उपनिषदात"** असे म्हटले आहे की -

**कट्वम्ललवणत्यागी क्षीरपानरत: सुखी ।।७१।।**
**ब्रह्मचारी मिताहारी योगी योगपरायण: ।।७१-१/२।।**

कडू, तिखट व खारट पदार्थ साधकाने टाळावेत. जो साधक दुग्धपान करतो, मिताहारी असतो व ब्रह्मचारी राहतो तो साधनाभ्यासाने योगपरायण होतो.

साधकाने कडू, खारट, आंबट, अतितिखट, गरम, कांजी, लोणचे, मोहरीचे तेल, मांस, मासे, दही, अति आंबट ताक, हिंग, कांदा, लसूण, दोनदा गरम केलेले पदार्थ, रुक्ष व जळजळ करणारे पदार्थ, शिळे, पचण्यास कठीण, दुर्गंधीयुक्त, अतिउष्ण, अतिशीतल, असे

सर्व पदार्थ वर्ज्य करावेत. "**श्रीमद्भगवद्गीतेमध्ये**" राजस व तामस लोकांना जे पदार्थ आवडतात ते सांगितले आहेत. साधकाने ते कटाक्षाने टाळले पाहिजेत.

**कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः।**
**आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः।।१७.९।।**
**यातायमं गतरसं पूति पर्युषितं च यत्।**
**उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम्।।१०।।**

कडू, आंबट, खारट, अति उष्ण, तिखट, रुक्ष, नीरस, दाहक, पोटाची व तोंडाची आग करणारे, दुःख, शोक व रोग उत्पन्न करणारे पदार्थ राजस प्रकृतीच्या मनुष्याला आवडतात. त्याचप्रमाणे अर्धवट शिजलेले, रसरहित, दुर्गंधीयुक्त, शिळे, उष्टे, यज्ञाला अयोग्य असे अन्न तामस लोकांना प्रिय असते. उपरोक्त सर्व प्रकारचे अन्न साधकाने टाळावे.

साधकाने मांसाहार कटाक्षाने वर्ज्य केला पाहिजे; कारण मांसाहारामुळे रज व तमोगुणाची वृद्धी होते. मांसाहारामुळे हिंसादोष साधकाला लागतो. यासाठी आपले शारीरिक व मानसिक कल्याण होईल असाच आहार साधकाने केला पाहिजे. कांदा व लसूण हे दोन्ही पदार्थ कामोत्तेजक असून प्राणशक्ती खाली खेचणारे असल्याने तेही साधकाने जन्मभर वर्ज्य केले पाहिजेत.

**भोजनाचे नियम किती दिवस पाळावयाचे :-**

योगी व रोगी हे जवळ जवळ सारखेच असतात; कारण रोगी वैद्याकडे जाऊन योग्य औषध व आहाराच्या पथ्याचे पालन करून प्रकृती ठीक करतो तर साधक भवरोगपीडित असल्याने श्रीगुरूपाशी जाऊन भवरोग समुद्रातून पार होण्यासाठी साधनरूप औषध घेऊन विधिनिषेधादि आहाराच्या नियमांचे पालन करणे त्याला भाग पडते.

गाय, म्हैस, बकरी, मेंढी इत्यादि प्राण्यांपासून रक्षण व्हावे म्हणून लहान लहान झाडांच्या रोपट्यांना काट्यांचे कुंपण घालतात. परंतु ती रोपटी जेव्हा मोठी होऊन त्यांचे वृक्षात रूपांतर होते तेव्हा त्यांना

काट्यांच्या कुंपणाची आवश्यकता राहत नाही. इतकेच नव्हे; तर हे प्राणी व प्रचंड हत्तीही त्या वृक्षाच्या बुंध्यालाच बांधता येतात. त्यावेळी झाडाचे काय होईल अशी भीती वाटत नाही. त्याचप्रमाणे नियमादिद्वारा नियमित साधन केले म्हणजे पांचभौतिक जड देहातील जडत्व योगाग्नीने दग्ध झाल्यामुळे साधकाचा देह परिपक्व होऊन त्यास अखंड चैतन्याची प्रत्यक्षानुभूती प्राप्त होते. ज्ञान दृढ झाल्यावर मग त्याला वासना, दुष्टसंस्कारादि कशाचेही भय राहत नाही. जोपर्यंत साधकाचे ज्ञान दृढ होत नाही तोपर्यंत त्याने उपरोक्त सर्वांचे पालन कटाक्षाने केलेच पाहिजे. तो जर यामध्ये हयगय करील तर त्याला पतनाचे व मागे येण्याचे भय राहते.

**ब्रह्मचर्य :-**

शक्तिपातयोगाच्या साधनसंपत्तीत ब्रह्मचर्याचे महत्त्व विशेष आहे. "**योगसूत्र व्यासभाष्यामध्ये**" ब्रह्मचर्याची व्याख्या करताना "**ब्रह्मचर्यं गुप्तेन्द्रियस्योपस्थस्य संयमः ।।२.३०।।**" असे म्हटले आहे. गुप्त इंद्रिय म्हणजे उपस्थाच्या संयमाला ब्रह्मचर्य असे म्हणतात. "**शाण्डिल्योपनिषदातही**" ब्रह्मचर्याची व्याख्या करताना असे म्हटले आहे की, "**ब्रह्मचर्यं नाम सर्वावस्थासु मनोवाक्कायकर्मभिः सर्वत्र मैथुनत्यागः ।।१.८।।**" अर्थात् शरीर, मन व वाणी यांच्याद्वारा सर्व अवस्थेमध्ये मैथुनाचा त्याग करणे याला ब्रह्मचर्य असे म्हणतात.

उपरोक्त ब्रह्मचर्याची प्रशंसा अनेकानेक ग्रंथामध्ये विपुल प्रमाणात आली आहे. त्यावरून ब्रह्मचर्य ही फार महत्त्वाची साधनसंपत्ती आहे याचा सहज पडताळा येतो. शक्तिपातयोगाचे साधन करणाऱ्या साधकाला या गुणांची नितांत आवश्यकता आहे. साधक ज्या आश्रमात असेल त्याला अनुसरून त्याने ब्रह्मचर्य पाळले म्हणजे झाले.

**मैथुनाचे प्रकार :-**

ज्यामुळे वीर्यनाश होऊन हानी होते असे आठ प्रकारचे मैथुन शास्त्राने सांगितले आहेत.

**स्मरणं कीर्तनं केलिः प्रेक्षणं गुह्यभाषणम्।**
**संकल्पोध्यवसायश्च क्रियानिष्पत्तिरेव च।।**
**एतन्मैथुनमष्टाङ्गं प्रवदन्ति मनीषिणः।**
**विपरीतं ब्रह्मचर्यमनुष्ठेयं मुमुक्षुभिः।**

कोणत्याही अवस्थेत स्त्रीचे स्मरण करणे, तिच्या रूपाचे व गुणांचे वर्णन करणे किंवा श्रृंगार रस प्रधान ग्रंथ वाचून स्त्रीसंबंधी चर्चा करून तिची स्तुती करणे, स्त्रियांबरोबर पत्ते, सोंगट्या इत्यादि खेळणे, स्त्रियांकडे वाईट दृष्टीने पाहणे, स्त्रीबरोबर एकान्तात बोलणे, स्त्री प्राप्त व्हावी म्हणून व तिच्याशी संभोग व्हावा असा संकल्प करणे आणि हा संकल्प पूर्ण व्हावा म्हणून उपाय किंवा प्रयत्न करणे आणि स्त्रीशी संभोग करणे असे आठ प्रकारचे मैथुन शास्त्राने व विद्वानांनी सांगितले आहे.

या आठही प्रकारच्या मैथुनाचा त्याग साधकाने अवश्य केला पाहिजे; कारण त्यामुळे वीर्यस्खलन होउन शरीर दुर्बल बनते.

**वीर्यधारण हेच ब्रह्मचर्य :-**

शरीरामध्ये ओजस धातूमुळे जीवनाची धारणा होते. तेच एकमेव जीवनाचे खरे कारण आहे. श्रीवाग्भटांनी याबाबत असे म्हटले आहे की -

**ओजस्तु तेजो धातूनां शुक्रान्तानां परं स्मृतम्।**
**हृदयस्थमपि व्यापि देहस्थितिनिबन्धनम्।।११.३७।।**
**यस्य प्रवृद्धौ देहस्य तुष्टिपुष्टिबलोदयाः।**
**यन्नाशे नियतो नाशो यास्मिंस्तिष्ठति जीवनम्।।**
**निष्पद्यन्ते यतो भावा विविधा देहसंश्रयाः।**
**उत्साहप्रतिभाधैर्यलावण्यसुकुमारताः।।३९।।**

रसापासून वीर्यापर्यंत सात धातुंमध्ये जे तेज असते त्याला ओजस असे म्हणतात. हे ओज विशेषकरून हृदयात राहते; परंतु ते सर्व शरीराला व्यापून असते. ओजाची वृद्धी झाली की, तुष्टी, पुष्टी व बलाची उत्पत्ती होते. ओजाच्या नाशाने मृत्यू होतो. हे ओजच

जीवनाचा आधार आहे. त्याच्यामुळे उत्साह, प्रतिभा, धैर्य, लावण्य व सुकुमारतेची प्राप्ती होते.

हे ओज कोठून येते हे सांगताना महर्षी श्रीसुश्रुतांनी असे म्हटले आहे की - "**रसादीनां शुक्रान्तांना धातूनां यत्परं तेजस्तत् खल्वोजस्तदेव बलमिति।।१५.२३।।**" म्हणजे रसापासून शुक्रापर्यंत जे सात धातू आहेत त्यातील श्रेष्ठ अशा तेजाच्या भागाला ओज असे म्हणतात. हेच खरे बल होय.

हे ओज कसे आहे व कोठे राहते हे सांगताना श्रीशारंगधरांनी असे सांगितले आहे की -

**ओजः सर्वशरीरस्थं स्निग्धं शीतं स्थिरं सितम्।**
**सोमात्मकं शरीरस्य बलपुष्टिकरं मतम्।।**

ओज सर्व शरीराला व्यापून राहते. हे स्निग्ध, शीतल, स्थिर, श्वेतवर्णाचे, सोमात्मक व शरीराला बल आणि पुष्टी देणारे असते.

यावरून हे सिद्ध होते की, ओजाची उत्पत्ती वीर्यापासून होते. त्यामुळे जीवन धारणाचे प्रधान कारण व आलंबन वीर्य हेच आहे. या वीर्याची उत्पत्ती अन्नापासून होते. एवढेच नव्हे; तर रस, रक्त, मांस, मेद, अस्थी, मज्जा व वीर्य हे सात धातू शरीरात राहून शरीराला धारण करतात. मनुष्य जेव्हा अन्न खातो तेव्हा प्रथम रस तयार होतो. रसापासून रक्त, रक्तापासून मांस, मांसापासून मेद, मेदापासून अस्थी, अस्थीपासून मज्जा व मज्जेपासून सर्व साररूप पदार्थ एकत्र येऊन वीर्य उत्पन्न होते. या वीर्याचेच ओजामध्ये रूपांतर होऊन त्याचे महान् तेज बनते व ते सर्व शरीरात पसरते.

यामुळे दुधातून लोणी काढण्यासाठी जसे दूध घुसळावे लागते व उसातून गुळाचे उत्पादन व्हावे म्हणून उसाला चरकात घालावे लागते त्याप्रमाणे वीर्याचा एक बिंदू बाहेर काढण्यासाठी सर्व शरीराला घुसळून व पिळून काढावे लागते. ज्याप्रमाणे लोणी काढल्यावर सत्त्वहीन दूध व ऊस पिळल्यावर उसाची चिपाडे खाली राहतात त्याप्रमाणे वीर्यस्रावानंतर शरीरातील सर्व नाड्या ढिल्या पडतात व

प्रत्येक अवयवात एकप्रकारची उदासीनता पसरते. वीर्यपतनात मनुष्याचे पतन आहे व वीर्यधारणात मनुष्याचे जीवन आहे. यासाठी वीर्य-धारणेलाच ब्रह्मचर्य म्हटले जाते. "**श्रीशिवसंहितेत**" असे म्हटले आहे की -

**मरणं बिन्दुपातेन जीवनं बिन्दुधारणात्।**
**तस्मादतिप्रयत्नेन कुरुते बिन्दुधारणाम्।।४.८८।।**

बिंदुपातातच मृत्यू आहे व बिंदुधारणातच खरे जीवन आहे. यासाठी अत्यंत प्रयत्नपूर्वक बिंदू धारण केला पाहिजे. भगवान् श्रीशंकरांनी बिंदुधारणा करून ब्रह्मचर्याच्या प्रतापानेच हलाहल विष-प्राशन केले. याबाबत त्यांनी स्वतःच असे सांगितले आहे की -

**सिद्धे बिन्दौ महायत्ने किं न सिद्ध्यति भूतले।**
**यस्य प्रसादान्महिमा ममाप्येतादृशोऽभवत्।।**
**श्रीशिवसंहिता ४.९०।।**

ब्रह्मचर्य म्हणजे बिंदुधारणा सिद्ध झाल्याने, त्याच्या प्रभावाने सर्व ब्रह्मांडात माझा महिमा झाला आहे. त्यामुळे वीर्य म्हणजे बिंदूच्या धारणेने जगतामध्ये असे कोणते कार्य आहे की ते सिद्ध होणार नाही?

वास्तविक पाहता खरी गोष्ट अशी आहे की, ब्रह्मचर्य हे सर्व पुरुषार्थाचे मूळ आहे. त्याच्या पालनाने मनुष्य निरोगी व सुखी होतो. जरा व मृत्यूपासून त्याचे रक्षण होते. त्यामुळे हृष्ट, पुष्ट, बलिष्ठ व धर्मपरायण संतती होते. ब्रह्मचर्यामुळेच भजनाची, ध्यानाची व साधन करण्याची योग्यता साधकाला येते. या साधनसंपत्तीमुळे शक्तिपातयोगाच्या साधनात रुची, प्रगती व सिद्धी प्राप्त होते. या गुणाच्या जोरावर मनुष्य निर्भय व विनम्र होऊन जगाची सेवा करू शकतो. वास्तविक हेच सर्वप्रथम साधन आहे. देवराज श्रीइंद्राने दीर्घकालपर्यंत ब्रह्मचर्य पालन केल्यावरच प्रजापती ब्रह्मदेवाने त्याला ब्रह्मविद्येची दीक्षा दिली होती.

यासाठीच "**यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति।।८.११।।**" असे

"**श्रीमद्भगवद्गीतेत**" श्रीभगवंतांनी स्पष्ट सांगितले आहे. ज्या साधकाला परमात्मप्राप्तीची इच्छा असते तो ब्रह्मचर्याचे पालन करतो. "**श्रीमद्भगवद्गीतेच्या**" १७ व्या अध्यायाच्या १४ व्या श्लोकात ब्रह्मचर्य हे शारीरिक तपच आहे असे श्रीभगवंतांनी सांगितले आहे. त्यावर भाष्य करताना श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, "**जन्मतेनि प्रसंगें। स्त्रीदेह शिवणें आंगें। तेथूनि जन्म आवघें। सोंवळें कीजे।। श्रीज्ञानेश्वरी १७.२११।।**" म्हणजे जन्माच्या प्रसंगीच फक्त स्त्री शरीराचा स्पर्श होईल तेवढाच काय तो स्त्रीस्पर्श. तेथून पुढे सर्व जन्मभर एवढे कडक ब्रह्मचर्य व्रत पाळणे आवश्यक आहे की, स्त्रीदेहाचा स्पर्शही होणार नाही.

**गृहस्थाश्रम्यांचे ब्रह्मचर्य :-**

ज्यांचा विवाह झाला आहे अशा गृहस्थाश्रमी साधकांना हे नियम नाहीत. जे नैष्ठिक ब्रह्मचारी, साधू, अरण्यवासी किंवा संन्यासी आहेत त्यांच्यासाठी उपरोक्त ब्रह्मचर्याचे नियम आहेत. परंतु जे गृहस्थाश्रमी विवाहित साधक आहेत त्यांच्यासाठी शास्त्राने स्वतंत्र मर्यादा घालून दिली आहे. या बाबतीत महर्षी श्रीयाज्ञवल्क्य असे म्हणतात की -

**ऋतुकाले स्वदारेषु संगतिर्या विधानतः।**
**ब्रह्मचर्यं तदेवोक्तं ग्रहस्थाश्रमवासिनाम्।।**

स्त्रीला ऋतुकाल प्राप्त झाला असता जो आपल्या धर्मपत्नीबरोबर शास्त्राच्या आदेशाप्रमाणे केवळ संतती उत्पन्न व्हावी म्हणून समागम करतो तो पुरुष गृहस्थाश्रमात असला तरी ब्रह्मचारीच असतो. ऋतुकालासंबंधी श्रीमनूने "**मनुस्मृतीत**" असे म्हटले आहे की -

**ऋतुः स्वाभाविकः स्त्रीणां रात्रयः षोडशः स्मृताः।**
**चतुर्भिरितरैः सार्धमहोभिः सद्विगर्हितैः।।३.४६।।**
**तासामाद्याश्चतस्त्रस्तु निन्दितैकादशी च या।**
**त्रयोदशी च शेषास्तु प्रशस्ता दश रात्रयः।।४७।।**

सत्पुरुषांनी निंदित केलेल्या रजोदर्शनाचे पहिले चार दिवस धरून सोळा रात्री स्त्रियांचा स्वाभाविक ऋतुकाल म्हटला जातो. या

सोळा रात्रीतील पहिल्या चार रात्री, अकरावी व तेरावी रात्र स्त्री सहवासाला वर्ज्य आहे. बाकी दहा रात्री उत्तम समजल्या जातात.

वरील दहा रात्रींमधील प्रतिपदा, षष्ठी, अष्टमी, एकादशी, द्वादशी, चतुर्दशी व पौर्णिमा या तिथी वर्ज्य कराव्यात. त्याचप्रमाणे व्यतिपात, ग्रहण, रामनवमी, शिवरात्र, जन्माष्टमी, श्राद्धतिथी, संक्रांत व रविवार इत्यादि दिवसांचा त्याग करून जे दिवस शिल्लक राहतील त्या दिवशी फक्त आपल्याला सुलक्षणी पुत्र व्हावा म्हणून जो पुरुष स्त्रीच्या इच्छेने महिन्यातून केवळ दोनदा समागम करतो तो गृहस्थाश्रमी असला तरी ब्रह्मचारीच असतो. याबाबत श्रीमनूने "**मनुस्मृतीत**" असे म्हटले आहे की -

**निन्द्यास्वष्टासु चान्यासु स्त्रियो रात्रिषु वर्जयन्।**
**ब्रह्मचार्येव भवति यत्र तत्राश्रमे वसन्।।३.५०।।**

पहिल्या निंदित सहारात्री व दुसऱ्या आणखी आठरात्री मिळून एकूण चौदारात्री सोडून जो पुरुष महिन्यामध्ये केवळ दोन रात्रीच स्त्रीशी गमन करतो त्याला ब्रह्मचारीच मानले पाहिजे.

रजस्वलेबरोबर साधकाने कधीही समागम व संसर्ग करता कामा नये. त्यामुळे अनेक व्याधी होण्याचा संभव असतो. शिवाय आश्लेषा, मघा, मूळ, कृत्तिका, ज्येष्ठा, रेवती, उत्तराभाद्रपदा, उत्तराफाल्गुनी व उत्तराषाढा नक्षत्र असताना स्त्रीसहवास करू नये.

**नियम :-**

"**पातंजल योगसूत्रात**" नियमांची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे. **शौचसन्तोषतपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमः।।२.३२।।** शरीराची आतील व बाहेरील शुद्धता, संतोष अर्थात् समाधान, तपश्चर्या, स्वाध्याय व ईश्वरोपासना हे नियम आहेत. यातील पहिल्या नियमाचा विचार पूर्वीच केला आहे. उरलेल्या चार नियमांचा विचार क्रमशः करू.

**संतोष :-**

"**शाण्डिल्योपनिषदामध्ये**" संतोषाची व्याख्या करताना असे म्हटले

आहे की, "**सन्तोषो नाम यदृच्छालाभ तुष्टिः ।।१.२.३।।**" ईश्वरेच्छेने प्रारब्धवशात जे मिळेल त्यात सुखी राहणे याला संतोष म्हणतात. "**श्रीमद्भगवद्गीतेच्या**" १२ व्या अध्यायात श्लोक १४ व १९ यामध्ये संतुष्ट शब्द आला आहे. त्याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, "वर्षाऋतूशिवाय देखील समुद्र नेहमीच पाण्याने परिपूर्ण भरलेला असतो. तसेच आनंदाचे काही विशेष उपचार न करतासुद्धा साधकाने विषयनिरपेक्ष सहज आनंदात निमग्न असले पाहिजे. इतकेच नव्हे तर -

**जो यथालाभें न तोखे। अलाभें न पारुखे।**
**पाउसेंवीण न सुके। समुद्र जैसा।।१२.२१०।।**
**आणि वायूसि एके ठायीं। बिढार जैसें नाहीं।**
**तैसा न धरीच कहीं। आश्रयो जो।।२११।।**
**आघवाची आकाशस्थिती। जेविं वायूसि नित्य वसती।**
**तेविं जगचि विश्रांति-। स्थान जया।।२१२।।**
**हें विश्वचि माझें घर। ऐसी मती जयाची स्थिर।**
**किंबहुना चराचर। आपण जाहला।।२१३।।**

**तप :-**

श्रीसद्गुरुकृपेने जे शक्तिपातयोगाचे साधन मिळालेले असते ते यथाशास्त्र रात्रंदिवस करणे हेच खरे तप होय; कारण अशा प्रकारच्या तपामुळेच अनादि अविद्या नाहीशी होऊन ज्ञानाने जीवशिवाचे ऐक्य होते. श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज "**श्रीज्ञानेश्वरीत**" तपाचा अर्थ स्पष्ट करताना श्रीमद्भगवद्गीतेच्या १६ व्या अध्यायातील पहिल्याच श्लोकाचा भावार्थ स्पष्ट करताना असे म्हणतात की, "ब्रह्मस्वरूपाचा विकास होऊन ते पूर्णपणे अभिव्यक्त व्हावे म्हणून साधकाने श्रीसद्गुरुकृपेने मिळालेल्या साधनाने प्राण, इंद्रिय व शरीर यांची आटणी केली पाहिजे. अशा प्रकारे साधनाने यांचा लय साधणे यालाच तप म्हणतात. याशिवाय जर तपाचे दुसरे काही निराळे लक्षण असले तर ते तप या साधनाभ्यासाच्या तपाप्रमाणे शुद्ध असत नाही. यासाठी हंस पक्षी

ज्याप्रमाणे दुधात आपली चोच घालून दूध व पाणी वेगळे करतो त्याप्रमाणे जन्मापासून देह व जीव यांच्या संयोगामुळे जीव जड वाटून आपण ब्रह्म आहोत ही जी जाणीव नाहीशी झालेली असते, ती सतत साधनाभ्यास करून आत्मा व अनात्मा यांच्यातील सत्य व मिथ्यारूप वेगळे केले पाहिजे. निरंतर साधनाने साधकाने आत्मानात्मविवेक सतत जागृत ठेवला पाहिजे. असे अखंड साधन घडले म्हणजे आत्मानात्मविचार सतत जागृत राहून बुद्धीचा विषयांकडे जाणारा मार्ग कुंठित होतो. मन अंतर्मुख होते. मग ज्याप्रमाणे मनुष्य जागा झाला की, निद्रा व स्वप्न ही दोन्ही आपोआप नाहीशी होतात, त्याप्रमाणे मनुष्याची अनादि निद्रा व जगत्स्वरूप स्वप्न नाहीसे होऊन तो आत्मस्वरूप होतो. अशा प्रकारे आत्मानात्मविवेक उत्पन्न करून स्वसंवेद्य असे स्वस्वरूप प्राप्त करून देणाऱ्या साधनाभ्यासाला खरे तप म्हणतात. **(१६.१०८ ते ११२)**

जोपर्यंत ब्रह्मप्राप्ती होत नाही तोपर्यंत साधकाने अत्यंत निष्ठेने या तपाचे म्हणजे साधनाचे आचरण केले पाहिजे. श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की -

**जंववरी अर्जुना। तो बोधु भेटेना मना।**
**तंवचि यया साधना। भजावें लागे।।**

**श्रीज्ञानेश्वरी ३.१४९।।**

**साधनाभ्यास :-**

शक्तिपातयोगाच्या साधनसंपत्तीत साधनाचा नियमित अभ्यास करण्याला निरतिशय महत्त्व आहे; कारण श्रीसद्गुरुकृपेने जेव्हा दीक्षा होऊन शक्ती जागृत होते तेव्हा तिच्या विकासाला वाव देण्यासाठी त्याने दिवसातून सकाळी व संध्याकाळी नियमित अभ्यास केलाच पाहिजे. वास्तविक त्याने दुपारी व रात्रीही अभ्यास करणे आवश्यक आहे. म्हणजे दिवसातून चार वेळा साधन करावे असे शास्त्र सांगते. परंतु ते शक्य नसल्यास दोन वेळा तरी साधनाभ्यास केलाच पाहिजे. नियमित साधनाने चित्ताच्या वृत्तींचा आपोआप निरोध होऊन संस्कार

नाहीसे होत असल्याने "**तत्र स्थितौ यत्नोऽभ्यासः ।। समाधिपाद १.१३ ।।**" म्हणजे या चितवृत्तींना पूर्णपणे कह्यात आणण्यासाठी श्रीसद्गुरूंनी दिलेले साधन सतत करीत राहण्याला व झटण्यालाच अभ्यास असे म्हणतात, अशी महर्षी श्रीपतंजलींनी "**योगसूत्रात**" अभ्यासाची व्याख्या केली आहे. त्यानंतर पुढील तीन सूत्रातून अभ्यासाचा महिमा सांगितला आहे. महर्षी श्रीपतंजली म्हणतात, "**तीव्रसंवेग-नामासन्नः ।।१.२१ ।।**" जो खूप प्रयत्नशील असतो त्याला या योगात फार लवकर यश मिळते. "**मृदुमध्याधिमात्रत्वात् ततोऽपि विशेषः ।।१.२२ ।।**" साधनेतील मंद प्रयत्न, मध्यम प्रयत्न व उत्कट प्रयत्न यांच्या अनुसार साधकांना प्राप्त होणाऱ्या यशामध्येही फरक पडतो. "**स तु दीर्घकाल नैरन्तर्यसत्कारासेवितो दृढभूमिः ।।१.१४ ।।**" अभ्यास दीर्घकाल, खंड न पडता व अत्यंत श्रद्धाभक्तिआदरपूर्वक केला म्हणजे तो दृढ होऊन परमपदाची प्राप्ती होते.

अभ्यासाचा हा महिमा श्रीसंततुकाराममहाराज, श्रीसंतरामदासस्वामीमहाराज व श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी आपापल्या ग्रंथांमध्ये परोपरीने सांगितला आहे; कारण साध्यसाधनाचा संबंध अविच्छेद्य असतो. शक्तिपातयोगसाधन हे साध्यरूप असल्याने साधनाभ्यास म्हणजे साध्याभ्यासच होय यात शंका नाही. या दृष्टिकोनातून अभ्यास, परिश्रम, साधन याकडे पाहिले म्हणजे आळस, संशय, प्रमाद, भ्रांती यांना दूर सारून साधक अभ्यासरत होईल असे वाटते.

**अभ्यासास काहीही दुष्कर नाही :-**

श्रीसंततुकाराममहाराज अभ्यासाला काहीही दुष्कर नाही हे सांगताना असे म्हणतात की -

**ओलें मूळ भेदी खडकाचें अंग। अभ्यासासी सांग कार्यसिद्धी ।।१।।**
**नव्हे ऐसें कांहीं नाहीं अवघड। नाहीं कईवाड तोंचि वरी ।।२।।**
**दोरें चिरा कापे पडिला कांचणीं। अभ्यासें सेवनीं विष पडे ।।३।।**
**तुका म्हणे कैंचा बैसण्यासी ठाव। जठरी बाळा वाव एकाएकी ।।४।।**

वृक्षाचे जिवंत मूळ जसजसे जोरावत जाते तसतसे ते खडकाचे

अंग फोडून भूमीत शिरत जाते. त्याप्रमाणे अभ्यासाच्या बलाने सर्व कार्यसिद्धता येते. अभ्यासाने अमुक एक गोष्ट साध्य होत नाही असे काहीही अवघड नाही. पण जोपर्यंत श्रीसद्गुरूंकडून साधनप्राप्ती होऊनही साधकाने अभ्यास करण्याचा व नियमित साधन करण्याचा निश्चय केला नाही तोपर्यंत सर्व कठीणच आहे. दोराच्या घर्षणाने मोठा दगड देखील कापला जातो. सवयीने व अभ्यासाने विषही पचनी पडते. श्रीसंत तुकाराममहाराज असे म्हणतात की, आईच्या पोटामध्ये नऊ महिन्यांचे मूल राहण्याएवढी जागा आरंभी असते काय? पण हळूहळू ते मूल राहण्याइतका अवकाश होत जातो.

**साधनाभ्यास हा अंकुश आहे :-**

शक्तिपातयोगात श्रीभगवद्भक्तीचा तीव्र उन्मेष उद्भूत होताना दिसून येतो. त्या भक्त्युन्मेषाला वाव देऊन शक्तीचा विकास करीत राहिले म्हणजे नित्य साधनाभ्यासाने मनावर अंकुश राहून हळूहळू क्रमविकासाने जागृती होत राहते असे पुढील अभंगावरून दिसून येते.

**भक्ति ते कठिण शुळावरील पोळी।**
**निवडे तो बळी विरळा शूर।।१।।**
**जेथें पाहें तेथें देखीचा पर्वत।**
**पायाविण भिंत तातडीची।।२।।**
**कामावलें तरी पाका ओज घडे।**
**रुचि आणि जोडे श्लाघ्यता हे।।३।।**
**तुका म्हणे मना पाहिजे अंकुश।**
**नित्य नवा दिस जागृतीचा।।४।।**

सुळावरील पोळी मिळणे जितके कठीण आहे तितकेच देवाची भक्ती करणे म्हणजे श्रीसद्गुरुकृपाप्रसादरूप साधन करणे कठीण आहे. जो अशा प्रकारच्या साधनाची निवड करतो तो खराच शूर असतो; कारण नियमित साधना करण्यासाठी ज्याच्या जवळ धैर्यादि व सातत्यादि शूर माणसाचे गुण असतात तोच या साधनाच्या कामी

योग्य ठरतो. असा साधक क्वचित् मिळतो. समाजात जिकडे पाहावे तिकडे बाह्य भक्तीचा पोकळ डोंगर रचलेला दिसतो. ज्याप्रमाणे खडकापर्यंत पाया न घेता झपाट्याने भिंत उभारावी त्याप्रमाणे बहुतेक जण भक्तीचा डोलारा उभा करतात; पण त्यात पक्केपणा नसतो. तो प्रयत्नाने येतो. धान्य चांगले निवडून मेहनत घेऊन स्वयंपाक केला तरच अन्नाची रुची व दर्जा उंचावून भोजनाच्या वेळी समाधान वाटते. जो साधक श्रीसद्गुरुकृपाप्राप्त साधनाचा अभ्यास करतो त्याच्या बाबतीत साधनाचा अंकुशाप्रमाणे उपयोग होतो; कारण मन हे मदोन्मत हत्तीसारखेच असते. ते साधनासारख्या अंकुशाच्या टोचणीशिवाय ताब्यात येत नाही. जो साधक नित्यनियमाने साधन करतो त्याला नवनवीन अनुभवांची प्राप्ती होऊन शक्तीचा विकास होत होत जागृतीची चरम अवस्था प्राप्त होते.

**अभ्यासाने असाध्यही साध्य होते :-**

श्रीसंततुकाराममहाराजांनी अभ्यासाने असाध्य ब्रह्मही साध्य होते असे दोन दृष्टान्त देऊन पटविले आहे. हळूहळू अभ्यास करीत कित्येक लोक विष पचनी पाडतात. इतर लोकांना या गोष्टीकडे डोळ्यानेही पाहवत नाही. त्याचप्रमाणे काही लोक अभ्यासाने जिवंत नाग हातात धरतात. इतर त्याला पाहून थरथर कापतात. यावरून हे स्पष्ट दिसते की, सतत प्रयत्नाने न होणाऱ्या गोष्टीही साध्य होतात. याकरिता ब्रह्मप्राप्तीसाठी सतत साधनाभ्यास करणे हेच साधकाचे ध्येय असले पाहिजे.

**आत्मज्ञान झाले तरी साधन केले पाहिजे :-**

साधनाचा महिमा श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी फार आवर्जून सांगितला आहे. साध्य हे साधनरूप असल्यामुळे साधकाने आत्मज्ञान झाल्यावरही साधनाभ्यास करीत राहिले पाहिजे असा अपूर्व आग्रह त्यांनी "**श्रीदासबोधाच्या**" ५ व्या दशकाच्या ३ ऱ्या समासात प्रतिपादन केला आहे. ते म्हणतात -

**म्हणौनि सद्गुरु आणि सच्छिष्य। तेथें न लागती सायास।**
**त्या उभयतांचा हव्यास। पुरे एकसरां।।७।।**
**सुभूमि आणि उत्तम कण। उगवेना पर्जन्येंविण।**
**तैसें अध्यात्मनिरूपण। नसता होय।।८।।**
**शेत पेरिलें आणि उगवलें। परंतु निगेविण गेलें।**
**साधनेंविण तैसे झाले। साधकासी।।९।।**
**जोंवरी पीक आपणासी भोगे। तोंवरी अवघेचि करणें लागें।**
**पीक आलियाही उगें। राहूच नये।।१०।।**
**तैसें आत्मज्ञान झालें। परि साधन पाहिजे केलें।**
**एक वेळ उदंड जेविलें। तरी सामुग्री पाहिजे।।११।।**

श्रीसमर्थ असे म्हणतात की, जेव्हा श्रीसद्गुरूंना खरा सच्छिष्य भेटतो तेव्हा श्रीसद्गुरूंना कोणतेही विशेष श्रम करावे न लागता शक्तिसंक्रमण घडून येऊन शिष्याला ब्रह्मप्राप्तीचे साधन मिळते. यामुळे आपल्याला चांगला शिष्य मिळून श्रीशंकरांपासून चालत आलेली शांभवज्ञानाच्या बोधाची ही अपूर्व परंपरा त्याच्या रूपाने पुढे चालू राहून अनेकांची जीविते धन्य होण्यास मदत होईल म्हणून त्यांना समाधान लाभते. तर आपल्याला श्रीसद्गुरू भेटून ब्रह्मप्राप्तीचे साधन मिळाले म्हणून शिष्याला धन्यता वाटते. मात्र उत्तम भूमीत चांगले बीज पेरले तरी पाऊस पडल्याशिवाय ते उगवत नाही. त्याप्रमाणे नित्य साधन केल्याशिवाय साधकाला अध्यात्माची प्राप्ती होत नाही. शेतात बी पेरल्यानंतर ते उगवून आले तरी जर त्या पिकाची योग्य निगा राखली नाही तर पीक हातचे जाते. त्याचप्रमाणे साधकाने दीक्षा मिळाल्यानंतर जर नियमित साधन केले नाही तर साध्यप्राप्ती होणे कठीण होते. पीक पूर्ण उगवून दाणा भरून येत नाही म्हणजे जोपर्यंत ते अपूर्णावस्थेत असते तोपर्यंत ते नीट उगवून यावे म्हणून सर्व काही करावे लागते. इतकेच नव्हे; तर पीक उगवून आल्यावरही स्वस्थ राहणे योग्य ठरत नाही. त्याचप्रमाणे पूर्णावस्था येईपर्यंत नित्यनियमित साधनाभ्यास करणे नितांत आवश्यक असते.

एवढेच नव्हे; तर आत्मज्ञान झाल्यावरही साधन मोठ्या आदराने श्रद्धापूर्वक, भक्तीने, निरंतर, खंड न पाडता व आळस सोडून केले पाहिजे. एक वेळा खूप जेवण केले तरी तेवढ्याने भागत नाही; कारण नियमित भोजनासाठी साधनसामग्री अवश्य लागतेच: तसे साधकाने ब्रह्मप्राप्ती झाली तरी नित्य साधन हे केले पाहिजे कारण साधन हे साध्यरूप आहे.

**प्रयत्नाशिवाय व साधनाशिवाय ब्रह्मज्ञान कठीण आहे :-**

श्रीसमर्थांनी आपल्या **"अंतर्भाव"** या प्रकरणात्मक ग्रंथाच्या दुसऱ्या समासात प्रयत्नाशिवाय व साधनाशिवाय ब्रह्मज्ञान अत्यंत कठीण आहे हे सांगताना असे म्हटले आहे की -

**सर्वात्मा ऐसें बोलतां। अंगीं बाणेना सर्वथा।**
**साधनेंविण ज्ञानवार्ता। बोलोंचि नये।।२.८।।**
**दसऱ्याचें सोनें वाटलें। तेणें काय हातासी आलें।**
**कीं राये विनोदें आलें। सुखासना।।९।।**
**तैसें शब्दें ब्रह्मज्ञान। बोलतां नये समाधान।**
**म्हणोनि आधीं साधन। केलें पाहिजे।।१०।।**
**शब्दीं जेविता तृप्ति जाहली। हें तों वार्ता नाहीं ऐकली।**
**पाकनिष्पत्ति पाहिजे केली। साक्षेपें स्वयें।।११।।**
**कांहीं तरी एक कारण। कैसें घडे यत्नेंविण।**
**मां हें ब्रह्मज्ञान परम कठीण। साधनावांचूनि।।१२।।**

**नित्यनेमाने समाधान, शांती व ज्ञानप्राप्ती :-**

**"अंतर्भावाच्या"** तिसऱ्या समासात श्रीसमर्थांनी नित्यनियमिततेचा महिमा सर्वार्थाने प्रकट केला आहे. ते असे म्हणतात की -

**कर्में त्यजोनि बाधक। शुद्ध वर्ते तो साधक।**
**क्रिया पालटे विवेक। निष्कलंक तेव्हां।।३.३।।**
**तये क्रियेचें लक्षण। आधीं स्वधर्म रक्षण।**
**पुढें अद्वैत श्रवण। केलें पाहिजे।।४।।**
**नित्यनेम दृढचित्तीं। तेणें शुद्ध चित्तवृत्ती।**

होवोनि भगवंतीं। माग फुटें।।५।।
नित्यनेमें भ्रांति फिटे। नित्यनेमें संदेह तुटे।
नित्यनेमें लिगटे। समाधान अंगीं।।६।।
नित्यनेमें अंतर शुद्ध। नित्यनेमें वाढे बोध।
नित्यनेमें बहु खेद। प्रपंचीं तुटती।।७।।
नित्यनेमें सत्व चढे। नित्यनेमें शांति वाढे।
नित्यनेमें थारा मोडे। देहबुद्धीचा।।८।।
नित्यनेमें दृढभाव। नित्यनेमें भेटे देव।
नित्यनेमें पुसे ठाव। अविद्येचा।।९।।
ऐसी साधकाची स्थिती। साधकें राहावे या रीती।
साधनेंविण ज्ञानप्राप्ती। होणार नाहीं।।१५।।

**भगवान् श्रीशंकरही साधन करतात :-**

**साधनाशिवाय बाष्कळता व बद्धता :-**

श्रीसमर्थ **"अंतर्भावाच्या"** चवथ्या समासात असे म्हणतात की-

सिद्ध होऊन बैसला। दृष्टीं नाणी साधनाला।
सादर अशन शयनाला। अत्यादरें करूनी।।१।।
ऐसा असे विषयासक्त। अत्यंत विषयीं आसक्त।
सिद्धपणें आपला घात। तेणें केला।।२।।
जो सिद्धांचा मस्तकमणी। महातापसी शूळपाणी।
तोही आसक्त श्रवणीं। जपध्यानपूजेसी।।३।।
अखंड वाचें रामनाम। अनुष्ठान हेंच परम।
ज्ञानवैराग्यसंपन्नकाम। सामर्थ्यसिंधू।।४।।
तोही म्हणे मी साधक। तेथें मानव पुढे रंक।
बापुडे सिद्धपणाचें कौतुक। केवीं घडे।।५।।
म्हणोनि साधनाशीं जो सिद्ध। तोचि ज्ञाता परम शुद्ध।
येर ते जाणावे अबद्ध। अप्रमाण।।६।।
साधनेंवीण बाष्कळता। तीच जाणावी बद्धता।
तेणें घडे अनर्गळता। आसक्तरूपे।।७।।

**मन सुखावले जिकडे। अंग टाकिले तिकडे।**
**साधन उपाय नावडे। अंतरापासोनी।।८।।**
**चित्तीं विषयाची आस। साधन म्हणता उपजे त्रास।**
**नेम धरिता कासाविस। परम वाटे।।९।।**
**दृढ देहाची आसक्ती। तेथें कैंची विरक्ती।**
**विरक्तीवीण भक्ती। केवी घडे।।१०।।**
**ऐक शिष्यटिळका। नेम नाही साधका।**
**तयालागीं धोका। नेमस्त आहे।।११।।**

श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनीही **"श्रीज्ञानेश्वरीत"** जागोजागी साधनाभ्यासाचे महत्त्व किती अपार आहे हे स्पष्ट केले आहे. "हे अर्जुना! आम्ही तुला हे अपूर्व असे शक्तिपातयोगाचे साधन सांगितले. जे साधक हे साधन शरीर कष्टवून करतात, खूप प्रयत्न करतात व नित्यनिरंतर अभ्यास करतात ते अत्यंत शुद्ध होऊन मत्स्वरूप होतात. जे या शक्तिपातयोगाभ्यासाच्या ठिकाणी दृढनिश्चयाने लागतात ते खात्रीने ब्रह्मरूप होतात. भाग्योदय होण्याची वेळ आली की, उद्योग किंवा प्रयत्नाचे निमित्त होऊन सर्व संपत्ती आपोआप घरी चालून येते. त्याचप्रमाणे मितआहारविहारादि युक्तीने वागणारा साधक हा साधनाभ्यास जेव्हा दृढतेने पुढे सरसावून करू लागतो त्यावेळी त्याला आत्मसिद्धीचा अनुभव येतो. यासाठी ज्याला ब्रह्मस्थिती प्राप्त व्हावी असे वाटत असेल त्याने योगाभ्यास करताना कचरता कामा नये." (६.३२६, ३५४, ३५५)

"मन हे मूलतःच चंचल आहे. त्याला वैराग्याच्या साहाय्याने जर या अभ्यासाकडे लावले तर काही काळाने ते आपोआप स्थिर होते. जर साधकाने अभ्यासाची पावले जोराने टाकली म्हणजे अभ्यास झपाट्याने केला तर आयुष्य संपण्यापूर्वीच साधकाला मोक्षप्राप्ती होते. जर साधकाच्या अभ्यासाचा वेग कमी असला तर पुन्हा जन्म घेऊन त्याला अभ्यास पूर्ण करावा लागतो." (६.४३९, ४४०)

"हे अर्जुना! साधकाला नेहमीच असे वाटते की, ही जन्ममरणाची

कथा आपल्याला पुन्हा ऐकू येऊ नये. पण त्यासाठी श्रीसद्गुरुकृपेने मिळालेल्या साधनाचा खूप अभ्यास करावा लागतो. साधक जेव्हा निष्ठेने प्रयत्न करतो तेव्हा या प्रयत्नाच्याच जोरावर समग्र परब्रह्माची फलप्राप्ती होते. हे अनुभवरूप फळ पिकले की पूर्णतेचा, अद्वैताचा व ऐक्याचा रस त्यातून गळू लागतो."

"शक्तिपातयोगसाधन हे संपूर्ण समर्पणाचे साधन आहे. परंतु सर्व साधकांना हे जमत नाही; कारण मनबुद्धिसहित चित्त ते एकदम परमेश्वराच्या चरणी अर्पण करू शकत नाहीत. असे जरी घडले नाही तरी दिवसभरात वेळ काढून डोळे मिटून जसा वेळ मिळेल तसे साधन केले पाहिजे. असा प्रयत्न केला म्हणजे जागृत शक्तीच्या साहाय्याने प्रयत्न करीत असताना परमेश्वराचे सुख थोडे थोडे अनुभवाला येऊन जसाजसा क्षण जाईल तसातसा चित्ताला विषयसुखाचा कंटाळा येत जाईल. ज्याप्रमाणे शरदऋतूला प्रारंभ झाला म्हणजे नद्यांचे पाणी ओसरू लागते त्याप्रमाणे माझ्या स्वरूपानंदामध्ये जसजसे साधकाचे चित्त गुंतत जाते तसतसे ते विषयसुखातून व प्रपंचातून बाहेर निघते. ज्याप्रमाणे चंद्रबिंब पौर्णिमेपासून दिवसेंदिवस कमी होत होत अमावस्येला नाहीसे होते त्याप्रमाणे अभ्यासाच्या योगाने साधकाचे चित्त विषयसुखाच्या वासनेतून क्रमाने निघून परमेश्वराच्या ठिकाणी प्रविष्ट होऊ लागते. यालाच अभ्यासयोग म्हणतात. या अभ्यासयोगाने प्राप्त होत नाही असे काही नाही." (१२.१०४ ते ११०)

"अभ्यासाचा महिमा अत्यद्भुत आहे; कारण या अभ्यासाच्या बळाने कोणी अंतरिक्षातही संचार करतात. कोणी वाघ, साप, अशा दुष्ट प्राण्यांनाही निर्वैर करून सुस्वभावी करतात. अभ्यासाने विषसुद्धा पचनी पडते. याच्या जोरावर समुद्रावरूनही पायवाटेप्रमाणे चालता येते. काहीजण या अभ्यासाच्या बळावर संपूर्ण वेदादिशास्त्रे मुखोद्गगत करतात. म्हणून अभ्यासाला काहीही असाध्य किंवा अप्राप्त नाही. याकरिता अभ्यासाने परमेश्वराची प्राप्ती होते हे निश्चित आहे." (१२.१११ ते ११३)

म.म.श्रीगोपिनाथ कविराज यांनी "**भारतीय संस्कृति और साधना,**" खंड एक, या ग्रंथातील "**ईश्वरमें विश्वास**" या आपल्या लेखात तीव्र पुरुषार्थाचे माहात्म्य सांगताना असे म्हटले आहे की, "साधन जगत्‌का जो निगूढ रहस्य है, जिसकी प्राप्तिके लिए दीर्घकाल तक सत्यस्वरूप सद्गुरूकी कृपा का अवलंबन कर तीव्र पुरुषार्थका प्रयोग करना पडता है। तार्किक-प्रकृति-विशिष्ट तथा साधनहीन पुरुष के सामने उस रहस्य की आलोचना करना उचित नहीं है। वहाँ इस आलोचनका यथार्थ फल उत्पन्न नहीं हो सकता।"

**ईश्वरप्रणिधान :-**

शास्त्रकारांनी-ईश्वरप्रणिधानाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की, "**ईश्वरप्रणिधानं तस्मिन्परमगुरौ सर्वकर्मार्पणम्**" परमगुरू परमेश्वर किंवा परमात्म्याला सर्व कर्मे अर्पण करणे हे खरे ईश्वरप्रणिधान होय. "**पातंजल योगसूत्रात**" "**ईश्वरप्रणिधानाद्वा।। समाधिपाद १.२३।।**" असे सूत्र घालून या साधनसंपत्तीचा महिमा सांगितला आहे. ईश्वराच्या उत्कट भक्तीमुळेही समाधी लाभ होतो असा या सूत्राचा अर्थ आहे. श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीमद्भगवद्गीतेच्या ७ व्या अध्यायातील १४ व्या श्लोकाचा भावार्थ प्रकट करताना ईश्वर-प्रणिधानाचा अपूर्व अर्थ व्यक्त केला आहे. ते म्हणतात- "हे अर्जुना! ज्याप्रमाणे विषयासक्त पुरुषाला स्त्रीला कधीही जिंकता येत नाही त्याप्रमाणे ही मायारूप नदी जीवाला स्वतःच्या प्रयत्नाने तरून जाता येत नाही. मात्र जे सर्व भावाने ईश्वराचे भजन करतात व त्याला शरण जातात ते या दुस्तर नदीतून सहज तरून जातात. इतकेच नव्हे; तर साधकांना अलीकडच्या काठावरच या मायानदीचे पाणी पार नाहीसे होते; कारण परमेश्वर अशा प्रकारे शरण आलेल्या साधकांना शक्तिपातयोगदीक्षा देणाऱ्या श्रीसद्गुरुरूप नावाड्याशी गाठ घालून देतो. अशा प्रकारे दीक्षा देणाऱ्या श्रीसद्गुरूंपाशी ब्रह्म-साक्षात्काराचा अगदी बळकट अनुभव असतो. आत्मनिवेदन कसे करावे हे परंपरागत चालत आलेल्या साधनाच्याद्वारा त्यांना ज्ञात असते. तेच ज्ञान ते आपल्या शिष्यांच्या ठिकाणी संक्रांत

करतात. त्यामुळे जीवब्रह्माचे ऐक्य होते. अहंभावाचे ओझे संपते. विकल्परूप वाऱ्याच्या झुळका आपोआप चुकतात. संसारातील प्रेमरूपी पाण्याची धार आटून जाते. त्यामुळे साधकाला आत्मबोधरूपी तेजस्वी तारा प्राप्त होतो व त्याला निवृत्तीच्या अगदी पैलतीरावर जाता येते. या सर्व बाबतीत साधनामुळे त्याची गती अत्यंत तीव्र असते. या तीव्रतेमुळे "मी ब्रह्म आहे" हा भावच त्याला मुक्त करतो. या शक्तिपातयोगसाधनेने असे हे ईश्वरप्रणिधान जेव्हा घडून येते तेव्हा साधक मायानदीतून पार होतो."( ७.९६ ते १०२ )

**विविध गुणयुक्त साधनसंपत्ती :-**

आतापर्यंत वर्णन केलेल्या साधनसंपत्तीशिवायही विविध गुणांनी युक्त अशा अनेक बाह्यसाधनांचेही अनेकानेक ग्रंथकारांनी वर्णन केले आहे. **"सिद्धस्य लक्षणानि साधकस्य साधनानि भवन्ति"** अर्थात् सिद्धाची जी लक्षणे असतात ती साधकाची प्रयत्नसाध्य साधने असतात. "**श्रीमद्भगवद्गीतेमध्ये**" दुसऱ्या अध्यायात स्थितप्रज्ञाची, बाराव्या अध्यायात भक्ताची, तेराव्या अध्यायात ज्ञान्याची व चौदाव्या अध्यायात गुणातीताची लक्षणे सांगितली आहेत. ती अंगी बाणविण्याचा साधकाने फार कसोशीने प्रयत्न केला पाहिजे. यातील काही महत्त्वाच्या लक्षणांचा उल्लेख करू.

**शास्त्रावर निष्ठा :-**

शक्तिपातयोगाची साधना करणाऱ्या अनेक साधकांना श्रीगुरुकृपेमुळे शक्तिसंक्रमण होऊन दिव्य अनुभव येतात. त्यांची साधना चांगली चालते. परंतु शास्त्राकडे, आचारविचारांकडे व धर्माकडे त्यांचे जेवढे लक्ष असावयास पाहिजे तेवढे असत नाही. शब्दप्रामाण्य खोटे आहे, पोथीनिष्ठा ढोंग आहे, मन शुद्ध असले म्हणजे झाले, आचारविचारांची व सोवळ्या ओवळ्याची तितकीशी आवश्यकता नाही असा नवमतवादी लोकांच्या विचारांचा त्यांच्या मनावर पगडा बसून ते वरील गोष्टींकडे उपेक्षेने पाहतात. एवढेच नव्हे; तर "शास्त्रावर निष्ठा ठेवली पाहिजे, वर्णाश्रम धर्माप्रमाणे वागले पाहिजे, नित्य-

नैमित्तिक कर्मे केली पाहिजेत, कुलाचार, कुलधर्म पाळले पाहिजेत, जानवे घातले पाहिजे, शेंडी ठेवली पाहिजे, संध्या केली पाहिजे, पूजा केली पाहिजे, यमनियम पाळले पाहिजेत, विटाळशीचा (रजस्वलेचा) विटाळ घरात पाळला पाहिजे, खाण्यापिण्याचे नियम चुकता कामा नयेत, इत्यादि सर्व आग्रह का?," असा प्रश्न ते साधक व साधन करण्याची इच्छा असणारे नवीन साधकही विचारीत असतात. साधन तेवढे आवश्यक बाकी सर्व अनावश्यक आहे असे ते समजतात. परंतु सर्व साधकांनी हे लक्षात ठेवले पाहिजे की, साधनाइतकीच शास्त्रनिष्ठा आवश्यक आहे. ज्या साधकाची प्रगती या जन्मी त्वरित् झालेली दिसते त्यांनी पूर्वजन्मी वरील सर्व गोष्टी चांगल्या प्रकारे आचरणात आणल्या असणार हे निश्चित आहे. याकरिता प्रत्येक साधकाने शास्त्र म्हणजे काय व त्याचे माहात्म्य किती मोठे आहे हे ध्यानात ठेवून वागण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**शास्त्र व त्याचे माहात्म्य :-**

ऋग्वेदादि चार वेद व स्मृती यांनाच शास्त्र असे म्हणतात. वेदाचे व स्मृतीचे माहात्म्य वर्णन करताना स्मृतिकार श्रीमनू "**श्रीमनुस्मृतीत**" असे म्हणतात की -

**श्रुतिस्मृत्युदितं धर्ममनुतिष्ठन् हि मानवः ।**
**इह कीर्तिमवाप्नोति प्रेत्य चानुत्तमं सुखम् ।।२.९।।**
**श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः ।**
**ते सर्वार्थेष्वमीमांसे ताभ्यां धर्मो हि निर्बभौ ।।२.१०।।**
**आचारः परमो धर्मः श्रुत्युक्तः स्मार्त एव च ।**
**तत्मादस्मिन्सदा युक्तो नित्यं स्यादात्मवान्द्विजः ।।१.१०८।।**
**श्रुतिस्मृत्युदितं सम्यङ्निबद्धं स्वेषु कर्मसु ।**
**धर्ममूलं निषेवेत सदाचारमतन्द्रितः ।।४.१५५।।**
**आचाराल्लभते ह्यायुराचारादीप्सिताः प्रजाः ।**
**आचाराद्धनमक्षय्यमाचारो हन्त्यलक्षणम् ।।४.१५६।।**
**दुराचारो हि पुरुषो लोके भवति निन्दितः ।**

दुःखभागी च सततं व्याधितोऽल्पायुरेव च।।४.१५७।।
सर्वलक्षणहीनोऽपि यः सदाचारवान्नरः।
श्रद्दधानोऽनसूयश्च शतं वर्षाणि जीवति।।४.१५८।।
यद्यत्परवशं कर्म तत्तद्यत्नेन वर्जयेत्।
यद्यदात्मवशं तु स्यात्तत्तत्सेवेत यत्नतः।।४.१५९।।
सर्वं परवशं दुःखं सर्वमात्मवशं सुखम्।
एतद्विद्यात्समासेन लक्षणं सुखदुःखयोः।।४.१६०।।
यत्कर्म कुर्वतोऽस्य स्यात्परितोषोऽन्तरात्मनः।
तत्प्रयत्नेन कुर्वीत विपरीतं तु वर्जयेत्।।४.१६१।।
तस्माद्धर्मं सहायार्थं नित्यं सञ्चिनुयाच्छनैः।
धर्मेण हि सहायेन तमस्तरति दुस्तरम्।।४.२४२।।
धर्मप्रधानं पुरुषं तपसा हतकिल्बिषम्।
परलोकं नयत्याशु भास्वन्तं स्वशरीरिणम्।।४.२४४।।
या वेदबाह्याः स्मृतयो याश्च काश्च कुदृष्टयः।
सर्वास्ता निष्फलाः प्रेत्य तमोनिष्ठा हि ताः स्मृताः।
उत्पद्यन्ते च्यवन्ते च यान्यतोऽन्यानि कानिचित्।
तान्यार्वाक्कालिकतया निष्फलान्यनृतानि च।।१२.९६९।।
चातुर्वर्ण्यं त्रयो लोकाश्चत्वारश्चाश्रमाः पृथक्।
भूतं भव्यं भविष्यं च सर्वं वेदात्प्रसिद्ध्यति।।१२.९७२।।
शब्दः स्पर्शश्च रूपं च रसो गन्धश्च पञ्चमः।
वेदादेव प्रसूयन्ते प्रसूतिगुणकर्मतः।।१२.९८।।
बिभर्ति सर्वभूतानि वेदशास्त्रं सनातनम्।
तस्मादेतत्परं मन्ये यज्जन्तोरस्य साधनम्।।१२.९९।।
वेदशास्त्रार्थतत्त्वज्ञो यत्र तत्राश्रमे वसन्।
इहैव लोके तिष्ठन्स ब्रह्मभूयाय कल्पते।।१२.१०२।।
आर्षं धर्मोपदेशं च वेदशास्त्राऽविरोधिना।
यस्तर्केणानुसंधत्ते स धर्मं वेद नेतरः।।१२.१०६।।

श्रुती व स्मृती यांमध्ये सांगितलेल्या धर्माचे अनुष्ठान करणाऱ्या

मनुष्याची या लोकी कीर्ती होते व परलोकी गेल्यावर त्यास अत्युत्तम सुख मिळते. श्रुती म्हणजे वेद व स्मृती म्हणजे धर्मशास्त्र असे समजावे. त्या दोघांचाही प्रतिकूल तर्क करून विचार करू नये; कारण त्यांच्यापासून संपूर्ण धर्म प्रकट झाला आहे. वेदोक्त व स्मृत्युक्त आचार हाच परम धर्म आहे. याकरिता आपल्या हिताची इच्छा करणाऱ्या द्विजाने आचारामध्ये सतत व अहर्निश तत्पर असावे. श्रुती व स्मृती यांनी उत्तम प्रकारे सांगितलेले, अध्ययनादि आपल्या कर्मामध्ये आपल्या अंगत्वाने संबद्ध असलेले व धर्मास कारण होणारे असे जे साधूंचे आचरण असेल त्याचे आळस सोडून पूर्णपणे सेवन करावे. आचाराच्या योगाने आपणास पाहिजे असेल तशी पुत्रपौत्रादि प्रजा होते. आचारापासून अक्षय्य धन मिळते व देहामध्ये असलेले अशुभसूचक अलक्षण निष्फळ होते. कारण दुराचारी पुरुष लोकांमध्ये निंदित, दुःखभागी, व्याधियुक्त व अल्पायुषी होतो. जो सदाचारसंपन्न, श्रद्धाळू व दुसऱ्याचे दोष न बोलणारा पुरुष असतो तो सर्व शुभ लक्षणांनी हीन असला तरी शंभर वर्षे जगतो. जे जे दुसऱ्याची प्रार्थना इत्यादिकांनी साध्य होणारे कर्म असेल त्याचा प्रयत्नाने त्याग करावा व जे जे आत्मवश कर्म असेल ते ते प्रयत्नाने करावे. दुसऱ्याची प्रार्थना करणे इत्यादि उपायांनी साध्य होणारे अर्थात् सर्व परवश कर्म दुःख देणारे असते व आपल्या अधीन झालेले सर्व कर्म सुखकारक असते. हेच सुखदुःखाचे लक्षण होय. जे कर्म करीत असताना कर्त्याच्या अंतरात्म्यास संतोष होतो तेच त्याने प्रयत्नपूर्वक करावे व त्याच्या विपरीत म्हणजे अनुष्ठानसमयी दुःख देणारे जे कर्म असते ते करू नये. यास्तव, साहाय्याकरिता धर्माचा नित्य व हळूहळू संग्रह करावा; कारण धर्म साहाय्य झाले असता प्राणी दुस्तर तमाचे उल्लंघन करतो. जो पुरुष धर्मपरायण झाला आहे, दैववशात् काही पाप घडल्यास त्याच्या तपाच्या योगाने ज्याने नाश केला आहे व त्यामुळेच जो दीप्तिमान् व ब्रह्मस्वरूप झाला आहे अशा त्या पुरुषास धर्मच शीघ्र ब्रह्मस्वर्गादिरूप परलोकास नेतो. (ह्यास्तव, केवळ धर्माचेच

अनुष्ठान करावे.) ज्या स्मृती वेदबाह्य आहेत व ज्या कुतर्कावर आधारलेल्या आहेत त्या सर्व परलोकी निष्फळ होत असतात; कारण त्यांचे नरक हे फळ मिळत असते. चार वर्ण, तीन लोक, ब्रह्मचर्य इत्यादि चार आश्रम, भूत, वर्तमान व भविष्य इत्यादि सर्व वेदांपासूनच प्रसिद्ध होत असते. शब्द, स्पर्श, रूप, रस व पाचवा गंध हे सत्त्वादिरूप विषय वेदांपासूनच प्रसिद्ध होतात. सनातन वेदशास्त्र सर्व भूतांना धारण करते. यास्तव, या वैदिक कर्माधिकारी पुरुषाचे वेदशास्त्र हेच उत्कृष्ट पुरुषार्थाचे साधन होय असे निश्चित समजावे. जो वेद, वेदार्थ व वेदात्मक कर्म यांना तत्त्वतः जाणतो तो नित्यनैमित्तिक कर्मानुगृहित ब्रह्मज्ञानाने युक्त असल्याने ब्रह्मचारी, गृहस्थ इत्यादि कोणत्याही आश्रमामध्ये याच लोकी जरी राहिला तरी ब्रह्मभावास समर्थ होतो. ऋषींनी सांगितलेला वेद व तन्मूलक स्मृत्यादि धर्मोपदेश यांचा त्यांच्या विरुद्ध कुतर्क न करता जो विचार करतो त्यासच धर्मज्ञान होते. इतर कोणासही होत नाही.

**श्रुतिस्मृतियुक्त आचारच श्रेष्ठ :-**

श्रुतिस्मृतियुक्त आचारच कसा श्रेष्ठ आहे हे सांगताना "**वसिष्ठ-स्मृतीत**" पुढील विवेचन आले आहे.

**श्रुतिस्मृतिविहितो धर्मः ।।१.३।।**
**आचारः परमो धर्मः सर्वेषामिति निश्चयः ।**
**हीनाचारपरीतात्मा प्रेत्य चेह विनश्यति ।।१.१६६।।**
**नैनं तपांसि न ब्रह्म नाग्निहोत्रं न दक्षिणाः ।**
**हीनाचारमितो भ्रष्टं तारयन्ति कथञ्चन ।।१.१६७।।**
**आचारहीनं न पुनन्ति वेदा यद्यप्यधीताः सह षड्भिरङ्गैः ।।**
**छन्दास्येनं मृत्युकाले त्यजन्ति नीडं शकुन्ता इव जातपक्षाः ।।**
**दुराचारो हि पुरुषो लोके भवति निन्दितः ।**
**दुःखभागी च सततं व्याधितोऽल्पायुरेव च ।।१.१७१।।**
**आचारात्फलते धर्ममाचारात्फलते धनम् ।**
**आचाराच्छ्रियमाप्नोति आचारो हन्त्यलक्षणम् ।।१.१७२।।**

**वेदोदितं स्वकं कर्म नित्यं कुर्यादतन्द्रितः।**
**तद्धि कुर्वन्यथाशक्त्या प्राप्नोति परमां गतिम्।।३६४।।**

श्रुती (वेद) आणि स्मृती यांनी जो सांगितला आहे त्यालाच धर्म असे म्हणतात. श्रुत्युक्त व स्मृत्युक्त आचार हाच सर्वांचा श्रेष्ठ धर्म आहे. जो हीनाचाराने वागतो त्याचा संसारात व मेल्यावर परलोकात नाश होतो. आचारहीनतेमुळे भ्रष्ट झालेल्या पुरुषाला तप, वेद, अग्निहोत्र आणि दक्षिणा या गोष्टी तारू शकत नाहीत. एखाद्याने सहा अंगांसहित वेदाध्ययन केले असले तरी जो पुरुष आचारहीन असतो त्याला वेदसुद्धा पवित्र करू शकत नाहीत. पंख उत्पन्न झालेले पक्षी ज्याप्रमाणे आपल्या घरट्याचा त्याग करतात त्याप्रमाणे आचारहीन माणसाचा मृत्युसमयी वेद त्याग करतात. दुराचारी माणसाची संसारात निंदा होते. त्याला अतिशय दुःख भोगावे लागते. तो नेहमी व्याधिग्रस्त असतो व त्याला अल्पायुष्य प्राप्त होते. आचारामुळे धर्माचे फळ मिळते, आचरामुळे धनही प्राप्त होते. आचारामुळेच मनुष्याला लक्ष्मीची प्राप्ती होते. दुष्ट स्वरूपाच्या आचाराने लक्षणहीन मनुष्याचा नाश होतो. वेदांनी सांगितलेले आपले कर्तव्य कर्म अतंद्रित होऊन दररोज केले पाहिजे. जो आपले कर्म यथाशक्ती करतो त्याला परमगती प्राप्त होते.

"**पाराशरस्मृतीतही**" आचाराचे माहात्म्य सांगताना ऋषी असे म्हणतात की -

**चतुर्णामपि वर्णानामाचारो धर्मपालकः।**
**आचारभ्रष्टदेहानां भवेद्धर्मः पराङ्मुखः।।१.३७।।**

चारही वर्णांचा आचार हा धर्माचे पालन करणारा असतो. जे लोक आचारभ्रष्ट होतात त्यांच्याकडे धर्म पाठ फिरवितो.

"**हारीतस्मृतीत**" धर्मशास्त्र व योगशात्र यांचे एकाच वेळी पालन केल्याने मनुष्य मुक्त होतो हे सांगताना ऋषी असे म्हणतात की -

**वर्णानामाश्रमाणां च योगशास्त्रञ्च सत्तमाः।**
**सन्धार्य मुच्यते मर्त्यो जन्मसंसारबन्धनात्।।१.८।।**

आपापल्या वर्णाप्रमाणे व आश्रमाप्रमाणे जो धर्माचे पालन करतो व योगशास्त्राचा अभ्यास करतो तो जन्मबंधनापासून मुक्त होतो.

**शास्त्रीय प्रयत्नाने आत्मज्ञान :-**

साधकाने शास्त्रीय प्रयत्न केला असता त्याला आत्मज्ञान प्राप्त होते असा **"योगवासिष्ठात"** श्रीवसिष्ठांनी सिद्धान्त मांडला आहे. ते असे म्हणतात की, "ज्याप्रमाणे निळा, पिवळा वगैरे रंगामधील फरक स्पष्ट कळावयाला प्रकाशाची आवश्यकता असते त्याप्रमाणे शास्त्रांनी घालून दिलेल्या नियमांप्रमाणे वर्तन करणाऱ्या मनुष्याला आपल्या कर्मात यश येण्याला त्यासंबंधाचे प्रयत्न करणे आवश्यक आहे. एखाद्या शास्त्रसंमत फलाची मनाने नुसती इच्छा केली; परंतु त्या संबंधाचा प्रयत्न केला नाही तर ती फलासंबंधीची नुसती इच्छा पुरुषार्थाच्या प्राप्तीला कारण होणारी नसून उन्मत्त मनुष्याच्या चेष्टांप्रमाणे मोहाला मात्र कारण होते. शास्त्रीय प्रयत्न केला असता शास्त्राने सांगितल्याप्रमाणे फल मिळते; परंतु अशास्त्रीय प्रयत्न केला असता अशास्त्रीय फल प्राप्त होते. आपले स्वतःचे पूर्वीचे कर्म फलोन्मुख झाले म्हणजे त्यालाच दैव असे नाव दिले जाते. त्याच्या शिवाय दैव म्हणून काही निराळे असत नाही. पौरुषाचे शास्त्रीय आणि अशास्त्रीय असे दोन प्रकार मानले गेलेले आहेत. त्यांपैकी अशास्त्रीय कर्म अनर्थाला कारण होते व शास्त्राला अनुसरून केलेले कर्म परमार्थ प्राप्त करून देते. दोन एडके आपसात लढू लागले म्हणजे कधी एकाचा जय होतो तर कधी दुसऱ्याचा जय होतो. त्याप्रमाणे प्राक्तन व ऐहिक प्रयत्न एकमेकांवर जय मिळविण्यासाठी लढत असतात. त्यांमध्ये जो सामर्थ्याने कमी त्याला अर्थातच हार खावी लागते. यासाठी मनुष्याने शास्त्रीय नियमांप्रमाणे उत्तम उद्योग करावा म्हणजे या जन्मात केलेला शास्त्रीय प्रयत्न यशस्वी झाल्याशिवाय निःसंशय राहत नाही. कित्येक वेळा शास्त्राने आखून दिलेल्या मार्गाने मनुष्य प्रयत्न करीत असताही रोगादिकांसारखे अनर्थ उत्पन्न होतात. परंतु आपले पूर्वीचेच कर्म ते अनर्थ उत्पन्न करीत आहे, असे त्या ठिकाणी

समजावे. अशा ठिकाणीही शास्त्रीय प्रयत्नाने अनर्थ उत्पन्न करणाऱ्या पूर्वीच्या कर्माचा पाडाव करावा. पूर्वजन्मातील कर्मफले मला विघ्न करीत आहेत, असे मनात आणून त्यांना जोराने पायाखाली तुडवावे; कारण या जन्मीच्या प्रत्यक्ष क्रियांपुढे (साधनांपुढे) त्यांची काही किंमत नाही. पूर्वीच्या जन्मातील कर्मफले नाहीशी होईपर्यंत मनुष्याने आपल्याकडून शक्य तितका प्रयत्न करावा. ज्याप्रमाणे कालच्या दिवशी झालेले अजीर्ण आज केलेल्या लंघनामुळे नाहीसे होते त्याप्रमाणे पूर्वीच्या जन्मातील कर्माचे दोष या जन्मातील शुभ कर्मांनी नाहीसे होतात. उत्साहयुक्त बुद्धीने पूर्वीची सदोष कर्मे नाहीशी करून संसारसागर तरून जाण्यासाठी शमदमादि साधनसंपत्ती प्राप्त करून घ्यावी. निरुद्योगी पुरुष गाढवांची बरोबरी करण्यासही समर्थ नाहीत; परंतु मनुष्याने शास्त्रशुद्ध प्रयत्न केला असता त्याला स्वर्ग आणि मोक्ष यांची प्राप्ती होते. ज्याप्रमाणे मनुष्याने तयार केलेल्या पिंजऱ्यातून सिंह प्रयत्नाने सुटून जातो त्याप्रमाणे स्वतः नेटाने प्रयत्न करून मनुष्यांनी संसाररूपी खळग्यातून बाहेर पडावे. आपला देह नश्वर आहे या गोष्टीचे नेहमी मनन करावे. पशूंच्यासारखे वर्तन टाकून द्यावे आणि सत्पुरुष व सच्छास्त्रे यांचा आश्रय करावा. शास्त्रात सांगितलेल्या नियमांना धरून शुभ प्रयत्न केले असता त्यापासून ताबडतोब शुभफल प्राप्त होते व अशुभ प्रयत्न केले असता नियमाने अशुभफल भोगावे लागते. सारांश, सच्छास्त्र हे सत्संग व सदाचार यांनी युक्त असले तर ते आत्मज्ञान देण्याला समर्थ होते."

**शास्त्रीय प्रयत्नाने जीवनमुक्तिसुखाचा आनंद :-**

श्रीवसिष्ठांनी शास्त्रीय प्रयत्नाने जीवनमुक्तिसुखाचा आनंद मनुष्याला कसा प्राप्त होतो हे श्रीप्रभुरामचंद्रांना **"योगवासिष्ठात"** पुढीलप्रमाणे समजावून सांगितले आहे. "हे रघुनंदना! प्रत्येक मनुष्याने योग्य दिशेने प्रयत्न केला असता त्याला या संसारामध्ये आत्मज्ञान प्राप्त झालेच पाहिजे. ज्याप्रमाणे चंद्रापासून शीतल आणि आह्लाददायक किरणे उत्पन्न होतात त्याप्रमाणे पुरुषप्रयत्नापासून चित्तशुद्धिद्वारा

जीवनमुक्तिसुखाचा आनंद प्रत्येकाला प्राप्त होणे शक्य आहे. सत्पुरुषांनी आखून दिलेल्या मार्गाने काया, वाचा आणि मन यांनी जे कर्म केले जाते तेच पौरुष होय व असे पौरुषच फलदायी होते."

**शास्त्रीय प्रयत्नांचे सामर्थ्य :-**

शास्त्रीय प्रयत्नांच्या अद्भुत सामर्थ्याचे वर्णन करताना **"योग-वासिष्ठात"** महर्षी श्रीवसिष्ठ असे म्हणतात की, "या जन्मात मनुष्याने नेटाने प्रयत्न केला असता पूर्वजन्मातील पौरुष त्याला नाहीसे करून टाकता येते. बुद्धी आणि साहस यांनी युक्त असलेल्या पुरुषांनी दृढप्रयत्नाने अभ्यास केला असता मेरुपर्वत सुद्धा गडप करून टाकता येतो. मग पूर्वजन्मातील पौरुष नाहीसे करता येईल यात काय नवल? जो मनुष्य शास्त्राने दर्शविलेल्या मार्गांनी कार्य करण्याला उद्युक्त होतो त्याला प्रयत्नापासून इष्ट फलाची प्राप्ती निःसंशय होते. परंतु या व्यतिरिक्त केलेले सर्व प्रयत्न अनर्थाला कारण होतात. एखादा मनुष्य रोगाने पीडलेला असून शक्तिहीन झालेला असला व आपल्या हाताने पाणी पिण्याचेही सामर्थ्य त्याच्या अंगी नसले, तर अशा स्थितीत त्याला पाण्याचा एक बिंदू जरी प्राशन करण्यास मिळाला तरी तेवढ्याने तो संतुष्ट होतो. परंतु असा मनुष्यही जर शास्त्रीय प्रयत्न करील तर त्याची सर्व आपत्ती नाहीशी होऊन कालांतराने का होईना त्याच्या सामर्थ्याला अखिल पृथ्वीही पुरेनाशी होईल.

**शास्त्रप्रभावामुळे परम शुद्धी :-**

शास्त्राचा प्रभाव किती विलक्षण असतो व त्यामुळे परम शुद्धी कशी प्राप्त होते हे सांगताना **"योगवासिष्ठात"** श्रीरामांना महर्षी श्रीवसिष्ठ असे म्हणतात, "हे राघवा! शास्त्रोक्त उपायांचा अभ्यास केल्याने अतिशय शुद्ध झालेले चित्त त्याची इच्छा नसतानाही सत्वर पावन पदाला पाहते. ते जसे जसे शुद्ध होऊ लागते तसेतसे भोगेच्छारहित होऊन प्रत्यही अंतर्मुख होत जाते व शेवटी आत्मपरायण होते. या शास्त्रामुळे अविद्येचा सात्त्विक भाग उत्कर्ष पावतो आणि या सात्त्विक

भागाच्या उत्कर्षामुळे तिचा तामस भाग क्षीण होतो. या शास्त्ररूपी प्रधान जलाने नित्य मलाचे क्षालन करणारा मनुष्य अचिंत्य शास्त्र-प्रभावामुळे परम शुद्धीला प्राप्त होतो. ज्याप्रमाणे सूर्य व समुद्र हे एकमेकांच्या समोर आले तर त्यातील कोणाचीही जरी इच्छा नसली तरी पूर्वी त्यात पाहिलेलेच प्रतिबिंब स्वच्छ प्रकाशस्वभावामुळे प्रवृत्त होते. त्याच न्यायाने मुमुक्षू व शास्त्र यांचा परस्पर संबंध झाल्यामुळेच अनुभवसिद्ध सर्व संवित्पदातील आत्मज्ञान प्रवृत्त होते."

**शास्त्ररक्षण न केल्यास पतनाचा संभव :-**

महर्षी श्रीनारदांनी आपल्या "**भक्तिसूत्रात**" शास्त्ररक्षणाची आवश्यकता सांगताना पुढील दोन महत्त्वाची सूत्रे लिहिली आहेत. "**भवतु निश्चयदार्ढ्यादूर्ध्वं शास्त्ररक्षणम्।।१२।। अन्यथा पातित्या-शङ्कया।।१३।।**" साध्यसाधनाचा निश्चय दृढ झाल्यावर तदनुरोधाने शास्त्राज्ञांचे पालन अवश्य झाले पाहिजे. शास्त्रपालन केले नाही तर साधक पतन पावण्याचा संभव असतो. परमेश्वरप्राप्ती हे साध्य व शक्तिपातयोग हे साधन होय. शक्तिपातयोगाची साधना करणाऱ्या साधकाने श्रीसद्गुरूंनी जागृत केलेल्या शक्तीचा उत्तरोत्तर विकास होण्यासाठी आवश्यक त्या सर्व शास्त्रमर्यादांचे पालन काटेकोरपणे केले पाहिजे. ज्या साधकाला मुक्कामाला लवकर पोहोचण्याची इच्छा असेल त्याने तर चुकूनसुद्धा शास्त्ररक्षणात कसूर करता कामा नये. साधन श्रेष्ठ आहे, आपण कसेही वागले तरी चालेल असे म्हणून शास्त्ररक्षणाची साधकाने कधीही उपेक्षा करता कामा नये. शास्त्राची उपेक्षा ही साधकाच्या पतनास कारण होते. त्यामुळे साधन नीट चालत नाही व मनःशांती बिघडते. शास्त्राने आपल्या दैनंदिन आचाराला अशा काही मर्यादा घालून ठेवल्या आहेत की, त्यांचे पालन केल्यास स्वैराचारास आळा बसून साधकाचे मन सहजच शुद्ध व स्थिर होऊ लागते.

शक्तिपातयोगप्राप्तीमुळे आपल्याला अलौकिक अशा भगवत्प्रेमाची प्राप्ती झाली असून आपण विधिनिषेधातीत आहोत असे समजून

साधकाने लौकिक व वैदिक कर्मांचा त्याग मुद्दाम करता कामा नये. असा त्याग आपोआप होत असतो. त्याकरिता सर्व गोष्टींचे विस्मरण पाडणारी भगवत्प्रेमाची दिव्य स्थिती जोपर्यंत साधकाला प्राप्त होत नाही तोपर्यंत शक्तिपातयोगाच्या नावावर साधकाने शास्त्रविहित कर्मांचा त्याग कधीही करता कामा नये. जो साधक जाणून बुजून शास्त्राज्ञांचे पालन करीत नाही व शास्त्रविरुद्ध अमर्यादेने वागून शक्तिपात-योगसाधनेच्या नावाखाली स्वतःची सोडवणूक करण्याचा प्रयत्न करतो अशा साधकाला पतनाचे भय राहते. त्याच्या शक्तीच्या विकासाचा वेग कमी होतो. याकरिता "**विधीतें पाळीत। निषेधातें गाळीत।। श्रीज्ञानेश्वरी १२.७७।।**" असेच साधकाचे आचरण असले पाहिजे.

**श्रुती ही जगाची माउली आहे :-**

"**श्रीमद्भगवद्गीतेच्या**" सोळाव्या अध्यायात शास्त्रच प्रमाण कसे मानले पाहिजे हे सांगताना श्रीभगवान् असे म्हणतात की,

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्मकर्तुमिहार्हसि।।१६.२४।।**

काय केले पाहिजे व काय करता कामा नये यांचा निश्चय करण्याकरिता तुला शास्त्रच प्रमाण मानले पाहिजे. याकरिता शास्त्रांनी सांगितलेले विधान जाणून घेऊन तसे कर्म करण्यास तू योग्य आहेस. याचा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीत**" फार सुंदर भावार्थ स्पष्ट केला आहे. ते असे म्हणतात की -

**या कारणें पैं बापा। जया आथी आपुली कृपा।**
**तेणें वेदांचिया निरोपा। आन न कीजे।।१६.४५५।।**
**पतीचिया मता। अनुसरोनि पतिव्रता।**
**अनायासें आत्महिता। भेटेचि ते।।४५६।।**
**नातरी श्रीगुरुवचना। दिठी देतु जतना।**
**शिष्य आत्मभुवना -। माजीं पैसे।।४५७।।**
**हें असो आपुला ठेवा। हाता आथी जरी यावा।**
**तरी आदरें जेविं दिवा। पुढां कीजे।।४५८।।**

**तैसा अशेषांही पुरुषार्थां। जो गोसावी हो म्हणे पार्था।**
**तेंणें श्रुतिस्मृति माथां। बैसणें घापे।।४५९।।**
**शास्त्र म्हणेल जें सांडावें। तें राज्यही तृण मानावें।**
**जें घेववी तें न म्हणावें। विषही विरु।।४६०।।**
**ऐसिया वेदैकनिष्ठा। जालिया जरी सुभटा।**
**तरि कें आहे अनिष्टां। भेटणें गा।।४६१।।**
**पैं अहितापासूनि काढिती। हित देऊनि वाढविती।**
**नाहीं श्रुतिपरौती। माउली जगा।।४६२।।**
**म्हणौनि ब्रह्मेसीं मेळवी। तंव हे कोण्हे न सांडावी।**
**अगा तुवांही ऐसीचि भजावी। विशेषेंसी।।४६३।।**
**कार्याकार्यविवेकीं। शास्त्रेंचि करावी पारखी।**
**अकृत्य तें कुडें लोकीं। वाळावें गा।।४६५।।**
**मग कृत्यपणें खरें निगे। तें तुवां आपलेनि आंगें।**
**आचरोनी आदरें चांगें। सारावें गा।।४६७।।**

याकरिता हे बापा अर्जुना! ज्याला आपले कल्याण व्हावे अशी इच्छा आहे त्याने वेदांची आज्ञा कधीही मोडू नये. पतिव्रता स्त्री आपल्या पतीच्या मनोगताप्रमाणे वागून अनायासे आपले आत्महित साधून घेते किंवा जो शिष्य श्रीगुरूंच्या आज्ञेकडे लक्ष देऊन वागतो तो आत्मप्राप्ती करून घेतो. फार काय, आपणच ठेवलेली ठेव हाती येण्याकरिता ज्याप्रमाणे दिवा अगत्याने पुढे करावा लागतो त्याप्रमाणे हे पार्था! सर्व पुरुषार्थांचा स्वामी होण्याची ज्याला इच्छा असेल त्याने श्रुती व स्मृती यांना शिरसावंद्य मानलेच पाहिजे. शास्त्रांनी जे टाकावे म्हणून म्हटले असेल ते जरी आवडते राज्यही असले तरी तृणाप्रमाणे तुच्छ समजून त्याचा त्याग करावा आणि ज्याचा स्वीकार करावा असे म्हटले असेल ते जरी विषही असले तरी ते मारक होईल असे मनातही आणू नये. हे अर्जुना! अशा रीतीने जो वेदांची आज्ञा एकनिष्ठपणे पाळतो त्याचे अकल्याण कधीच होत नाही. अकल्याणापासून सोडविणारी व कल्याण करून पोषण करणारी अशी श्रुतीशिवाय जगाला दुसरी

माऊली नाही. परब्रह्माशी ऐक्य होईपर्यंत श्रुतीचा कोणीही त्याग करू नये आणि अर्जुना! तूही विशेषेकरून श्रुतीची आज्ञा पाळली पाहिजे. काय करावे व काय करू नये यांचा निवाडा शास्त्रावरूनच करावा आणि जगात करू नये म्हणून सांगितले असेल अशा निंद्य कर्मांचा त्याग करावा. मग करावे म्हणून जे यथार्थ ठरेल त्याचे तू स्वतः श्रद्धायुक्त अंतःकरणाने आचरण करून ते पुरे करावे.

**विहितकर्मे टाकणे हा वेडेपणाच होय :-**

जोपर्यंत साधकाला दिव्य व अलौकिक अवस्था प्राप्त होत नाही तोपर्यंत साधकाने मुद्दाम होऊन शास्त्राने उचित सांगितलेल्या अशा कर्मांचा त्याग कधीही करता कामा नये. याबद्दल श्रीज्ञानेश्वरमहाराज "**श्रीज्ञानेश्वरीत**" असे म्हणतात की -

**वांचोनि कर्मारंभ उचित। न करितां सिद्धवत।**
**कर्महीना निश्चित। होईजेना।।३.४५।।**
**कीं प्राप्तकर्म सांडिजे। येतुलेनि नैष्कर्म्य होईजे।**
**हें अर्जुना वायां बोलिजे। मूर्खपणें।।४६।।**
**सांगें पैलतीरा जावें। ऐले व्यसन कां जेथ पावे।**
**तेथ नावेते त्यजावें। घडे केवीं।।४७।।**
**ना तरी तृप्ती इच्छिजे। तरी कैसेनि पाकु न कीजे।।**
**कीं सिद्धही न सेविजे। केविं सांगें।।४८।।**
**जंव निरार्तता नाहीं। तंव व्यापारु असे पाहीं।**
**मग संतुष्टीच्या ठायीं। कुंठे सहजें।।४९।।**
**म्हणौनि आइकें पार्था। जया नैष्कर्म्यपदीं आस्था।**
**तया उचित कर्म सर्वथा। त्याज्य नोहे।।५०।।**
**आणि आपुलिये चाडे। आपादिलें हें मांडे।**
**कीं त्यजिलें हें कर्म सांडे। ऐसें आहे।।५१।।**
**हें वायांचि सैरा बोलिजे। उकलु तरी देखोनि पाहिजे।**
**परी त्यजितां कर्म न त्यजे। निभ्रांत मानीं।।५२।।**
**देखैं विहित कर्म जेतुलें। तें सगळें जरी वोसंडिलें।**

तरी स्वभाव काय निमाले। इंद्रियांचे।।५४।।
सांगैं श्रवणीं ऐकावें ठेलें?। कीं नेत्रीचे तेज गेलें?।
हे नासरंध्र बुझालें। परिमळु नेघे।।५५।।
ना तरी प्राणापानगती। कीं निर्विकल्प जाहली मती।
कीं क्षुधा तृषादि आर्ती। खुंटलिया।।५६।।
हे स्वप्नावबोधु ठेले। कीं चरण चालों विसरले।
हें असो काय निमाले। जन्ममृत्यू?।।५७।।
हें न ठकेचि जरी कांहीं। तरी सांडणे तें कायी।
म्हणोनि कर्मत्यागु नाहीं। प्रकृतिवंतां।।५८।।
कर्म पराधीनपणें। निपजत असे प्रकृतिगुणें।
येरी धरी मोकली अंतःकरणें। वाहिजे वायां।।५९।।
देखें रथीं आरूढीजे। मग जरी निश्चळ बैसिजे।
तरी चळु होऊनि हिंडिजे। परतंत्रा।।६०।।
कां उचलिलें वायुवशें। चळे शुष्क पत्र जैसें।
निश्चेष्ट आकाशें। परिभ्रमें।।६१।।
तैसें प्रकृतिआधारें। कर्मेंद्रियविकारें।
नैष्कर्म्यही व्यापारे। निरंतर।।६२।।
म्हणौनि संगु जंव प्रकृतीचा। तंववरी त्यागु न घडे कर्माचा।।
ऐसियाहि करूं म्हणती तयांचा। आग्रहोची उरे।।६३।।

कोणीही मनुष्य विहित कर्मे टाकून जर सिद्ध (ज्ञानी) होऊ म्हणेल तर निश्चयाने त्याला तसे होता येणार नाही. हे अर्जुना! ज्याला जी विहित कर्मे करावयाची, ती टाकल्याने तो कृतार्थ होईल असे म्हणणे हा केवळ वेडेपणा होय. दुथडी भरलेल्या नदीच्या परतीराला जाण्याचे संकट प्राप्त झाले तर नावेचा त्याग करता येईल का? भोजनापासून जो तृप्तीची इच्छा करतो त्याला स्वयंपाक न करता अथवा तयार असलेले अन्न न खाता तृप्ती कशी प्राप्त होईल? जोपर्यंत निरिच्छपणा प्राप्त झाला नाही तोपर्यंत खटपट ही केलीच पाहिजे. एकदा का निरिच्छता प्राप्त झाली की, प्राणी आत्मसंतोषात सहज

गुंतून जातो. याकरिता पार्था! ज्याला मोक्षप्राप्तीची इच्छा आहे त्याने आपले विहित कर्माचरण कधीही सोडू नये. आणि आपापल्या गरजेप्रमाणे कर्माचा स्वीकार व त्याग करू म्हटल्याने तो होईल काय? हे बोलणे व्यर्थ बहकल्यासारखे आहे. याचा नीट विचार करून पाहिला तर कर्म टाकल्याने कर्माचा त्याग होत नाही असे पक्के समज.

जेवढी विहित कर्मे आहेत तेवढी सगळी जरी त्रासाने सोडली तरी इंद्रियांचे स्वभावधर्म नाहीसे होतात का? कर्मत्याग केला म्हणून कानाचे ऐकणे बंद झाले आहे का? का डोळ्याची दृष्टी (तेज) गेली? का नाकाची भोके बुजून जाऊन वास येईनासा झाला? किंवा प्राणापानवायूंची गती बंद झाली? का मन हे कल्पनारहित झाले? का तहान व भुकेची इच्छा नाहीशी झाली? त्याचप्रमाणे निद्रा व जागृती या अवस्था बंद झाल्या का? किंवा पाय चालणे विसरले? इतकेच नव्हे; परंतु जन्ममरण तरी चुकले आहे काय? हे इंद्रियांचे व्यापार बंद पडत नाहीत तर कोणते कर्म सोडले असे म्हणता येईल? म्हणून देहाभिमान्याला कर्मत्याग करता येणार नाही. कर्म हे पराधीन असल्यामुळे प्रकृतीच्या गुणानुरोधाने घडते. याकरिता मी कर्म करीन अगर सोडीन असे समजणे व्यर्थ होय. हे पहा अर्जुना! आपण रथावर बसलो व निश्चळ जरी राहिलो तरी रथाच्या अधीन झाल्यामुळे आपण चालतो व हिंडतोच. किंवा ज्याप्रमाणे झाडाचे वाळलेले पान निश्चेष्ट असताही वायूच्या वेगाने उडून आकाशात भ्रमण करते त्याप्रमाणे मायेच्या आधाराने व कर्मेंद्रियांच्या विकाराने निष्काम मनुष्यही नेहमी कर्म करतो. म्हणून जोपर्यंत मायेचा संग आहे तोपर्यंत कर्माचा त्याग घडत नाही. असे असूनही जे कर्माचा त्याग करू म्हणतात त्यांचा तो रिकामा आग्रह आहे.

**स्वधर्म हा मोक्षदायक यज्ञ :-**

स्वधर्म हा मोक्ष देणारा असा नित्य यज्ञ आहे. त्याचे वैशिष्ट्य वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज "**श्रीज्ञानेश्वरीत**" असे म्हणतात की -

म्हणोनि नैष्कर्म्य होआवें। तरी एथ तें न संभवें।
आणि निषिद्ध केविं राहाटावें। विचारीं पां।।३.७७।।
म्हणौनि जें जें उचित। आणि अवसरेंकरूनि प्राप्त।
तें कर्म हेतुरहित। आचरें तूं।।७८।।
पार्था आणीकही एक। नेणसी तूं हें कवतिक।
जें ऐसें कर्ममोचक। आपैसें असे।।७९।।
देखैं अनुक्रमाधारें। स्वधर्मु जो आचरे।
तो मोक्षु तेणें व्यापारें। निश्चित पावे।।८०।।
स्वधर्मु जो बापा। तोचि नित्य यज्ञु जाण पां।
म्हणौनि वर्तत तेथ पापा। संचारु नाहीं।।८१।।
हा निजधर्म जैं सांडे। आणि कुकर्मीं रति घडे।
तैंचि बंध पडे। सांसारिक।।८२।।
म्हणौनि स्वधर्मानुष्ठान। तें अखंड यज्ञयाजन।
जो करी तया बंधन। कहींच न घडे।।८३।।
हा लोकु कर्में बाधिला। जो परतंत्रा भूलला।
तो नित्ययज्ञातें चुकला। म्हणौनियां।।८४।।

याकरिता कर्मरहित असे आत्मरूप व्हावयाचे असल्यास कर्मत्याग करून ते साधणे हे या संसारात असंभवनीय आहे. मग शास्त्रविरुद्ध आचरण का करावे याचा विचार कर. म्हणून आपल्याला विहित असेल ते उचित कर्म व प्रसंगोपात्त जे नैमित्तिक कर्म असेल ते ते विषयसुखाच्या प्राप्तीचा उद्देश सोडून केवळ श्रीभगवंताने लावून दिलेले आपले कर्तव्य आहे असे समजून कर. अशा रीतीने केलेले निष्काम कर्म करण्यात एक मौज आहे, ती तुला माहीत नाही. अशा रीतीने केलेले कर्म अनायासे कर्मबंधनापासून सोडविणारे होते. जो वर्णाश्रमधर्माप्रमाणे स्वधर्माचे आचरण करतो तो त्या आचरणानेच निश्चये करून मोक्ष पावतो. आपल्या धर्माप्रमाणे आचरण करणे हाच नित्ययज्ञ आहे असे समज. म्हणून त्याप्रमाणे वर्तन केल्यावर त्यात पापाचा रिघाव होत नाही. प्राणी जेव्हा हा स्वधर्म टाकतात

आणि वाईट कर्माच्या ठिकाणी प्रवृत्त होतात, तेव्हाच जन्ममरणाच्या फेऱ्यात सापडतात. म्हणून स्वधर्माप्रमाणे आचरण करणे हाच अखंड यज्ञ असे समज. जो पुरुष हा यज्ञ करतो त्याला काही सुद्धा बंधन होत नाही. हे सर्व जग स्वकर्माला चुकले म्हणूनच कर्माने बांधले जाऊन मायेच्या पाशात गुंतले आहे.

**स्वधर्म सोडण्याने दुःख, दारिद्र्य व पाप प्राप्त होते :-**

स्वधर्माचे आचरण जर मनुष्याच्या हातून घडले नाही तर मनुष्याला किती हालआपेष्टा, दुःख व दैन्य सोसावे लागते याचे मोठे विदारक चित्र श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीत**" रंगविले आहे. शक्तिपात-योगाची साधना करणाऱ्यांनी साधन व नित्यनैमित्तिक कर्मांची सांगड उत्तम प्रकारे घातली पाहिजे. त्यामुळे त्यांच्या वाट्याला दुःख, दारिद्र्य व पाप न येता सुखच येईल. याबाबत श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की -

**ऐसें समस्त भोगभरित। होआल तुम्हा अनार्त।**
**जरी स्वधर्मैकनिरत। वर्ताल बापा।।३.१०२।।**
**कीं जालिया सकळ संपदा। जो अनुसरेल इंद्रियमदा।**
**लुब्ध होऊनियां स्वादा। विषयांचिया।।१०३।।**
**तिहीं यज्ञभावितीं सुरीं। जे हे संपत्ती दिधली पुरी।**
**तयां स्वधर्मीं सर्वेश्वरीं। न भजेल जो।।१०४।।**
**अग्निमुखीं हवन। न करील देवतापूजन।**
**प्राप्तवेळे भोजन। ब्राह्मणाचे।।१०५।।**
**विमुख होईल गुरुभक्ती। आदर न करील अतिथी।**
**संतोष नेदील ज्ञाती। आपुलिये।।१०६।।**
**ऐसा स्वधर्मक्रियारहितु। आथिलेपणें प्रमत्तु।**
**केवळ भोगासक्तु। होईल जो।।१०७।।**
**तया मग अपावो थोर आहे।जेणें तें हातींचें सकळ जाये।**
**देखा प्राप्तही न लाहे। भोग भोगूं।।१०८।।**
**जैसें गतायु शरीरीं। चैतन्य वासु न करी।**

कां निदैनाच्या घरीं। न राहे लक्ष्मी।।१०९।।
तैसा स्वधर्मु जरी लोपला। तरी सर्व सुखांचा थारा मोडला।
जैसा दीपासवें हरपला। प्रकाशु जाय।।११०।।
तैसी निजवृत्ति जेथ सांडे। तेथ स्वतंत्रते वस्ती न घडे।
आइका प्रजा हो फुडें। विरंचि म्हणे।।१११।।
म्हणौनि स्वधर्मु जो सांडील। तयातें काळु दंडील।
चोरु म्हणौनि हरील। सर्वस्व तयाचें।।११२।।
मग सकळ दोषु भवंते। गिंवसोनि घेती तयातें।
रात्रिसमयीं स्मशानातें। भूतें जैसीं।।११३।।
तैसीं त्रिभुवनींचीं दुःखें। आणि नानाविधें पातकें।
दैन्यजात तितुकें। तेथेंचि वसे।।११४।।
ऐसें होय तया उन्मत्ता। मग न सुटे बापा रुदतां।
कल्पांतींही सर्वथा। प्राणिगण हो।।११५।।
म्हणौनि निजवृत्ती हे न सांडावी। इंद्रियें बरळों नेदावीं।
ऐसें प्रजांतें शिकवी। चतुराननु।।११६।।
जैसें जळचरां जळ सांडे। मग तत्क्षणीं मरण मांडे।
हा स्वधर्मु तेणें पाडें। विसंबों नये।।११७।।
म्हणौनि तुम्हीं समस्तीं। आपुलालिया कर्मीं उचितीं।
निरत व्हावें पुढतपुढती। म्हणिपत असें।।११८।।

"अशा रीतीने तुम्ही एकनिष्ठेने स्वधर्माचे आचरण कराल तर तुम्ही ऐश्वर्ययुक्त होऊन तुम्हाला विषयांची इच्छा राहणार नाही. याच्या उलट सर्व संपत्ती प्राप्त होऊन जो कोणी विषयाच्या सुखाला भुलून इंद्रियांना जसे वाटेल तसे वागण्याचा प्रयत्न करील, यज्ञाने संतुष्ट झालेल्या देवांनी प्रसन्न होऊन मनुष्याला पूर्ण जी संपत्ती दिली त्या संपत्तीने व स्वधर्माचरणाने जो ईश्वराला भजणार नाही, जो अग्नीत आहुती देणार नाही, देवतापूजन करणार नाही, प्रसंगाने ब्राह्मणाला भोजन देणार नाही, आपल्या श्रीगुरूची भक्ती करणार नाही, अतिथींचा आदरसत्कार करणार नाही, आपल्या जातीबांधवांचे

कार्य करून त्यांना संतोष देणार नाही, अशा रीतीने जो स्वधर्माचे आचरण करीत नाही, श्रीमंतीने ज्याला गर्वाचा ताठा भरला आहे आणि जो केवळ विषयासक्त झाला आहे अशा पुरुषाला महासंकटे येऊन पुढे फार दुःख होते. त्याला मिळालेले सर्व ऐश्वर्य नाहीसे होते आणि प्राप्त भोग भोगण्याकरिताही तो समर्थ राहत नाही. ज्याप्रमाणे आयुष्य संपलेल्या शरीरात चैतन्य वास करीत नाही किंवा ज्याचे दैव फिरले आहे त्याच्या घरी लक्ष्मी राहत नाही, त्याप्रमाणे जसा दिवा मालविला की, प्रकाश तत्काळ नाहीसा होतो तसा स्वधर्माचा लोप झाला असता, सर्व सुखाचे आश्रयस्थान नाहीसे होते. याकरिता ब्रह्मदेव असे म्हणतात की, प्रजाजन हो! जो स्वधर्माचे आचरण सोडतो, त्याचे स्वातंत्र्य नष्ट होते. म्हणून स्वधर्माचा जो त्याग करील त्याला काळ शिक्षा करील आणि हा चोर आहे असे समजून त्याच्या सर्वस्वाचे हरण करील. मग रात्र झाल्यावर स्मशानात जशी भुतांची गर्दी होते तशी सर्व संकटे व पापे त्याला येऊन वेढतात. तसेच त्रिभुवनातील सर्व प्रकारची दुःखे, हजारो प्रकारची पातके व झाडून सगळे दारिद्र्यही त्याच्या ठिकाणी वास करते. श्रीब्रह्मदेव असे म्हणतात की, हे प्रजाजनहो! याप्रमाणे त्या उन्मत्त मनुष्याची स्थिती होते. मग तो कितीही रडला व त्याने दुःख केले तरी कोणी त्याला कल्पांतीही सोडवू शकत नाही. श्रीब्रह्मदेव असा बोध करतात की, आपला स्वधर्म सोडू नका आणि इंद्रियांना स्वैर वर्तन करू देऊ नका. ज्याप्रमाणे जलचरांना पाण्यातून बाहेर काढल्याबरोबर लागलीच मृत्यू येतो त्याप्रमाणे स्वधर्माचा विसर पडला म्हणजे प्राणी अधःपात पावतो. श्रीब्रह्मदेव म्हणतात, म्हणून तुम्ही सर्वांनी कर्म करण्यास नेहमी तत्पर राहावे."

**साधनावर विश्वास :-**

शक्तिपातयोगसाधनेत साधकाचा साधनेवर पूर्ण विश्वास असणे अत्यंत आवश्यक आहे; कारण विश्वासामुळेच कोणत्याही कार्यात सिद्धी प्राप्त होत असते. श्रीमद्गोस्वामी तुलसीदासमहाराजांनी "**श्रीराम-**

**चरितमानसाच्या**" बालकांडातील मंगलचरणात विश्वासाचे स्थान किती मोठे आहे हे सांगताना असे म्हटले आहे की -

**भवानीशङ्करौ वन्दे श्रद्धाविश्वासरूपिणौ।**
**याभ्यां विना न पश्यन्ति सिद्धाः स्वान्तःस्थमीश्वरम्।।२।।**

श्रद्धा व विश्वासरूपी श्रीउमामहेश्वरांना मी वंदन करतो; (कारण) त्यांच्याशिवाय आपल्या हृदयातील परमात्म्याचे दर्शन योगीसुद्धा घेऊ शकत नाही.

"**श्रीमद्भगवद्गीतेच्या**" चवथ्या अध्यायातील ४० व्या श्लोकात श्रीभगवंतांनी अर्जुनाला अविश्वासाची भीषणता पुढील शब्दात सांगितली आहे.

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति।।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः।।४.४०।।**

अज्ञानी, श्रद्धाहीन व संशययुक्त असा जो असतो तो अधोगतीला जातो. त्या संशयी पुरुषाला इहलोक, परलोक व मोक्षसुखही प्राप्त होत नाही. या श्लोकाचा भावार्थ स्पष्ट करून साधकाच्या दृष्टीने संशय व अविश्वास हा किती हानीकारक आहे हे सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज "**श्रीज्ञानेश्वरीत**" असे म्हणतात की -

**मग संशयीं जरी पडिला। तरी निभ्रांत जाणें नासला।**
**तो ऐहिक परत्रा मुकला। सुखासि गा।।४.१९९।।**
**जया काळज्वर आंगीं बाणे। तो शीतोष्णें जैशीं नेणे।**
**आगी आणि चांदणें। सरिसेंचि मानीं।।२००।।**
**तैसें साच आणि लटिकें। विरुद्ध आणि निकें।**
**संशयीं तो नोळखे। हिताहित।।२०१।।**
**हा रात्री दिवसु पाहीं। जसा जात्यंधा ठाउवा नाहीं।**
**तैसें संशयीं असतां कांहीं। मना नये।।२०२।।**
**म्हणौनि संशयाहूनि थोर। आणिक नाहीं पाप घोर।**
**हा विनाशाची वागुर। प्राणियांसी।।२०३।।**
**येणें कारणें तुवां त्यजावा। आधीं हाच एकु जिणावा।**

**जो ज्ञानाचिया अभावा -। माजि असे।।२०४।।**
**जैं अज्ञानाचे गडद पडे। तैं हा बहुवस मनीं वाढे।**
**म्हणौनि सर्वथा मार्गु मोडे। विश्वासाचा।।२०५।।**
**हृदयीं हाचि न समाये। बुद्धीतें गिंवसूनि ठाये।**
**तेथें संशयात्मक होये। लोकत्रय।।२०६।।**

मनुष्य संशयात पडला की, निःसंशय नाश पावतो व तो ऐहिक व पारत्रिक अशा दोन्ही सुखांना मुकतो. ज्याला भयंकर सन्निपातज्वर झाला आहे त्याला शीत-उष्णाचे ज्ञान होत नाही. तो उष्णता व चांदणे सारखेच मानतो. त्याचप्रमाणे संशयग्रस्त मनुष्याला खरे-खोटे, अनुकूल-प्रतिकूल व हित-अहित ही कळत नाहीत. ज्याप्रमाणे जन्मांध पुरुष रात्र व दिवस ओळखत नाही त्याप्रमाणे संशयात पडलेल्या मनुष्याच्या बुद्धीला दुसऱ्याचे सांगणे मुळीच पटत नाही. म्हणून संशयापेक्षा दुसरे भयंकर पाप कोणतेच नाही. संशय हा प्राण्याचा सर्वस्वी नाश करणारे जाळे आहे, याकरिता अर्जुना! तू त्याचा त्याग कर. प्रथम संशयालाच जिंक. हा संशय जेथे यथार्थ ज्ञान नाही तेथेच असतो. जेव्हा अज्ञानाचा गाढ अधंकार असतो तेव्हाच याची फार वाढ होते. तो विश्वासाविषयी मनात कल्पना देखील येऊ देत नाही. हा संशय वाढला की, अंतःकरणातच भरून राहतो असे नाही, तर तो बुद्धीलाही ग्रासून टाकतो. असे झाले की, त्या मनुष्याला तिन्ही लोक संशयात्मकच दिसू लागतात.

हे सर्व जरी खरे असले तरी साधकांना संशय येतच राहतो. साधक ज्या ज्या अवस्थेत असतो त्या त्या अवस्थेत त्याला निरनिराळे संशय येतात. साधकांमध्ये नवीन साधक, काही काळ साधना करून झालेले साधक व थोड्या वरच्या पायरीवर गेलेले साधक असे तीन प्रकार सर्वसाधारणपणे संभवतात. या तीनही प्रकारच्या साधकांचे भिन्नभिन्न संशय व त्यांचे निराकरण यांचा आपण क्रमशः विचार करू.

**नवीन साधक, त्यांचे संशय व त्याची उत्तरे :-**

**पहिली शंका :-**

नवीन साधकाला असे वाटते की, कुंडलिनी-जागरण ही तर अत्यंत दुर्लभ अशी गोष्ट आहे. मग अत्यंत सहजपणे ती आपल्या-सारख्या सामान्य माणसाला प्राप्त होणे कसे शक्य आहे? यात काही मायाजाल किंवा जादूटोणा तर नसेल? संमोहन विद्येच्या प्रभावाने तर लोक इकडे आकर्षित होत नसतील? अशा प्रकारे शक्ती जागृत करणारे लोक जादूगार तर नसतील?

**उत्तर** :- पूर्व जन्माची पुण्याई, भाग्य व कर्मसाम्यदशा प्राप्त झाल्याने शक्तिपातयोगसाधनेकडे साधक वळू लागतो. त्याची श्रीसद्गुरूंशी अनायासे गाठ पडते. अशा साधकावर कृपा करून श्रीसद्गुरू त्याच्या मुक्तीचा मार्ग मोकळा करून देतात; परंतु साधकाच्या वाटचालीत वर वर्णन केलेले संशय व अविश्वास अनेक वेळा डोके वर काढून प्रगती थांबवून ठेवतात. दुर्लभ वस्तू सहजतेने प्राप्त झाली म्हणजे माणसाचे मन अनेक शंकाकुशंकांनी भरून जाते यासंबंधी "**योग-वासिष्ठात**" मणिकांचन उपाख्यान आले आहे. ते पाहण्यासारखे आहे.

श्री.रामप्रसाद नावाचा एक श्रीमंत ब्राह्मण होता. तो सर्व कलात पारंगत होता. खूप हुशार होता, व्यवहारात निपुण होता. त्याचे जीवन सर्वांगांनी समृद्ध होते.

एकदा त्याला आपल्याला चिंतामणी प्राप्त व्हावा अशी तीव्र इच्छा झाली. आपली इच्छा पुरी व्हावी म्हणून श्री.रामप्रसादने घोर तपश्चर्या सुरू केली. त्याच्या दृढनिश्चयामुळे व श्रीभगवत्कृपेने थोड्याच दिवसात एक अमूल्य चिंतामणी त्याला प्राप्त झाला. परंतु एखाद्या अत्यंत पामर व दीनदरिद्री पुरुषाला अकस्मात् संपत्ती प्राप्त झाली किंवा राज्य मिळाले तर त्याची त्याविषयी खात्री नसते. आपल्याला खरोखरच चिंतामणी मिळाला असेल का? हा प्रश्न त्याला वारंवार भेडसावू लागला. त्यामुळे श्री.रामप्रसादचा त्या श्रेष्ठ अशा चिंतामणी-विषयी पक्का निश्चय होईना. हा चिंतामणीच नव्हे असे त्याला वाटू लागले.

या विचारांमुळे श्री.रामप्रसादचे मन भ्रांत बनले. त्याने प्राप्त झालेल्या त्या चिंतामणीची उपेक्षा केली. त्याच्या एका मनाला मधून मधून थोडा वेळ असे वाटे की, अमूल्य असा चिंतामणी आपल्याला प्राप्त झाला असावा; परंतु त्याचे दुसरे मन म्हणत असे, छे ! हा चिंतामणी खासच नव्हे. माझ्या इतक्याशा थोड्या तपश्चर्येने हा मणी मला प्रत्यक्ष दिसणे शक्यच नाही.

अशा विचारांच्या द्विधा अवस्थेत मन सापडले असता हा खरोखरीचा अस्सल चिंतामणी आहे की नाही याचे मणी हातात घेऊन परीक्षण करावे असे श्री.रामप्रसादला वाटले. परंतु त्या मण्याला स्पर्श करणे त्याला बरे वाटेना. याला जर आपण स्पर्श केला तर आपल्या अभाग्याच्या स्पर्शाने हा गुप्त होईल असे वाटून तो नुसता त्या मण्याकडे पाहत राहिला.

एवढ्याशा थोड्या कालात चिंतामणी सिद्ध होणे शक्य दिसत नाही असा विचार शेवटी प्रबळ होऊन पुन्हा अनेक संशय त्याच्या मनात आले. "इतिहासाकडे पाहिले तर मरेपर्यंत जेव्हा प्रयत्न करावा तेव्हाच चिंतामणी प्राप्त होतो असे दिसून येते. या रत्नाला एवढा प्रकाश आहे खरा पण कृपणता, भ्रांती, द्विधा मनःस्थिती व संशय यामुळे मला तो खोटा वाटत आहे. एखाद्या माणसाला दृष्टिदोषामुळे जसे दोन चंद्र दिसतात, त्याप्रमाणे मला हा चिंतामणी दिसत आहे. माझे भाग्य मोठे नाही. तपश्चर्या तीव्र नाही. दैव बलवत्तर नाही. पूर्वजन्मीचे खूप पुण्य नाही. अशा परिस्थितीत मला सर्वसिद्धी देणारा श्रेष्ठ चिंतामणी प्राप्त होईलच कसा? ज्यांना थोड्याच काळात अल्प प्रयत्नाने संपत्ती मिळते असे महाभाग्यशाली महात्मे या भूतलावर काही थोडेच असतील! मी अगदी दुर्बल मनुष्य आहे, तेव्हा मला अभाग्याला अशी सिद्धी कशी मिळणार?"

अशा प्रकारच्या संकल्प-विकल्पात श्री.रामप्रसादाचा बराच वेळ निघून गेला. शेवटी संभ्रमाने व अज्ञानाने मोहित झाल्याने श्री.राम-प्रसादाने तो मणी उचलून घेण्याचा साधा प्रयत्न सुद्धा केला नाही.

त्याने प्राप्त झालेला तो चिंतामणी दुर्बुद्धीने व अनादराने टाकून दिला. या मूर्खाने आपल्याला अनादराने टाकून दिले आहे असे पाहून तो चिंतामणी तेथून अंतर्धान पावला.

चिंतामणी निघून गेल्यावर आता खरा चिंतामणी आपल्याला प्राप्त व्हावा या इच्छेने श्री.रामप्रसादाने पुन्हा तपश्चर्येस प्रारंभ केला. खरा चिंतामणी सोडून पुन्हा चिंतामणीसाठी तप करणाऱ्या त्या ब्राह्मणाला पाहून काही थट्टेखोर श्री.सिद्धांनी रामप्रसादाच्या दृष्टीला न पडता हळूच एक चकचकीत काचेचा तुकडा त्याच्या पुढे ठेवला. ध्यानाच्या शेवटी श्री.रामप्रसादाला तो चमकणारा काचेचा तुकडा दिसला. त्याला वाटले इतके दिवस आपण जी तपश्चर्या केली ती फळाला आली. ज्या दुर्लभ व अमूल्य वस्तूची आपण इतके दिवस इच्छा करीत होतो ती वस्तू श्रीभगवंताच्या कृपेने आपल्याला मिळाली. श्री.रामप्रसादला परमानंद झाला.

अत्यानंदाने व हर्षातिरेकाने श्री.रामप्रसादने तो काचेचा तुकडा घेतला. तो घरी आला. काचेच्या तुकड्यालाच चिंतामणी समजून श्री.रामप्रसाद राहू लागला. पुढे पुढे त्याला असे वाटू लागले की, आपल्या सर्व इच्छा, आशा व आकांक्षा या चिंतामणीमुळेच पूर्ण होऊन सर्व अडचणी दूर होतील.

या विचाराने श्री.रामप्रसादने आपली सर्व मालमत्ता विकून टाकून तो दूर ठिकाणी निघून गेला. श्री.रामप्रसाद विश्वासाने निघून गेला खरा; पण त्याच्या दुःखाला व दुर्दशेला सीमा राहिली नाही. या परिस्थितीमुळे हा चिंतामणी नसून काचेचा तुकडा आहे याची खात्री पटून त्याने तो काचेचा तुकडा फेकून दिला."

शक्तिपाताचे साधन करणाऱ्या काही नवीन साधकांची स्थितीही वरील गोष्टीतील ब्राह्मणाप्रमाणेच होते. पूर्वजन्मीच्या बलवत्तर पुण्याईने, भाग्य उदयास आल्याने व कर्मसाम्यदशा प्राप्त झाल्याने थोड्याशा प्रयत्नाने ईश्वरी कृपा होऊन साधकाची सद्गुरूशी गाठ पडून त्याला शक्तिपातासारखे दुर्लभ साधन प्राप्त होते; परंतु हे दुर्लभ साधन

सहजासहजी मिळाल्याने त्याचे विशेष महत्त्व व त्याची श्रेष्ठता साधकाला जाणवत नाही. अशा वेळी साधकाने हृदयाच्या कसोटीवर साधनाला पारखून आपल्याला सोने मिळाले की पितळ हे साक्षेपाने पाहिले पाहिजे. आपण चिंतामणीचे स्वामी आहोत की, काचेचे याची परीक्षा त्याने केली पाहिजे. साधना नियमित करून श्रीगुरुवाक्य व शास्त्रवाक्य यांच्याशी आपली अनुभूती जुळते की नाही हे अवश्य पाहिले पाहिजे. जर श्रीगुरुवाक्य, शास्त्रवाक्य व स्वतःचा अनुभव या तीनही गोष्टी बरोबर जुळल्या तर साधन-तत्त्वासंबंधी कोणताही संशय मनात ठेवता उपयोगी नाही.

जादूटोण्याने किंवा संमोहन विद्येच्या जोरावर एखाद्याने काही काळ माणसाला झुलविले तरी फार काळ त्याचा प्रभाव राहणार नाही. या साधनाने मिळणारा आनंद, प्रचीती व ब्रह्मप्राप्ती ही जादूटोण्याने किंवा संमोहन विद्येच्या प्रभावाने कदापीही मिळणार नाही. संमोहनामुळे तत्कालिक भ्रम पडेल; पण निरंतर सुख कसे मिळेल?

सारांश, शक्तिपातयोग म्हणजे मायाजाल, जादूटोणा किंवा संमोहन विद्या नव्हे. अशा प्रकारे शक्तिजागृती करणारे श्रीसद्गुरू जादूगारही नव्हेत; तर आदिगुरू श्रीशंकरांपासून शिष्यपरंपरेने हे महायोगाचे ऐश्वर्य चालत आलेले असून ते महद्भाग्याने आपणास प्राप्त झालेले आहे याची निरंतर जाणीव अंतःकरणात बाळगून साधकांनी निःशंक होऊन साधन केले पाहिजे.

**दुसरी शंका :-**

नवीन साधकांच्या मनात दुसरी शंका नेहमी अशी येते की, ईश्वरप्राप्ती करून देण्याइतके हे साधन खरोखरीच अपूर्व आहे का? मनःशांती प्राप्त करून देण्याचे अद्वितीय सामर्थ्य या साधनात आहे का? ज्या ध्येयाने आपण वेडे झालो त्या ध्येयाप्रत सहजसुलभतेने पोहोचू शकू इतके हे साधन अद्वितीय असेल का? ब्रह्मज्ञान होण्यासाठी हे साधन अमूल्य ठरेल का?

**उत्तर :-**

नवीन साधक ध्येयसिद्धीसाठी उतावीळ झालेला असतो. त्यामुळे त्याच्या मनात वरील प्रकारच्या शंका सतत येत राहतात. या दृष्टीने पुढील कथा अत्यंत बोधकारक ठरेल.

श्री.शंकरप्रसाद नावाचा एक श्रद्धाळू भक्त होता. तो लहानपणापासून ईश्वराची भक्ती करीत असे. तो जेव्हा मोठा झाला तेव्हा त्याची एका साधूशी गाठ पडली. तो साधू फार मोठा महात्मा होता. त्या साधूने खूप वर्षे एकांतात राहून तपश्चर्या केली होती. त्यामुळे त्याला ईश्वरी साक्षात्कार झाला होता. साक्षात्काराचे तेज त्याच्या सर्वांगावर झळकत असे.

श्री.शंकरप्रसादला ईश्वरी साक्षात्काराची फार तळमळ लागली होती. साधूशी गाठ पडल्यावर त्याने त्याची खूप दिवस उत्तम प्रकारे सेवा केली. हळूहळू सेवेमुळे श्री.शंकरप्रसादचे दोष दूर होऊ लागले. तो सत्त्वगुणसंपन्न बनू लागला. त्याची श्रीगुरुभक्ती अधिकाधिक दृढ होत गेली. श्रद्धा वृद्धिंगत झाली. कुतार्किकपणा नाहीसा झाला. आळस झडून गेला. शास्त्रवचनावर विश्वास बसला. काम, क्रोध, लोभ, मोह, मद व मत्सर हे षड्रिपू ताब्यात आले. घृणा व द्वेष हे दुष्ट भाव जाऊन चित्त सरळ, शांत व मृदू बनले. संतांविषयी व भगवद्भक्तांविषयी त्याच्या मनात गाढ प्रीती उत्पन्न झाली. अंगी तितिक्षा बाणली. ब्रह्मज्ञान होऊन मोक्षप्राप्ती लवकर व्हावी यासाठी त्याचे अंतःकरण तळमळू लागले.

श्री.शंकरप्रसादची तळमळ शिगेला पोहोचली. एक दिवस त्याने साधूचे चरण घट्ट पकडले. "माझा आपण उद्धार करावा व जन्ममरणाच्या फेऱ्यातून मला सोडवावे," अशी त्याने साधूची प्रार्थना केली. त्याच्या प्रार्थनेने महात्मा प्रसन्न झाले. श्री.शंकरप्रसाद मोक्षाचा आता अधिकारी झाला हे त्याने जाणले.

एके दिवशी साधूने श्री.शंकरप्रसादला असे सांगितले की, "उद्या दिवस उत्तम आहे. अमृतसिद्धी योग आहे. उद्या दीक्षाविधी होईल.

तेव्हा सकाळी लवकर उठून श्रीगंगास्नान करून एक हार व नारळ घेऊन तू ये." श्रीगुरुमहाराजांच्या या आज्ञेने श्री.शंकरप्रसादाचे डोळे भरून आले. त्याला खूप खूप आनंद झाला. साधुमहाराजांना प्रणाम करून तो घरी आला.

दुसऱ्या दिवशी सकाळी श्रीगंगास्नान करून श्री.शंकरप्रसाद नारळ व हार घेऊन श्रीगुरुमहाराजांकडे गेला. साधूने प्रथम आपल्या श्रीगुरुमहाराजांच्या प्रतिमेपुढे नारळ ठेवून नंतर हार अर्पण करण्यास श्री.शंकरप्रसादला सांगितले. त्याप्रमाणे त्याने केले. नंतर त्याने साधुमहाराजांना साष्टांग प्रणिपात घातला.

साधूने श्री.शंकरप्रसादला आपल्या समोर बसवून घेतले. ते त्याला म्हणाले की, "मी तुला आता जो मंत्र सांगणार आहे तो अत्यंत श्रेष्ठ आहे. तो नेहमी गुप्त ठेवला पाहिजे. या अमूल्य मंत्राचे माहात्म्य फारच थोड्या लोकांना माहीत आहे. तू हा मंत्र कधीही कोणाला सांगू नकोस. रोज सकाळ संध्याकाळ साधी मांडी घालून एका आसनावर डोळे मिटून बसत जा. श्वास आत घेताना एकदा व श्वास बाहेर सोडताना एकदा मानसिक रीतीने उच्चार करून हा जप करीत जा."

एवढे सांगून साधूमहाराजांनी "राम" या महामंत्राची श्री.शंकरप्रसादला शक्तिपातपूर्वक दीक्षा दिली. मंत्र कानात शिरल्याबरोबर त्याच्या ठिकाणी अष्टसात्त्विक भाव जागृत झाले. वृत्ती स्थिर झाली. आनंदाच्या उर्मी अंतःकरणात उसळू लागल्या. अशा रीतीने त्याला साधनात निरनिराळे अनुभव येऊ लागले.

एक दिवस श्री.शंकरप्रसाद श्रीगंगास्नान करून घरी परत येत होता. इतक्यात त्याच्या असे लक्षात आले की, आपल्याप्रमाणेच कित्येक लोक श्रीगंगेचे स्नान करून "राम" मंत्राचा जोरजोराने जप करीत चालले आहेत. अशा प्रकारे श्रीगंगास्नान करून रोजच लोक नामस्मरण करीत जात असत. परंतु रोज हे पाहत व ऐकत असूनही त्याचे लक्ष कधी विशेष तिकडे गेले नव्हते. त्या दिवशी त्या लोकांकडे त्याचे लक्ष गेल्यावर त्याच्या मनात असा संशय आला की,

श्रीगुरुमहाराजांनी सांगितले होते की, "मी तुला जो मंत्र सांगितला आहे तो अत्यंत गुप्त आहे. त्याचे सामर्थ्य फार अलौकिक आहे. त्याचे खरे माहात्म्य फारच थोड्या लोकांना माहीत आहे." परंतु हा मंत्र तर सर्वांनाच माहीत आहे. हजारो लोक राम राम अशी गर्जना करीत चालले आहेत.

या विचाराने श्री.शंकरप्रसाद अस्वस्थ झाला. त्या दिवशी तो घरी न जाता सरळ श्रीगुरुदेवांकडे गेला. त्याला अवेळी आलेला पाहून श्रीगुरुदेव असे म्हणाले की, "अरे! तू यावेळी इकडे कसा आलास?" त्यावर श्री.शंकरप्रसाद असे म्हणाला की, "महाराज! माझ्या मनात जो संशय आला त्यामुळे मी बैचेन झालो आहे. संशयाची निवृत्ती झाल्याशिवाय बरे वाटेना, म्हणून तत्काळ आपल्याकडे आलो. आपण माझा संशय अवश्य दूर करावा."

श्रीगुरुदेवांनी श्री.शंकरप्रसादच्या मनातील शंका ओळखली. ते त्याला असे म्हणाले की, "तुझ्या प्रश्नाचे उत्तर मी मागाहून देईन. प्रथम तू माझे एक काम कर. "असे म्हणून श्रीगुरुदेवांनी आपल्या झोळीत हात घातला व काचेसारखी एक मोठी गोटी बाहेर काढली. ती चकाकत होती. पाहाता क्षणीच मोह पडावा इतकी ती वस्तू आकर्षक होती. ती वस्तू श्री.शंकरप्रसादच्या हातात देत श्रीगुरुदेव असे म्हणाले की, "ही वस्तू घेऊन तू बाजारात जा. त्याची खरी किंमत काय असेल ते पाहून परत ये. वस्तू विकू मात्र नकोस. फसू नकोस. सावध राहून वस्तूची काळजी घे."

श्रीगुरुदेव आपल्या प्रश्नाचे उत्तर न देता काचेच्या गोटीची किंमत करण्यासाठी आपल्याला बाजारात पाठवीत आहेत हे पाहून त्याला आश्चर्यच वाटले; परंतु तो आज्ञाधारक व श्रद्धाळू होता. त्याने आपला प्रश्न तेथेच सोडून दिला व तो श्रीगुरूंच्या कामासाठी बाहेर पडला.

बाजारात गेल्यावर पहिल्या प्रथम त्याला रस्त्यावर भाजी विकणारी एक बाई भेटली. त्याने तिला आपल्या जवळील चकचकीत वस्तू

दाखविली व असे विचारले की, "ह्याची तू मला किती किंमत देशील? भाजीवालीने ती चकाकणारी काचेची गोटी पाहून विचार केला, "आपल्या मुलांना खेळावयास ही वस्तू बरी आहे. बाजारात इतकी सुंदर काचेची गोटी आपणास कधीच मिळणार नाही." त्यामुळे ती "या वस्तूच्या बदल्यात मी तुला दोन शेर बटाटे व दोन शेर वांगी देईन," असे म्हणाली.

श्री.शंकरप्रसाद पुढे गेला. त्याला एक सोनाराचे दुकान लागले. तेथे तो थांबला. त्याने सोनाराला आपल्या जवळील वस्तू दाखविली. त्याची किंमत किती होईल म्हणून त्याने विचारले. सोनाराने वस्तू हातात घेऊन वरखाली करून पाहिली. हा बहुतेक नकली हिरा असावा असे समजून त्याने १०० रु. किंमत सांगितली.

वस्तूची किंमत वाढू लागल्याने श्री.शंकरप्रसादला आश्चर्य वाटले. तो आणखी पुढे गेला. त्याला एक सराफी दुकान लागले. सराफाने श्री.शंकरप्रसादची वस्तू पाहिली. परीक्षा केली. ही सामान्य काचेची गोटी नसून एक अप्रतिम हिरा असल्याबद्दल त्याची खात्री पटली. मात्र त्याने इतका मोठा सुंदर हिरा उभ्या आयुष्यात पाहिला नव्हता. त्यामुळे त्याच्या मनांत किंचित् संदेह उत्पन्न झाला. शेवटी त्याने श्री.शंकरप्रसादला त्या हिऱ्याची किंमत एक लाख रुपये सांगितली.

श्री.शंकरप्रसादचे कुतूहल आणखी जागृत झाले. त्याने पुढे आघाडी मारली. जेव्हा तो श्रीगुरुदेवांकडून निघाला तेव्हा त्यालाही ती काचेचीच वस्तू वाटत होती. परंतु जसजशी त्या वस्तूची किंमत वाढत गेली तसतसे त्याचे साहसही वाढत गेले. त्यामुळे सर्वात मोठ्या सराफी दुकानात तो गेला. त्याने सराफाला तो हिरा दाखविला. ते अद्वितीय रत्न पाहून दुकानदार चकित झाला. त्याने श्री.शंकरप्रसादला सांगितले की, "आपल्या देशातील सर्व संपत्ती एकत्रित केली तरी या हिऱ्याचे मूल्य पूर्ण होऊ शकणार नाही. हे अपूर्व असे रत्न आहे."

आता या रत्नाची किंमत कोणीही करू शकणार नाही याची खात्री श्री.शंकरप्रसादला झाली. तो श्रीगुरुदेवांकडे परत आला.

त्याने श्रीगुरुदेवांना सर्व हकीकत सांगितली व तो त्यांना असे म्हणाला की, "आपण दिलेल्या वस्तूची किंमत कोणीही करू शकत नाही." इतके सांगून श्री.शंकरप्रसादने श्रीगुरुदेवांकडे तो हिरा परत दिला. श्रीगुरुदेवांनी तो आपल्या झोळीत ठेवून दिला."

त्यानंतर श्री.शंकरप्रसादने श्रीगुरुदेवांना असे विचारले की, "प्रभो! आपण माझी शंका आता दूर करावी!" श्रीगुरुदेव त्याला असे म्हणाले की, "मी उदाहरणासहित तुझ्या शंकेचे निवारण केले. तुझ्या ते लक्षात आलेले दिसत नाही. पुन्हा तुला समजावून देतो. या रत्नाची किंमत करतानाच तुझी शंका दूर व्हावयास पाहिजे होती. तुला दिलेली वस्तू काचेची गोटी नसून एक अमूल्य हिरा होता. त्याची खरी किंमत शेवटी फक्त एका सराफालाच कळू शकली. दुसऱ्या कुणाला त्या वस्तूची साधी ओळख सुद्धा झाली नाही. जर तुला मी हा हिरा विकण्याची परवानगी दिली असती तर तू दोन शेर बटाट्याच्या मोबदल्यात तो विकून टाकला असतास. पुढे जाऊन साधी चौकशीही केली नसतीस. अमूल्य हिरा कवडीमोल भावाने गेला असता. याच दृष्टिकोनातून पाहा म्हणजे तुला दिलेले साधन किती अमूल्य आहे हे कळेल. सामान्य माणसाला या साधनाची किंमत कधीही कळणार नाही. वस्तू हातात असूनही जोपर्यंत त्याची खरी ओळख पटत नाही तोपर्यंत त्याचा अस्सलपणा व दर्जा गुप्तच राहतो."

सारांश, श्री.शंकरप्रसाद ज्याप्रमाणे हिऱ्याला काचेचा तुकडा समजत होता त्याप्रमाणे शक्तिपातयोगाचे साधन करणाऱ्या नवीन साधकालाही अनुभवाशिवाय या साधनाची किंमत कळत नाही. साधकाने सकाळ संध्याकाळ दृढपणे साधन केले म्हणजे हळूहळू त्याचे मन शांत होऊ लागते. वृत्ती स्थिर होऊ लागतात. ध्येयसिद्धीच्या मार्गावर साधक अग्रेसर होऊ लागतो. श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी तर या साधनाबद्दल अशी खात्री दिली आहे की -

**इये अभ्यासीं जे दृढ होती।**
**ते भरंवसेनि ब्रह्मत्वा येती।। श्रीज्ञानेश्वरी ६.३३०।।**

शेवटी श्रीकबीरांनी म्हटले आहे तेच खरे आहे,

**हीरा पडा बाजारमें रहा धूल लपटाय।**
**बहुतक मुरख चलि गये पारखि लिया उठाय।।**

**तिसरी शंका :-**

नवीन साधकाला काही काही वेळेला असा प्रश्न पडतो की, शक्तिपात जर एकच आहे तर त्याच्या फलात व परिणामात भिन्नता का दिसून येते? शास्त्रात शक्तिपाताचे सर्वात मोठे माहात्म्य सांगितले आहे तर आपल्याला एकदम सर्व फल का प्राप्त होत नाही? श्रीसद्गुरूंनी केलेल्या मूळ अनुग्रहातच तरतमभाव व पृथकता का दिसून येते? मन एकदम निर्विकार का होत नाही? चित्तवृत्तींचा निरोध होऊन समाधी सुख लगेच का मिळत नाही? भक्ती त्वरित का वाढत नाही? ब्रह्मज्ञान तत्काल का होत नाही?

**उत्तर :-** जोपर्यंत शक्ती जागृत होऊन मनुष्याची शिवत्वाकडे वाटचाल सुरू होत नाही तोपर्यंत मनुष्य मनुष्याच्या रूपाने दिसत असूनसुद्धा प्रकृतीच्या दृष्टीने पशूच्याशिवाय दुसरे काहीही असत नाही. कुंडलिनी शक्तीचे जागरण व त्याच्या जोरावर शिवत्वाचा विकास करणे हा पशुत्वनिवृत्तीचा एकमात्र उपाय आहे. परंतु हे कुंडलिनी शक्तीचे जागरण सर्वांचे एकसारखे होत नाही. जरी श्रीसद्गुरू साक्षात् भगवच्छक्तिसंपन्न असले तरी शिष्याची पात्रता किती, त्याच्या शरीराचे व मनाचे सामर्थ्य किती आणि आधार किती बलवान् आहे हे पाहणे महत्त्वाचे आहे; कारण श्रीसद्गुरूंनी शिष्यामध्ये संचारित केलेल्या शक्तीची फलप्राप्ती वरील गोष्टींवरच अवलंबून असते. ज्या शिष्याला जितकी शक्ती धारण करता येणे शक्य असते त्याच्या ठिकाणी श्रीसद्गुरू अधिक शक्तीचा संचार करीत नाहीत आणि कमी शक्तीचाही संचार करीत नाहीत. शिष्याची पात्रता अगदी सामान्य असेल व आधार अगदी दुर्बल असेल तर कुंडलिनीचे उत्थान अगदी किंचित् स्वरूपात होते. मग साधक आपण स्वतः अभ्यास करून शक्तीचा विकास करून घेऊन पुढे जातो. अशा प्रकारे साधकाच्या आतून व बाहेरून

जागृत चैतन्यशक्तीचा विकास होत जातो. जसाजसा शक्तीचा हळूहळू विकास होतो तसतसे त्याचे सर्व संस्कार नाहीसे होऊन पशुत्वाचे बीज नाहीसे होते व दिव्यज्ञानाचा उदय होऊ लागतो. या दृष्टीने पुढील दोन दृष्टान्त पाहण्यासारखे आहेत.

**दोन दृष्टान्त :-**

श्रीसंततुकाराममहाराजांनी आपल्या एका अभंगात असे म्हटले आहे की, "**भूमी पाहतां नाहीं वेगळी। माळ बरड एक काळी। उत्तम निराळी। मध्यम आणि कनिष्ठ।।**" म्हणजे तत्त्वतः विचार केला तर सर्व जमीन एकच आहे. तीत भेद नाही. पण व्यवहार दृष्टीने माळ जमीन कनिष्ठ, बरड जमीन मध्यम व काळी जमीन उत्तम असा भेद दिसून येतो. त्यामुळे पाऊस सर्व जमिनीवर सारखा पडत असला तरी जमिनीच्या प्रतिप्रमाणे त्यात येणाऱ्या पिकाचा दर्जा व प्रमाणही बदलत जाते. त्याचप्रमाणे श्रीसद्गुरू सर्व साधकांवर समान अनुग्रह करतात. परंतु साधकाची जितकी पात्रता असेल तितकेच तो ग्रहण करू शकतो. अर्थात् माळ व बरड जमिनीवर खूप मेहनत घेतली म्हणजे ज्याप्रमाणे तिचा दर्जा सुधारून तिच्या पिकाच्या प्रमाणात फरक पडतो त्याचप्रमाणे साधकाने साधनाभ्यास दीर्घकाल, खंड न पाडता निरंतर व अत्यंत श्रद्धाभक्तिआदरपूर्वक केला म्हणजे शक्तीचा विकास हळूहळू निश्चितपणे होत जातो. मात्र योगसूत्रकार महर्षी श्रीपतंजलींनी लिहिल्याप्रमाणे "**मृदुमध्याधिमात्रत्वात् ततोऽपि विशेषः।। समाधिपाद १.२२।।**" म्हणजे साधनेतील मंद, मध्यम व उत्कट प्रयत्नांच्या अनुसार साधकांना प्राप्त होण्याऱ्या यशामध्येही फरक पडतो हे नेहमी लक्षात ठेवण्यासारखे आहे. यादृष्टीने "**श्रीगुरु-चरित्रातील**" पुढील ओव्या पाहण्यासारख्या आहेत.

**तो (गुरू) दातार अखिल महीं। जैसा मेघाचा गुण पाही।**
**पर्जन्य पडतो सर्वां ठायीं। कृपामूर्ती ऐसा असे।।३.३१।।**
**त्यांतचि पाही पात्रानुसार। सांगेन साक्षी एक थोर।**
**सखोल भूमी उदक स्थिर। उन्नती उदक नाहीं जाणा।।३.३२।।**

**दृढ भक्ती जैसी सखोल भूमी। दांभिक जाणावी उन्नत तुम्ही।**
**याची कारणें मनोवाक्कर्मीं। निश्चयावें श्रीगुरूसीं।।३.३३।।**

गोडेतेल, घासलेट व पेट्रोल या तेलांच्या दिव्यांच्या वातीजवळ पेटलेली काडी नेली म्हणजे पेट्रोलच्या दिव्याची वात काडीचा अग्नी स्वत:कडे ओढून घेऊन तत्काल पेट घेते. घासलेट तेलाच्या दिव्याच्या वातीवर काडी ठेवली म्हणजे ती पेटते. गोड्या तेलाच्या दिव्याच्या वातीवर पेटलेली काडी काही काळ धरली म्हणजे ती पेट घेते. तिन्ही तेलांची पेट घेण्याची शक्ती भिन्न असल्याने वरील फरक दिसून येतो. त्याचप्रमाणे उत्तम दर्जाचा साधक श्रीसद्गुरूंच्या संपर्कात आला की, तो श्रीसद्गुरूंपांसून शक्ती खेचून घेतो. त्याच्या ठिकाणी शक्तिसंक्रमण सहज घडून येते. मध्यम दर्जाच्या साधकाची थोड्या कालाने व थोड्या प्रयत्नाने शक्ती जागृत होते. मात्र सामान्य दर्जाच्या साधकाची शक्ती खूप उशिरा व खूप प्रयत्न केल्यावर जागृत होते.

**एक अपूर्व उदाहरण :-**

या दृष्टीने एक अपूर्व उदाहरण पाहण्यासारखे आहे. श्रीतोतापुरीमहाराज हे श्रीरामकृष्ण परमहंस यांचे श्रीसद्गुरू होते. त्यांच्याजवळ ध्यानाचा अभ्यास करीत असता श्रीरामकृष्ण परमहंस एकदा निराश होऊन श्रीतोतापुरीमहाराजांना असे म्हणाले की, "माझे मन पूर्णपणे निर्विकल्प होत नाही; काय करू?" त्याबरोबर "होत नाही म्हणजे काय?" असे म्हणून श्रीतोतापुरीमहाराजांनी एक काचेचा तुकडा शोधून काढला. त्याचे सुईसारखे तीक्ष्ण टोक श्रीरामकृष्णांच्या कपाळावर दोन्ही भुवयांमध्ये जोराने टोचले. त्याबरोबर श्रीरामकृष्णांची समाधी लागली. ती पुढे तीन दिवस टिकली.

श्रीरामकृष्णांना अशा प्रकारे समाधी लागताच श्रीतोतापुरीमहाराज उद्गारले, "ही खरोखरच एक अपूर्व गोष्ट आहे. जी गोष्ट साध्य करून घेण्याला मला चाळीस वर्षे सतत परिश्रम करावे लागले ती गोष्ट या महापुरुषाने तीनच दिवसात साध्य करून घेतली."

**तरतमभावाचा हेतू काय ? :-**

शिष्याला शक्तिपाताची दीक्षा मिळाल्यावर जी भिन्नता अगर तरतमभाव दिसून येतो त्याचा हेतू काय असावा हा प्रश्नही महत्त्वाचा आहे. तरतमभावाचा खरा हेतू असा आहे की, साधारण देहाभिमानी जो जीव असतो तो प्रत्यक्ष भगवच्छक्ती ग्रहण करू शकत नाही; कारण की, भगवंताची साक्षात् शक्ती अत्यंत तीव्र असते. ती सहन करणे अत्यंत कठीण आहे. मग ती धारण करणे ही फार दूरची गोष्ट होय. यामुळे महर्षी श्रीनारदांनी आपल्या "**भक्तिसूत्रात,**" "**प्रकाश्यते क्वापि पात्रे।।५३।।**" असे म्हटले आहे. श्रीभगवंताचे अनिर्वचनीय प्रेम, शक्ती व सामर्थ्य योग्य अशा श्रीभगवंताच्या कृपेला पात्र झालेल्या भाग्यवानाच्या ठिकाणी दिसून येते. श्रीचैतन्यमहाप्रभूंना श्रीईश्वरपुरींनी मंत्रदीक्षा दिल्यावर त्यांच्या ठिकाणी प्रेमाचा व शक्तीचा जो दिव्य स्रोत प्रगट झाला तो सामान्य जीवाला कसा सहन झाला असता? श्रीप्रभुदत्त ब्रह्मचारी यांनी लिहिलेल्या "**श्रीचैतन्य चरितावली**" खंड १ मध्ये त्यांच्या प्रेमोन्मादाचे वर्णन करताना असे म्हटले आहे की,

**"महाप्रभु श्रीचैतन्य देवका प्रेम दिव्यही था। उनकी हृदय-कंदारसे जो भक्तिभावका भव्य स्रोत उदित हो गया, वह फिर सदा उत्तरोत्तर बढता ही गया। उनकी हृदय-कंदारसे उत्पन्न हुई भक्तिभागीरथीकी धारा सावन-भादोंकी क्षुद्र नदी की भाँती नहीं थी जो थोडे समय के लिये तो खूब इठलाकर चलती है और जेठमासकी तेजधूप पडतेही सूख जाती है। उनके हृदयसे उत्पन्न हुई प्रेम सरिता की धारा सदा बहकर समुद्रमेंही जाकर मिलनेवाली स्थायी थी। उसमें कमी का क्या काम? वह तो उत्तरोत्तर बढनेवाली अलौकिक और अनुपम धारा थी, उसकी उपमा इन संसारी धाराओंसे दी ही नहीं जा सकती, वह तो अनुभवगम्य ही है।"**

**"महाप्रभु जबसे मंत्रदीक्षा लेकर गयासे लौट आये तभीसे उनकी विचित्र दशा हो गयी हैं। वे भोजन करते-करते सहसा बीचमेंही उठकर रुदन करने लगते हैं। रास्ता चलते-चलते पागलोंकी भाँती**

**नृत्य करने लगते हैं। शय्यापर लेटे लेटे सहसा उठकर बैठ जाते हैं और हा कृष्ण! हा कृष्ण! कहकर जोरोंसे चिल्लाने लगते हैं। कभी-कभी लोगोंसे बातें करते-करते बीचमेंही जोरोंसे ठहाका मारकर हँसने लगते हैं। रातभर सोनेका नाम नहीं। लंबी लंबी साँसें लेते रहते हैं, अधीर होकर अत्यंत विरहीकी भाँती हिचकियाँ भरते रहते हैं। और उनके नेत्रोंसे इतना जल निकलता है की सम्पूर्ण वस्त्र गीले हो जाते हैं।"(पृ.२७२)**

तरतमभावाचा दुसरा हेतू असा आहे की, शिष्याचे-साधकाचे कोणत्याही प्रकारे अकल्याण होऊ नये. जीवाचे-साधकाचे-अंतिम कल्याण करणे हाच शक्तिपाताचा हेतू असल्याने श्रीसद्गुरूंनी दीक्षा दिल्यावर शक्ती स्वतःच शिष्याची पात्रापात्रता व योग्यायोग्यता पाहून त्या प्रमाणात प्रकट होत असते. शक्ती ही माता आहे. आई ही बालकाचे हित व अहित कशात आहे हे पूर्ण जाणून असते. बालकाला कोणत्या वेळेस कोणती गोष्ट किती प्रमाणात द्यावयाची हे ठरवून ती त्याच्या हिताची रात्रंदिवस चिंता वाहून बालकाचे संगोपन करते. त्याचप्रमाणे शक्ती ही साधकाला जी गोष्ट ज्या प्रमाणात व ज्या पद्धतीने सहन होईल त्या प्रमाणात व त्या पद्धतीने ती देऊन त्याची प्रगती घडवून आणते. साधकाला शिवत्वाच्या गंतव्य स्थानापर्यंत शक्ती घेऊन जात असल्याने कमी जास्त प्रमाण करणे व तरमभाव दाखविणे क्रमप्राप्त व अपरिहार्य असते. या क्रमविकासामुळे मनाची निर्विचार स्थिती येण्यास उशीर लागतो व चित्तवृत्तीचा निरोधही लवकर होत नाही.

**भोगेच्छू फलार्थी व निस्वार्थी मुमुक्षू :-**

शक्तिपात एकच व निरपेक्ष असूनसुद्धा त्यात तरतमभाव, भिन्नता व वैचित्र्य दिसून येते. त्यामुळे शास्त्रात सांगितलेली फळे साधकाला एकदम प्राप्त होत नाहीत; कारण प्रत्येक अनुग्रहपात्र जीवाच्या चित्तात किंवा आधारात विषमता दिसून येते. जे निःस्वार्थी मुमुक्षू असतात त्यांच्या ठिकाणी शक्तिपाताच्या माहात्म्याने भगवद्भक्तीचा उदय होतो.

अशा व्यक्तींच्या ठिकाणी फलाकांक्षा नसल्याने कुल, जाती, देह, कर्म, वय, अनुष्ठान इत्यादि गोष्टींचा प्रश्नच येत नाही. अशा मुमुक्षूंच्या ठिकाणीच शक्तिपाताची उत्कृष्ट अवस्था दृष्टीस पडते आणि या शक्तीच्या प्रभावामुळे चिदात्मा अंतःकरणात प्रकाशित होतो.मात्र आधार निष्काम नसेल म्हणजे साधक जर भोगेच्छू व फलार्थी असेल तर ही गोष्ट साध्य होत नाही. जे फलाची इच्छा करणारे असतात त्यांना अनुग्रहप्राप्तीच्या प्रभावाने भक्ती प्राप्त होत असली तरी फलार्थी लोक भोगेच्छू असल्याने त्यांची भक्ती मुमुक्षूंच्या भक्तीसारखी निरपेक्ष असत नाही. या फलार्थी साधकांना कर्मादि गोष्टींची आवश्यकता सतत भासत राहते. खरे पाहता हा शक्तिपाताचा अगदी खालचा दर्जा आहे. हा शक्तिपात पहिल्या शक्तिपातासारखा अनवच्छिन्न असत नाही; कारण साधकाच्या भोगाकांक्षेमुळे त्याला मर्यादा पडतात. अर्थात् नियमित साधनाने अशा साधकांनाही पूर्ण अवस्था निश्चित प्राप्त होते.

**भोगाकांक्षेमुळे अडथळा :-**

वरील सर्व विवेचनावरून हे स्पष्ट दिसून येते की, ज्याला कोणाला शक्तिपातयोगाचा अनुग्रह प्राप्त होतो त्याच्या बाबतीत हे निश्चित मानावे लागते की, केव्हा ना केव्हा तरी त्याला भगवच्चरणांची प्राप्ती अवश्य होते. ही प्राप्ती लवकर होईल का उशिरा हा प्रश्न सर्वस्वी भिन्न आहे. परंतु जे निष्काम आहेत, भोगाकांक्षेपासून अलिप्त आहेत आणि मुमुक्षू आहेत तेच भगवच्छक्ती धारण करण्यास सर्वोत्तम अधिकारी असतात. अशा साधकांना पूर्णत्व प्राप्त करण्यासाठी कालक्षेप करावा लागत नाही. परंतु ज्या व्यक्तीच्या ठिकाणी भोग, इच्छा, आकांक्षा, वासना, तृष्णा इत्यादि गोष्टी जोपर्यंत शिल्लक राहतात व त्यांची पूर्णपणे निवृत्ती होत नाही तोपर्यंत पूर्णत्वाची प्राप्ती होत नाही. काही दुसऱ्या उपायांनीसुद्धा भोगतृष्णा दूर होऊ शकतात; परंतु जोपर्यंत त्यांची पूर्ण निवृत्ती होत नाही तोपर्यंत पूर्णत्वाची प्राप्ती होऊन देखील त्यामध्ये तो साधक स्थिर होऊ शकत नाही.

**पूर्व जन्मांचे संस्कार :-**

शक्तिपाताच्या फलात व परिणामात भिन्नता दिसून येण्यास व सर्व फले एकदम प्राप्त न होण्यास पूर्व जन्माचे संस्कार हे एक प्रबल कारण आहे. प्रत्येक जीवावर पूर्वजन्माचे संस्कार दृढ झालेले असतात. अर्थात् सर्वांचे संस्कार एकसारखे असत नाहीत. त्यामुळे प्रत्येकाची आकृती व प्रकृती निराळी दिसून येते. शरीराची रचना व क्षमता भिन्न असते. चित्ताच्या व मनाच्या धारणाशक्तीत फरक आढळून येतो. प्राणिमात्राला कर्मामध्ये प्रवृत्त करण्यास पूर्वजन्मीचे संस्कारच बलवान् ठरतात. शुभ व अशुभ असे दोन प्रकारचे संस्कार कर्मामुळे उत्पन्न होतात.

श्रीसद्गुरू सूर्यकिरणांप्रमाणे सर्व साधकांवर समभावाने कृपा करतात. परंतु वर उल्लेखिलेल्या कारणांमुळे फलात व परिणामात भिन्नता दिसून येते. सूर्याची किरणे सर्वत्र सारखीच पसरतात. परंतु स्वच्छ काचेवर ती पडल्यावर प्रकाश अधिक दिसतो. स्वच्छ पाण्यावर पडल्यास खूप चमचमाट दिसून येतो. स्वच्छ काचेतून व पाण्यातून सूर्याची किरणे आरपार जाऊ शकतात. ती पात्रता अस्वच्छ काचेत व शेवाळलेल्या पाण्यात असत नाही. त्याचप्रमाणे पूर्वजन्मी केलेल्या शुभ कर्मांमुळे ज्या साधकाचे चित्त जितके निर्मळ झाले असेल तितका श्रीगुरुभक्तीचा परिणाम व प्रभाव दिसून येतो. त्या अनुरोधाने साधकाचा विकास होत जातो.

अर्जुनाने श्रीकृष्णांना एक अत्यंत महत्त्वाचा प्रश्न विचारला आहे. तो वरील विचारांना पोषक ठरेल. अर्जुन म्हणतो, "हे कृष्णा! जो साधक श्रद्धायुक्त असतो परंतु मोक्षप्राप्तीसाठी विशेष प्रयत्न न केल्यामुळे ज्याचे मन योगापासून भ्रष्ट होते अशा पुरुषाला योगसिद्धी मिळत नाही. जर असा मनुष्य मरण पावला तर तो कोणत्या गतीला जातो?" त्याला श्रीकृष्णांनी असे उत्तर दिले आहे की, "हे पार्था! असा जो योगेच्छू पुरुष आहे तो इहलोकाला व परलोकाला अंतरत नाही. शुभ कर्मांच्या द्वारे स्वतःच्या कल्याणाची इच्छा असल्याने

तो कधीही दुर्गतीला जात नाही. मात्र तो पुन्हा पवित्र अशा श्रीमंत कुलात किंवा बुद्धिमान् योग्याच्या कुलात जन्म घेतो. अशा कुलामध्ये जन्म झाला म्हणजे त्याला पूर्वजन्मीची योगबुद्धी या जन्मी प्राप्त होते आणि योगाच्या सिद्धीकरिता तो पुन्हा यत्न करतो." वरील विवेचनावरून हे लक्षात येईल की, पूर्वजन्मी साधक जेथे थांबला तेथपासून त्याची पुढे या जन्मात वाटचाल सुरू होते. प्रत्येक साधकाची थांबण्याची ठिकाणे निरनिराळी असल्याने या जन्मात श्रीसद्गुरूंनी अनुग्रह केल्यावर तरतमभाव व पृथकता दिसून येते. त्यामुळे अनुग्रह एक असूनसुद्धा साधकाची पातळी भिन्न असल्याने शक्तिपाताच्या परिणामात भिन्नता दिसते.

**अधिकारभेदाने साधकांचे तीन प्रकार :-**

**"कुलार्णवतंत्राच्या"** १४ व्या उल्लासात अधिकार भेदामुळे शक्तिपाताच्या फलात तरतमभाव किंवा पृथकता कशी दिसून येते याचे सुंदर वर्णन केले आहे.

**आदिमध्यावसानेषु योग्याः शक्तिर्निपातिताः।**
**अधमा मध्यमाः श्रेष्ठाः शिष्या देवि प्रकीर्त्तिताः।।२७।।**
**आदौ भक्तिर्भवेद्देवि दीक्षार्थं समुदन्ति ये।**
**पुनर्विह्वहृष्टास्ते आदियोग्या इतीरिताः।।२८।।**
**यथा विहङ्गमः शीघ्रं फल एव निषीदति।**
**तथा ज्ञानोपदेशश्च कथितः कुलनायिके।।३३।।**

श्रीशंकरांच्यापासून परंपरागत शक्तीचे सामर्थ्य एकसारखे असूनसुद्धा शिष्य उत्तम, मध्यम व अधम असल्याने दीक्षेच्या वेळेला शक्तिपाताची लक्षणेही तीन प्रकारची दिसून येतात. त्यामुळे उत्तमाला तत्काल, मध्यमाला क्रमाने व अधमाला विलंबाने फल मिळते. ज्यांच्या ठिकाणी पहिल्यापासून भक्ती असते, जे दीक्षाग्रहणार्थ प्रसन्न व उत्सुक असतात आणि दीक्षेनंतर आनंदाने बेहोश होऊन जातात ते शिष्य आदियोग्य अधिकारी आहेत असे म्हटले जाते. ज्याप्रमाणे पक्षी सरळ उडत जाऊन तत्काळ फलप्राप्ती करून घेतो त्याचप्रमाणे उत्तम अधिकारी

शिष्याला दीक्षेमुळे उत्पन्न होणारे ज्ञान तत्काळ मिळते.

**दीक्षासमयसम्प्राप्ता ज्ञानविज्ञानविवर्जिताः।**
**भक्त्या प्रध्वस्तसुधियो मध्ययोग्याश्च ते स्मृताः।।१४.२९।।**
**यथा कपिश्च शाखायाः शाखामुल्लङ्घ्य यत्नतः।**
**फलं प्राप्नोति धर्मस्य चोपदेशस्तथा प्रिये।।३२।।**

जे दीक्षा घेईपर्यंत ज्ञानविज्ञानरहित असतात, ज्यांना दीक्षा व योगासंबंधी फार माहिती नाही; परंतु दीक्षा प्राप्त झाल्याबरोबर ज्यांच्या ठिकाणी भक्तीचा उदय होतो व बुद्धी निर्मळ होते अशा शिष्यांना मध्ययोग्य किंवा मध्यम अधिकारी म्हटले जाते. ज्याप्रमाणे माकड झाडाच्या फांदीवरून उडी मारून दुसऱ्या फांदीवर जाऊन फळ तोडून घेतो त्याप्रमाणे या दुसऱ्या प्रकारच्या साधकाला दीक्षेच्या फलाची प्राप्ती क्रमशः होते.

**आदौ भक्तिविहीना ये मध्यभक्तास्तु ये नराः।**
**अन्ते भक्ताः प्रबद्धाः स्युर्ह्यन्तयोग्या भवन्ति ते।।३०।।**
**यथा पिपीलका मन्दं मन्दं वृक्षाग्रगं फलम्।**
**चिरेणाप्नोति धर्मोपदेशश्चापि तथा स्मृतः।।३१।।**

जे आधी भक्तिहीन असतात, दीक्षा मिळाल्यावर ज्यांच्या ठिकाणी भक्ती उत्पन्न होते आणि शेवटी ज्ञान-भक्तियुक्त झाल्याने जे अत्यंत एकनिष्ठ भक्त होतात ते अंतयोग्य म्हणजे कनिष्ठ अधिकारी शिष्य समजावे. त्यांना श्रीगुरुदत्तकृपेचे फल खूप उशिरा मिळते. मुंगी ज्याप्रमाणे वृक्षावर चढत जाऊन फळापाशी पोहोचते त्याप्रमाणेच कनिष्ठ साधकाला दीक्षा उशिरा फलद्रूप होते.

**गुणांमधील फरक :-**

**"शिवसंहितेतही"** साधकांचे चार प्रकार सांगितले आहेत. त्यांच्या गुणांमध्ये फरक असल्याने फलप्राप्तीतही फरक दिसून येतो. चार प्रकारचे साधक कोणते ते प्रथम सांगितले आहे.

**चतुर्धा साधको ज्ञेयो मृदुमध्याधिमात्रकाः।**
**अधिमात्रतमः श्रेष्ठो भवाब्धौ लङ्घनक्षमः।।५.१५।।**

मृदु, मध्यम, अधिमात्र म्हणजे उत्तम व अधिमात्रतम म्हणजे उत्कृष्ट असे साधकांचे चार प्रकार असतात. या सर्व साधकात अधिमात्रतम साधक श्रेष्ठ होय. हा साधक संसाररूपी समुद्र पार करून जाण्यास समर्थ होतो.

**मृदुसाधकाची लक्षणे :-**

**मन्दोत्साही सुसंमूढो व्याधिस्थो गुरुदूषकः।**
**लोभी पापमतिश्चैव बह्वाशी विनिताश्रयः।।५.१६।।**
**चपलः कातरो रोगी पराधीनोऽतिनिष्ठुरः।**
**मन्दाचारो मन्दवीर्यो ज्ञातव्यो मृदुमानवः।।५.१७।।**

मृदुमानवाची म्हणजे अगदी सामान्य दर्जाच्या साधकाची लक्षणे पुढीलप्रमाणे दिसून येतात. या साधकाचा उत्साह अगदी मंद म्हणजे सामान्य दर्जाचा असतो. निरुत्साह हा त्याचा स्थायी स्वभाव असतो. बुद्धी मंद असल्याने एखाद्या मूढासारखी त्याच्या चित्ताची स्थिती असते. "**स्वहित काय हे कळेना। विषयवासना तुटेना। देहाभिमान गळेना। मंदबुद्धिस्तव।।** हे श्रीसमर्थांचे म्हणणे या साधकाला लागू पडते. त्याला अनेक व्याधी असतात किंवा मधूनमधून काहीना काही रोग होत असतात. श्रीगुरूंवर त्याची पूर्ण श्रद्धा असत नाही. त्यामुळे कोणत्याही बाबतीत कमीजास्त झाल्यास तो श्रीगुरूंना दोष देण्यास व त्यांची निंदा करण्यास कमी करत नाही. संसाराची आसक्ती असल्याने त्याच्या ठिकाणी खूप लोभ दिसून येतो. पूर्वजन्मीच्या दोषामुळे त्याची पाप करण्याकडे प्रवृत्ती होते व त्याच्या हातून खूप वेळा पापाचरण घडतही जाते. त्याचे जेवणही खूप असते. तीव्र कामासक्ती, बलवत्तर भोगेच्छा व उत्कट वासना यामुळे तो नेहमी स्त्रीच्या अधीन असतो. तो अत्यंत भित्रा असतो. त्याची वृत्ती नेहमी चंचल असते. त्याचा साधनावर पूर्ण विश्वास नसतो. तो पराधीन, कठोर शब्द बोलणारा, रागीट व क्रोधी असतो. त्याचा आचार अत्यंत सामान्य दर्जाचा असतो व तेजस्वीपणाही अगदी मंद असतो. असा जो साधक असतो त्याला मृदुमानव किंवा सामान्य दर्जाचा

साधक म्हणतात. याची प्रगतीही अगदी मंद होत असते.

याप्रकारचे जे साधक असतात त्यांना श्रीसमर्थरामदासांनी **"येर मायिक वेषधारी। असत् शिष्य।।"** असे म्हटले आहे व त्यांचे वर्णन केले आहे.

**मध्यम साधकाची लक्षणे :-**

**समबुद्धिः क्षमायुक्तः पुण्याकाङ्क्षी प्रियंवदः।**
**मध्यस्थः सर्वकार्येषु सामान्यः स्यान्न संशयः।।५.१९।।**

मध्यम साधकाची पुढील लक्षणे दिसून येतात. याची बुद्धी सर्वसाधारणपणे समतोल असते. तो क्षमाशील असून पुण्यकर्म करण्याकडे त्याचा स्वभावतःच ओढा असतो. याचे बोलणे प्रिय असते. कोणत्याही गोष्टीचा विशेष हर्ष-विषाद नसल्याने तो कोणाचीही बाजू न घेता सर्वकार्यात मध्यस्थाची भूमिका करतो.

**उत्तम साधकाची लक्षणे :-**

**स्थिरबुद्धिर्लये युक्तः स्वाधीनो वीर्यवानपि।**
**महाशयो दयायुक्तः क्षमावान् सत्यवानपि।।५.२०।।**
**शूरो वयस्थः श्रद्धावान् गुरुपादाब्ज पूजकः।**
**योगाभ्यासरतश्चैव ज्ञातव्यश्चाधिमात्रकः।।२१।।**

अधिमात्र म्हणजे उत्तम साधकाची पुढील लक्षणे दिसून येतात. त्याची बुद्धी स्थिर असते. तो मनाचा लय करण्याच्या योगात समर्थ असतो. स्वतंत्र असतो. कोणाच्याही अधीन असत नाही. तो शक्तिसंपन्न, सामर्थ्यसंपन्न व तेजस्वी असतो. तो दयाशील, क्षमाशील व सत्यशील असतो. **"भक्ती ते कठीण शुळावरील पोळी। निवडे तो बळी विरळा शूर।"** या श्रीसंत तुकाराममहाराजांच्या म्हणण्याप्रमाणे तो शूर असतो. समाधियोग आपल्याला निश्चित प्राप्त होईल अशी त्याची दृढ श्रद्धा असते. श्रीगुरुचरणांवर त्याची नितांत भक्ती असते. योगाभ्यासात तो नेहमी मग्न असतो. नियमित अखंड साधनतत्परता त्याच्या ठिकाणी असते.

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी या प्रकारच्या साधकाचे

"मनाच्या श्लोकात" पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे :-
मना लोचनीं श्रीहरी तोचि पाहे। जनीं जाणता भक्त होऊनि राहे।
गुणीं प्रीति लागो क्रमू साधनाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा।।
सदा देवकाजीं झिजे देह ज्याचा। सदा रामनामें वदे नित्य वाचा।
स्वधर्मेंचि चाले सदा उत्तमाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा।।४८।।
सदा बोलण्यासारिखें चालताहे। अनेकीं सदा एक देवासि पाहे।
सगूणीं भजे लेश नाहीं भ्रमाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा।।
नसे अंतरीं काम नानाविकारी। उदासीन तो तापसी ब्रह्मचारी।
निवाला मनीं लेश नाहीं तमाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा।।
मदें मत्सरी सांडली स्वार्थबुद्धी। प्रपंचीक नाहीं जयातें उपाधी।
सदा बोलणें नम्र वाचा सुवाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा।।५१।।
क्रमी वेळ जो तत्त्वचिंतानुवादें। न लिंपे कदा दंभ वादें विवादें।
करी सूखसंवाद जो ऊगमाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा।।५२।।
सदा आर्जवीं प्रीय जो सर्वलोकीं। सदा सर्वदा सत्यवादी विवेकी।
न बोले कदा मिथ्य वाचा त्रिवाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा।।
सदा सेवि आरण्य तारुण्यकाळीं। मिळेना कदा कल्पनेचेचि मेळीं।
चळेना मनीं निश्चयो दृढ ज्याचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा।।
नसे मानसी दुष्ट आशा दुराशा। वसे अंतरीं प्रेम पाशा पिपाशा।
ऋणी देव हा भक्तिभावें जयाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा।।
दिनाचा दयाळू मनाचा मवाळू। स्नेहाळू कृपाळू जगीं दास पाळू।
जगीं अंतरीं क्रोध संताप कैचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा।।५६।।

उत्कृष्ट साधकाची लक्षणे :-

महावीर्यान्वितोत्साही मनोज्ञः शौर्यवानपि।
शास्त्रज्ञोऽभ्यासशीलश्च निर्मोहश्च निराकुलः।।
शिवसंहिता ५.२३।।

नवयौवनसम्पन्नो मिताहारी जितेन्द्रियः।
निर्भयश्च शुचिर्दक्षो दाता सर्वजनाश्रयः।।२४।।
अधिकारी स्थिरो धीमान् यथेच्छावस्थितः क्षमी।

**सुशीलो धर्मचारी च गुप्तचेष्टः प्रियंवदः ।।२५।।**
**शास्त्रविश्वाससम्पन्नो देवतागुरुपूजकः।**
**जनसङ्गविरक्तश्च महाव्याधि विवर्जितः ।।२६।।**
**अधिमात्रतरोज्ञेयः सर्वयोगस्य साधकः ।।२७।।**

अधिमात्रतम म्हणजे उत्कृष्ट साधकाची पुढील लक्षणे दिसून येतात. असा साधक अत्यंत तेजस्वी असतो. त्याच्या उत्साहात कधीही खंड पडत नाही. अखंड उत्साहाचा स्रोत त्याच्यापासून उत्पन्न होतो. तो स्वतःचे मन जाणून मनावर ताबा ठेवतो. तो शौर्यसंपन्न, शास्त्र जाणणारा म्हणजे वेदशास्त्रांप्रमाणे आचरण ठेवणारा, अभ्यासशील म्हणजे प्रयत्न करणारा, कधीही मोहाला बळी न पडणारा व नेहमी समाधानी असतो. असा साधक नवयौवनसंपन्न म्हणजे तारुण्यातील शक्तींनी युक्त असतो. त्यामुळे शक्तीचा वेग सहन करण्याचे सामर्थ्य अशा शरीरात असते. तो नेहमी योग्य तेवढाच आहार घेतो. त्याची इंद्रिये स्वाधीन असतात. तो निर्भय, अत्यंत पवित्र, शुद्ध, अखंड सावधान व दानशूर असून शरण आलेल्या लोकांना आश्रय देण्याची बुद्धी त्याच्या ठिकाणी असते. त्याचा अधिकार मोठा असतो. त्याचे चित्त स्थिर असते. अंतःकरणात संतोष असतो. तो क्षमाशील, सुशील, धार्मिक कृत्ये गुप्त ठेवणारा व शास्त्रावर विश्वास ठेवणारा असतो. तो देवता व श्रीगुरुपूजक, जनसंगाची आवड नसलेला व महाव्याधिविरहित असतो.

**साधनाचा हेतू :- (चवथी शंका)**

काही काही वेळेला साधकाच्या मनात साधनाबद्दल अशी शंका येते की, आपण जे शक्तिपातयोगाचे साधन करतो त्याचा खरा हेतू काय? अमक्या साधकाचा रोग बरा झाला, अमक्याची स्थिती दीक्षा घेतल्यावर सुधारली, शारीरिक, मानसिक व आर्थिक विवंचनेतून साधक पार झाला, अशा कितीतरी गोष्टी व अनुभव कानावर येत असतात. अशा वेळी साधकाची द्विधा मनस्थिती होते. परंतु अशा प्रकारे साधकाने कधीही आपले मन दोलायमान होऊ देता कामा नये.

**उत्तर :-** ब्रह्मप्राप्ती करून घेणे हाच या साधनाचा खरा हेतू आहे. विषयसुख प्राप्त करणे, रोग दूर करणे व व्यवहारात यश प्राप्त करणे हा या साधनाचा हेतू नाही. एखादी नर्तकी नाचत असताना तिच्या डोळ्यांपुढे प्रेक्षकांचे मनोरंजन करून कलेचा अत्युच्च आनंद प्राप्त करून देणे हाच हेतू असतो. पायांना व्यायाम देणे हा तिचा हेतू कधीही नसतो. तसा व्यायाम जर घडत असेल तर तो नाचण्याचा आपाततः होणारा परिणाम आहे, हेतू नाही, हे अगदी निश्चित आहे. त्याचप्रमाणे शक्तिपातयोगाचे साधन करीत असताना उपरोक्त गोष्टी घडून आलेल्या दिसल्या तरी तो त्या साधनाचा हेतू नसून उपरोक्त दृष्टान्ताप्रमाणे आपाततः घडून आलेला परिणाम होय. वैराग्य प्राप्त होणे, श्रीभगवद्भक्ती वाढत जाणे, मनातून संसाराची आसक्ती नाहीशी होणे व मोक्षप्राप्तीची इच्छा प्रतिदिन वाढत जाणे हा या साधनाचा खरा उद्देश आहे. श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी **"श्रीज्ञानेश्वरीत"**

**आम्हीं साधन हें जें सांगितलें। तेंचि शरीरा जिहीं केलें।**
**ते आमुचेनि पाडें आले। निर्वाळलेया।।६.३२९।।**
**इये अभ्यासीं जे दृढ होती। ते भरंवसेनि ब्रह्मत्वा येती।।६.३३०।।**

असा या साधनाचा अंतिम परिणाम सांगितला आहे. साधनामुळे शरीर, मन, नाडी व चित्तशुद्धी होऊन मनाला शांती मिळून भगवत्प्राप्ती होणे हाच या साधनाचा एकमेव हेतू आहे, असा विचार करून साधन करावे.

**आदेश व संदेश :- (पाचवी शंका)**

साधन करताना साधकाला नाना तऱ्हेचे आदेश व संदेश आतून येत आहेत असे वाटते. कधी कधी बाहेरूनही या स्वरूपात कानावर शब्द आदळत असतात. अशा वेळी साधकाला अशी शंका येते की, याचे पालन करावे की करू नये. नेमका कोणता निर्णय घ्यावा?

**उत्तर :-** वास्तविक साधन सुरू झाल्यावर पूर्वसंचित, संस्कार, वासना व इच्छा अनेक प्रकारची रूपे धारण करून पुढे येतात. त्यामुळे अंतःकरणात नाना तऱ्हेचे विचारतरंग उत्पन्न होऊन ते

साधकाच्या तोंडून आदेश किंवा संदेशाच्या रूपाने बाहेर पडतात. अशा वेळी साधकाने सावध राहिले पाहिजे. काही साधक अशा आदेशाला क्रियाशक्तीची आज्ञा मानून त्याप्रमाणे कार्य करू लागतात. साधकाने असे करता कामा नये. आदेश हा इच्छा व वासनेतून आला की, खरोखर क्रियाशक्तीकडून आला याचे विश्लेषण करणे साधकाला कठीण जाते. याकरिता साधकाने अगदी सावध राहून संदेश व आदेशाचे निरीक्षण केले पाहिजे. बहुतांशी असे संदेश व आदेश साधकाच्या इच्छेमुळे, वासनेमुळे, पूर्वसंस्कारामुळे, वैचारिक, मानसिक, सांसारिक किंवा व्यावहारिक असमानतेमुळे येत असल्याने साधकाने त्याप्रमाणे न वागता त्याकडे दुर्लक्ष केले पाहिजे.

**साधनातील विघ्ने :-**

नवीन व जुन्या साधकाला साधनात विविध प्रकारची विघ्ने उपस्थित झाल्याचे अनुभवाला येते. त्यामुळे तो चिंताक्रांत होतो. नवीन साधक पहिल्या दिवशी दीक्षाग्रहणाकरिता बसल्यावर जर त्याला अनुभव आला नाही तर त्याच्या मनात शंकांचे काहूर उठते. यावेळी अंतर्दर्शी होऊन साधकाने विचार केला पाहिजे. त्याचे खरे कारण त्याचे न्यूनत्वच असते. भट्ट श्रीकल्लटाने **"स्पंदशास्त्राच्या"** शेवटी असे म्हटले आहे की, "ही शक्तिपातयोगविद्या म्हणजे ब्रह्मविद्येचे बीज आहे. परीक्षा घेतल्याशिवाय अगर केल्याशिवाय अयोग्य क्षेत्रामध्ये हे बीज पेरता कामा नये. सिद्धविद्या ही गुणवती कन्येप्रमाणे आहे. जर अशा कन्येचे दान गुणवर्जित पुरुषाला दिले तर ती पुरुषाच्या अपात्रतेमुळे त्याला संभोग देऊ शकत नाही. एवढेच नव्हे; तर ती दान करणाऱ्याच्या अपकीर्तीचे कारण मात्र होते. याकरिता सद्गुणसंपन्न साधकालाच या विद्येचे दान दिले पाहिजे." या दृष्टीनेच **"कुलार्णव-तंत्राच्या"** १४ व्या उल्लासामध्ये असे म्हटले आहे की -

**असच्छिष्येष्वभक्तेषु यज्ज्ञानमुपदिश्यते।**
**तत्प्रयात्यपवित्रत्वं गोक्षीरं श्वघृतादिव।।१७।।**

जो शिष्य असत्य कर्म करणारा, मिथ्याचारी, भक्तिहीन, श्रद्धारहित

व साधनसंपत्तीरहित असतो अशा साधकाला या शक्तिपातयोगज्ञानाचा उपदेश दिला तर हे साधन अपवित्रतेला प्राप्त होऊन त्याची अप्रतिष्ठा होते. गाईचे दूध व तूप पवित्र असले तरी हे पदार्थ कुत्र्याला खावयास दिले की, त्याच्या अंगाला खाज सुटते, त्याचे केस झडून जातात व शेवटी कुत्रा अगदी निकामी होतो. याप्रमाणे अपात्र माणसाला ही सिद्धयोगाची विद्या दिली म्हणजे अनुभूती न आल्याने संशयाच्या काहुराने मोठा अनर्थ उत्पन्न होतो.

येथे काही लोकांच्या मनात अशी शंका येईल की, शक्तिपातयोगाची वैशिष्ट्ये सांगताना शक्तिपाताच्या वेळी पात्रापात्रतेचा विचार होत नाही असा सिद्धान्त मांडला व आता अपात्रतेमुळे अनुभव येत नाही असा सिद्धान्त सांगतात. हे परस्परविरुद्ध आहे. परंतु ही दोन्ही विधाने परस्परविरुद्ध नाहीत; कारण श्रीसद्गुरू शिष्याच्या आत्यंतिक शरणागतीने परमकारुणिक बनून त्याला दीक्षा देत असतात. त्यावेळी पात्रापात्रतेचा विचार आड न येता शक्तिपाताची प्रक्रिया घडून येते. परंतु पात्रापात्रतेनुसार या प्रक्रियेचा परिणाम घडून येत असल्याने अनुभूतीची भिन्नता दिसून येते. हे लक्षात घेतले म्हणजे अपात्रता ही दीक्षेच्या आड येत नसून अनुभूतीच्या आड येते हे स्पष्ट होते व संशयही राहत नाही. यासाठी नूतन साधकाने पहिल्या दिवशी आपल्याला काही अनुभव आला नाही म्हणून निराश होण्याचे कारण नाही. सूक्ष्म स्वरूपात शक्तिसंचार झाल्याने व्यक्त स्वरूपातील काही अनुभव आला नाही म्हणून निराश होण्याचे कारण नाही. सूक्ष्म स्वरूपात शक्तिसंचार झाल्याने व्यक्त स्वरूपातील स्पष्ट असे अनुभव येण्यास वेळ लागतो. काही वेळेला साधन सुरू झाल्यावर क्रियाच इतक्या सूक्ष्म, सौम्य, अल्प व लहान असतात की, त्या साधकाच्या लक्षातही येत नाहीत. त्याचप्रमाणे शारीरिक रोग, मानसिक चिंता, शोक, भय, वृद्धावस्था, अशुद्धी आणि श्रद्धाहीनता या गोष्टी शक्ती कार्यान्वित होण्यास बाधक ठरतात. मनाचे जडत्व, पूर्वजन्मीचे दुष्ट संस्कार, पाप, संशय, प्रमाद, आळस, चित्ताची विषयांकडे ओढ होणे, जागा चांगली नसणे इत्यादि विविध कारणांमुळे

पहिल्याप्रथम अनुभव येण्यास वेळ लागतो.

जुन्या साधकांनाही साधनात उपस्थित होणाऱ्या विघ्नांना तोंड द्यावे लागते. **"पातंजल योगदर्शनात"** श्रीपतंजली महर्षींनी साधनात येणाऱ्या अडथळ्यांचे पुढीलप्रमाणे समाधिपादात वर्णन केले आहे. **"व्याधिस्त्यानसंशयप्रमादालस्याविरतिभ्रान्तिदर्शनालब्धभूमिकत्वानवस्थितत्वानि चित्तविक्षेपास्तेऽन्तराया: ।।३०।।** रोग, मानसिक जडता, संशय, निरुत्साह, आळस, भोगासक्ती, भ्रम, एकाग्रता न साधणे व प्राप्त केलेल्या अवस्थेपासून च्युत होणे ही साधनात अडथळा आणणारी नऊ विघ्ने आहेत. त्याचा क्रमश: विचार करू.

**व्याधी :-**

साधनाला सुरुवात झाल्यावर शक्ती जागृतीमुळे सर्व शरीर ढवळून निघते. अपानवायू शरीरशुद्धीचे कार्य करतो. त्यावेळी व्याधी उत्पन्न होऊन नाहीशा होतात. या दृष्टीने श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज **"श्रीज्ञानेश्वरीत"** असे म्हणतात की, "अपानवायू खवळून बलवत्तर होतो. तो सर्व शरीर ढवळून काढतो व बाळपणापासून शरीरात साचलेली सर्व घाण बाहेर फेकून देतो. कफ आणि पित्त यांचे तो नावही ठेवीत नाही. शरीरातील रसरक्तादि सप्तधातूंचे समुद्र हा वायू पालथे घालतो. मेदाचे पर्वत फोडून टाकतो. हाडांमधील मज्जा नाहीशी करतो. नाड्या सोडवितो व शुद्ध करतो. सर्व अवयवांना शिथिल करतो. अभ्यास करणाऱ्या साधकाला भिववितो; पण साधकाने भिऊन जाता कामा नये. हा वायू शरीरात व्याधी उत्पन्न करतो व लगेच नाहीशी करतो. साधकाने नियमित साधन केले म्हणजे हा व्याधिदोष, विघ्न किंवा अडथळा आपोआप दूर होतो. त्याचप्रमाणे अनियमित आहार व विहार, ऋतूंचे बदल, आर्थिक स्थिती, मानसिक अस्वस्थता, पूर्वजन्मींचे बलवत्तर प्रारब्ध इत्यादि विविध कारणे शरीरस्थ दोषांना कारण होतात. परंतु हे सर्व अडथळे एकमात्र नियमित साधनाने दूर होतात असे अनुभवाला येते.

**स्त्यान :-**

साधकाला साधन करताना जो दुसरा अडथळा येतो त्याला शास्त्रकारांनी स्त्यान असे म्हटले आहे. आपण नियमित सकाळ-संध्याकाळ साधन करावे अशी साधकाला इच्छा असते. परंतु काही वेळेला चित्त इतके दुर्बल, असमर्थ, मूढ, तमोगुणावृत्त व जड बनते की, ते साधकाला साधनास बसूच देत नाही. या अकर्मण्यावस्थेलाच स्त्यान असे म्हणतात. परंतु साधकाने निश्चयाच्या बळाने हा अडथळा दूर केला पाहिजे.

**संशय :-**

संशय हा साधनाचा सर्वात मोठा असा तिसरा अडथळा आहे. आपण करतो ते साधन आपल्याला ब्रह्मप्राप्ती करून देईल का नाही? या योगमार्गाने शेवट गाठलेले कोणी दिसतात की नाही? या योगाचे फल खरे आहे की खोटे आहे? हा योग सोपा आहे तर तो सर्व संतांनी, ऋषींनी व मुनींनी स्वच्छ व स्पष्टपणे का सांगितला नाही? गुप्त का ठेवला? इत्यादि नानाविध संशयांनी साधकाचे मन संदेहयुक्त बनते. या संशयांनी साधकाचा सर्वनाश होतो असे अनुभवाला आले आहे. यासाठी साधकांनी सर्व संशय दूर ठेवून निःसंदिग्धपणे व श्रद्धेने साधन केले पाहिजे. **"संशयात्मा विनश्यति"** असे शास्त्रकार म्हणतात ते अगदी खरे आहे.

**प्रमाद :-**

साधन नित्यनियमित न करणे व दीक्षेचा प्रसाद मिळूनही शक्तिपातयोग साधनाबद्दल उदास राहणे याला प्रमाद म्हणतात. साधकाच्या आर्थिक, व्यावहारिक, सामाजिक, मानसिक असंतुलनामुळे व दृढनिश्चयाच्या अभावामुळे साधकाच्या हातून साधन न करण्याची चूक होते. वास्तविक काही कारणांनी नित्य साधन झाले नाही व मध्ये खंड पडला तर पुन्हा उत्साहपूर्वक साधन करणे हे साधकाचे कर्तव्य आहे. जर प्रमादाकडे त्याने दुर्लक्ष केले तर हळूहळू त्याला मिळालेले साधन शिथिल व मंद होऊन जाते.

**आळस :-**

वात, पित्त व कफामुळे देहाला व तमोगुणामुळे चित्ताला जडता आली की, साधकाच्या देहात आळस उत्पन्न होतो. आळस देहात शिरला की, साधन करावे असे वाटत नाही व संसारातच मन रमून जाते. ज्यादा खाणे व ज्यादा झोपणे यामुळे साधकाला आळस येतो. आळस जाण्यासाठी मनाला धारेवर धरणे हा सर्वांत मोठा उपाय आहे. त्याचबरोबर खाणे, पिणे इत्यादि सर्व बेतात व नियमित ठेवणे हेही आवश्यक आहे.

**अविरती :-**

अविरती म्हणजे भोगासक्ती. साधनातील हे सर्वांत मोठे विघ्न आहे. पूर्वसंस्कारानुरूप नानाप्रकारच्या भोगांची आसक्ती साधकाच्या मनात असते. या भोगाचे रूप इतके व्यापक आहे की, त्याचे वर्णन करणे केवळ अशक्य आहे. ज्यामुळे साधनात अडथळे येणार नाहीत असे लहानसहान भोग साधकाने भोगून संपवावेत. परंतु ज्यामुळे शास्त्रमर्यादिकांचे उल्लंघन होऊन अनर्थ उत्पन्न होण्याची शक्यता असते त्यावेळी मोठ्या धैर्याने या भोगाकांक्षेशी सामना करून बाह्यत: साधकाने त्याचे निराकरण करावे. असे केले म्हणजे नियमित साधनाने भोगासक्ती दूर होऊन नाहीशी होते. कारण साधनाभ्यासानेच "**विषयांचा विसरु पडे। इंद्रियांची कसमस मोडे। मनाची घडी घडे। हृदयामाजीं ।।६.१८८।।**" असे या साधनाचे फल मिळते म्हणून श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीत**" सांगितले आहे. यामध्ये भोगासक्ती साधनानेच दूर होते हे स्पष्ट झाले आहे. यासाठी साधकाने साधनेचा आधार कधीही सोडता कामा नये.

**भ्रांतिदर्शन :-**

उलट्या किंवा विपरीत ज्ञानाला भ्रम किंवा भ्रांतिदर्शन असे म्हणतात. साधन करताना साधकाची काही काही वेळेस मोठी चमत्कारिक धारणा होते. यामुळे आपली स्थिती फार उत्तम आहे, अवस्था फार वरच्या दर्जाची आहे, आपल्याला साक्षात्कार झाला व समाधी लागली

अशी धारणा होऊन त्याचे साधनावरील लक्ष कमी होते. साधकाने अशा वेळी मोठ्या सावधानतेने राहिले पाहिजे. स्वतःवर लक्ष ठेवले पाहिजे व शास्त्राशी अनुभव जुळतो की नाही हे पाहिले पाहिजे.

**अलब्ध भूमिकत्व :-**

चित्ताची एकाग्रता न साधणे याला अलब्ध भूमिकत्व असे म्हणतात. शक्तिपातयोगाच्या साधनात साधकाला सुरुवातीपासून कित्येक दिवसपर्यंत या अडथळ्याशी सामना करावा लागतो; कारण हे साधन सुरू झाले की, या व पूर्वजन्मीच्या संस्कारांचे शुद्धीकरण सतत सुरू असते. अशा वेळी चित्ताची एकाग्रता वारंवार खंडित होते. क्वचित् प्रसंगी चित्त इतके क्षुब्ध होते की, कशाला आपण हे साधन घेतले असे साधकाला वाटू लागते. चित्ताला एकाग्रता प्राप्त होऊन शांतता लाभावी म्हणून साधक साधनेला बसला की, जे विचार व प्रसंग स्मृतीच्या गर्तेत नाहीसे झालेले असतात व ज्यांचा अर्थाअर्थी काही संबंध नसतो तेच दत्त म्हणून पुढे उभे राहतात. साधकाला स्वतःचाच राग येतो. संतोष नाहीसा होतो. त्याला वाटते की, साधन सोडून दूर पळून जावे. परंतु मनाला दूर कोठे काढून ठेवणार? यासाठी मन जसे उसळेल, विचार करील व जिकडे जाईल तिकडे जाऊ दिले पाहिजे. अगदी मोकळे सोडले पाहिजे. असे केले म्हणजे त्याचे शुद्धीकरण लवकर होऊन दमून ते स्थिरावते. कोठेही एकाग्रता न करता स्वस्थ बसून काय होते ते पाहणे हा या साधनाचा विशेष असल्याने या अडथळ्याचा म्हणजे चित्त एकाग्र न होण्याचा विचारच साधकाने डोक्यातून काढून टाकला पाहिजे. साधनानेच एकाग्रता, चित्तवृत्ती निरोध व मनःशांती साधणार असल्याने साधकाने या शक्तिपातयोगसाधनाला पूर्ण शरणागत होणे एवढेच त्याच्या हातात आहे.

**अनवस्थित्व :-**

प्राप्त केलेल्या अवस्थेपासून च्युत होणे याला अनवस्थित्व असे म्हणतात. साधक जसजसा साधनात पुढे प्रगती करत जातो तसतशी

त्याची अवस्था बदलत जाते. त्याला स्थिरचित्तत्वाचा व समाधीचा अनुभव येऊ लागतो. परंतु वर वर्णिलेल्या अडचणी आल्या की, मधून मधून आपण पुन्हा खालच्या पायरीवर आलो आहोत असे वाटून तो अस्वस्थ होतो. अशा वेळी साधकाने आपल्या मनाशी पक्का विश्वास बाळगला पाहिजे की, "जागृत शक्ती आपल्याला मुक्कामाला नेणार आहे. साधनात येणारे अडथळे व अडचणी ती दूर करणार आहे." त्याची ही धारणा पक्की राहिली की, वरील सर्व अडथळे पार करून तो आपल्या इष्टस्थानी पोहोचतो हे निःसंशय खरे आहे.

**"हठयोगप्रदीपिकेतही"** योगाभ्यास प्रतिबंधक गोष्टीचे वर्णन करताना श्रीस्वात्मारामयोगींद्र यांनी असे म्हटले आहे की -

**अत्याहारः प्रयासश्च प्रजल्पो नियमग्रहः ।**
**जनसङ्गश्च लौल्यं च षडभिर्योगो विनश्यति ।।१.१५।।**

भूक नसताना ज्यादा खाणे, खूप परिश्रम करणे, खूप बोलणे, थंड पाण्याने प्रातःस्नान करणे, रात्रीचे एक वेळाच जेवण करणे इत्यादि नियम करणे, लोकसंपर्क करणे व लोलुपता या सहा गोष्टी योगाचा नाश करतात.

साधकाने मोजकेच खाल्ले पाहिजे. याबाबत त्याने कोणाचीही क्षिती बाळगता कामा नये. आपल्याकडे आग्रहाची दुष्ट प्रवृत्ती आहे. त्यामुळे भिडेला बळी पडून साधकाला ज्यादा खावे लागते. त्यामुळे त्याच्या अभ्यासाचा नाश होतो. अती आहारामुळे जडता, आळस व चंचलता येते. परिश्रमाबाबतही साधकाने अखंड सावध असले पाहिजे. धावणे, पळणे, जड वजन उचलणे अशा प्रकारचा व्यायाम किंवा खूप कष्टादि गोष्टी त्याने टाळाव्यात; कारण त्यामुळे प्राणांची गती वाढून चित्त चंचल होते व शरीर थकल्याने साधनाला जास्त वेळ बसवत नाही. बोलण्याबाबत तर श्रीसंत तुकाराममहाराजांनी **"नये बोलो फार"** अशी फार मोठी मोलाची सूचना देऊन ठेवली आहे. साधकाने नियमित सकाळ संध्याकाळ साधन करण्याला

प्राधान्य देऊन इतर गोष्टींना गौणत्व दिले पाहिजे. याचा अर्थ असा की, आपण जे साधन करणार आहोत त्याच्याशी धर्मशास्त्र, कर्मकांड, अर्थशास्त्रादि इतर सर्व शास्त्रांचा समन्वय आपल्या पद्धतीने घातला पाहिजे. अगदी प्रातःकाली स्नान करणे, उपवासाचा किंवा नक्ताचा नियम करणे इत्यादि नियम न करता जेणे करून शरीर सुस्थितीत धातुसाम्ययुक्त राहील व उत्तम साधनाभ्यास घडेल असे पाहिले पाहिजे. इतर शास्त्रांचे जे विहित नियम आपल्या वर्णाश्रमाला उचित असतील ते योग्य ती मुरड घालून त्यांचे आपल्या प्राप्त परिस्थितीप्रमाणे पालन करावे. आपले घर, परिस्थिती, शारीरिक-मानसिक व आर्थिक स्थिती इत्यादि सर्वांचा साकल्याने विचार करून साधकाने स्वतःच आपला मार्ग प्रशस्त केला पाहिजे. यासाठी प्रत्येकाला आपल्याला काय पटेल हे पाहून आपला मार्ग निश्चित करणे योग्य ठरते.

जनसंगाचा त्यागही साधकाला फार आवश्यक आहे. "**नये बैसो जनामध्ये**" अशी सूचना याबद्दल श्रीसंततुकाराममहाराज यांनीही दिली आहे.

**"दुःसङ्गः सर्वथैव त्याज्यः"** ।।४३।।
**कामक्रोधमोहस्मृतिभ्रंशबुद्धिनाशसर्वनाशकारणत्वात्** ।।४४।।
**तरङ्गायिता अपीमे सङ्गात्समुद्रायन्ति** ।।४५।।

अशी तीन सूत्रे ब्रह्मर्षी श्रीनारदांनीही आपल्या "**नारद भक्तिसूत्रात**" घालून दुःसंगादि जनसंगाचा निषेध केला आहे. दुर्जनसंगती सर्व प्रकारे त्याज्य होय; कारण दुःसंगाने काम, क्रोध, मोह, लोभ, मद, मत्सर हे वाढतात. स्मृती नाहीशी होते आणि बुद्धिनाश होतो. त्यामुळे हा दुष्ट जनसंग अखेर सर्वनाशाला कारण होतो. हे कामक्रोधादि विकार जरी तरंगासारखे प्रथम लहान दिसले तरी ज्यावेळी दुष्ट असा जनसंग होतो त्यावेळी ते समुद्रप्राय होतात. यासाठी साधकाने सावध राहून हे टाळले पाहिजे.

लौल्य म्हणजे लोलुपता होय. साधकाने अखंड सावधान राहून अलिप्तता साधली पाहिजे. परिस्थिती, स्वभाव व संधी यामुळे तो

कशात लिप्त होईल हे सांगता येत नाही. "**लोलुप्यता काय निद्रेसी जिणावे**" असे म्हणून श्रीसंततुकाराममहाराजांनी लोलुपता अशी काय लागून गेली आहे असे मनात आणून निद्रेबरोबर ती बलपूर्वक प्रयत्नाने जिंकावी असे म्हटले आहे.

वरील सर्व अडथळे नियमित साधनाने दूर होत असले तरी सुद्धा साधकाने व्यवहारात सावधान राहिले पाहिजे. त्यामुळे साधन अधिक उत्तम चालण्यास व प्रगती लवकर होण्यास मदत होते. "**अखंड सावधान असावें**" हे श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी श्रीसंभाजीमहाराजांना उपदेशिलेले सूत्रच येथे लागू केले पाहिजे. "**आपुल्या मनासी रोधावें। परांतर शोधावें। क्षणाक्षणा सांभाळावे। बदलेल म्हणूनी।।१०।।**" ही श्रीसमर्थांची "सावधता प्रकरणातील" अपूर्व सूचनाच साधकाचे बाह्य जीवनातील ध्येय असले पाहिजे. साधन मोठे आहे व आपण कसेही वागले तरी चालेल असे साधकाने कधीही मनात आणता व त्याप्रमाणे वागता कामा नये.

"**शिवसंहितेच्या**" पाचव्या पटलामध्ये शक्तिपातयोगाच्या साधकांना कोणकोणत्या योगविघ्नांना तोंड द्यावे लागते याचे फार चांगले वर्णन केले आहे. साधकांनी या विघ्नांपासून आपला बचाव कसा होईल याचा चांगला अभ्यास व विचार केला पाहिजे. भोगरूपी, धर्मरूपी, ज्ञानरूपी व स्वादरूपी अशी चार प्रकारांची विघ्ने उपस्थित होतात व ती साधनाचा नाश करतात म्हणून श्रीशंकरांनी श्रीपार्वतीला असे सांगितले आहे.

श्रीदेवी पार्वती श्रीशंकरांना असे म्हणाली की, "हे देवाधिदेवा! परमार्थ ज्ञानाच्या प्राप्तीमध्ये मनुष्याला जी विघ्ने येतात त्याबद्दल सविस्तर माहिती तुम्ही मला सांगा." श्रीदेवी पार्वतीने अशी प्रार्थना केल्यावर श्रीशंकर तिला असे म्हणाले की, "हे देवी ! मोक्षप्राप्तीकरिता साधक प्रयत्न करू लागला की, त्याच्या प्रगतीमध्ये अडथळा करणारी नाना प्रकारची विघ्ने उपस्थित होतात. त्यांचे क्रमशः सविस्तर वर्णन करतो. ते तू ऐक."

"एखाद्या मार्गावर काटेच काटे पसरलेले असावेत त्याप्रमाणे शक्तिपातयोगाने प्राप्त होणाऱ्या मुक्तीच्या साधनातही विषयभोगरूपी विघ्नांचे समुदाय सतत उपस्थित होत असतात. भोगाची ही तीव्र वासना हे सर्वात मोठे बंधन व विघ्न आहे. स्त्री उपभोग, उत्तम शय्या, मनोहर आसन, रमणीय वस्त्र आणि खूप धनसंचय या गोष्टी मोक्षाच्या आड येतात. विडा खाणे, अत्यंत स्वादिष्ट भोजन करणे, उत्तमोत्तम गाड्यातून प्रवास करणे, राजऐश्वर्य उपभोगणे, सर्वांवर प्रभुत्व गाजविणे, मोठेपणा मिरविणे, सोने, चांदी, रत्ने, तांबे, सुगंधित द्रव्ये, संपत्ती, गाई या गोष्टी एकत्रित करून त्यांचा संचय करणे; पांडित्य, वेदादि शास्त्रोक्त कर्मकांड, नृत्य, गीत अलंकार, बासरी, वीणा, मृदुंग व संगीत यांमध्ये विशेष रुची दाखविणे व हत्ती-घोड्यांच्या संग्रहासारखे ऐश्वर्य असावे असे वाटणे ही सर्व साधनात आडवी येणारी भोगरूपी विघ्ने आहेत."

"साधनामध्ये धर्मरूपी विघ्नेही आडवी येतात. प्रातःस्नान, बाह्यपूजेमध्ये अधिक निमग्नता, होम, अतिथी सेवा, विविध तिथि-कृत्ये, धर्मार्थ दानाचे ऐश्वर्य दाखविणे, व्रत व उपवास इत्यादि नियमबंधनात स्वतःला जखडून घेणे, हट्टाने बलपूर्वक मौन धरणे व इंद्रियनिग्रह करणे, ध्येय वस्तूचे जबरदस्तीने ध्यान करणे, स्थूल ध्यान करणे, अमुक मंत्राचा अमुक इतक्या संख्येपर्यंत काय वाटेल ते झाले तरी जप झाला पाहिजे असा अट्टाहास करणे, नियमित दान झाले पाहिजे, या सर्वांच्या प्रसिद्धीची हाव, बावडी, विहीर, तलाव या गोष्टी व्हाव्यात म्हणून त्यातच सर्व लक्ष घालणे, मोठमोठी घरे बांधणे, बगीचे तयार करणे, केळ्यांचे मांडव तयार करणे, यज्ञ, पापक्षय व्हावा म्हणून चांद्रायण व कृच्छ्र व्रते करणे, तीर्थयात्रा सतत करणे व नानातऱ्हेच्या देवोत्सवामध्ये संमिलित होणे ही सर्व धर्मरूपी विघ्ने साधकाला साधनात आडवी येतात."

"हे वरानने! आता साधकाला साधनामध्ये जी ज्ञानरूपी विघ्ने आडवी येतात ती सांगतो. गोमुख, पश्चिमोत्तान इत्यादि विविध

आसने करणे, धौती व बस्ती इत्यादि षट् क्रिया करून नाडी प्रक्षालन-शोधन करीत राहणे, नाडी विज्ञान व्हावे म्हणून प्रयत्न करणे, प्रत्याहार साधावा म्हणून अत्यंत निग्रहाने, निश्चयाने व बलाने कान, नाक इत्यादि इंद्रियांचा निरोध करणे, लोखंडाच्या साखळीने किंवा लाकडी लंगोटीने उपस्थ बांधून टाकणे, त्याचप्रमाणे संयमासाठी उपस्थ छेदून टाकणे, अशा प्रकारची उत्कट कर्मे, वायू चालन व्हावे म्हणून कुक्षी संचालन करणे किंवा वज्रोली मुद्रा करणे इत्यादि कोणत्याही क्रिया मुद्दाम करणे हे शक्तिपातयोगसाधन करणाऱ्याला अनावश्यक असून त्या साधनाने उत्पन्न होणाऱ्या ज्ञानामध्ये विघ्न आणतात यात शंका नाही."

"साधकाला स्वादरूप विघ्नांनाही तोंड द्यावे लागते. खूप गोड व पोटभर खावे असे वाटणे हे मोठे विघ्न आहे. साधकाने लोभाने अशा प्रकारे खूप गोड खाल्ले व अपरिमित आहार घेतला की, शरीरात नव्या रसाचा संचार होऊन एक प्रकारचे जडत्व शरीराला प्राप्त होते. शरीराबरोबर मन ही विकारी, जड व तामसी होऊन बहुतांशी कामोत्तेजकता वाढीस लागल्याचे दिसते. यासाठी साधकाने अत्यंत सावध राहून शरीरात नवीन रसाचा संचार होईल असे पदार्थ टाळले पाहिजेत. याकरिता जीभ ताब्यात ठेवून व रात्रंदिवस पहारा ठेवून जिह्वेची तृप्ती होईपर्यंत न खाता संयमित भोजन करून खाण्याची वासना कमी केली पाहिजे."

येथपर्यंत शक्तिपातयोगाच्या साधन संपत्तीचे सर्वांगाने दर्शन घेण्याचा प्रयत्न केला. आपल्या सर्व शास्त्रकारांनी साध्यप्राप्तीमध्ये साधन संपत्तीचे फार मोठे महत्त्व असल्याने पुनःपुन्हा घोळून घोळून हा विषय मांडला आहे. किंबहुना सर्व परमार्थिक ग्रंथांचे अभ्यासपूर्वक वर्गीकरण केले तर असे आढळून येते की, ३/४ पेक्षा जास्त भाग या साधन संपत्तीच्या स्पष्टीकरणाकरिता खर्ची पडला आहे. यावरून या विषयाचे महत्त्व किती आहे याचे आकलन साधकांना होईल. शास्त्रीय प्रयोगाचे अचुक उत्तर जर हवे असेल तर सर्व उपकरणे व

परिस्थिती त्या प्रयोगाला अनुकूल अशीच आवश्यक असते. त्याचप्रमाणे या शक्तिपातयोगाची किंवा सिद्धमहायोगशास्त्राची फले शास्त्रीय निकषावर उत्तम ठरतील इतकी चांगली व उत्कृष्ट यावी असे वाटत असेल तर या साधनसंपत्तीचा अपूर्व साठा जवळ असला पाहिजे. असे घडले म्हणजे अपेक्षित फलनिष्पत्ती झाल्याशिवाय कधीही राहणार नाही.



# - आधार अकरावा -

## ★शक्तिपातायोगाची शास्त्रीय प्रक्रिया★

१) संप्रदायाचा महिमा २) दीक्षेचा महिमा
३) दीक्षेचा अर्थ ४) दीक्षेचा हेतू
५) दीक्षा कशी होते? -
अ) स्पर्शदीक्षा ब) दृग्दीक्षा
क) शब्ददीक्षा ड) ध्यानदीक्षा (कृपा किंवा पत्रदीक्षा)
६) दीक्षेचे व साधनाचे स्थान ७) साधनासाठी आसन
८) साधनाला बसण्याची पद्धत ९) साधनाला बसण्यापूर्वी करावयाची प्रार्थना
१०) साधनाची वेळ ११) साधनेसाठी वस्त्रे
१२) साधनातील क्रिया -
अ) साधनात क्रिया का होतात?
ब) पश्चिम मार्ग खुला होतो
क) प्राणशक्तीचे ऊर्ध्वगामित्व
ड) तीन ग्रंथींचे भेदन
इ) पंचतत्त्वांचे अवलंबन
ई) आत्मतत्त्वांचे शुद्धिकरण
उ) परिपक्वता व परिपूर्णता प्राप्ती
ऊ) षट्चक्र वेध
१३) दीक्षेची वेळ
१४) साधनक्रियांची वैशिष्ट्ये
श्री) क्रिया अर्थशून्य नाहीत
प्र) आनंदाची प्राप्ती
भु) साधन महायज्ञात क्रियांद्वारा हवन
रा) कर्म, जाती व अवस्थांचे क्रियांना बंधन नाही
म) विचार प्रवाह व एकाग्रता

**१५) साधनातील क्रिया व अनुभव -**

**श्री) आरंभावस्था** **कृ) घटावस्था**
**ष्णा) परिचयावस्था** **य) निष्पत्ती अवस्था**
**न) हठयोगाच्या क्रिया** **मः) नाडीशुद्धीच्या क्रिया**
**ॐ) बंध व मुद्रा** **न) प्राणायाम**
**मः) नऊरस** **शि) मंत्रयोगाच्या क्रिया**
**वा) लययोगाच्या क्रिया**
**य) राजयोगाच्या क्रिया**

**अ) दिव्यस्पर्शज्ञान** **ब) दिव्यरस**

शक्तिपातयोगदीक्षा मिळून शक्ती जागृत होणे नितांत आवश्यक आहे; कारण त्याशिवाय मंत्र, तंत्र व अर्चन इत्यादि गोष्टी सिद्ध होत नाहीत व ज्ञानप्राप्तीही होत नाही. **"गौतमीयतंत्रामध्ये"** असे म्हटले आहे की -

**मूलपद्मे कुण्डलिनी यावन्निद्रायिता प्रभो।**
**तावत् किञ्चिन्न सिद्ध्येत् मन्त्रयन्त्रार्चनादिकम्।।३२.३।।**
**जागर्ति यदि सा देवी बहुभिः पुण्यसञ्चयैः।**
**तदा प्रसादमायाति मन्त्रयन्त्रार्चनादि च।।**

जोपर्यंत मूलाधारामध्ये कुंडलिनी शक्ती निद्रा घेत असते तोपर्यंत मंत्र, यंत्र किंवा पूजाअर्चादि कोणतीही गोष्ट सिद्ध होत नाही. ज्यावेळी पुण्यसंचयाच्या प्रभावामुळे कुंडलिनीशक्ती श्रीगुरुकृपेने जागृत होईल तेव्हा त्या शक्तीच्या कृपेमुळेच मंत्र, यंत्र किंवा अर्चनादि गोष्टी सिद्ध होतात.

ज्ञानप्राप्तीसाठीही शक्ती जागृत होणे आवश्यक असते. **"घेरंड-संहितेच्या"** तृतीय उपदेशात व **"योगशिखोपनिषदात"** असे म्हटले आहे की -

**मूलाधारे आत्मशक्तिः कुण्डलिनी परदेवता।**
**शायिता भुजगाकारा सार्द्धत्रयवलयान्विता।।घे.सं.४९।।**
**यावत्सा निद्रिता देहे तावज्जीवः पशुर्यथा।**

**ज्ञानं न जायते तावत् कोटियोगविधेरपि।।५०।।**
**आधारशक्ति निद्रायां विश्वं भवति निद्रया।**
**तस्यां शक्तिप्रबोधेन त्रैलोक्यं प्रति बुध्यते।।यो.शि.२३/२४।।**

मूलाधारात परमदेवता कुंडलिनी शक्ती सर्पाचा आकार घेऊन साडेतीन वेढे घालून झोपलेली आहे. जोपर्यंत ही शक्ती झोपलेली असते तोपर्यंत जीव पशुप्रमाणे अगदी अज्ञानात असतो. त्यामुळे कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय इतर कोटी कोटी योगांचे साधन केले तरी ज्ञानाची प्राप्ती होत नाही. याचे कारण आधार शक्ती झोपली की, सर्व ब्रह्मांड झोपलेले असते. ती जेव्हा जागृत होते तेव्हा सर्व त्रैलोक्य जागृत होते. याकरिता कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय ज्ञानाची सर्व साधने निष्फळ ठरतात.

शक्ती जागृत होण्याची नितांत आवश्यकता आहे हे निःसंशय आहे. यासाठी शक्तिपाताच्या शास्त्रीय प्रक्रियेच्या सांगोपांगांचा यथाक्रम विचार आवश्यक आहे.

**संप्रदायाचा महिमा :-**

शक्तिपातयोगशास्त्राचा "**श्रीमद्भगवद्गीता**" हा ग्रंथ मुकुटमणी आहे आणि शक्तिपातयोग हे सर्व शास्त्रात श्रेष्ठ शास्त्र आहे. त्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराज "**श्रीज्ञानेश्वरीत**" असे म्हणतात की, "अर्जुनाने पुष्कळ पुण्य केल्यामुळे त्याला सर्व शास्त्रांचा राजा असलेले हे शक्तिपातयोगशास्त्र म्हणजे गीताशास्त्र श्रीभगवंतांनी सांगितले." मात्र या शक्तिपातयोगशास्त्रामध्ये संप्रदायाचा महिमा फारच अपूर्व आहे व त्याच्या आधाराशिवाय गती नाही हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज "**श्रीज्ञानेश्वरीत**" असे म्हणतात की -

**तरी ययाचि शास्त्राचेनि। संप्रदायें पांघुरौनि।**
**शास्त्रार्थु हा निकेनि। अनुष्ठीं हो।।१८-१४८१।।**
**येऱ्हवीं अमृतमंथना-। सारिखे होईल अर्जुना।**
**जरी रिघसी अनुष्ठाना। संप्रदायेंवीण।।१४८२।।**
**गाय धड जोडे गोमटी। तें तैंचि पय दे किरीटी।**

**जैं जाणिजे हातवटी। सांजवणीची।।१४८३।।**
**तैसा श्रीगुरु प्रसन्न होये। शिष्य विद्याही कीर लाहे।**
**परि ते फळे संप्रदायें। उपासिलिया।।१४८४।।**

शक्तिपातयोगशास्त्राचा जो संप्रदाय आहे तो समजावून घेऊन त्याचाच अंगिकार केला पाहिजे. मग त्या शास्त्राप्रमाणे या योगाचा अभ्यास केला पाहिजे. संप्रदायाचे पांघरूण हे कृपाछत्रच असते. साधक हा परंपरेने चालत आलेल्या संप्रदायातून दीक्षित झाला की, त्या संप्रदायाची सिद्धशक्ती साधकाचे अखंड कल्याण करण्यास सिद्ध होते. एरवी हे अर्जुना! संप्रदाय सोडून जो आपल्या मनाप्रमाणे अनुष्ठान करतो त्याची स्थिती अमृतमंथनाप्रमाणे होते. ज्याप्रमाणे अमृतमंथनात परिणामी जसे विष निघाले त्याप्रमाणे साधकाला संप्रदायक्रमाने शक्तिसंक्रमण झाले नाही; तर कैवल्यामृताची सिद्धी होत नाही. यासाठी दीक्षेची नितांत आवश्यकता आहे. हे अर्जुना! गाय उत्तम मिळाली तरी तिचे दूध काढण्याची हातोटी माहीत असली तरच ती दूध देते. त्याप्रमाणे ज्यावेळी श्रीगुरू प्रसन्न होतात त्यावेळी शिष्याला शक्तिपातयोग दीक्षा मिळून त्याला ही विद्या प्राप्त होते. परंतु शिष्याने संप्रदायाप्रमाणे नियमाने साधन केल्याशिवाय त्याला फलप्राप्ती मिळत नाही. नुसते साधन मिळाले म्हणजे आपण कृतकृत्य झालो असे ज्या साधकांना वाटते ते चुकीचे आहे. साधनाचे अनुष्ठान झाले पाहिजे. हाच प्रयत्न होय. अशा या शक्तिपातयोगस्वरूप गीतारत्नेश्वराची जेव्हा साधक-भक्त आपल्या अंतःकरणात दृढ निश्चयाने स्थापना करतो तेव्हा त्याला परब्रह्मस्वरूपाची प्राप्ती होते. या अर्थानेच श्रीज्ञानेश्वरमहाराज "**श्रीज्ञानेश्वरीत**" असे म्हणतात की, "**ऐशा भक्तालयीं चोखटीं। गीतारत्नेश्वर हा प्रतिष्ठीं। मग माझिया संवसाटीं। तुकसी जगीं।।१८.१५०९।।**" इतकेच नव्हे; तर श्रीभगवंतांनी असे म्हटले आहे की -

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः।**
**भविता न चे मेतस्मादन्यः प्रियतरो भुवि।।१८-६९।।**

श्रीभगवंत अर्जुनाला असे म्हणतात की, "जो कोणी माझे हे शक्तिपातयोगशास्त्राचे गुह्यज्ञान सांगतो त्याहून माझी अत्यंत आवडती गोष्ट करणारा मनुष्य दुसरा कोणीही नाही आणि त्याच्यापेक्षा या लोकी मला अत्यंत आवडता असा दुसरा होणार नाही."

शक्तिपातयोगामुळे परंपरेने आपल्याला बोधाचे ऐश्वर्य कसे प्राप्त झाले हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मोठ्या अभिमानाने सांगितले आहे. ते असे म्हणतात की, "कलीने भूतांचा ग्रास केलेला आहे असे पाहून श्रीगहिनीनाथांनी श्रीनिवृत्तिनाथांना अशी आज्ञा केली की, आदिगुरू श्रीशंकरांपासून शिष्यपरंपरेने हे बोधाचे ऐश्वर्य आमच्या कुलात प्राप्त झाले. शक्तिपातयोगाने शिष्याला बोध देणारे, विषय विध्वंस करणारे व अद्वयानंदसुख देणारे हे ऐश्वर्य घेऊन तू कलीने त्रस्त केलेल्या जीवांना देऊन त्यांना दुःखापासून सर्व प्रकारे मुक्त कर."या सर्व विवेचनावरून संप्रदाय व परंपरा यांची आवश्यकता किती आहे हे लक्षात येईल. (१८.१७५८ ते १७६०)

**दीक्षेचा महिमा :-**

दीक्षेचा महिमा अपूर्व आहे; कारण वेदान्त, योग, मंत्र, तंत्र, भक्ती इत्यादि जेवढे ज्ञानप्राप्तीचे संप्रदाय आहेत त्यामध्ये दीक्षा ही दिली जातेच. परंतु ज्या दीक्षेमुळे श्रीगुरूंच्या शक्तीचा शिष्याच्या ठिकाणी संचार होतो तीच खरी दीक्षा होय. दीक्षेचे माध्यम व प्रकार कोणता आहे ही अगदी गौण बाब आहे. दीक्षेत शक्तिसंचार हा झालाच पाहिजे; कारण त्याशिवाय शिष्याची बुद्धी अतींद्रिय विषय ग्रहण करू शकत नाही. अतींद्रिय अशा ब्रह्मतत्त्वाचे ग्रहण हे दीक्षेने होत असल्याने त्याला शक्तिपात असे म्हणतात. ब्रह्मतत्त्वाचे ग्रहण हे शक्तिपातयोगदीक्षेशिवाय इतर कोणत्याही मार्गाने होणे शक्य नसल्याने या दीक्षेचा महिमा अपूर्व आहे हे सर्वांनी मान्य केले आहे.

**"देवात्मशक्ती"** या ग्रंथामध्ये प.प.श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज दीक्षेचा महिमा सांगताना असे म्हणतात की, "शक्तिपात हे एक प्रकारचे शक्तीचे संक्रमण किंवा निवेशच आहे. सिद्धपुरुष अनुग्रहाकांक्षी

शिष्याच्या प्राणदेहात संवित् शक्तीचा एक प्रवाह निवेशित करतात. हा प्रवाह म्हणजे अत्युच्च बीजरूप शक्त्यात्मक तेजोमय द्रवाचा अति उदात्त कवलच होय. हा प्रवाह हस्तस्पर्श, दृष्टिक्षेप, मुखाने उच्चारलेला एखादा शब्दसमूह म्हणजे मंत्र, ईश्वराच्या परम पावन नामांपैकी एखादे नाम किंवा केवळ चिद्-विचार असू शकतो. ही देवात्मशक्ती, ज्यावेळी दीक्षित केली जाते तेव्हा अनुग्रहीताची सुप्तकुंडलिनी शक्ती जागृत होते. आपण असे म्हणू या की, प्राणाग्नी चेतविला जाऊन त्यांच्या शिखाज्वाला चैतनिक व्यूहात फैलावतात. त्यामुळे सरतेशेवटी सुषुम्णेचे दार उघडले जाऊन वंशीय रज्जूमधील चैतनिक केंद्रे म्हणजे षट्चक्रांचा वेध करीत त्या सहस्रारापर्यंत जातात. शक्तिपातयोग दीक्षेस वेधदीक्षाही म्हणतात. वेध म्हणजे आरपार जाणे. श्रीगुरू शक्ती जागृत करतात व त्याच शक्तीने षट्चक्र वेध होतो. एका शरीरातून दुसऱ्या शरीरात शक्ती प्राणाच्या द्वारे जाते; कारण प्राण सर्वव्यापी आहे. हेच कार्य मंत्रदीक्षेत वाणीच्या व्यापाराने श्रवणद्वारा होते. अशा मंत्रास मंत्रचैतन्य अथवा शक्तिसंपुटीत मंत्र असे म्हटले जाते."

**"कुलार्णवतंत्राच्या"** १४ व्या उल्लासात दीक्षेचा महिमा पुढीलप्रमाणे सांगितला आहे.

**दीक्षामूलो जपः सर्वो दीक्षामूलं परं तपः।**
**दीक्षामाश्रित्य निवसेत् यत्र कुत्राश्रमे वसन्।।१।।**
**विना दीक्षां न मोक्षः स्यात्तदुक्तं शिवशासने।**
**सा च न स्याद्विनाचार्यमित्याचार्य परम्परा।।३।।**
**दीक्षया मोक्षदीपेन चण्डालोऽपि विम्युच्यते।**
**याभ्यां विना कुलेशानि कौलिको नैव मुच्यते।।८०।।**
**शरीरस्य न संस्कारो जायते न च कर्मणः।**
**आत्मनः कारयेद्दीक्षामनादि कुलकुण्डलीम्।।८१।।**
**मन्त्रौषधैर्यथा हन्याद्विषशक्तिं कुलेश्वरि।**
**पशुपाशं तथा छिन्द्याद्दीक्षया मन्त्रवित् क्षणात्।।८३।।**

**अस्मात् प्रविततात्द्वन्धात् परसंस्थानबोधकात्।**
**दीक्षैव मोक्षयेत् पूर्वं दिव्यं धाम नयत्यपि।।८४।।**
**उपपातकलक्षाणि महापातककोटिशः।**
**क्षणाद्दहति देवेशि दीक्षा हि विधिना कृता।।८५।।**
**यया चोन्मीलितात्मानो भवन्ति पशवः शिवाः।**
**सा दीक्षा ह्युदिता देवि पशुपाशविमोचका।।८६।।**
**यया दीक्षितमात्रेण जायन्ते प्रत्ययाः प्रिये।**
**सा दीक्षा मोक्षदा ज्ञेया शेषास्तु जनसेविकाः।।८७।।**
**उपासनाशतेनापि यां विना नैव सिद्ध्यति।**
**तां दीक्षामाश्रयेद् यत्नात् श्रीगुरोर्मन्त्रसिद्धये।।८८।।**
**रसेन्द्रेण यथा विद्धमयः सुवर्णतां व्रजेत्।**
**दीक्षा विद्धस्तथा ह्यात्मा शिवत्वं लभते प्रिये।।८९।।**
**दीक्षाग्निदग्धकर्मासौ मायाविच्छिन्नबन्धनः।**
**गतः परां ज्ञानकाष्ठां निर्बीजस्तु शिवो भवेत्।।९०।।**
**दार्वश्मलौहमृद्रत्न जातिलिङ्गप्रतिष्ठितम्।**
**यथोच्यते तथा शुद्धाः सर्ववर्णास्तु दीक्षिताः।।९३।।**
**येन पूजितमात्रेण चाब्रह्मभुवनान्तिकम्।**
**पूजितं तेन सर्वं स्याद्दीक्षितेन न संशयः।।९४।।**
**दीक्षितस्य न कार्यं स्यात्तपोभिर्नियमव्रतैः।**
**न तीर्थक्षेत्रगमनैर्न च शारीरयन्त्रणैः।।९५।।**
**अदीक्षिता ये कुर्वन्ति जपपूजादिकाः क्रियाः।**
**न फलन्ति प्रिये तेषां शिलायांगुप्तबीजवत्।।९६।।**
**देवि दीक्षाविहीनस्य न सिद्धिर्न च सद्गतिः।**
**तस्मात् सर्व प्रयत्नेन गुरुणा दीक्षितो भवेत्।।९७।।**

"जप आणि तप यांच्या मुळाशी दीक्षा आहे. कोठल्याही आश्रमात असले तरी दीक्षेच्या आश्रयाने उन्नती करून घ्यावी. श्रीशंकरांपासून परंपरेने जी योगदीक्षा प्रवाहित झाली आहे त्यामध्ये योगेच्छू लोकांना दीक्षेवाचून फलप्राप्ती नाही. श्रीगुरूवाचून कधीही दीक्षा होत नाही.

अशी योगमार्ग परंपरा आहे. दीक्षेने प्राप्त होणाऱ्या ज्ञानदीपाने चांडाळही मुक्त होतो. दीक्षेशिवाय व ज्ञानाशिवाय श्रीशंकरांच्यापासून चालत आलेल्या म्हणजेच महेशान्वयसंभूत परंपरेशिवाय साधकाला मुक्ती मिळत नाही. ज्याप्रमाणे मंत्र व विषघ्न औषधीने विषाची मारक शक्ती नष्ट होते त्याप्रमाणेच मंत्रज्ञगुरूच्या दीक्षेने एका क्षणात पशुपाशाचा छेद होतो. या दृढतर विस्तृत बंधनातून परमस्थानाचे म्हणजे ब्रह्माचे ज्ञान देऊन दीक्षाच फक्त मुक्त करणारी व श्रेष्ठ स्थानाला नेणारी आहे. विधियुक्त दीक्षा ही उपपातक व महापातकांच्या कोटी कोटी राशी एका क्षणात भस्मसात करते. ज्यामुळे सामान्यजनही आत्मजागृत होऊन श्रीशिवस्वरूप होतात तीच खरी माणसाला पशुसारख्या पाशातून सोडविणारी दीक्षा होय. जी दीक्षा होताच दिव्य अनुभव येऊ लागतात तीच खरी मोक्ष देणारी दीक्षा होय. इतर ज्या दीक्षा असतात त्या सामान्य जनसेविकांप्रमाणे होत. शेकडो उपासना करूनही दीक्षेवाचून सिद्धी प्राप्त होत नाही. यासाठी प्रयत्नाने श्रीगुरुमंत्र सिद्धीसाठी दीक्षा जरूर घ्यावीच. धातुवादाच्या प्रक्रियेत ज्यावेळी पाऱ्याचा लोखंडावर संस्कार केला जातो त्यावेळी त्याचे सोने होते. त्याप्रमाणेच दीक्षेच्या संस्कारामुळे जीवाला शिवभावाची प्राप्ती होते. दीक्षारूप अग्नीने ज्याची कर्मे दग्ध झाली, ज्याची मायिकबंधने तुटून गेली व ज्याला परम तत्त्वज्ञान झाले तो श्रीशिवच समजावा. पाषाण, लोहादि धातू, मृत्तिका व रत्नादींना देवप्रतिमेच्या संस्काराने जसे पावित्र्य येते तसे दीक्षासंस्काराने कोणत्याही वर्णाच्या व्यक्तीची शुद्धी होते. जो दीक्षा घेतो त्याने सृष्टीतील पिपीलिकेपासून ब्रह्मापर्यंत सर्व काही पूजल्यासारखे आहे. दीक्षा ही सर्व पूजांपेक्षा श्रेष्ठ आहे. दीक्षिताला तप, नियम, व्रत, तीर्थ, क्षेत्रगमन व इतर कोणतेही शारीरिक क्लेश करण्याची आवश्यकता नाही. दीक्षा न घेता केलेल्या जप व पूजादिक्रिया खडकाळ जमिनीत पेरलेल्या धान्यबीजांप्रमाणे व्यर्थ व निष्फळ होतात. हे पार्वती! दीक्षाहीनाला मंत्रसिद्धी होत नाही. सद्गती मिळत नाही. याकरिता सर्व प्रयत्नाने श्रीगुरूकडून दीक्षा घ्यावी."

**दीक्षेचा अर्थ :-**

दीक्षेचा अर्थच देवत्वाची प्राप्ती असा आहे. या दृष्टीने "**विश्वसार**" ग्रंथात असे म्हटले आहे की -

**अथ दीक्षां प्रवक्ष्यामि श्रुणुष्व कमलानने।**
**अस्य विज्ञानमात्रेण देवत्वं लभते नरः।।२।।**

श्रीशंकर श्रीदेवी पार्वतीला दीक्षेच्या विषयासंबंधी चर्चा चालू असताना असे म्हणाले की, "या दीक्षेचे विज्ञान म्हणजे त्याची शास्त्रीय प्रक्रिया जाणल्याने मनुष्य देवत्वाचा लाभ करून घेऊ शकतो. याचा अर्थच असा आहे की, दीक्षेमुळेच मनुष्याला दैवी शक्ती प्राप्त होते."

"**श्रीशारदातिलक व रुद्रयामलतंत्रातही**" दीक्षेचा अर्थ सांगून तिच्या ठिकाणी परम ज्ञान देण्याचे व पापशृखंला नाहीशी करण्याचे अद्भुत सामर्थ्य कसे असते हे सांगताना असे म्हटले आहे की -

**दिव्य ज्ञानं यतो दद्यात् कुर्यात्पापक्षयं ततः।**
**तस्मात् दीक्षेति सा प्रोक्ता सर्व तन्त्रस्य सम्मता।।४.२।।**
**ददाति शिवतादात्म्यं क्षिणोति च मलत्रयम्।**
**अतो दीक्षेति सम्प्रोक्ता दीक्षातन्त्रार्थवेदभिः।।१।।**
**दीयते परमं ज्ञानं क्षीयते पाप पद्धतिः।**
**तेन दीक्षोच्यते मन्त्रे स्वागमार्थबलाबलात्।।३।।**

दीक्षा या शब्दात दी + क्षा अशी दोन अक्षरे आहेत. दीक्षा दिव्य ज्ञान देते व तिच्यामुळे सर्व पापांचा क्षय होतो. याकरिताच तिला दीक्षा असे म्हणतात. दीक्षा या शब्दाचा खरा अर्थ हाच आहे. दीक्षा ही सर्व तंत्रांना संमत व सर्व शास्त्रांना मान्य आहे. ही दीक्षा शिवाशी जीवाचे तादात्म्य करते. ती आणव, कार्मण व मायिक अशा तीन मलांचा नाश करते. दीक्षातंत्राच्या ज्ञात्या अशा ऋषींनी व मुनींनीच या शक्तिपाताने होणाऱ्या शक्तिसंक्रमणाच्या प्रक्रियेला दीक्षा हे नाव दिले आहे. ही दीक्षा अत्यंत श्रेष्ठ असे ज्ञान देते व पापांच्या राशींचा नाश करते. या कारणामुळे या संक्रमण प्रक्रियेला दीक्षा असे नाव

मंत्रशास्त्र व आगमशास्त्रामध्ये दिले आहे.

"**योगिनीतंत्रामध्येही**" दीक्षेचा अर्थ पुढीलप्रमाणे वर्णन केला आहे.

**दीयते ज्ञानमत्यर्थं क्षीयते पाशबन्धनम्।**
**अतो दीक्षेति देवेशि कथिता तत्त्वचिन्तकैः ।।१।।**
**मनसा कर्मणा वाचा यत्पापं समुपार्जितम्।**
**तेषां विशेषा करणी परमज्ञानदायतः ।।२।।**
**तस्मात् दीक्षेति लोकेऽस्मिन् गीयते शास्त्रवेदकैः।**
**विज्ञानफलदा सैव द्वितीया लयकारिणी।**
**तृतीया मुक्तिदा चैव तस्माद्दीक्षेतिधीयते।।३।।**

दीक्षा ब्रह्मज्ञान देते. पाश म्हणजे कर्मबंधनाचा नाश करते. याकरिता तत्त्वचिंतन करणाऱ्या ज्ञानी पुरुषांनी या प्रक्रियेला दीक्षा असे म्हटले आहे. मन, वाणी आणि कर्म यांच्याद्वारे जो पाप संचय केला जातो तो दीक्षेमुळे अगदी मुळापासून नष्ट होतो. शास्त्रवेत्त्यांचा असा त्रिकालाबाधित सिद्धान्त आहे की, एकमात्र दीक्षा हीच मनुष्याला परमज्ञान प्रदान करू शकते. दीक्षा विज्ञानरूपी फल देते. दुसरी विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे ती द्वैतभावाचा व मनाचा लय करते. आणि तिसरी सर्वात श्रेष्ठ गोष्ट म्हणजे दीक्षा मुक्ती देते. या सर्व गोष्टी ज्या क्रियेमुळे घडून येतात त्या शक्तिपाताला दीक्षा असे म्हणतात.

**दीक्षेचा हेतू :-**

ज्ञानाचे दान करणे हाच दीक्षेचा हेतू आहे; कारण ज्ञान प्राप्त झाले की, मनुष्य मुक्त होतो. सामान्य लोकांची अशी समजूत आहे की, ज्ञान ही काही दान करण्याची किंवा एकाने दुसऱ्याला देण्याची वस्तू नव्हे. ज्यांना वेदान्ताचा गर्भितार्थ शक्तिपातयुक्त श्रीगुरुपरंपरेने प्राप्त होत नाही त्यांना असे वाटते की, नुसत्या प्रवचनाने, सांगण्याने किंवा महावाक्योपदेशाने वेदान्त प्रतिपादित ज्ञान प्राप्त होईल. परंतु "**तत्त्वप्रकाश**" या ग्रंथात शास्त्रकारांनी निक्षून असे सांगितले आहे की -

**परिपक्वमला ये तानुत्सादनहेतुशक्तिपातेन।**
**योजयति परे तत्त्वे स दीक्षयाऽऽचार्यमूर्तिस्थः।।**

ज्यामुळे शिष्याचा मूळ आवरणरूप मल हा परिपक्व होऊन गळून पडण्याच्या अवस्थेला येतो त्यावेळी श्रीसद्गुरू शक्तिपात करून शिष्याच्या मलादि आवरणाचा भेद करतात व त्याची परतत्त्वाशी गाठ घालून देतात. अशा प्रकारे शक्तिपाताने ज्ञानदान करणाऱ्या श्रीगुरूंना मूर्तिमंत दीक्षाचार्य असे म्हणतात.

**"सूतसंहितेतील"** यज्ञवैभवखंडात असे म्हटले आहे की -

**शक्तिपातेन संयुक्ता विद्या वेदान्तवाक्यजा।**
**यदा यस्य तदा तस्य विमुक्तिर्नात्र संशयः।।३५.२६।।**

वेदान्ताने प्राप्त होणारी विद्या जेव्हा शक्तिपाताच्या संयोगाने मिळते तेव्हा मनुष्य तत्क्षणीच मुक्त होतो यात काहीच संशय नाही. याचा अर्थच असा आहे की, श्रीगुरू हे श्रोत्रीय व ब्रह्मनिष्ठ असूनसुद्धा जर शक्तिपात करण्याचे सामर्थ्य त्यांच्यात नसेल तर शिष्याला त्याच क्षणी साक्षात्कार होऊ शकत नाही.

त्यानंतर **"सूतसंहितेमध्ये"** तर वेदान्त-तत्त्वज्ञान हे शक्तिपाताच्या हातात हात घालून आल्यावरच उपयुक्त ठरते हे सांगताना **"सूतगीतांतर्गत" "सर्ववेदान्तसंग्रह"** या अध्यायात असे म्हटले आहे की -

**तत्त्वज्ञानेन मायाया बाधो नान्येन कर्मणा।।८.६।।**
**ज्ञानं वेदान्तवाक्योत्थं ब्रह्मात्मैकत्वगोचरम्।।**
**तच्च देवप्रसादेन गुरोः साक्षान्निरीक्षणात्।**
**जायते शक्तिपातेन वाक्यादेवाधिकारिणाम्।।८.७।।**

तत्त्वज्ञानानेच मायेचा निरास होतो. दुसऱ्या कोणत्याही कर्माने किंवा उपासनेने म्हणजे मार्गाने होत नाही. महावाक्यामुळे उत्पन्न होणारे, जीव व ब्रह्माचे ऐक्य दाखविणारे असे ज्ञानच वेदान्तशास्त्राला संमत आहे. हे ज्ञान देवाच्या प्रसादामुळे श्रीगुरूंकडून प्रत्यक्ष दृष्टिक्षेप झाल्यामुळे शक्तिपात होऊन अधिकारी शिष्याला नुसत्या वाक्योच्चारा-बरोबर अनुभवाला येते. यावरून हे सिद्ध होते की, नुसत्या प्रवचनाने, बोलण्याने किंवा सांगण्यानेज्ञान प्राप्तीचे काम होत नाही. यासाठी

ज्ञान देण्याची क्रिया घडून येणे आवश्यक असते. ज्ञान देणे ही अपूर्व गोष्ट आहे व ती एकमात्र दीक्षेनेच साध्य होते. दीक्षा म्हणजेच ज्ञान देणे. ज्या श्रीगुरूंजवळ ही ज्ञान देण्याची शक्ती आहे तेच ज्ञान देऊ शकतील. बाकी कोणीही ज्ञान देऊ शकणार नाहीत. फक्त सांगू शकतील.

ज्याला खरी ज्ञानप्राप्तीची तळमळ आहे त्याने अशी शक्तिपात-योगदीक्षा आपल्याला कोठे मिळेल याच्या शोधात असले पाहिजे. इतर शेकडोशे साधनांचा, उपासनांचा व मार्गांचा त्याग करून जेथे अशा प्रकारे प्रत्यक्ष ज्ञानदानाची दीक्षा मिळत असेल तेथे निःसंकोच-पणे पदर पसरला पाहिजे. याबाबतीत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीमद्-भगवद्गीतेच्या**" ४ थ्या अध्यायातील ३४, ३५,३६ व ३७ या श्लोकांचा जो भावार्थ प्रकट केला आहे तो पाहण्यासारखा आहे.

**तें गा ज्ञान पैं बरवें। जरी मनी आथि आणावें।**
**तरी संतांतें भजावें। सर्वस्वेंसीं।।४.१६५।।**
**जे ज्ञानाचा कुरुठा। तेथ सेवा हा दारिवंठा।**
**तो स्वाधीन करीं सुभटा। वोळगोनी।।१६६।।**
**तरी तनुमनजीवें। चरणांसी लागावें।**
**आणि अगर्वता करावें। दास्य सकळ।।१६७।।**
**मग अपेक्षित जें आपुलें। तेंहि सांगतील पुसिलें।**
**जेणें अंतःकरण बोधलें। संकल्पा न ये।।१६८।।**
**जयाचेनि वाक्य उजिवडें। जाहालें चित्त निधडें।**
**ब्रह्माचेनि पाडें। निःशंक होय।।१६९।।**
**ते वेळीं आपणपेयां सहितें। इयें अशेषेंहि भूतें।**
**माझ्या स्वरूपीं अखंडितें। देखसी तूं।।१७०।।**
**ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल। तैं मोहांधकरु जाईल।**
**जैं श्रीगुरुकृपा होईल। पार्था गा।।१७१।।**
**जरी कल्मषाचा आगरु। तूं भ्रांतीचा सागरु।**
**व्यामोहाचा डोंगरु। होऊनि अससी।।१७२।।**

**तऱ्ही ज्ञानशक्तिचेनि पाडें। हें आघवेंचि गा थोकडें।**
**ऐंसे सामर्थ्य असे चोखडें। ज्ञानीं इये।।१७३।।**
**देखें विश्वसंभ्रमा ऐसा। जो अमूर्ताचा कडवसा।**
**तो जयाचिया प्रकाशा। पुरेचिना।।१७४।।**
**तया कायसे हे मनोमळु। हें बोलताचि अति किडाळु।**
**नाहीं येणें पाडे ढिसाळु। दुजें जगीं।।१७५।।**

"जर ते उत्तम असे आत्मज्ञान आपल्याला प्राप्त व्हावे असे साधकाला वाटत असेल तर त्याने ज्यांना ज्ञानाचे दान करण्याची शक्ती परंपरेने प्राप्त झाली आहे अशा संत सत्पुरुषांची सर्व भावाने उपासना केली पाहिजे; कारण हे सत्पुरुष म्हणजे ज्ञानाचे कोठार होत. सेवाधर्म हा त्या कोठाराचा दरवाजा आहे. भगवान् श्रीकृष्ण असे म्हणतात की, हे अर्जुनरूपी साधका! तू अत्यंत मनोभावाने या संतसत्पुरुषांची सेवा करून हा दरवाजाच आपल्या स्वाधीन करून घे. शरीर, मन व जीवभाव हे सर्व त्यांना अर्पण करून त्यांच्या चरणी लाग. अत्यंत नम्र व निरहंकार होऊन त्यांची सेवा किंवा दास्य कर. अशा प्रेमाने केलेल्या सेवेने ते प्रसन्न होतील. मग जर तू त्यांच्यापुढे आत्मज्ञानाची इच्छा स्वतःहून प्रकट केलीस तर ते शक्तिपात दीक्षा देऊन तुला ज्ञानबोधाने तृप्त करतील. ही ज्ञानवस्तू तुला प्राप्त झाली की, तुझे अंतःकरण संकल्प करण्याचे विसरून जाईल व मनामध्ये कसलेही संकल्पविकल्प उत्पन्न होणार नाहीत. यामुळे एका आत्मपदार्थावाचून साधकाला दुसरा पदार्थ जगात आहे याची कल्पनाच येत नाही. ज्यावेळी श्रीसद्गुरू शक्तिपातपूर्वक शिष्याला तत्त्वज्ञानाचे दान करतात त्यावेळी त्याच्या दिव्यचक्षूंचे उन्मीलन झाल्याने चित्त निर्भय होते. या दीक्षा समकालच जीव परब्रह्माच्या योग्यतेस पोहोचतो. हे अर्जुना! शक्तिसंक्रमणामुळे तुझ्या चित्ताची जेव्हा वर वर्णिल्याप्रमाणे स्थिती होईल त्यावेळी तू आपल्यासह सर्व भूते व सर्व जग एकरूप म्हणजे माझ्या स्वरूपात निरंतर पाहशील. अर्जुना! ज्यावेळी श्रीगुरू कृपापूर्वक हे ज्ञानाचे दान तुला शक्तिपाताने

करतील त्याचवेळी खऱ्या ज्ञानप्रकाशाचा तुझ्या अंतःकरणात उदय होईल व तुझा मोहरूपी अंधकार पूर्णपणे नाहीसा होईल. हे अर्जुना! जरी तू सर्व पापांचे आगर असला किंवा भ्रांतीचा समुद्र किंवा मोहाचा डोंगर असला तरी ज्यावेळी कुंडलिनीरूपी ज्ञानशक्ती जागृत होऊन तिचा उदय होईल त्यावेळी त्या कुंडलिनी शक्तीपुढे ह्या सर्व गोष्टी अगदी कःपदार्थ ठरतील. शक्तिपातयोगाने प्राप्त होणाऱ्या ज्ञानाचे सामर्थ्य अत्यंत श्रेष्ठ असे आहे. कारण शक्ती जागृत होऊन जेव्हा तिचा सुषुम्णेत प्रवेश होतो तेव्हा वरील सर्व गोष्टी जळून जाऊन साधक ज्ञानाच्या उदयामुळे हळूहळू शुद्धचित्त होत जातो व शेवटी ब्रह्मरूप होतो. जीवाला विश्व आहे असा भ्रम झाला आहे. हा भ्रम म्हणजे ब्रह्माचा कवडशासारख्या प्रकाशाप्रमाणेच आहे. परंतु ज्यावेळी ज्ञानशक्तीच्या उदयामुळे सर्वत्र प्रकाशचैतन्याचा अनुभव येतो त्यावेळी कडवसा म्हणजे भ्रांतीचे नावही उरत नाही. या ज्ञानापुढे मनाच्या दोषांचे सामर्थ्य शून्य ठरते. खरोखर शक्तिपातयोगाने उदित होणाऱ्या या कुंडलिनीरूप ज्ञानशक्तीच्या सामर्थ्याशी दुसऱ्या कोणत्याही गोष्टीची तुलना करणे योग्य नाही. या ज्ञानासारखा दुसरा थोर पदार्थच या जगात नाही."

यावरून हे सिद्ध होते की, दीक्षा किंवा ज्ञान ही नुसती सांगण्याची किंवा फक्त ऐकण्याची गोष्ट नाही. ज्ञान ही देण्याची वस्तू आहे. याकरिता बोलण्याने, सांगण्याने, प्रवचनाने किंवा तत्सम कोठल्याही कृतीने जीव-साधक कधीही कृतार्थ होणार नाही. फक्त ज्ञानवस्तू देण्यानेच जीव कृतार्थ होईल. ज्याने अशा प्रकारे ज्ञान दिले आहे व ज्याने ते घेतले आहे तेच हे जाणू शकतील. याकरिता ज्ञान ही सांगण्याऐकण्याची गोष्ट नसून देण्याघेण्याची आहे हे नितांत सत्य आहे. "**हृदया हृदय येक जाहले। ये हृदयींचे ते हृदयीं घातलें। द्वैत न मोडतां केलें। आपणाऐसें अर्जुना।।१८.१४२१।।**" असे जेव्हा श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज "**श्रीज्ञानेश्वरीत**" अर्जुनाच्या दीक्षेचे वर्णन करतात तेव्हा ज्ञान ही देण्याचीच वस्तू आहे याचा पडताळा आल्या-

शिवाय राहत नाही. त्याचप्रमाणे "**येर कलशींचे येरीं। रिचविजे जयापरी। आपणपें तया श्रीहरी। दिधलें तैसें।। श्रीज्ञानेश्वरी १३.११४६।।** ज्याप्रमाणे एका कलशातील पाणी दुसऱ्या कलशात ओतावे त्याप्रमाणे श्रीभगवंतांनी अर्जुनाच्या अंतःकरणात ज्ञान ओतून आपणच आपल्याला दिले. म्हणजे श्रीभगवंत हे ज्ञानस्वरूप असल्याने त्यांनी शक्तिसंक्रमण करून आपली शुद्ध स्वरूपस्थिती अर्जुनाच्या अंतःकरणात प्रकट केली.

**दीक्षा कशी होते ? :-**

"**सूतसंहितेतील**" यज्ञवैभवखंडातील "**महादेवप्रसादनिरूपणम्**" या प्रकरणात असे म्हटले आहे की -

**तस्य प्रसादयुक्तस्य विद्या वेदान्तवाक्यजा।**
**दहत्यविद्यामखिलां तमः सूर्योदये यथा।।४.३५.२४।।**

ज्याप्रमाणे सूर्योदय अंधःकाराला जाळून टाकतो त्याप्रमाणे वेदान्त वाक्यापासून शक्तिपातामुळे उत्पन्न होणारी विद्या, ज्याला मागे कथन केलेला दीक्षाप्रसाद प्राप्त झाला आहे, त्याची सर्व अविद्या जाळून टाकते. असे सामर्थ्य असणारी दीक्षा कशी होते हे पाहण्यासारखे आहे.

स्पर्श, भाषण, दर्शन व संकल्प या चार प्रकाराने दीक्षा होते. दीक्षेच्या या चार प्रकारांचे वर्णन करताना "**योगवासिष्ठाच्या**" निर्वाण प्रकरणाच्या पूर्वार्धात असे म्हटले आहे की -

**दर्शनात् स्पर्शनात् शब्दात् कृपया शिष्यदेहके।**
**जनयेद्यः समावेशं शाम्भवं स हि देशिकः।।१२८-६१।।**

जे दर्शनाने, स्पर्शाने, शब्दाने व कृपा म्हणजे संकल्प या चार साधनांनी शिष्याच्या देहात ज्ञानाचा समावेश करतात ते साक्षात् शिवस्वरूप श्रीगुरू होत असे समजावे. पहिल्या तीन प्रकारातही कृपा हाच आधार असतो.

श्रीसमर्थांनी "**मनाच्या श्लोकात**" या चार प्रकारच्या दीक्षांचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे.

**हरीभक्त वीरक्त विज्ञानराशी। जेणें मानसी स्थापिलें निश्चयासी।**
**तया दर्शनें स्पर्शनें पुण्य जोडे। तया भाषणें नष्ट संदेह मोडे।।१३३।।**

श्रीगुरू हरिभक्त व विरक्त असून शिष्याला दीक्षेने ज्ञान देण्याची विशेष प्रक्रिया जाणणारे असतात. ते संकल्पाने शिष्याच्या मनात ज्ञानाचा निश्चय शक्तिपाताने स्थापन करतात. त्यांच्या ठिकाणी दर्शनाने व स्पर्शाने दीक्षा देण्याचे सामर्थ्य असल्याने शिष्याला ज्ञानभिक्षारूप पुण्याची प्राप्ती होते. अशा श्रीसमर्थ श्रीसद्गुरूंच्या "तत्त्वमस्यादींपैकी" एखाद्याही महावाक्याने, मंत्राने किंवा नुसत्या कल्याणकारक शब्दाने शिष्याचा संदेह ज्ञानप्राप्तीमुळे दूर होतो.

प्रत्येक दीक्षा कशी होते ते पाहण्यासारखे आहे.

**स्पर्शदीक्षा :-**

स्पर्शदीक्षेची व्याख्या करताना "**कुलार्णवतंत्रात**" श्रीमहादेव श्रीपार्वतीला असे म्हणतात की -

**यथा पक्षी स्वपक्षाभ्यां शिशून् संवर्द्धयेच्छनैः।**
**स्पर्शदीक्षोपदेशश्च तादृशः कथिते प्रिये।।**
**कुलार्णव तंत्र १४.३५।।**

ज्याप्रमाणे पक्षी आपल्या पंखांचा स्पर्श करून आपल्या पिल्लांचे लालन, पालन व वर्धन करतो त्याप्रमाणे स्पर्शदीक्षा असते. जोपर्यंत पिल्लू अंड्याच्या बाहेर येत नाही तोपर्यंत पक्षी अंडे उबवितो व अंड्यातून बाहेर आल्यावर जोपर्यंत पिल्लू लहान असते तोपर्यंत आपल्या पंखाखाली झाकून ठेवतो. त्याप्रमाणेच श्रीगुरू स्पर्शाने शिष्याच्या ठिकाणी सुप्त असलेली शक्ती जागृत करून तिचे संवर्धन करतात. शक्तीचा हळूहळू विकास होऊन शेवटी ती सहस्रारापर्यंत जाते. त्यामुळे साधकाला पूर्णावस्था प्राप्त होते. अशा प्रकारे जी दीक्षा होते तिला स्पर्शदीक्षा किंवा स्पर्शद्वारे शक्तिसंचार असे म्हणतात.

श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीच्या**" १८ व्या अध्यायात अर्जुनाला आलिंगन देऊन श्रीकृष्णांनी ज्ञान कसे संक्रमित केले याचे जे वर्णन केले आहे ते स्पर्शदीक्षेचेच वर्णन आहे.

**मग सांवळा सकंकणु। बाहु पसरोनि दक्षिणु।**
**आलिंगिला स्वशरणु। भक्तराजु तो।।१८.१४१८।।**
**न पवतां जयातें। कांखे सूनि बुद्धीतें।**
**बोलणें मागौतें। ओसरलें।।१४१९।।**
**ऐसें जें काहीं एक। बोला बुद्धीसीही अटक।**
**तें द्यावया मिष। खेंवाचें केलें।।१४२०।।**
**हृदया हृदय एक जालें। ये हृदयींचें तें हृदयीं घातलें।**
**द्वैत न मोडितां केलें। आपणाऐसें अर्जुना।।१४२१।।**
**दीपें दीपु लाविला। तैसा परिष्वंगु तो जाला।**
**द्वैत न मोडतां केला। आपणपें पार्थु।।१४२२।।**

भगवान् श्रीकृष्णांनी कंकणांनी युक्त असा आपला श्यामवर्णाचा उजवा हात पुढे करून आपल्यास शरण आलेल्या भक्तराज अर्जुनाला आलिंगन दिले. स्वस्वरूप हे बुद्धीला व शब्दाला आकलन होत नाही. त्यामुळे तेथे बोलणे खुंटून जाते. ते स्वरूप अर्जुनाला देण्याकरिता देवांनी आलिंगनाचे निमित्त केले. श्रीकृष्णांचे हृदय व अर्जुनाचे हृदय एकमेकांना भिडले. श्रीकृष्णांनी आपल्या हृदयातील ज्ञान अर्जुनाच्या हृदयात घातले. त्यांनी देव व भक्त या रूपाने दिसणारे द्वैत न मोडता अर्जुनाला आपल्यासारखे केले. एका दिव्याने दुसरा दिवा लावल्यावर जसे द्वैत कायम राहून ऐक्य मोडत नाही तसा प्रकार या आलिंगनाचा होऊन द्वैत न मोडता श्रीकृष्णांनी पार्थाला आपलेपणा दिला. **"श्रीज्ञानेश्वरीच्या"** ११ व्या अध्यायातही अर्जुनाला स्पर्शदीक्षेने अनुग्रह कसा झाला याचे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केले आहे.

**ना तरी मधुवनीं ध्रुवासी केलें। जैसें कपोल शंखें शिवतलें।**
**आणि वेदांचियेही मती ठेलें। तें लागला बोलों।।१८४।।**
**तैसा अनुग्रहो पैं राया। श्रीहरि धनंजया।**
**आतां कवणेकडेही माया। ऐसी भाषा नेणोंचि तो।।१८५।।**

मधुवनात ध्रुव तपश्चर्या करीत होता. त्याला श्रीभगवंतांची स्तुती करण्याची इच्छा होती. श्रीभगवंतांनी ध्रुवाच्या गालाला आपल्या

हातातील शंखाचा स्पर्श केल्याबरोबर वेदालाही जे अगम्य होते ते त्याच्या मुखातून आपोआप उमटू लागले. अगदी याचप्रमाणे भगवान् श्रीकृष्णांनी अर्जुनाला स्पर्शदीक्षानुग्रह दिला. त्यामुळे त्याच्या दृष्टीने मायेची भाषाच नाहीशी झाली.

प्रत्यक्ष डोक्यावर हात ठेवून श्रीनिवृत्तिनाथांनी आपल्याला स्पर्श दीक्षा देऊन ज्ञानाचे बीज आपल्या ठिकाणी कसे रुजविले याचे वर्णन **"श्रीज्ञानेश्वरीच्या"** ६ व्या अध्यायात श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केले आहे.

**ज्ञानदेव म्हणे मी चाडें। सद्गुरूंनी केलें कोडें।**
**माथां हात ठेविला तें फुडें। बीजचि वाइलें।।४९२।।**

श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, "मी बीज पेरण्याचे चाडे आहे. श्रीनिवृत्तिनाथांनी असे काही नवल केले की, त्यांनी माझ्या डोक्यावर हात ठेवून शक्तिपातयोगाच्या द्वारा ज्ञानाचे बीज माझ्या ठिकाणी घातले. "ज्ञान ही देण्याची व घेण्याची वस्तू असल्याने श्रीसद्गुरू ती शक्तिपाताने देतात व शिष्य ती स्वीकारतो. ज्याप्रमाणे चाड्यातून पेरलेले बी **सुक्षेत्रीं आणि वोलटे। बीजही पेरिलें गोमटें। तरी आलोट फळ भेटे। परि वेळे कीं गा।।१८.९९९।।** या न्यायाने फळ देते त्याप्रमाणे श्रीसद्गुरूंच्या कृपेने मूलाधारस्थ कुंडलिनी शक्ती जागृत होऊन मलविक्षेपआवरणादि सर्व दोषांचे भस्म होते." **तियें ब्रह्मीं ऐक्यपणें। ब्रह्मचि होऊनि असणें। तें क्रमेंचि करून तेणें। पाविजे पैं।।१८.१००६।।** अशी स्थिती साधकाला क्रमाक्रमाने प्रयत्न करून प्राप्त होते. आता श्रीसद्गुरूंच्या केवळ दर्शनाने दृग्दीक्षा कशी होते ते पाहू.

**दृग् दीक्षा :-**

**स्वापत्यानि यथा मत्स्यो वीक्षणेनैव पोषयेत्।**
**दृग्भ्यां दीक्षोपदेशश्च तादृशः परमेश्वरि।।**
**कुलार्णव तंत्र १४.३६।।**

"हे पार्वती ! मासा ज्याप्रमाणे आपल्या अपत्यांचे पालन केवळ प्रेमळ दृष्टीने करतो त्याप्रमाणे श्रीगुरूंच्या प्रेमळ कृपाकटाक्षाने शिष्यामध्ये शक्तिसंचार होऊन शिष्य कृतार्थ होतो."

संत हे साधकांच्या बाबतीत अत्यंत प्रेमळ व श्रीमंत असतात. **"कां जे लळेयाचे लळे सरती। मनोरथांचे मनोरथ पुरती"।।९-३।।** असे श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी **"श्रीज्ञानेश्वरीत"** म्हटल्याप्रमाणे साधकाला त्याने जी जी आळ घ्यावी किंवा जे जे मनोरथ करावे ती ती इच्छा व ते ते त्याचे मनोरथ सहज पूर्ण होतात, म्हणून त्यांना प्रेमळ म्हटले जाते. त्याचप्रमाणे **"परमार्थ महाधन। जोडी देवाचे चरण।।"** असे श्रीसंततुकाराममहाराजांनी म्हटल्याप्रमाणे परमात्म-स्वरूपाची प्राप्ती करून देत असल्याने त्यांना श्रीमंत म्हटले जाते. श्रीसंत निवृत्तिनाथमहाराजांनी दृग्दीक्षा देऊन आपल्याला कृतार्थ कसे केले हे वर्णन करताना श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज **"श्रीज्ञानेश्वरीत"** असे म्हणतात,

**तुमचेया दिठिवेयाचिये वोलें। सासिन्नले प्रसन्नतेचे मळे।**
**ते साउली देखोनि लोळें। श्रांत जी मी।।९.४।।**
**कां जैं दिठिवा तुमचा वरूषे। तैं सकळार्थसिद्धिमती पिके।**
**येऱ्हवीं कोंभेला उन्मेष सुके। जरी उदास तुम्ही।।९.२५।।**

श्रीगुरुमहाराजांच्या कृपादृष्टीच्या ओलाव्यामुळे माझ्या अंतःकरणात प्रसन्नतेचे हिरवेगार मळे भरास आले. मी संसारतापाने अगदी पोळून गेलो होतो. परंतु त्यांची दृग्दीक्षा प्राप्त झाल्याबरोबर मी त्या कृपेच्या सावलीत अगदी आनंदाने लोळत आहे. कारण जेव्हा श्रीगुरूंच्या कृपादृष्टीचा म्हणजे दृग्दीक्षेचा साधकावर वर्षाव होतो तेव्हा सर्व शब्दांचे अर्थ खरोखरी कोणते आहेत याची सम्यक् दृष्टी साधकाच्या बुद्धीमध्ये उत्पन्न होते. या दीक्षेमुळे शब्दांचे ब्रह्मज्ञानार्थ प्रतिपादक अर्थ कसे आहेत हे समजणारी बुद्धी उत्पन्न होऊन पक्व होंते. मात्र अशी दृग्दीक्षा साधकाला मिळाली नाही तर ज्ञानाचा फुटलेला अंकुरही सुकून जातो.

"**श्रीज्ञानेश्वरीच्या**" १० व्या अध्यायात या दृग्दीक्षेचा महिमा वर्णन करताना श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, "**हें असो दिठी जयावरी झळके। तो जीवचि परि तुके। महेशेंसीं ।।१०.९।।**" श्रीसद्गुरुरायांची दृष्टी ज्यावेळी साधकावर झळकते त्यावेळी साधकाच्या जीवस्थितीचा भंग होऊन त्याची योग्यता शिवाइतकी होते. म्हणजे दृग्दीक्षेच्या प्रभावाने जीव शिव होतो.

दृग्दीक्षेचा प्रभाव अपार आहे. डोळ्यांचे सामर्थ्य कल्पनातीत आहे. अर्जुनाला ते जाणवले. तो म्हणतो -

**जी आनंदसरोवरींचीं कमळें। तैसे हे जे तुझे डोळे।**
**आपुलिया प्रसादाचीं राउळें। जयालागीं करिती।।११.६५।।**

अर्जुन म्हणाला, "हे श्रीकृष्णा! आनंदसरोवरातील कमळाप्रमाणे तुझे डोळे आहेत. किती विशाल! किती सुंदर! ज्यावेळी तुझ्या नेत्रातून कृपेची किरणे साधकांवर पडतात त्यावेळी जन्मजन्मांतरीच्या अज्ञानाचा नाश होऊन ज्ञानाचा प्रसाद प्राप्त होतो. या ज्ञानप्रसादरूप मंदिरात साधक आनंदाने सुखाची राणीव भोगतो. दृग्दीक्षेमुळेच साधकाला आनंदाचे साम्राज्य प्राप्त होते."

श्रीसद्गुरूंच्या या दृग्दीक्षेचा अद्भुत महिमा श्रीसंतज्ञानेश्वर-महाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीच्या**" १२ व्या अध्यायात फारच बहारदारपणे वर्णन केला आहे.

**जयजय वो शुद्धे। उदारे प्रसिद्धे।**
**अनवरत आनंदें। वर्षतिये।।१२.१।।**
**विषयव्याळें मिठी। दिधलिया नुठी ताठी।**
**ते तुझिये गुरुकृपादृष्टी। निर्विष होय।।२।।**
**तरी कवणातें तापु पोळी। कैसेनि वो शोकु जाळी।**
**जरी प्रसादरसकल्लोळीं। पुरें येसी तूं।।३।।**
**योगसुखाचे सोहळे। सेवकां तुझेनि स्नेहाळे।**
**सोऽहंसिद्धीचे लळे। पाळिसी तूं।।४।।**
**आधारशक्तीचिया अंकीं। वाढविसी कौतुकीं।**

**हृदयाकाशपालखीं। परिये देसी निजें।।५।।**
**प्रत्यक्ज्योतीची ओवाळणी। करिसी मनपवनाची खेळणीं।**
**आत्मसुखाची बाळलेणीं। लेवविसी।।६।।**
**सतराविये‍चें स्तन्य देसी। अनाहताचा हल्लरू गासी।**
**समाधिबोधें निजविसी। बुझाउनी।।७।।**
**म्हणोनि साधकां तूं माउली। पिके सारस्वत तुझिया पाउलीं।**
**याकारणें मी साउली। न संडीं तुझी।।८।।**
**अहो सद्गुरुचिये कृपादृष्टी। तुझे कारुण्य जयातें अधिष्ठी।**
**तो सकळ विद्यांचिये सृष्टी। धात्रा होय।।९।।**

"हे श्रीगुरुकृपादृष्टी माते! तुझा जयजयकार असो. तू शुद्ध आहेस. तू अत्यंत उदार म्हणून प्रसिद्ध आहेस. तू अखंड आनंदस्वरूप किंवा प्रेमरूप असून शिष्याच्या ठिकाणी अत्यंत परमानंदाचा वर्षाव करणारी किंवा प्रेमाची प्राप्ती करून देणारी आहेस. विषयरूपी भयंकर सर्पाने जीवाला मिठी मारून वेढून टाकल्यामुळे त्याला आत्मविस्मृतिरूप मूर्च्छा येते. ती कशानेही नाहीशी होत नाही. पण ज्यावेळी श्रीगुरू दृग्दीक्षा देतात तेव्हा त्यांच्या कृपादृष्टीनेच विषयरूपी सर्पाचे विष उतरून ती मूर्च्छा नाहीशी होते. या दृग्दीक्षेचा महिमा अपार आहे. ज्यावेळी श्रीसद्गुरूंच्या अंतःकरणात साधकाच्याविषयी कृपाप्रेमाचा पूर येऊन त्याच्या लाटा उसळू लागतात तेव्हा हे कृपाप्रेम दृष्टिद्वारा स्रवून शिष्याच्या ठिकाणी संक्रांत होते. त्यावेळी संसारातील त्रिविध तापाने पोळणारा साधक शांत होऊन जातो. प्रिय वस्तूचा वियोग व अप्रिय वस्तूचा संयोग यांच्या विषयीचा शोक त्याला जाळू शकत नाही."

"ही दृग्दीक्षा साधकाला मिळाली की, साधकाला कोणत्याही प्रकारचे सायास न करता योगसुखाचे सोहळे भोगावयास मिळतात. ही दीक्षा झाल्याबरोबर साधकाची कुंडलिनी शक्ती जागृत होऊन ती साधकाला अत्यंत सहजतेने व प्रेमाने योगाचा आनंद भोगवीत उन्नती पथावर नेत असते. शेवटी मी ब्रह्म व्हावे अशी जी साधकाची

इच्छा असते तीही या दीक्षेमुळे पूर्ण होते. या दीक्षेमुळे मूलाधारातील कुंडलिनी शक्ती जागृत होते. ती मोठ्या लीलेने व कौतुकाने सुषुम्णामार्गात प्रवेश करून साधकाला वर नेते. वर जाताना षट्चक्रांचा वेध होत जेव्हा शक्ती जाते तेव्हा ती आज्ञाचक्रामध्ये म्हणजे हृदयाकाशात येते. तेथे साधकाला आपल्या शुद्ध आत्मस्वरूपाचे ज्ञान होते. जणू काही या हृदयाकाशरूपी पाळण्यात साधकाला आपल्या शुद्ध आत्मस्वरूपाच्या ऐक्याचे झोकेच मिळतात. या दीक्षेमुळेच स्थलकाला-पलीकडील आत्मतत्त्वरूप ज्योतीची ओवाळणी मिळते. म्हणजे देहापासून बुद्धीपर्यंत जेवढी सूक्ष्म तत्त्वे आहेत त्या सर्वांच्या अंतर्यामी राहणाऱ्या चैतन्याची या दीक्षेमुळेच प्राप्ती होते. मन व प्राण या दोन्ही अवघड गोष्टी दीक्षाप्रसादामुळे खेळण्याप्रमाणे स्वाधीन होऊन राहतात. बाळाला आईने अलंकार घालावेत त्याप्रमाणे आत्मसुखाचा अलंकार या दीक्षासाधनामुळे अनायासे प्राप्त होतो. शक्ती ऊर्ध्वगामिनी होऊन सहस्रारात गेली की, साधकाला व्योमचक्रातील चंद्रामृताच्या सतराव्या कलेचे दूध मिळते. तेथेच श्रीशिवशक्तीचे ऐक्य घडून येते. हे होत असताना नाना तऱ्हेचे अनाहत ध्वनी साधकाला ऐकू येतात. अनाहतनादामध्ये जेव्हा मनाचा लय होतो तेव्हा साधक नामरूपातीत होऊन त्याला समाधी सुख प्राप्त होते. साधक या समाधिबोधामुळे जणू काही स्वरूपात निद्रा घेत पहुडतो. म्हणून हे श्रीगुरुकृपादृष्टे! तुझ्यामुळे जे साधन प्राप्त होते त्यामुळे तू साधकांची सतत कृपादृष्टी सांभाळ करणारी आई आहेस. या दीक्षासाधनामुळेच सर्व प्रकारच्या विद्या साधकाला प्राप्त होतात. म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, मी दृग्दीक्षा साधनाची कृपारूप साउली कधीही सोडणार नाही. हे श्रीसद्गुरूंचे कृपादृष्टी! तुझ्या कृपेचा आश्रय ज्याला मिळेल तो सृष्टी निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवाप्रमाणे नाना विद्यांची सृष्टी निर्माण करणारा ब्रह्मदेवच होतो."

**शब्ददीक्षा :-**

श्रीसद्गुरूंच्या शब्दाबरोबर शक्ती संक्रमित होऊन शिष्याच्या ठिकाणी आपण ब्रह्म आहोत असा भाव जेव्हा उदित होतो तेव्हा शब्ददीक्षा

घडून येते. शास्त्रकारांनी शब्ददीक्षेची व्याख्या करताना असे म्हटले आहे की -

**निशम्य कोकिलशब्दं कोकिलः काकपालितः।**
**स्वीयां जातिं विजानाति गुरुवाक्यश्रवात्तथा।**
**स्वीयं स्वरूपं विज्ञाय शिष्यो ब्रह्मत्वमश्नुते।।**

कावळ्यांच्यामध्ये पाळलेले कोकिळेचे पिल्लू कोकिळेचा शब्द ऐकताच मी कावळा नसून कोकीळ आहे असे ओळखते. त्याप्रमाणे "तू ब्रह्म आहेस" असे श्रीसद्गुरू म्हणताच शिष्याच्या ठिकाणी तो भाव उदित होऊन त्यास तसा अनुभव येतो तेव्हा त्याला शब्ददीक्षा असे म्हणतात.

या शब्ददीक्षेचे व तिच्या सामर्थ्याचे वर्णन करताना **"श्रीज्ञानेश्वरीच्या"** ४ थ्या अध्यायात श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की -

**जयाचेनि वाक्य उजिवडें। जाहले चित्त निधडें।**
**ब्रह्माचेनि पाडें। निःशंकु होय।।१६९।।**
**ते वेळीं आपणपेयां सहिते। इयें अशेषेंहि भूतें।**
**माझ्या स्वरूपीं अखंडितें। देखसी तूं।।१७०।।**
**ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल। तैं मोहांधकारु जाईल।**
**जैं गुरुकृपा होईल। पार्था गा।।१७१।।**

ज्यावेळी श्रीसद्गुरू शिष्याला "तू ब्रह्म आहेस" असे सांगतात त्यावेळी अशेष अज्ञान नाहीसे होऊन शिष्याच्या ठिकाणी ज्ञानाचा उजेड उत्पन्न होतो. त्यामुळे त्याचे चित्त निर्भय होते व निःसंशयपणे तो ब्रह्माच्या योग्यतेस जाऊन पोहोचतो. ही शब्ददीक्षा झाली की, तत्काळ ब्रह्मज्ञान उत्पन्न होऊन साधक आपल्यासह सर्व जग भगवत्स्वरूप आहे असे पाहू लागतो. त्याची द्वैताची जाणीव नाहीशी होते. अशा रीतीने जेव्हा शब्ददीक्षारूप श्रीगुरुकृपा होते तेव्हा शक्तिसंक्रमण होऊन मलविक्षेपआवरणादि सर्व दोष जळून जाऊन साधकाच्या अंतःकरणात ज्ञानप्रकाशाचा उदय होऊन मोहरूपी अंधकार पूर्णपणे नाहीसा होतो.

"**श्रीज्ञानेश्वरीच्या**" सातव्या अध्यायातही श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी शब्ददीक्षेची अपूर्वता अलौकिकपणे वर्णन केली आहे.

**जेथ तद्‌ब्रह्मवाक्यफळें। जियें नानार्थरसें रसाळें।**
**बहकतें आहाति परिमळें। भावाचेनि।।१८६।।**
**सहज कृपामंदानिळें। श्रीकृष्णद्रुमाचीं वचनफळें।**
**अर्जुनश्रवणाचिये खोळे। अवचित पडिलीं।।१८७।।**
**तियें प्रमेयांची हो कां वळलीं।**
**कीं ब्रह्मरसाच्या सागरीं चुबुकळिलीं।**
**मग तैसीच कां घोळिलीं। परमानंदें।।१८८।।**
**तेणें बरवेपणें निर्मळें। अर्जुना उन्मेषाचे डोहाळे।**
**घेताति गळाळे। विस्मयामृताचे।।१८९।।**
**तिया सुखसंपत्ति जोडलिया। मग स्वर्गा वाये वांकुलिया।**
**हृदयाच्या जीवीं गुतकुलिया। होत आहाती।।१९०।।**
**ऐसें वरचिलीचि बरवा। सुख जावों लागलें फावा।**
**तंव रसस्वादाचिया हांवा। लाहो केला।।१९१।।**
**कानाचेनि गवाक्षद्वारें। बोलाचे रश्मी अभ्यंतरें।**
**पाहेना तंव चमत्कारें। अवधान ठाकलें।।२००।।**

"श्रीभगवंतांच्या बोलण्यात "तद्‌ब्रह्म" इत्यादि ब्रह्मप्रतिपादक वाक्ये आली. त्या वाक्यांचे सामर्थ्य अद्भुत व अपार होते. ती वाक्ये ब्रह्म-प्रतिपादक अशा नाना अर्थरूपाने भरलेली होती. कारण श्रीभगवंतांच्या मुखातून जी जी वाक्ये निघत होती ती शक्तिसहित संक्रमित होत असल्याने अर्जुनाच्या अंतःकरणात त्यामुळे भक्तिप्रेमाचा सुगंध दरवळू लागला. श्रीभगवंतांची अर्जुनावर असलेली स्वाभाविक कृपा हाच मंदवायू होता. त्या मंदवायूने भगवान् श्रीकृष्णरूप वृक्षाची वचनरूप फळे अर्जुनाच्या श्रवणरूप झोळीत अकस्मात् पडली. म्हणजे श्रीकृष्णांच्या कृपेमुळे अर्जुनाला शब्ददीक्षा मिळून तो कृतार्थ झाला. ती वाक्यरूपी फळे सिद्धान्ताचीच बनली होती व ब्रह्मरसाच्या समुद्रात बुडविली होती. त्याचप्रमाणे ती परमानंदात घोळली होती. अशा त्या शुद्ध व

उत्कृष्ट वाक्यांनी अर्जुनाच्या अंत:करणाचा वेध घेतला. त्याबरोबर त्याच्या ठिकाणी "मी ब्रह्म आहे" असे ज्ञान उत्पन्न झाले. इतकेच नव्हे; तर या शब्ददीक्षेने अर्जुनाला अनेक दिव्य दिव्य अनुभव येऊ लागल्यामुळे तो विस्मयामृताच्या डोहामध्ये बुडून गेला. अशा दिव्य अनुभवांच्या रसाळ स्वादाच्या सुखाने अर्जुन संपन्न झाल्यामुळे त्याला स्वर्गसुख तुच्छ वाटू लागले. शब्ददीक्षेमुळे जे अपूर्व अनुभव अर्जुनाला आले त्यामुळे त्याच्या हृदयात गुदगुल्या होऊ लागल्या. अशा रीतीने श्रीभगवंतांच्या तोंडून निघालेल्या शब्दांमुळे अगदी सुरुवातीलाच वरवर पाहता पाहता अर्जुनाच्या मनात सुख उचंबळून आले. परंतु या वरवरच्या सुखकारक अनुभवांचा जो ब्रह्मरूप शेवट, त्या ब्रह्मरसाचा स्वाद घेण्याची त्याला उत्कट इच्छा झाली. ती त्याची इच्छा पूर्ण झाली; कारण भगवान् श्रीकृष्णांच्या मुखातून निघालेल्या शब्दांचे सामर्थ्य इतके अपूर्व होते की, विस्मयालाही विस्मय वाटला. अर्जुनाच्या कानाच्या झरोक्यातून भगवान् श्रीकृष्णांच्या शब्दांचे किरण हृदयाच्या आत गेल्याबरोबर त्याला दिव्य अनुभव आल्यामुळे त्याचे मन आश्चर्यचकित झाले व शेवटी तो ब्रह्मरूप होऊन गेला."

शब्ददीक्षेने हृदयात मूलत:च असलेले ज्ञान कसे प्रकट होते हे सांगताना **"श्रीज्ञानेश्वरीच्या"** ९ व्या अध्यायात श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की -

**मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे। आणि हृदयीं स्वयंभचि असें।**
**प्रत्यक्ष फावों लागे तैसें। आपैसयाचि।।४९।।**

"अहं ब्रह्मास्मि", "तत्त्वमसि", "अयमात्मा ब्रह्म", "प्रज्ञानं ब्रह्म" इत्यादि अगदी थोड्या शब्दांनी श्रीगुरू शिष्याला उपदेश देतात. हा उपदेश मिळाल्याबरोबर शक्तिपात होऊन शिष्याच्या ठिकाणी आत्मज्ञानाचा उदय होतो. वास्तविक आत्मज्ञान हे जीवाच्या ठिकाणी मूळचेच असते. ते अज्ञानाने म्हणजेच मलविक्षेपआवरणादि दोषांनी झाकलेले असते. जेव्हा वरील वाक्ये शक्तिसहित संक्रमित होतात तेव्हा उक्त दोष जळून जाऊन आत्मज्ञान विलसू लागते. हा अनुभव

शिष्याला या शक्तिपातयोगाच्या अलौकिक सामर्थ्यामुळे आपोआप येतो. त्याला कोणतेही सायास स्वतःहून करावे लागत नाहीत. मी मूळचाच "**सर्वदुःख विनिर्मुक्तैकचैतन्यात्मकोऽहमित्येष आत्मानुभवः**" **(ब्रह्मसूत्र ४-१-२)** सर्वदुःखरहित केवळ ज्ञानमात्र चैतन्यस्वरूप आहे असा अनुभव येऊन "**कोणाचे कांहीं न घेसी। आपुलेही तैसेंचि न देसी।।६८।।**" **(अमृतानुभव प्र.९)** श्रीगुरूंनी माझे काही घेतले नाही किंवा आपले काही दिलेही नाही असा आपोआप प्रत्यय येऊन शिष्य कृतार्थ होतो.

"**श्रीज्ञानेश्वरीच्या**" १० व्या अध्यायातही शब्ददीक्षेची महती आढळून येते.

**जी आपुलिया स्नेहाची वागेश्वरी। जरी मुकेयातें अंगिकारी।**
**तो वाचस्पतीसीं करी। प्रबंधु होडा।।८।।**
**तरी ऐकें ऐकें गा सुवर्म। वाक्य माझें परम।**
**जें अक्षरें लेऊनि परब्रह्म। तुज खेंवासि आलें।।६२।।**
**पैं गुरुशिष्यांचिया एकांतीं। जे अक्षरा एकाचि वदंती।**
**ते मेघाचियापरी त्रिजगतीं। गर्जती सैंघ।।१२६।।**
**आजि आयुष्या उजवण जाहाली। माझिया दैवा दशा उदयली।**
**जे वाक्यकृपा लाधली। दैविकेनि मुखें।।१४७।।**
**आतां येणें वचनतेजाकारें। फिटलें आंतील बाहेरील आंधारें।**
**म्हणोनि देखतेसे साचोकारें। स्वरूप तुझें।।१४८।।**
**ते आतां वाक्यसूर्यकर तुझे फांकले।**
**आणि ऋषींनीं मार्ग होते जे कथिले।**
**तयां आघवयांचेंचि फिटलें। अनोळखपण।।१६३।।**
**तुझे वाक्य व्यक्ती न येतां देवा। जो आपुलिया जाणे जाणिवा।**
**तो कहींचि नोहे हें मद्भावा। भरंवसेनि आलें।।१७५।।**
**जयाचि गोठीचि ऐकतखेवों। आघवा संसार होय वावो।**
**बळिया नित्यता लागे येवों। आपणपेयां।।१९७।।**
**जन्ममृत्यूंची भाख। हारपोनि जाय निःशेख।**

**आंत बाहेरि महासुख। वाढोंचि लागे।।१९८।।**
**मग दैवगत्या जरि सेविजे। तरी तें आपणचि होऊनि ठाकिजें।**
**तें तुज देतां चित्त माझें। पुरे म्हणों न शके।।१९९।।**

"श्रीसद्गुरूंचे प्रेम हीच कोणी सरस्वती होय. ज्यावेळी शब्द प्रेमाने थबथबून श्रीगुरूंच्या मुखातून स्रवतात तेव्हा शक्तीचे संक्रमण होऊन शिष्याच्या ठिकाणी अलौकिक सामर्थ्य उत्पन्न होते. "**अनधीतस्य शास्त्रस्य स्वत एव प्रकाशनम्।"।। सूतसंहिता ब्रह्मगीता ४.१२३।।** असे या शब्ददीक्षेने घडून येत असल्यामुळे शक्तिपातयोग सामर्थ्यामुळे श्रीसद्गुरूंच्या प्रेममय शब्दांनी मुक्याचा अंगीकार केला तर तो बृहस्पतीशी देखील ग्रंथरचनेत प्रतिज्ञेने पैज लावू शकेल अशी स्थिती उत्पन्न होते.

शब्ददीक्षेचे सामर्थ्यच अलौकिक आहे. त्यामुळे श्रीकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की, "माझे हे शक्तीने संपुटित झालेले वाक्य ऐक. माझे हे वाक्य साधेसुधे नसून अक्षररूपाने साक्षात् परब्रह्मच तुला आलिंगन देण्यास आले आहे. श्रीसद्गुरू शिष्याला एकांतात शब्ददीक्षा एखाद्या नाममंत्राने किंवा "तत्त्वमस्यादि" महावाक्याचा आश्रय करून देतात. त्या एका शब्दाने शिष्याची कुंडलिनी शक्ती जागृत होऊन शरीरस्थ त्रिजगतात मेघाच्या गर्जनेप्रमाणे अनाहत नादाची नानाप्रकारे गर्जना होऊ लागते. शक्तीचे चालन झाले की, ब्रह्मग्रंथी, विष्णुग्रंथी व रुद्रग्रंथींचे भेदन होते. शरीरस्थ त्रिजगतात ज्ञानरूपी गौरी (माहेश्वरी) शक्ती, इच्छारूपी ब्राह्मीशक्ती व क्रियारूपी वैष्णवीशक्ती किंवा लक्ष्मी यांचा निवास असतो. मूलाधारापासून नाभिचक्रापर्यंत इच्छाशक्तिरूप ब्राह्मीशक्तीचे स्थान आहे. हिलाच अध:शक्ती असे म्हटले जाते. नाभीपासून कंठचक्रापर्यंत क्रियाशक्तिरूप विष्णुशक्तीचे स्थान आहे. या वैष्णवीशक्तीलाच मध्यशक्ती म्हणतात. कंठचक्रापासून आज्ञाचक्रा-पर्यंत ज्ञानशक्तिरूप शिवशक्तीचे स्थान आहे. हिला ऊर्ध्वशक्ती म्हणतात. याच्यापुढे निरंजन निर्गुण ब्रह्माचे स्थान आहे. या तीनही ग्रंथींचा भेद करून शक्ती ऊर्ध्वगामिनी झाली की, तीनही शक्तींना आपल्यामध्ये सामावून ती ब्रह्मरंध्रामध्ये स्थिर होते. त्यावेळी साधक नामरूपातीत

अशा निरंजन पदाची प्राप्ती करून घेतो. असा शब्ददीक्षेचा महिमा अपूर्व आहे."

अर्जुन म्हणाला, "हे प्रभो! श्रीकृष्णा!! आपण शब्ददीक्षेने माझ्यावर जो शक्तिपातयोगानुग्रह केला त्यामुळे माझ्या आयुष्याची सफलता झाली व माझ्या दैवाच्या भाग्यदशेस प्रारंभ झाला. इतकेच नव्हे तर; हे प्रभो! या वचनाच्या अर्थरूप ज्ञानप्रकाशाने माझा आतील व बाहेरील अज्ञान अंधकार नाहीसा झाला. त्यामुळे आता तुझे खरे स्वरूप मी पाहत आहे. तुझे वाक्यरूपी सूर्यकिरण माझ्या अंतःकरणात फाकल्यामुळे पूर्वी ऋषींनी जे मार्ग सांगून ठेवले आहेत त्या सर्वांची, आज शब्ददीक्षेमुळे जे ज्ञान उत्पन्न झाले, त्यामुळे ओळख पटली. म्हणजे त्यांनी जे तुझ्या स्वरूपाचे पूर्ण ब्रह्मत्त्व म्हणून वर्णन केले होते ते सर्व यथार्थ आहे याचा आज मला अनुभव आला. अशा प्रकारे शब्ददीक्षा जोपर्यंत होत नाही तोपर्यंत हे प्रभो! तुझ्या वचनाचा यथार्थ व स्पष्ट बोध होत नाही. कारण शब्ददीक्षेने शक्तिपात होऊन दिव्यचक्षूंचे उन्मीलन झाल्याशिवाय आपल्या बुद्धीनेच जाणण्याचा एखाद्याने कितीही प्रयत्न केला, तरी त्याला त्यांचा यथार्थ बोध होणे कधीही शक्य नाही, हे मला निश्चित कळून आले आहे. या शब्ददीक्षारूप परमामृताचे जो पान करतो त्याचा सर्व संसार खोटा ठरतो व आपला विनाशीपणा जाऊन बळेच आपोआप आपल्या ठिकाणी नित्यता धर्म येतो. शब्ददीक्षेमुळे जन्ममरणाची भाषा निःशेष नाहीशी होते व आतबाहेर परमसुख वाढू लागते. सुदैवाने या शब्ददीक्षारूप परमामृताचे सेवन झाले असता तो साधक परमामृतस्वरूप होऊन जातो. असे हे परमामृत तू मला पाजीत असताना माझे चित्त पुरे म्हणू शकत नाही."

"**श्रीज्ञानेश्वरीतील**" ११ व्या अध्यायातही शब्ददीक्षेचे वर्णन पुढीलप्रमाणे आले आहे.

**म्हणौनि तो देवांचा रावो। म्हणे पार्थातें तुज दिव्य दृष्टी देवों।**
**जया विश्वरूपाचा ठावो। देखसी तूं।।१७६।।**
**ऐसीं श्रीमुखौनि अक्षरें। निघती ना जंव एकसरें।**

**तंव अविद्येचे आंधारें। जावोंचि लागे।।१७७।।**
**तीं अक्षरें नव्हती देखा। ब्रह्मसाम्राज्यदीपिका।**
**अर्जुनालागीं चित्कळिका। उजळलिया श्रीकृष्णें।।१७८।।**
**मग दिव्यचक्षुप्रकाशु जाहला। तया ज्ञानदृष्टी फांटा फुटला।**
**ययापरी दाविता जाहला। ऐश्वर्य आपुलें।।१७९।।**

तो देवांचाही देव भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला असे म्हणाला की, "ज्या दृष्टीने माझ्या विश्वरूपाचे दर्शन तुला घेता येईल अशी दृष्टी मी तुला देतो. श्रीकृष्णांच्या मुखातून अशी अक्षरे निघाल्याबरोबर शक्तिसंक्रमण होऊन एकदम अविद्यारूपी अंधःकार नाहीसा झाला. श्रीभगवंतांच्या मुखातून "मी तुला दिव्यदृष्टी देतो" ही जी अक्षरे निघाली ती साधीसुधी अक्षरे नव्हती. त्या शब्दांच्या ठिकाणी अपूर्व सामर्थ्य होते. ती अक्षरे म्हणजे ब्रह्मस्वरूपाचे साम्राज्य दाखविणारी ज्योती होती. ती ज्ञानज्योती शब्ददीक्षा देऊन अर्जुनाकरिता श्रीभगवंतांनी उजळली होती. या शब्ददीक्षेमुळे अर्जुनाचा अज्ञानांधःकार नाहीसा होऊन चैतन्याचा प्रकाश सर्वत्र पसरला. त्यामुळे ज्ञानदृष्टी प्राप्त होऊन अद्वैत स्थिती अर्जुनाला प्राप्त झाली. ही स्थिती प्राप्त होण्यापूर्वी शब्दाच्या द्वाराने जी शक्तिपातयोगदीक्षा झाली होती त्यामुळे त्याला नाना तऱ्हेचे दिव्य अनुभव प्राप्त झाले. श्रीभगवंतांनी अर्जुनाला जे विश्वरूप ऐश्वर्य दाखविले ते सर्व दिव्य अनुभवांच्या रूपांनी शब्ददीक्षा देऊन दाखविले.

**"श्रीज्ञानेश्वरीच्या"** अठराव्या अध्यायातही शब्ददीक्षेची अपूर्वता वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की,-

**तैसें जया कोण्हासि दैवें। गुरुवाक्यश्रवणाचिसवें।**
**द्वैत गिळोनि विसंवे। आपणया वृत्ती।।९८८।।**
**कानांवचनाचिये भेटी-। सरिसाचि पैं किरीटी।**
**वस्तु होऊनि उठी। कवणि एकु जो।।९९१।।**

ज्यावेळी दैवयोगाने श्रीसद्गुरूंची प्राप्ती होऊन साधकाला शब्ददीक्षा मिळते तेव्हा श्रीगुरुवाक्यश्रवणाबरोबर भेदाचा सर्वार्थाने नाश होऊन

तो आपल्या स्वरूपाच्या ठिकाणी स्थिर होतो. अर्जुना! जो साधक तीव्र अधिकारी असेल त्याला जेव्हा शब्ददीक्षा होते तेव्हा श्रीगुरूंच्या उपदेशरूप वचनाची म्हणजे तत्त्वमस्यादि व त्याच्या कानाची गाठ पडल्याबरोबर तो ब्रह्मरूप होतो.

**ध्यानदीक्षा :- ( कृपा किंवा पत्रदीक्षा )**

**यथा कूर्मः स्वतनयान्ध्यानमात्रेण पोषयेत्।**
**वेधदीक्षोपदेशश्च मानुषस्य तथाविधः।।**
**कुलार्णव तंत्र १४.३७।।**

ज्याप्रमाणे कासवी केवळ मनाने चिंतन करून भूमीच्या खाली ठेवलेली अंडी उबवून पिल्लांना वाढविते व त्यांचे पोषण करते त्याप्रमाणे केवळ संकल्पाने श्रीगुरू शिष्याची शक्ती जागृत करून शक्तिसंचार करतात. या प्रकाराने जी वेधदीक्षा किंवा शक्तिसंचार होतो त्याला मानसदीक्षा असेही म्हणतात.

श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीच्या**" ६ व्या अध्यायात कृपादीक्षेच्या सामर्थ्याचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे.

**तें बुद्धीही आकळितां सांकडें। म्हणऊनि बोलीं विपायें सांपडे।**
**परी श्रीनिवृत्तिकृपादीपउजियेडें। देखेन मी।।३२।।**
**जें दिठीही न पविजे। तें दिठीवीण देखिजे।**
**जरी अतींद्रिय लाहिजे। ज्ञानबळ।।३३।।**
**ना तरी जे धातुवादाही न जोडे। तें लोहींचि पंधरें सांपडे।**
**जरी दैवयोगें चढे। परिसु हातां।।३४।।**
**तैसी सद्गुरुकृपा होये। तरी करितां काय आपु नोहे।।३५।।**

परब्रह्म हे बुद्धीला आकलन करणे कठीण आहे. त्यामुळे शब्दाने त्याचे क्वचितच वर्णन करता येते. असे जरी असले तरी श्रीनिवृत्तिनाथ श्रीसद्गुरूंची कृपादीक्षा झाल्यावर त्या कृपारूप दिव्याच्या प्रकाशात मी ते परब्रह्म पाहीन असे श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. ज्यावेळी अशी ध्यानकृपादीक्षा मिळते त्यावेळी शक्तिपातामुळे इंद्रियातीत असे ब्रह्मज्ञान प्राप्त होते. ते जर प्राप्त झाले तर इंद्रिय दृष्टीलाही जे दिसू

शकत नाही ते इंद्रियावाचूनही पाहता येते. किमयेने लोखंडाचे जातिवंत सोने होऊ शकत नाही. पण दैवाने परिस हाती आला तर त्या परिसाने मात्र धातूचे जातिवंत सोने होऊ शकते. त्याप्रमाणे श्रीसद्गुरूंची कृपादीक्षा झाल्यावर जर प्रयत्न केला तर काय साध्य होणार नाही?

भगवान् श्रीकृष्णाने कृपादीक्षा देऊन अर्जुनाला संसारसागरातून कसे तारले याचे वर्णन "**श्रीज्ञानेश्वरीच्या**" ११ व्या अध्यायात श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे केले आहे.

**मग पार्थु देवातें म्हणे। जी तुम्हीं मजकारणें।**
**वाच्य केलें जें न बोलणें। कृपानिधे।।४४।।**
**जैं महाभूतें ब्रह्मीं आटती। जीव महदादिचे ठाय फिटती।**
**तैं जें देव होऊनि ठाकती। तें विसवणे शेषींचें।।४५।।**
**होतें हृदयाचिये परिवरीं। ठेविलें कृपणाचिये परी।**
**शब्दब्रह्मासिही चोरी। जयाची केली।।४६।।**
**तें तुम्ही आजि आपुलें। मजपुढां हियें फोडिलें।**
**जया अध्यात्मा वोंवाळिलें। ऐश्वर्य हरें।।४७।।**
**ते वस्तु मज स्वामी। एकिहेळां दिधली तुम्हीं।**
**हें बोलों तरी आम्ही। तुजपासोनि भिन्न कैंचे।।४८।।**
**परि साचचि महामोहाचिये पुरीं। बुडालिया देखोनि सीसवरी।**
**तुवां आपणपें घालोनि श्रीहरी। मग काढिलें मातें।।४९।।**
**आणि मी तंव दातारा। ये कृपाचिये रिघोनि गाभारां।**
**घेत आहें चारा। ब्रह्मरसाचा।।६७।।**

मग अर्जुन म्हणाला की, "देवा! तुम्ही कृपासागर आहात. त्यामुळे कृपादीक्षा देऊन जे परब्रह्म बोलून दाखविले जात नाही ते तुम्ही मला प्रत्यक्षात आणून दिले. जेव्हा ही संपूर्ण महाभूते परब्रह्मात लय पावतात व जीवरूप पराप्रकृती व महदादिरूप अपराप्रकृती यांचे नावही राहत नाही तेव्हा तुम्ही परब्रह्मस्वरूपात स्थिर होऊन राहता. हेच कुंडलिनीरूप शेषशक्तीचे खरे विश्रांतिस्थान आहे. हे स्थान सहस्रारात आहे. तेच खरे हृदयमंदिर आहे. त्या ठिकाणी हे

परब्रह्म एखाद्या कृपण मनुष्याप्रमाणे लपवून ठेवले आहे. शब्दब्रह्मापासून म्हणजे वेदापासूनही ते चोरून ठेवले आहे. याचा अर्थच असा आहे की, वेद सुद्धा त्या स्वरूपाला जाणू शकत नाहीत. परंतु तुम्ही ते आत्मस्वरूप हृदय उघडे करून कृपेने मला दाखविले. त्यामुळे मी धन्य झालो. या अध्यात्मस्वरूपावरून श्रीशंकरांनी कैलासाचे राज्य ओवाळून टाकून स्मशानात वास केला. हे प्रभो! ती अध्यात्मवस्तू, ते ज्ञान, तुम्ही मला एकदम दिले. वास्तविक दिले व घेतले ही भाषा खरी नाही. आम्ही तुमच्यापासून निराळे नसल्यामुळे ही स्वभावतःच होण्याघडण्याची गोष्ट आहे. पण खरोखरच मी या संसाररूपी महामोहाच्या पुरात डोक्यापर्यंत बुडालो आहे, हे पाहून, देवा! आपण स्वतः त्यात उडी टाकून मला बाहेर काढले. ही खरी कृपादीक्षा आहे. आपण कृपासागरच आहात. मी तर तुमच्या कृपेच्या गाभाऱ्यात बसून ब्रह्मानंदाचा स्वाद घेत आहे.

**"श्रीमद्भगवद्गीतेच्या"** १८ व्या अध्यायातही ही कृपादीक्षा कशी अपूर्व आहे हे सांगताना श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज म्हणतात -

**ते सत्त्वशुद्धी साहाकारें। गुरुकृपामृततुषारें।**
**सासिन्नलेनि बोधें वोसरे। द्वैतदैन्य।।२५९।।**
**म्हणौनि धनंजया। तूं संसारदुर्गती यया।**
**तरसील माझिया। प्रसादास्तव।।१२७३।।**

"साधकाला शुद्ध सत्त्वाच्या साहाय्याने श्रीगुरुकृपारूपी अमृताच्या तुषारांचा लाभ कृपादीक्षेने झाल्यामुळे जो आत्मबोध होतो त्यामुळे त्याचे द्वैताचे दैन्य नाहीसे होते. म्हणून श्रीकृष्ण अर्जुनाला असे म्हणाले की, "हे धनंजया! या कृपादीक्षारूप प्रसादाशिवाय संसार-दुर्गतीपासून तरण्याचा दुसरा मार्गच नाही."

**दीक्षेचे व साधनाचे स्थान :-**

ज्या ठिकाणी बसून साधक दीक्षा घेणार ते व नित्यसाधनाचे स्थान अत्यंत पवित्र असले पाहिजे. **"मंत्रयोगसंहितेमध्ये"** दीक्षेच्या स्थानाचे वर्णन करताना असे म्हटले आहे की -

**गोशालायां गुरोर्गेहे देवागारे च कानने।**
**पुण्यक्षेत्रे तथोद्याने नदीतीरे च दीक्षणम्।।१।।**
**धात्रीबिल्वसमीपे च पर्वताग्रगुहासु च।**
**गङ्गायास्तु तटे वापि कोटिगुणं फलं भवेत्।।२।।**
**अथवा गुरुरेवास्य दीक्षयेद् यत्र तच्छुभम्।**
**गुरोः परतरं नास्ति तद्वाक्यं श्रुतिसन्निभम्।।३।।**

दीक्षेच्या वेळी जीवात्म्याच्या व परमात्म्याच्या मिलनाचा मार्ग मोकळा व्हावयाचा असतो. याकरिता उत्तम स्थानाची आवश्यकता असते. स्थान जितके उत्तम तितकी शिष्याची अभिष्ट सिद्धी होण्याला अवसर अधिक हे निश्चित आहे.

दीक्षेकरिता स्थान प्रशस्त व पवित्र असावे. गोशाला, श्रीगुरुगृह, देवालय, वन, (एकांत अरण्य) पुण्यक्षेत्र, (तीर्थक्षेत्र) उद्यान, नदीतट, आवळ्याच्या किंवा बेलाच्या झाडाखाली, पर्वतावर, गुहेत किंवा श्रीगंगेच्या तीरावर दीक्षा ग्रहण केली पाहिजे. श्रीगंगेच्या तीरावरील कोणत्याही स्थानी दीक्षा ग्रहण करण्यात खूप मोठे पुण्य आहे. याकरिता श्रीगंगा तटावर दीक्षा ग्रहण करणे ही सर्वोत्तम गोष्ट आहे. श्रीगंगेच्या तीरावरील सर्व स्थाने तीर्थरूप आहेत.

या सर्वांपेक्षा श्रीगुरूंची ज्या ठिकाणी दीक्षा देण्याची इच्छा होईल व ते ज्या ठिकाणी दीक्षा ग्रहणासाठी शिष्यास बसावयास सांगतील ते स्थान सर्वश्रेष्ठ आहे असा नितांत विश्वास शिष्याने मनात बाळगला पाहिजे. श्रीगुरूंचे वाक्य हे वेदतुल्य वाक्य असून त्यांच्याशिवाय या त्रिभुवनात कोणतेही मोठे तीर्थ नाही.

नित्याच्या साधनाची जागाही फार सुंदर व मनोहर अशा एकांतस्थळी असावी असे श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे. परंतु प्रत्येक साधकाला अशी जागा सध्याच्या कालात उपलब्ध होणे शक्य नसल्याने कालमानाला अनुसरून जागा कशी असावी हे पाहू.

साधनाला शक्यतो स्वतंत्र व एकांताची खोली असावी. तेथे निदान साधनाच्या वेळी तरी लोकांची जा ये नसावी. साधनाची

खोली-जागा दररोज एकच असली म्हणजे खूप फायदा होतो. अशी शक्यता नसल्यास भिन्न जागी साधन करण्यास हरकत नाही. साधनाच्या खोलीत जितका अधिक एकांत, स्वच्छता व प्रसन्नता राहील तितका अधिक लाभ होईल. पलंग, टेबल, दिवा, उदबत्ती, समई, काचेच्या वस्तू इत्यादि शरीराला जखम करणाऱ्या किंवा साधनात क्रिया सुरू झाल्यावर काही तरी अनिष्ट घडून येईल अशा वस्तू आसपास असू नयेत. जागा भरपूर मोकळी असावी. आपण नित्य ज्या खोलीत अभ्यास करतो त्या खोलीचे वातावरण शक्तियुक्त होत असते. जर ती खोली दुसऱ्या कामासाठी उपयोगात आणली तर तेथील वातावरण दूषित होते. यासाठी साधनाव्यतिरिक्त खोली बंद ठेवणे अधिक श्रेयस्कर ठरते. खोलीत उन्हाळ्यात गारवा व थंडीत उष्णता असावी. मात्र पंखा लावून ठेवून साधन करू नये. खोली जवळ कोणत्याही प्रकारची घाण असू नये. दुर्गंधीमुळे साधन चांगले होत नाही. साधनापूर्वी धूप जाळून किंवा उदबत्ती लावून खोली सुवासिक करावी. मात्र धूर होणार नाही याची काळजी घ्यावी. डास, पिसवा, किडे, ढेकूण किंवा मुंग्या खोलीत असू नयेत. असे स्थान न मिळाल्यास किंवा परिस्थितीमुळे काही कमतरता असल्यास भगवान् श्रीवेदव्यासांनी "**ब्रह्मसूत्रात**" केलेल्या सूचनेप्रमाणे "**यत्रैकाग्रता तत्राविशेषात्।।४.१.११।।**" म्हणजे जागा कशीही असली तरी जेथे मन एकाग्र होईल तेथे साधन करावे. साधन देवघरातच बसून केले पाहिजे असे नाही.

**साधनासाठी आसन :-**

साधनासाठी आसन कसे असावे हे सांगताना "**श्रीमद्भगवद्गीतेच्या**" ६ व्या अध्यायात भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला असे सांगतात की -

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः।**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम्।।११।।**

अतिशय शुद्ध अशा पवित्र स्थळी अत्यंत उंच होणार नाही व अगदी जमिनीशी लागून होणार नाही असे आपले स्थिर आसन असावे. हे आसन खाली दर्भ अंथरून त्यावर मृगचर्म घालून व

शेवटी वस्त्राची घडी घालून तयार करावे.

"**कुलार्णवतंत्र,**" "**संमोहनतंत्र**" व "**गंधर्वतंत्रात**" आसन कोणते असावे व त्याचा उपयोग कसा होतो हे सांगताना असे म्हटले आहे की-

**तूलकम्बलवस्त्राणां सिंहव्याघ्रमृगाजिनम्।**
**कल्पयेदासनं धीमान् सौभाग्यज्ञानवर्धनम्।।१।।**
**कृष्णाजिने ज्ञानसिद्धिः मुक्तिः स्याद् व्याघ्रचर्मणि।**
**वस्त्रासने व्याधिनाशः कम्बलं दुःखमोचनम्।।२।।**

साधकाने आसनावर बसल्याशिवाय साधन करता कामा नये. आसनाशिवाय साधन करणे शास्त्रसंमत नाही. यासाठी बुद्धिमान् साधकाने सौभाग्य प्राप्त व्हावे व ज्ञानबुद्धी व्हावी म्हणून वस्त्राचे किंवा लोकरीपासून तयार केलेले आसन वापरावे. सिंह, व्याघ्र किंवा मृगचर्माचाही उपयोग करण्यास हरकत नाही. काळ्या हरणाच्या कातड्यावर बसून साधन केल्याने ज्ञानाची सिद्धी होते. सिंह किंवा व्याघ्रचर्मावर बसून साधन केल्याने समाधीची सिद्धी लवकर होऊन मोक्षप्राप्ती लवकर होते. कंबलासनावर बसून साधन केल्याने दुःखाची निवृत्ती होते. वस्त्रासनामुळे व्याधिनाश होतो.

आसन कसे असू नये हेही साधकाने लक्षात ठेवले पाहिजे.

**धरण्यां दुःखसम्भूतिर्दौर्भाग्यं दारुजासने।**
**वंशासने दरिद्रः स्यात्पाषाणे व्याधिपीडनम्।।१।।**
**तृणासने यशोहानिः पल्लवे चित्तविभ्रमः।**
**जपध्यानतपोहानि जायते वसनासने।।२।।**

आसन न घालता जमिनीवर बसून साधन केल्याने त्रास, दुःख व व्याधी होण्याचा संभव असतो. बांबूपासून तयार केलेल्या आसनावर बसून साधन केल्याने दारिद्र्य येते. जमिनीवर बसून साधन केल्याने पीडा व रोगाची उत्पत्ती होते. गवतावर बसून साधन केल्याने यशहानी व पानावर बसून साधन केल्याने चित्तामध्ये भ्रांती उत्पन्न होते. नुसत्या वस्त्रासनावर बसून साधन केल्याने जप, ध्यान व तप यांचा नाश होतो.

पाटावर, पलंगावर किंवा टेबलावर बसून साधन करू नये. अशा प्रकारे साधन केल्यास पडण्याचा संभव असतो. आसन पाच फूट लांबरुंद, मऊ, नरम, सुखकारक, जाड व औरस चौरस प्रशस्त असे असावे. गादीपेक्षा चौपदरी घोंगडी, जाड सतरंजी किंवा गालीचा उत्तम. आसन खोलीच्या मधोमध घालावे. भिंतीजवळ घालू नये. कारण साधनाच्या वेळी क्रिया जोरात झाल्यास किंवा मागे पडल्यास शरीराला लागण्याचा संभव असतो. आसनाच्या चारी बाजूला जागा मोकळी असावी. आपल्या आसनावर दुसऱ्या कोणालाही बसू देणे उचित व इष्ट नाही. त्यामुळे दुसऱ्याचे दोष येण्याची शक्यता असते.

**साधनाला बसण्याची पद्धत :-**

शक्तिपातयोगसाधन ही जागृत म्हणजेच प्रत्यक्ष अनुभूती देणारी साधना आहे. त्यामुळे साधनाला बसताना एखादे विशिष्ट आसन घालूनच साधन सुरू केले पाहिजे अशी आवश्यकता नाही.

सोयीची, सुखकारक व आराम वाटेल अशी मांडी घालून पाठीला बाक न येता सरळ व ताठ बसून साधनाला आरंभ करावा. श्रीकपिल महामुनींनी "**सांख्यसूत्रात**" असे लिहिले आहे की, "**स्थिर-सुखमासनमिति न नियमः ।।६.२४ ।।**" ज्यामुळे देह व मन स्थिर होऊन सुख वाढेल त्याला आसन म्हणतात. यासंबंधी आणखी कोणताही नियम नाही. मुद्दाम पद्मासन किंवा सिद्धासन घालून साधनाला बसू नये. त्यामुळे शरीरावर ताबा व संयम येऊन साधनाच्या वेळी आतून होणाऱ्या क्रियांना अडथळा उत्पन्न होतो. साधनात होणाऱ्या क्रियांना अगदी मोकळेपणाने वाव मिळाला पाहिजे. यासाठी साधी मांडी घालून बसले म्हणजे शक्तीकडून आवश्यक त्या क्रिया होऊन लवकर प्रगती होईल. एकाच आसनावर पुष्कळ वेळ बसल्याने पायास रग लागल्यास अगर मुंग्या येऊ लागल्यास पाय बदलण्यास हरकत नाही. ज्यांचे गुडघे दुखतात त्यांनी ताठ बसून पाय लांब पसरून व कंबरेला फार रग लागल्यास आडवे पडून साधन करण्यास हरकत नाही.

**साधनाला बसण्यापूर्वी करावयाची प्रर्थना :-**

साधनाला बसण्यापूर्वी पुढील प्रार्थना करून साधनाला सुरुवात करावी.

**ब्रह्मानन्दं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम्।**
**द्वन्द्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम्।।**
**एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतम्।**
**भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि।।१।।**
**गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः।**
**गुरुः साक्षात् परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः।।२।।**
**अखण्डमण्डलाकारं व्याप्तं येन चराचरम्।**
**तत्पदं दर्शितं येन तस्मै श्रीगुरुवे नमः।।३।।**
**अज्ञानतिमिरान्धस्य ज्ञानाञ्जनशलाकया।**
**चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरुवे नम।।४।।**
**मन्त्रः सत्यं पूजा सत्यं सत्यं देवो निरञ्जनः।**
**गुरुर्वाक्यं सदा सत्यं सत्यमेव परम्पदम्।।५।।**

**साधनाची वेळ :-**

सकाळ संध्याकाळची साधनाची निश्चित वेळ ठेवल्याने खूप फायदा होतो. त्यामुळे साधनात नियमितपणा येतो. साधन निरंतर होण्याची शक्यता खूप वाढते. खंड पडत नाही. ज्याप्रमाणे जेवणाची ठराविक वेळ असली म्हणज़े ती वेळ झाली की, भूक लागते त्याप्रमाणे साधनाची वेळ झाली की, मन तिकडे खेचले जाऊन साधन होते.

प्रत्येक दिवशी सकाळी व संध्याकाळी कमीत कमी एक एक तास तरी उत्साहाने साधन केले पाहिजे. शक्य असेल तर दुपारी व मध्यरात्री उठून साधन केले तर अधिक चांगले. एखाद्या दिवशी ठरलेल्या वेळी काही अपरिहार्य कारणामुळे साधन झाले नाही तर इतर वेळेला साधन अवश्य केले पाहिजे. काही सामाजिक, व्यावहारिक, शारीरिक व मानसिक कारणांमुळे साधन झाले नाही तर निरुत्साहित व अस्वस्थ होता कामा नये.

भोजन झाल्यानंतर तीन तासपर्यंत बैठक करू नये. भोजनानंतर तत्काळ भरल्या पोटी किंवा भुकेने व्याकूळ झालेल्या अवस्थेत रिकाम्या पोटी साधन करू नये. अशा वेळी अगदी थोडेसे खाऊन साधनाला बसावे.

सुतकामध्ये साधन करू नये. सोयरात करण्यास हरकत नाही. साधनाच्या वेळी शरीरावर वारा बसू देऊ नये. खोलीत दिव्याचा किंवा अन्य कोणत्याही प्रकारचा प्रखर प्रकाश असू नये. त्याचप्रमाणे परगावी गेल्यावर साधकाला एकांताची स्वतंत्र खोली असल्यास साधन करावे. तशी सोय नसल्यास साधन करू नये.

**साधनेसाठी वस्त्रे :-**

साधनाच्या वेळी कमीत कमी कपडे अंगावर असावेत. पुरुषांनी धोतर अगर पंचा नेसून बसावे. पँण्ट घालून बसल्याने शरीर जखडल्यासारखे होते. शरीरावर अधिक कपडे असले म्हणजे मोकळेपणी क्रिया होत नाहीत. थंडीच्या दिवसात प्रकृतीमानाप्रमाणे कपडे घालण्यास हरकत नाही. साधनाच्यावेळी येणारी लाळ किंवा नाक पुसण्याकरिता जवळ रुमाल ठेवावा. तो रोज धुवावा.

**साधनातील क्रिया :-**

ज्यावेळी श्रीमहेश्वरांची कृपा होते तेव्हा श्रीगुरुकृपेने व प्रबल पुण्यप्रतापामुळे साधकाची आत्मसत्ता जागृत होते. या आत्मसत्तेला योगी लोक कुंडलिनी शक्ती असे म्हणतात. भक्तिमार्गाने जाणारे भक्त हिलाच आह्लादिनी शक्ती असे म्हणतात. वेदान्ती लोक या आत्मसत्तेला चिच्छक्ती असे नाव देतात. तर मंत्रतंत्राचे उपासक तिला महामाया आद्याशक्ती कुलकुंडलिनी या नावाने संबोधितात. या आत्मसत्तेच्या जागृतीची सर्वजण इच्छा करतात; कारण ही आत्मसत्ता जागृत झाल्याशिवाय व स्वत: वाटचाल करू लागल्याशिवाय इतर कोणत्याही प्रकाराने सुलभतेने साधक परमात्मस्वरूप होऊ शकत नाही. ही आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्ती जागृत झाली की, ती अनादिकालाच्या निद्रेचा त्याग करून ब्रह्मस्वरूप प्रकट होऊन

श्रीशिवाशी ऐक्य व्हावे म्हणून गतिमान होते. त्यामुळे जप, यज्ञ, पूजा, ध्यान इत्यादि सर्व बाह्य साधने समाप्त होऊन खरे अंतरंग साधन सुरू होते. श्रीशक्ती श्रीशिवाशी समरस होण्यासाठी धडपड करू लागते. त्यावेळी साधकाच्या शरीरात हठयोग, लययोग, मंत्रयोग व राजयोगातील निरनिराळ्या क्रिया आपसुख होत असल्याने त्या होऊ देण्यातच साधकाला आनंद वाटत असतो. त्या अवस्थेत सर्व ब्रह्मांड साधकाच्यां अंतरंगामध्ये चित्रविचित्र रूपाने दिसू लागते. जागृतशक्ती नाना तऱ्हेच्या क्रिया साधकाकडून करविते. या क्रियांच्यामुळे साधकाला नाना तऱ्हेचे आश्चर्यकारक अनुभव येतात. "**योगशिखोपनिषदाच्या**" ६ व्या अध्यायात यासंबंधी असे म्हटले आहे की -

**मनसा मन आलोक्य योगनिष्ठः सदाभवेत्।**
**मनसा मन आलोक्य दृश्यन्ते प्रत्यया दश।।६४।।**
**यदा प्रत्यया दृश्यन्ते तदा योगीश्वरो भवेत्।।६५।।**
**बिन्दुनादकलाज्योतिर्बिन्दुर्ध्रुवतारकम्।**
**शान्तं च तदतीतं च परं ब्रह्म तदुच्यते।।६६।।**
**हसत्युल्लसति प्रीत्या क्रीडते मोदते तदा।**
**तनोति जीवनं बुद्ध्या बिभेति सर्वतो भयात्।।६७।।**
**रोधते बुध्यते शोके मुह्यते नवसम्पदा।**
**कम्पते शत्रुकार्येषु कामेन रमते हसन्।।६८।।**
**स्मृत्या कामरतं चित्तं विजानीयात्कलेवरे।**
**यत्र देशे वसेद्वायुश्चित्तं तद्वसति ध्रुवम्।।६९।।**

ज्यावेळी कुंडलिनीशक्ती जागृत होऊन ती क्रियाशील होईल त्यावेळी मनानेच मनाला पाहून योगसाधन घडू लागते. अशा प्रकारे ज्यावेळी योगसाधन आपोआप घडू लागेल त्यावेळी साधकाला दशेंद्रियविषयक अतींद्रिय ज्ञान होते. अशा प्रकारे साधन करताना जेव्हा अनुभव येऊ लागतो त्यावेळी योगाची सिद्धी फार लवकर होते. नाद, बिंदू, कला, ज्योती, सूर्य, चंद्र, ध्रुव, तारा इत्यादि परब्रह्माची अभिव्यक्ती करणारी चिह्ने अंतराकाशात दिसतात व पुढे नाहीशी

होतात. ज्यावेळी या क्रिया संपतात त्यावेळी मन शांत होते. त्यावेळी कोणतीही क्रिया होत नाही. मग शांत्यातीत अवस्था प्राप्त होते. शांत्यातीत अवस्था ही परब्रह्म आहे. ही अवस्था मनाच्या व वाणीच्या पलीकडे असल्यामुळे केवळ स्वानुभवगम्य आहे हेच खरे.

ज्यावेळी साधन करताना दिव्य अनुभव साधकाला येऊ लागतात त्यावेळी त्याला अपार आनंद होतो. या आनंदामुळे तो उल्हासित व उत्फुल्ल होऊन आनंदित व प्रसन्न होतो. प्रेमाने आपल्याशीच क्रीडा करतो. स्वतःतच रममाण होतो. साधक महासुखाच्या अपार सागरात पोहू लागतो. अशा प्रकारे आत्मसुखाचा अनुभव आला की, साधक विषयांपासून निवृत्त होतो. संसाराबद्दल भय मानून तो त्याच्यापासून लांब राहतो. शोकाच्या प्रसंगात तो बुद्धीच्या जोरावर विवेकाने राहतो. ज्यावेळी साधकाला खूप संपत्ती व सुख मिळते त्यावेळी तो मोहित होत नाही. शत्रुत्वाच्या कार्याबद्दल त्याला भय वाटते. कामामुळे जे विकार शरीरामध्ये होतात त्याचे परिणाम त्याला जाणवतात. त्यामुळे तो सर्व कामनांपासून मनाला आवरतो. शरीरामध्ये ज्या ज्या स्थानी वायू राहतो त्या त्या ठिकाणी चित्तही राहत असते.

ज्यावेळी कुंडलिनी शक्ती मूलाधारातून निघून सहस्राराकडे जाऊ लागते त्यावेळी अनंत क्रिया होतात व अपार अनुभव येतात. या क्रिया का होतात? अनुभव का व कोणते येतात? क्रिया कोणत्या व कशा होतात? त्यांचा शेवट केव्हा होतो? या सर्वांचा विचार व त्याची स्पष्ट कल्पना साधकाला असणे अत्यंत महत्त्वाचे आहे.

**साधनात क्रिया का होतात? :-**

ज्यावेळी साधकाला शक्तिपातयोगदीक्षा होते त्यावेळी साधकाच्या ठिकाणी ज्या अनंत प्रकारच्या क्रिया प्रकट होतात त्या का होतात हे प्रथम पाहणे आवश्यक आहे. त्याचा क्रमशः विचार करू.

**शक्ती जागृत होते :-**

ज्यावेळी श्रीगुरू शक्तिपात करतात त्यावेळी तत्काल अनादि निद्रेचा भंग होऊन कुंडलिनी शक्ती जागृत होते. त्यामुळे प्राण

प्रक्षुब्ध होतो. मूलाधारात त्याची गती रुद्ध झाली की, क्रिया सुरू होतात. याबद्दल **"योगशिखोपनिषदाच्या"** ६ व्या अध्यायात असे म्हटले आहे की -

**आधारवातरोधेन शरीरं कम्पते यथा।**
**आधारवातरोधेन योगी नृत्यति सर्वदा।।२८।।**
**आधारवातरोधेन विश्वं तत्रैव दृश्यते।**
**सृष्टिधारमाधारमाधारे सर्वदेवताः।**
**आधारे सर्ववेदाश्च तस्माधारमाश्रयेत्।।२९।।**

आत्मशक्तीचे उद्बोधन झाले की, प्राणाची गती बदलून जाते. ते प्रक्षुब्ध होऊन सहस्त्राराकडे जाऊ लागतात. परंतु पुढे जाण्याला वाट न मिळाल्यामुळे आधारचक्रामध्येच रुद्ध होतात. त्यामुळे शरीरात कंप उत्पन्न होतो. मूलाधारात प्राण रुद्ध झाल्यामुळे साधक आनंदित होऊन नाचू लागतो. आधारचक्रामध्ये प्राणवायूचा निरोध झाल्याने तेथे साधकाला संपूर्ण विश्वाचे दर्शन होते. कुंडलिनी शक्ती ही मूलाधारातच निवास करते. तिच्या या स्थितीमुळेच सृष्टीचा आधार मूलाधार आहे. या ठिकाणीच सर्व सृष्टी, सर्व देवता व सर्व वेद असतात म्हणून आधार शक्तीचाच आश्रय घ्यावा.

**पश्चिम मार्ग खुला होतो :-**

**"द्विवक्त्रा कुण्डलिन्यभिधा नित्यानन्दस्वरूपा परमा कला प्रकृति वर्तते!"** कुंडलिनी नावाची नित्यानंदस्वरूपाची परम प्रकृती जीवन किंवा प्राणशक्तीच्या रूपाने शरीरात निवास करते. तिला दोन मुखे आहेत. सुषुम्णानाडीचे एक मुख मूलाधारात आहे व दुसरे सहस्त्रारात आहे. या मूलाधारातील मुखाला म्हणजेच ब्रह्मद्वार किंवा ब्रह्मविवराला अडवून त्याच्या तोंडावरच ती झोपली आहे. हे तिचे अंतर्मुख आहे. दुसरे जे बहिर्मुख आहे त्याच्या द्वारा ही प्राणरूप कुंडलिनी शक्ती श्वासप्रच्छ्वास करते. यालाच जीवाचा श्वासनिश्वास म्हणतात. या मुखानेच ती नित्य जागृत आहे असे दिसते. यामुळे जीवाला बाह्यज्ञान किंवा चेतना प्राप्त होत असते. जीवाला जो भिन्नतेचा किंवा द्वैताचा

भास सतत होतो व एकत्वाचा बोध होत नाही, त्याला कारण ही शक्तीची बहिर्मुखताच आहे. ज्या ठिकाणी तिचे अंतर्मुख आहे तेथे ती झोपलेलीच आहे. त्यामुळे जीवाला अंतर्ज्ञान, ब्रह्मज्ञान किंवा आत्मज्ञान न होता तो अज्ञानाने बद्ध होतो. या मार्गानेच गेल्याने साधक सहस्रारातील निरामय अशा ब्रह्मस्थानात पोहोचून त्याला आत्मसाक्षात्कार होतो. परंतु ब्रह्मद्वार अडवून परमेश्वरी शक्ती तेथे झोपलेली असल्यामुळे साधकाचे प्राण सुषुम्णेत प्रवेश करीत नाहीत. आणि जोपर्यंत प्राणशक्ती सुषुम्णा मार्गात प्रवेश करीत नाही तोपर्यंत मोक्षप्राप्तीचा संभव नाही हे अगदी निश्चित आहे. या दृष्टीनेच "**योगशिखोपनिषदात**" असे म्हटले आहे की -

**नाकृतं मोक्षमार्गं स्यात् प्रसिद्धं पश्चिमं विना।।१-१४५।।**

पश्चिम म्हणजे पाठीतून जाणारा मार्ग मोकळा झाल्याशिवाय मोक्षमार्गात प्रगती होत नाही. शरीरात मूलाधारातून निघून सहस्रारापर्यंत पाठीमागून जी नाडी जाते तिला सुषुम्णा म्हणतात. हिलाच पश्चिममार्ग म्हटले जाते. शरीरातील पुढील भागातून गुह्यस्थान, बेंबी, हृदय, कंठ व नाक यांच्या द्वाराने जो प्राणाचा प्रवाह चालू असतो त्याला पूर्वमार्ग असे म्हणतात. या पूर्वमार्गाने म्हणजेच पूर्वमुखाने प्राणाची गती बहिर्मुख अशी चालू असते. कुंडलिनीच्या या मुखानेच श्वासप्रश्वासाची क्रिया होत असते. अंतर्मुखाकडील गती मूलाधारात कपाटात वस्तू बंद करून ठेवल्याप्रमाणे बंद असते. ज्यावेळी श्रीगुरुकृपा होते त्यावेळी प्राणशक्तीचे चालन होऊन हे बंद द्वार उघडण्याचा प्रयत्न होऊ लागतो. या प्रयत्नामुळेच नाना प्रकारच्या क्रिया साधनात प्रकट होतात. "**योग-शिखोपनिषदाच्या**" सहाव्या अध्यायात असे म्हटले आहे की,

**आधारे पश्चिमे भागे त्रिवेणीसङ्गमो भवेत्।**
**तत्र स्नात्वा च पित्वा च नरः पापात्प्रमुच्यते।।३०।।**
**आधारे पश्चिमं लिङ्गं कवाटं तत्र विद्यते।**
**तस्योद्घाटन मात्रेण मुच्यते भवबन्धनात्।।३१।।**

मूलाधारात पश्चिमभागात इडा, पिंगला व सुषुम्णा यांचा त्रिवेणी

संगम होतो. ज्यावेळी श्रीगुरुकृपेने शक्ती जागृत होते त्यावेळी मन व प्राण एकत्र होऊन दिव्य क्रिया होऊ लागतात. हेच खरे स्नान होय. हे क्रियारूप स्नान होऊ लागले की, अद्भुत अनुभवाचे पान साधक करतो व सर्व पापांपासून तो मुक्त होतो. आधाराच्या पश्चिम भागात स्वयंभू लिंग प्रतिष्ठित आहे. त्या ठिकाणी सुषुम्णेमध्ये प्रवेश करण्याचे ब्रह्मद्वार आहे. नाना प्रकारच्या क्रियांनी कुंडलिनी शक्ती जेव्हा धडका मारून ते दार उघडते तेव्हा मनुष्य संसार बंधनातून मोकळा होतो.

**प्राणशक्तीचे ऊर्ध्वगामित्व :-**

साधकाला क्रिया होण्याचे तिसरे महत्त्वाचे कारण हे आहे की, प्राणांची गती ऊर्ध्वमुखी होते. प्राण ऊर्ध्वमुख झाल्याबरोबर ते सुषुम्णेमधून वर जाण्याचा प्रयत्न करू लागतात. अशा वेळी मार्गात जे जे अडथळे येतात ते ते निरनिराळ्या प्रकारच्या क्रिया करून प्राणशक्ती दूर करते. प्रत्येक जीवाच्या कर्मगतीप्रमाणे व त्याने पूर्वजन्मात केलेल्या साधनाप्रमाणे अडथळे येत असतात. त्यामुळे प्रत्येक अडथळ्यात सारखेपणा असणे कधीही शक्य नाही. जागृत आत्मशक्तीला हे अडथळे ओलांडून साधकाला पलीकडे कसे न्यावयाचे याची पुरेपूर जाणीव असते. त्यासाठी कोणत्या क्रियेची आवश्यकता आहे हे ती जाणते. या जाणिवेतूनच अनंत जीवांच्या अनंत क्रिया प्रकट होऊन प्राण सर्व अडथळे ओलांडून सहस्राराकडे जातो. सहस्रारापाशी जाईपर्यंत प्राणशक्तीची जी हालचाल होते, ती बाह्य व अंतःक्रियांच्या रूपाने प्रकट होते व जाणवते.

**वासना व संस्कारांचा नाश :-**

नुसत्या विचाराने वासनांचा व संस्कारांचा नाश लवकर होत नाही. मात्र जेव्हा शक्ती जागृत होऊन सुषुम्णेमध्ये प्रवेश करते तेव्हा हे कार्य सुलभतेने व आपोआप होऊ लागते. सुषुम्णा नाडीमध्ये जन्मजन्मांतरीच्या वासना व संस्कार एकत्रित होऊन एखाद्या गाळाप्रमाणे साठून राहिलेले असतात. ज्यावेळी शक्ती जागृत होते त्यावेळी ती सुषुम्णामार्गातून प्रवाहित होऊन ऊर्ध्वगामिनी होते. ती जसजसा

मार्ग आक्रमू लागते तसतसा वासना व संस्कार यांचा नाश होऊ लागतो. मात्र हा नाश सहजासहजी होत नाही. ज्यावेळी शक्ती ऊर्ध्वगामी होऊन या दोन्ही गोष्टी जाळून टाकू लागते त्यावेळी प्राणशक्तीला खूप अडथळे येतात. संपूर्ण सुषुम्णामार्गात जेथे जेथे अडथळे येऊन प्राणशक्ती रुद्ध होते त्या त्या वेळी तीव्र स्पंदने निर्माण होतात. या स्पंदनांमुळे निरनिराळ्या क्रिया सतत प्रकट होत राहतात व प्रगती होत जाते. शक्ती जागृत होऊन आपल्याला एकदम समाधी लागावी असे जरी साधकाला वाटत असले तरी जन्मजन्मांतरीचे संस्कार, वासना, इच्छा, आकांक्षा त्याला पुढे जाऊ देत नाहीत. साधकाला त्या मागे खेचीतच राहतात. अशा वेळी नियमित साधन केले म्हणजे ब्रह्माभिव्यक्तीची चिह्ने असलेल्या क्रिया शरीरात प्राणशक्ती उद्भूत करून सर्व दोषांचा निरास करते. हुक्क्याची नळी जर लोखंडाच्या सळईने बरेच दिवस साफसूफ केली नाही तर त्यात साठलेली घाण वाढत जाऊन हळूहळू काही दिवसांनंतर ती नळी बंद होते व पुढे त्या नळीतून हुक्का पिणारा धूर खेचू शकत नाही. मात्र तापलेली लोखंडाची सळई घालून जर ती हुक्क्याची नळी हळूहळू साफ केली तर ती जेव्हा पूर्णपणे साफ होईल त्यावेळी त्या नळीतून तंबाखूचा धूर योग्य रीतीने वाहू लागून तो पिणाऱ्याला आनंद देऊ शकेल. सुषुम्णामार्गातही प्राणशक्तीमुळे अशीच साफसफाई करून शुद्धीकरण झाले म्हणजे प्राण विनासायास सहस्रारामध्ये पोहोचतात व साधक कृतकृत्य होतो. हे शुद्धीकरण पूर्ण होईपर्यंत नाना प्रकारच्या क्रियांचे आविष्करण होत राहतेच.

शक्तिपातयोगदीक्षेने उद्भूत होणाऱ्या या क्रियांमुळे महायज्ञाला व हवनाला प्रारंभ होतो. पूर्णाहुती होईपर्यंत ज्या ज्या क्रिया घडतात व जे जे अनुभव साधकाला येतात त्यांचे यथातथ्य वर्णन करणे हे मनुष्यबुद्धीच्या पलीकडचे काम आहे. या विविध क्रियांचे विश्व साधकाला आश्चर्याच्या महासागरात बुडवून टाकून ब्रह्मानंदामध्ये हळूहळू निमग्न करीत करीत वासनासंस्कारांना जाळीत जाळीत पुढे

नेत असते. ज्यावेळी शक्ती श्रीशंभूंशी एकरूप होते तेव्हा सर्व क्रिया संपून साधक कृतकृत्य व कृतार्थ होतो.

**तीन ग्रंथींचे भेदन :-**

ज्यावेळी कुंडलिनी शक्ती जागृत होते त्यावेळी ब्रह्मग्रंथी, विष्णुग्रंथी व रुद्रग्रंथी या तीनही ग्रंथींचे भेदन करून ती सहस्रारस्थ परम श्रीशिवाबरोबर एकरस होऊन आनंदरसात बुडून जाते. ही साधनाची परावस्था म्हटली पाहिजे. या अवस्थेतच सर्व कामनांची निवृत्ती होते. हे कसे घडते? "**योगकुंडलिनी उपनिषदात**" याचे वर्णन करताना असे म्हटले आहे की, ज्यावेळी अग्नी प्राणस्थानात जाऊन प्राणवायूला मिळतो त्यावेळी निद्रिस्थ कुंडलिनी शक्ती जागृत होते. त्या उष्णतेमुळे तापून जाऊन व वायूमुळे चलित होऊन कुंडलिनी सरळ होते व सुषुम्णेमध्ये प्रवेश करते. प्रथम रजोगुणापासून उत्पन्न झालेल्या दशदलयुक्त नाभीपद्मातील ब्रह्मग्रंथीचा भेद करून कुंडलिनी शक्ती सुषुम्णेमध्ये विजेप्रमाणे चमचमाट व झगझगाट करीत अत्यंत त्वरित गतीने मार्गक्रमण करीत वरती चढत जाते. कुंडलिनी शक्तीचा हा चमचमाट व झगझगाट म्हणजेच अनेक प्रकारच्या क्रिया होत. अशा प्रकारे क्रिया करीत कुंडलिनी शक्ती अत्यंत जलद गतीने द्वादशदल हृदयपद्मस्थित विष्णुग्रंथीचा भेद करून पुढे आज्ञाचक्रातील भ्रूमध्यस्थ द्विदलचक्रस्थ रुद्रग्रंथीचा भेद करून सहस्रारात जाते. सारांश, अग्नी व वायू या दोघांच्या आघातामुळे निद्रिस्थ कुंडलिनी शक्ती जागृत होते तेव्हा ब्रह्मग्रंथी, विष्णुग्रंथी, रुद्रग्रंथी आणि षट्चक्रांचे भेदन करीत ती सहस्रदलकमलात जाऊन पोहोचते. त्या ठिकाणी श्रीशिवाशी श्रीशक्तीचे ऐक्य होऊन साधकाला परमानंद प्राप्त होतो. हीच श्रेष्ठ व मोक्षदायक अवस्था आहे.

त्याचप्रमाणे "**योगशिखोपनिषदातही**" या तीनही ग्रंथींचे भेदन शक्तिचालनामुळे व विविध क्रियांमुळे कसे होते याचे वर्णन करताना असे म्हटले आहे की -

**यथा करी करेणैव पानीयं प्रपिबेत्सदा।।१.११७।।**
**सुषुम्णावज्रनालेन पवमानं ग्रसेत्तथा।।१.११८।।**

ज्याप्रमाणे हत्ती नेहमी आपल्या सोंडेने पाणी पितो त्याप्रमाणे योगी सुषुम्णेमध्ये असलेल्या वज्रा नाडीच्या द्वाराने प्राणवायू ग्रहण करीत असतो. बांबूमधील गाठींचा छेद केल्याप्रमाणे प्राणवायू सुषुम्णेमधील तीनही ग्रंथींचा भेद करतो. या अर्थानेच **"योगबीज"** या ग्रंथात असे म्हटले आहे की -

**भिद्यन्ते ग्रन्थयो वंशे तप्तलौहशलाकया।**
**तथैव पृष्ठवंशे स्याद्ग्रन्थिभेदस्तु वायुना।।१२५।।**

ज्याप्रमाणे तापलेल्या लोखंडाच्या सळईने बांबूच्या गाठींचा छेद लवकर व सहजासहजी होतो त्याप्रमाणे सहज क्रियांच्या द्वारा मेरुदंडातील सुषुम्णेतील तीनही ग्रंथींचे भेदन अत्यंत सुलभतेने होते.

**पंचतत्त्वांचे अवलंबन :-**

शक्तिपात झाला की, प्राणाच्या गतीत बदल होतो. त्यामुळे प्राण साधकाच्या देहाला विशेष रीतीने क्षुब्ध करतो. हा क्षुब्ध प्राण कधी पृथ्वीतत्त्व, कधी जलतत्त्व, कधी तेजतत्त्व व कधी आकाशतत्त्व या पैकी एका तत्त्वाचा अवलंब करून शरीरात वावरू लागतो. काही वेळेला तो स्वप्रधान होऊन म्हणजे स्वतःच्याच प्राणतत्त्वाचा अवलंब करून देहात सर्वत्र फिरू लागतो. यामुळे नाना प्रकारच्या क्रिया शरीरात उत्पन्न होतात. जेव्हा प्राण भूमितत्त्वाचे अवलंबन करतो तेव्हा शरीर खांबासारखे निश्चल होऊन साधकाला स्तंभभाव प्राप्त होतो. जलतत्त्वाशी प्राण निगडीत झाला की, अश्रुपात होऊ लागतो. तेजतत्त्वाशी प्राणाचा संयोग झाला की, घाम येऊ लागतो व शरीराचा रंग पालटू लागतो. यालाच वैवर्ण्य किंवा वर्णविकृती असे म्हणतात. जेव्हा प्राण आकाशतत्त्वाशी एकरूप होतो तेव्हा प्रलय म्हणजे भावसमाधी, मूर्च्छा, तंद्रा अगर निद्रा यांसारख्या क्रिया होतात. जेव्हा प्राण स्वस्थ होतो म्हणजे आपल्या वायुरूपतत्त्वामध्ये राहू लागतो तेव्हा मंद, मध्य किंवा तीव्रतेने रोमांच, कंप व स्वरविक्रिय हे तीन

भाव प्रकट होतात.

आपल्या देहामध्ये मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत व विशुद्ध ही पाच चक्रे पृथ्वी, जल, तेज, वायू व आकाश या पाच महाभूतांची स्थाने म्हणून प्रसिद्ध आहेत. मूलाधारात पृथ्वीतत्त्व, स्वाधिष्ठानात जलतत्त्व, मणिपुरात तेजतत्त्व, अनाहतामध्ये वायुतत्त्व व विशुद्धचक्रामध्ये आकाशतत्त्व असते. प्राणशक्ती ऊर्ध्वगामी होऊन ज्या ज्या वेळी ज्या ज्या चक्रांचा आश्रय करते त्या त्या वेळी त्या त्या क्रिया होऊन ती ती भूततत्त्वांची लक्षणे प्रकट होत राहतात.

श्रीगुरूंनी शक्तिपात केला की, पंचमहाभूतांची आटणी होताना ज्या अनंत क्रिया होऊन मन, प्राण व शरीरामध्ये अध्यात्मप्रसादाच्या आनंदाचा जो उद्रेक होतो त्याचे वर्णन करणे शक्य नाही. साधकशिष्य वेदान्ती, योगी, सगुणोपासक, निर्गुणोपासक, भगवद्भक्त, मांत्रिक, यांत्रिक, ज्ञानी, अज्ञानी इत्यादि कसाही असला तरी ज्यावेळी आत्मशक्तीचे म्हणजे प्राणकलेचे उद्बोधन होते त्यावेळी उपरोक्त सर्व क्रिया व लक्षणे प्रकट होतात. याप्रकारे श्रीमहेश्वरांनी सांगितलेल्या या महायोगाचे साधन ज्ञात किंवा अज्ञात रूपाने ज्ञानी, ध्यानी, योगी, यती, भक्त इत्यादि सर्वांना क्रियांचा अनुभव घेत करावे लागते.

**आत्मतत्त्वांचे शुद्धीकरण :-**

उद्बोधित कुंडलिनी शक्तीकडून ज्या क्रिया आपोआप होतात त्यामुळे आत्मतत्त्वाचे शुद्धीकरण घडून येते. प्रकृतीच्या ३६ तत्त्वांचे पूर्ण शुद्धीकरण झाल्यासच जीवाची मायेच्या बंधनातून पूर्ण मुक्ती होते. पृथ्वीतत्त्वापासून जागतिक विकासावरणाच्या ३६ तत्त्वातून जीवात्मा बाहेर पडला म्हणजे तो उत्क्रांत होऊन मुक्ती मिळवितो. आत्मोत्क्रांतीच्या या प्रणालीलाच तत्त्वशुद्धी असे नाव आहे.

शक्ती जागृत झाली की, क्रियाशील होऊन ती तत्त्वशुद्धी करू लागते. पहिल्याने निवृत्तितत्त्वापासून म्हणजे त्यागापासून रुद्रतत्त्वापर्यंत ब्रह्मांडतत्त्वाची शुद्धी होते. दुसऱ्या प्रतिष्ठातत्त्वापासून अव्यक्ततत्त्वा-पावेतोची दुसरी अधिक उच्च तत्त्वे शुद्ध होतात. त्याहीपुढे विद्यातत्त्व

सामावून विद्याधिपतीपर्यंतची शांत्यासह अधिक तत्त्वे विशुद्ध होतात. हा क्रम शांत्यातीत अवस्थेपर्यंत असाच उत्तरोत्तर चालतो. हा विशुद्धीकरणाचा क्रम केवळ शक्तिपातयोगदीक्षेनेच चालतो हे नितांत सत्य आहे. या दृष्टीने **"श्रीशिवपुराणातील"** वायवीय संहितेत असे म्हटले आहे की -

**वृथा परिश्रमस्तस्य निरयवैव केवलम्।**
**शक्तिपातसमायोगादृते तत्त्वानि तत्त्वः।**
**तद्व्याप्तिस्तद्विशुद्धिश्च ज्ञातुमेव न शक्यते।।२९.२७।।**

आत्मतत्त्व हे मूलतत्त्व आहे. सर्व तत्त्वांची व्याप्ती आत्मतत्त्वापर्यंतच असते. या आत्मतत्त्वाचे शुद्धीकरण केवळ शक्तिपातयोगदीक्षेनेच सिद्ध होते. आत्मतत्त्व हे मूलतः विशुद्ध व अविकृत असूनही केवळ देहाध्यासाने प्रकृतीच्या २४ तत्त्वांशी त्याचे ऐक्य भासमान होते. मी शरीरच आहे ही मिथ्या कल्पना म्हणजे देहाध्यास होय. आत्मतत्त्वाचे मूळ शुद्धस्वरूप विपर्यय ज्ञानाने विस्मृत होते. याचे कारण आत्मतत्त्वाची व्याप्ती व व्यापकता हेच आहे. स्थूल, सूक्ष्म व कारण शरीराच्या बीजभूत तत्त्वापासून आत्मतत्त्व हे सर्वथा भिन्न असल्याने सम्यक् ज्ञान हेच या आत्मतत्त्वाचे विशुद्धीकरण होय. या उलट आत्मतत्त्वापासून प्रकृतीची २४ तत्त्वे सर्वथा भिन्न आहेत हे समजणे ही त्या तत्त्वांची शुद्धी होय. शक्तीमुळे होणाऱ्या क्रियांमुळे उपरोक्त शुद्धीकरण होऊन सत्य ज्ञान होण्याने जीव मुक्त होतो. या दृष्टीनेच **"योगदर्शनात"** महर्षी श्रीपतंजलींनी **"सत्त्वपुरुषयोः शुद्धिसाम्ये कैवल्यमिति।।३.५५।।** म्हणजे सत्त्वशुद्धी व पुरुषशुद्धी झाल्यावर मोक्ष प्राप्त होतो, असे म्हटले आहे. शक्तिपातयोगाच्या प्राप्तीने ज्या क्रियांचे विश्व साधकाच्या अंतरंगात उद्भूत होऊन समाप्त होते, त्यामुळेच तत्त्वांच्या मूलार्थाची विशुद्धी व व्याप्ती समजू शकते.

**परिपक्वता व परिपूर्णता प्राप्ती :-**

शरीर, मन, प्राण व ज्ञानामधील अपरिपक्वता दूर होऊन साधकाला परिपक्वता प्राप्त होऊन तो परिपूर्ण व्हावा म्हणून कुंडलिनी शक्ती

साधकाकडून शारीरिक, मानसिक व बौद्धिक क्रिया करवून घेते. कच्चे शरीर, दुर्बल मन, अपूर्ण बुद्धी व अस्वस्थता यामुळे साधक आत्मदर्शन प्राप्त करून घेऊ शकत नाही. त्यामुळेच **"मुण्डकोपनिषदात"** **"नायमात्मा बलहिनेन लभ्यः।।३.२.४।।"** असे म्हटले आहे. याकरिता योगमाया कुंडलिनी शक्ती नाना प्रकारच्या क्रियांनी साधकाला आत्मज्ञानाकरिता आवश्यक साधनसंपदा प्राप्त करून देते. त्यामुळे साधक या जन्मातच जीवन्मुक्त होऊ शकतो.

**षट्‌चक्रवेध :-**

ज्यावेळी श्रीगुरुकृपेने शक्ती जागृत होते तेव्हा ती मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध व आज्ञा या षट्‌चक्रांचा वेध करीत सहस्रारात जाऊन पोहोचते. कुंडलिनी शक्ती जागृत होऊन सुषुम्णेत प्रवेश करून मार्ग आक्रमू लागली की, मार्गातील षट्‌चक्ररूपी प्राणप्रवाहाच्या केंद्रस्थानातून तिला जावे लागते. या चक्रांचे भेदन होत असताना निरनिराळ्या क्रिया होतात. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी चक्रवेध होत असताना क्रिया कशा होतात हे **"श्रीज्ञानेश्वरीच्या"** ६ व्या अध्यायात वर्णन केले आहे. **"ऐसी शरीराबाहेरलीकडे। अभ्यासाची पांखर पडे।।२११।।"** म्हणजे नाना प्रकारच्या शारीरिक क्रिया या साधनाभ्यासात घडून येऊन शरीराच्या बाहेरच्या भागातही या अभ्यासाचा कृपाप्रसाद घडून येतो.

**जो मूळबंधें कोंडला। अपान माघौता मुरडला।**
**तो सेवेंची वरी साकडला। धरी फुगूं।।२१४।।**
**क्षोभलेपणें माजे। उवाइला ठायीं गाजे।**
**मणिपूरेंसी झुंजे। राहोनियां।।२१५।।**

जो अपानवायू मूळबंधामुळे कोंडला जाऊन मागे फिरला होता तो वर कैचित सापडला जाऊन लगेच फुगू लागतो. तो क्षुब्ध झालेला अपानवायू माजून तेथल्या तेथेच गुरगुरू लागतो व राहून राहून मणिपुरचक्राशी झुंज घेतो. ही झुंज अनेक क्रिया घडवून आणून षट्‌चक्रभेद होतो.

**दीक्षेची वेळ :-**

साधारणपणे शास्त्राने सांगितल्याप्रमाणे व्यवहारात लोक लग्न, मुंज, गृहप्रवेशादि सर्व नैमित्तिक शुभ कार्ये तिथी, वार, नक्षत्र इत्यादि चांगला दिवस पाहून करतात. तीर्थयात्रा, यज्ञ, दान, तप, जप, दीक्षा इत्यादि शुभ कार्ये करतानासुद्धा शुभाशुभ काल पाहूनच ती सुरू करतात. शुभ कालावर सुरू झालेली कर्मे निर्विघ्नपणे पूर्ण होऊन इच्छेप्रमाणे फलप्राप्ती होते. यासाठी ज्योतिषाचा आधार घेऊन व कालाकालाचा निर्णय घेऊन धर्मकर्मे केली पाहिजेत. परंतु **"मंत्रयोगसंहिता"** व **"तत्त्वसार"** या ग्रंथात दीक्षेच्या वेळासंबंधी असे म्हटले आहे की -

**यदि भाग्यवशेनैव सिद्धो हि पुरुषो मिलेत्।**
**तदैव दीक्षां गृह्णीयात् त्यक्त्वा कालविचारणम्।।१।।**
**दुर्लभे सद्गुरुणाञ्च सकृत् संङ्ग उपस्थिते।**
**तदनुज्ञा यदा लब्धा स दीक्षावसरो महान्।।१।।**
**यदैवेच्छा तदा दीक्षा गुरोराज्ञानुरूपत:।।**
**न तीर्थं न व्रतं होमो न स्नानं न जपक्रिया।**
**दीक्षाया: कारणं किन्तु स्वेच्छा प्राप्तेतु सद्गुरौ।।२।।**

शुभ कर्मांच्या बाबतीत ज्योतिषशास्त्राचा व कालाकालाचा निर्णय जरी वरीलप्रमाणे असला तरी ज्यावेळी सिद्धपुरुषाच्या रूपाने श्रीसद्गुरूंची प्राप्ती होते त्यावेळी कालाकालाचा विचार न करता दीक्षा ग्रहण केली पाहिजे. ज्यावेळी श्रीसद्गुरूंचा दुर्लभ सहवास मिळून, ते प्रसन्न होऊन, कृपा करण्याची त्यांची इच्छा होईल व ते शिष्याला दीक्षा घेण्याविषयी अनुमती देतील ती दीक्षेची सर्वश्रेष्ठ वेळ आहे असे समजले पाहिजे. त्याचप्रमाणे श्रीगुरुशिष्याची उभयतांची दीक्षा देण्याघेण्याची इच्छा होईल त्यावेळीही दीक्षा होऊ शकते. ज्यावेळी श्रीसद्गुरूंची कृपा करण्याची इच्छा होते त्यावेळी शिष्याने कालाकालाचा विचार न करता अगदी नि:शंक मनाने दीक्षा ग्रहण करावी.

सामर्थ्यसंपन्न श्रीसद्गुरू शास्त्र व लौकिक व्यवहाराचे पालन बाह्यत:

लोक मार्गी लागावेत म्हणून उत्तम रीतीने करीत असतात. खरे पाहता ते विधिनिषेधातीत झालेले असतात. ते ज्यांच्यावर कृपा करतात त्यांनाही ते सर्व बंधनातून सोडवून विधिनिषेधातीत करतात. पण ही सर्व प्रक्रिया मनाची आहे. शरीराची राहाटणी व्हावी व सर्व मर्यादा सांभाळून शिष्याकडून व्यवहार पाळला जावा अशीच त्यांची इच्छा असते. अशा श्रीसद्गुरूंची गाठ भाग्यवशात् क्वचित्च पडते. साधारणपणे बाह्य क्रियाकर्म इत्यादिंमध्येच गुंतलेले श्रीगुरू दृष्टीस पडतात. त्यांच्या ठिकाणी शक्तिपाताने अनुग्रह करण्याचे सामर्थ्य असत नाही.

**साधनक्रियांची वैशिष्ट्ये :-**

साधनात कोणकोणत्या क्रिया होतात हे आपण पाहिले. आता त्यांची वैशिष्ट्ये काय आहेत हे पाहू.

**क्रिया अर्थशून्य नाहीत :-**

साधनात ज्या ज्या विविध क्रिया होतात त्या अर्थशून्य तर नाहीत ना असा साधकाला संशय येतो. परंतु कुंडलिनी महाशक्ती जागृत झाल्यावर मंत्र, यंत्र, तंत्र, जप, तप, पाठ, पूजन इत्यादि जे या जन्मी व जन्मजन्मांतरी केलेले असते ते सर्व या नानाविध क्रियांच्या रूपाने फलसंपन्न होते. अशा क्रिया होणे ही परम भाग्यकारक व पुण्यकारक गोष्ट आहे. श्रीसद्गुरूंची कृपा झाल्याशिवाय हा क्रियांचा प्रसाद प्राप्त होत नाही. साधनाच्या वेळी क्रिया होत असताना साधक ज्या काही शुभ व अशुभ क्रिया करतो त्या सर्व क्रिया आत्मप्राप्तीसाठीच होत असतात, यात तिळमात्र शंका नाही. साधकाचे ओरडणे, बडबडणे व वाटेल तसे बोलणे या क्रिया जपाचे फल देतात. नाना तऱ्हेच्या शरीराच्या ज्या हालचाली होतात त्या पूजेचे फल देतात. साधनात येणारी तंद्रा किंवा निद्रा समाधीचे फल देतात. रेचक, पूरक, कुंभक व प्राणायामाच्या क्रिया बलीचे काम करतात. त्यामुळे सर्व पापांचा नाश होतो. साधनाच्या वेळी जे काही बोलणे होते त्यापासून स्तोत्रपाठाचे फल मिळते. हाताने निरनिराळ्या अवयवांना केलेला स्पर्श व स्वतःच्या शरीराच्या अंगप्रत्यंगांना केलेले मर्दन हे मंत्रन्यासाचे काम करतात.

क्रिया होताना खाल्लेले अन्न हे हवनाचे फल देते. क्रियाशक्तीच्या आवेशात साधकाची जिकडे दृष्टी जाते किंवा पाहिले जाते ते त्याचे पाहणे ध्यानरूप होते. त्यामुळे त्याला ध्यानाचे फल मिळते. क्रिया होताना साधक जेव्हा जमिनीवर पडतो, लोळतो, आडवा होतो किंवा कसाही कलंडतो तेव्हा त्याला साष्टांग नमस्काराचे फल मिळते. अशा प्रकारे कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर साधकाला जन्मजन्मांतरी केलेल्या नानाविध साधनांच्या आपापल्या संस्कारानुरूप क्रिया होतात. या क्रिया शुभ असोत अगर अशुभ असोत, त्या सर्व अध्यात्मिक ज्ञानामध्ये परिणत होऊन महामंगलदायक व सुखदायक होतात.

**आनंदाची प्राप्ती :-**

साधन करताना साधकाला ज्या ज्या क्रिया होतात त्या त्या क्रियांपासून त्याला परमानंदाची प्राप्ती होते. "**योगशिखोपनिषदाच्या**" सहाव्या अध्यायात असे म्हटले आहे की, "ज्या वेळेला साधकाला मागे सांगितलेले दिव्य अनुभव साधन करताना येतात त्यावेळी साधक अपरिमित आनंद उल्हासाने उत्फुल्ल होऊन हसतो. प्रसन्न होतो. प्रेमाने स्वतःच स्वतःशी क्रीडा करतो व अगदी महान् सुखात बुडून जातो. या आनंदाला स्थळकाळाची मर्यादा राहत नाही. अत्यंत घाणेरड्या, दुर्गंधीयुक्त, मलीन स्थानामध्ये किंवा संडासामध्ये सुद्धा बसल्याबसल्या क्रिया होऊन मन आनंदात बुडून जाते. श्रीमुकुंदराजांनी आपल्या "**परमामृत**" ग्रंथात वेदान्ताचे निजवर्म श्रीगुरुमुखाने शक्तिपात होऊन, साधक-शिष्याला मिळाल्यावर आनंदाची प्राप्ती अष्टसात्त्विक क्रियांच्या द्वारा त्याला प्राप्त होऊन, साधक-शिष्य कसा कृतार्थ होतो, हे "**स्वानुभवसुख**" नावाच्या अकराव्या, बाराव्या व तेराव्या प्रकरणात फार बहारीने वर्णन केले आहे.

**विसरे प्रकाशे स्वरूप। हारपे सांपडे आपेंआप।**
**ऐसा करितां साक्षेप। मन स्थिरावे।।११.२८।।**
**निवांत भोगी स्वरूप। डुल्लत आनंदें आपेंआप।**
**मग तया सुखाचें माप। कवण करी।।२९।।**

स्वेदकंपादि उठती। अष्टसात्त्विक भाव प्रगटती।
पावे साम्राज्यसंपत्ती। रंक जैसा।।१२.१।।
चित्त चैतन्यीं हारपे। उरिजे ज्ञप्तिस्वरूपें।
अखंडित आपआपें।। ब्रह्मानंद।।२।।
तया सुखाचेनि समरसें। पावे सुलीन दशे।
तें बोलावे कैसें। अनुभवी जाणती।।३।।
जैसें अमृत चाखे आपुली चवी। तैसें स्वसुख अनुभवीं।
तेथें कोण आठवी। संसारासी।।४।।
वोळे स्वानंदाचा घन। दाटे सुख परिपूर्ण।
तयामाजीं विवेक सुजाण। हारपोनि जाय।।५।।
अहंता स्वरूपीं गळे। विषयतृष्णा मावळे।
इंद्रियांचे लळे। क्रियेवीण पूर्ण होती।।६।।
महासुखाचे अरुवारीं। आलिंगी स्वानुभूती सुंदरी।
ज्ञानमात्र इयापरी। स्वस्वरूप भोगी।।७।।
निरसतां नेणीव। स्वरूपीं समरसे जाणीव।
मग एकछत्री राणीव। योगियासी।।८।।
सदा स्वानंदाचे सोहळे। विषयविजाती वितळे।
स्वरूपसुखाचेनि मळें। इंद्रियां तृप्ती।।९।।
परमसुखाचेनि भरें। एकहि स्फूर्ती न स्फुरे।
कार्यजाती विसरे। निमिषांत।।१०।।
करूनि यज्ञाचिया कोडी। उभवितीं स्वर्गाची गुढी।
तें सुख किजे कुर्वंडी। या ब्रह्मसुखासी।।११।।
आनंद आनंदासी घोंटी। बोलतां परेसी पडे मिठी।
मुक्यानें सुखाच्या गोष्टी। केविं किजे।।१२।।
खुंटलें मनाचें जाणणें। तें सुख अनुवादावें कवणें।
हें अनुभवी तोचि जाणें। इतरां टकमक।।१३।।
ऐशी पावोन योगखुण। स्वानंद भोगितो परिपूर्ण।
तया योगिया न घडे शीण। संसाराचा।।१३.१।।

"श्रीसद्गुरुकृपेने शक्ती जागृत झाली की, ती ऊर्ध्वगामिनी होऊन नाना तऱ्हेच्या क्रिया करू लागते. त्यामुळे स्वरूपाचा क्षणभर प्रकाश पडतो तर क्षणभर विसर पडतो. मध्येच पूर्वसंस्कारांचा उदय झाल्यामुळे ते स्वस्वरूप आपोआप गुप्त होते. क्रियांच्या जोरामुळे केव्हा ते आपोआपच सापडते. अशा रीतीने क्रिया होता होता शेवटी मन आपोआप स्थिरावते. त्यानंतर मन निवांतपणे स्वस्वरूपाचा उपभोग घेऊ लागले असता आनंदाने डोलू लागते. अशा प्रकारे डोल येऊ लागल्यामुळे जे सुख होते त्या सुखाची गणती कोण करील?"

अशा प्रकारे आत्मस्वरूपाची प्राप्ती झाल्यावर स्वेद, कंप, रोमांच इत्यादि सात्त्विक अष्टभाव साधकाच्या ठिकाणी उत्पन्न होतात. (या क्रिया होणे ही किती भाग्याची व पुण्याची गोष्ट आहे हे यावरून ध्यानात येईल.) या क्रिया आत्मस्वरूपरूप आहेत; कारण आत्मस्वरूपाच्या प्राप्तीनंतर व आधीही त्या प्रकट होतात. असे झाले म्हणजे एखाद्या भिकाऱ्याला साम्राज्य प्राप्त व्हावे अशी स्थिती होते. साधनात होणाऱ्या क्रिया ह्या साम्राज्याप्रमाणे मोलाच्या व श्रेष्ठतम आहेत. (ह्याची जाणीव साधकाने निरंतर बाळगली पाहिजे.) असे असले तरी याची जाणीव न राहिल्याने भिकाऱ्याला जशी साम्राज्याची किंमत कळत नाही त्याप्रमाणे साधकालाही या क्रियांची किंमत कळत नाही. या क्रियांमुळेच चित्त चैतन्यात विलीन होऊन साधक ज्ञानमात्रच शिल्लक राहतो. अशी स्थिती झाली की, साधकाला आपोआप अखंड ब्रह्मानंद अनुभवास येतो. ह्या सुखाच्या ठायी जीव समरस झाला म्हणजे तो त्यातच लीन होतो. त्या स्थितीचे वर्णन कोण करील? ज्यांना त्याचा अनुभव आहे तेच ते जाणतात. अमृताने जशी स्वतःची चव घ्यावी त्याप्रमाणे साधक स्वसुखाचा अनुभव घेत असतो. तेथे संसाराची आठवण कोणास होणार?

साधनात क्रिया सुरू झाल्या की, आनंदाचा जणू मेघच वर्षू लागतो व परिपूर्ण असे सुख प्राप्त होते. त्या सुखामध्ये ज्ञानाज्ञान निवडणारा विवेक हरपून जातो. या क्रियांचे सामर्थ्य अपरंपार असते;

कारण त्यामुळे स्वस्वरूपाच्या ठायी अहंकार विलीन होतो. विषयांची तहान नाहीशी होते. कोणत्याही प्रकारचे बाह्य कर्मादि न करता इंद्रियांच्या इच्छा पूर्ण होतात. परमसुखाच्या मृदू शय्येवर आत्मानुभूती म्हणजे स्वानुभवरूपी सुंदर स्त्रीला जीव आलिंगितो व या रीतीने ज्ञानमात्र अशा स्वस्वरूपाचा अनुभव घेतो. या क्रियांमुळे नेणिवेचा निरास होऊन जाणीव स्वस्वरूपाच्या ठायी समरस होते. त्यामुळे योगिसाधकाला एकछत्री स्वराज्याची प्राप्ती होते. या साधनामुळेच साधक नेहमी स्वानंदाचे सोहळे भोगतो. विजातीय विषय वितळून जातात. एवढेच नव्हे; तर स्वस्वरूपाशी मिलन पावलेली इंद्रिये तृप्त होतात. त्या आत्यंतिक सुखाच्या भरात एकही स्फूर्ती उत्पन्न होत नाही व एका निमिषात कर्मांची आठवण बुजून जाते. याज्ञिक लोक यज्ञ करून स्वर्गलोकी आपला झेंडा उभारतात; पण ते स्वर्गसुख या साधनाने प्राप्त होणाऱ्या ब्रह्मसुखावरून ओवाळून टाकावे.

शक्तिपातयोगसाधनातील क्रियांमुळे उत्पन्न होणारा आनंदच आनंदाचे घुटके घेतो. त्या आनंदाचे वर्णन करताना परावाणीही कुंठित होते. अशा रीतीने वाचाच मुकी झाल्यावर ती सुखाच्या गोष्टी काय सांगणार? मनाची जाणण्याची शक्तीच जेथे कुंठीत होते तेथे त्या सुखाचे वर्णन कोण करील? जो अनुभवी मनुष्य आहे तोच ते सुख जाणतो. इतरांना याबाबतीत नुसते टकमक पाहावे लागते हेच खरे. कारण अनुभूती ही चीजच निराळी आहे. या प्रकारची शक्तिपातयोगाची श्रीगुरुकिल्ली प्राप्त होऊन जो परिपूर्ण अशा स्वानंदाचा उपभोग घेतो त्या साधकयोग्याला संसाराचा शीण पडत नाही." शक्तिपातयोगाच्या वेधदीक्षेमुळे आनंदावस्थेची प्राप्ती कशी होते हे "**कुलार्णवतंत्राच्या**" १४ व्या उल्लासात पुढीलप्रमाणे सांगितले आहे.

**आनंदश्चैव कम्पश्चोद्भवो घूर्णा कुलेश्वरी।**
**निद्रा मूर्च्छा च वेधस्य षडवस्थाः प्रकीर्तिताः।।६४।।**

श्रीगुरुदेवांच्या अनुग्रहाने जेव्हा शिष्याला वेधदीक्षा प्राप्त होते तेव्हा आनंद, कंप, आसनापासून उत्थान, घुमणे किंवा डोलणे, निद्रा

व मूर्च्छा या सहा अवस्था शिष्याच्या ठिकाणी प्रगट होतात. या सहाही अवस्थांमध्ये आनंदावस्थेची प्राप्ती ही मूर्धन्य स्थानी असल्याने ती प्रथम आली आहे.

"**सूतसंहितेच्या**" चतुर्थ खंडातील ३५ व्या अध्यायातही शक्तिपाताने आनंदप्राप्तीची सर्व लक्षणे तत्काल कशी प्रकट होतात हे सांगितले आहे.

**देहपातस्तथा कम्पः परमानन्द हर्षणे।**
**स्वेदो रोमाञ्च इत्येतच्छक्तिपातस्य लक्षणम्।।टीका २१।।**

ज्यावेळी शक्तिपातयोगाची दीक्षा मिळते त्यावेळी शिष्याचा देह जमिनीवर आडवा पडतो. कंप होऊ लागतो. मन अत्यंत प्रसन्न होते व परमानंदाने भरून जाते. अशा प्रकारे उद्भूत होणाऱ्या आनंदामुळे साधकाच्या अंगावर रोमांच उभे राहतात व त्याला घाम येतो.

"**कुलार्णवतंत्राच्या**" अष्टम उल्लासामध्ये शक्तिपातयोगाने आनंदप्राप्ती कशी होते व या आनंदामुळे इतर लक्षणे कशी प्रकट होतात हे सांगताना श्रीमहेश्वर असे म्हणतात की, "हे देवी पार्वती! मी तुला वास्तविक खरा योग कशाला म्हणतात ते सांगतो. जेव्हा श्रीगुरूंच्या शक्तिसंपातामुळे शिष्याची आंतरिक आत्मशक्ती कुंडलिनी देवी जागृत होते तेव्हा मन, प्राण व शरीराच्या नाना प्रकारच्या बाह्य व आंतरिक क्रिया होऊ लागून शिष्याच्या कोटी कोटी जन्मांचे संस्कार छिन्नभिन्न होऊन नाना प्रकारचे रूप धारण करतात. या क्रियांमुळे त्याला परमानंद होतो. तो आल्हादित होऊन हसू लागतो. त्याला परमप्रसन्नता प्राप्त होते. त्या आनंदाच्या आवेशामध्ये तो भूमीवर पडतो. लोळतो. कधी कधी आनंदाच्या उद्रेकात गाऊही लागतो. मागे वर्णन केलेल्या अनंत क्रियांची ही आनंदाची अवस्था मूलभूत भूमी ठरते. आनंदमदाने उत्साहित झालेले साधकाचे मन जेव्हा आंतरिक शक्तीच्या प्रेरणेने क्रिया करते तेव्हा त्या अवस्थेत त्याच्यावर कोणताही विपरित, वाईट किंवा दुष्ट परिणाम कोणत्याही प्रकारे होत नाही. त्याची बुद्धी निश्चलच राहते. ज्यावेळी क्रियांचा आतील जोर संपतो तेव्हा साधक

तत्काल आपल्या पूर्वीच्या अवस्थेत येतो."

**साधनमहायज्ञात क्रियांद्वारा हवन :-**

श्रीगुरुप्रदत्तशक्तीच्या प्रभावाने साधकाला ज्या नानाविध क्रिया होतात व जे बहुविध अनुभव येतात त्याच्या पूर्वसंस्कारांचा व पापांचा नाश होऊन तो आत्मप्राप्तीच्या मार्गात अग्रेसर होतो. बाह्यचक्षूंच्याद्वारे दिसणारी परमेश्वराची सृष्टी सूक्ष्म अंशाने प्रत्येक मनुष्यमात्रांच्या शरीरातील सुषुम्णा नाडीमध्ये सामावलेली असते. ज्यावेळी कुंडलिनी शक्ती क्रियाशील होते तेव्हा अंतरामध्ये हे विश्व सामावलेले आहे त्याची अनुभूती साधकाला येते. साधकाला संतोष व श्रद्धा प्राप्त व्हावी म्हणून ही सर्व शुभलक्षणे ब्रह्मस्वरूपाची अभिव्यक्ती करीत राहतात. ह्या सर्व क्रिया व अनुभव साधकाला त्याच्या गंतव्यस्थानापर्यंत जाण्यासाठी मार्गात दिसणारे जणू काही दीपस्तंभच असतात. एवढेच नव्हे; तर साधकाला शेवटी कोठे जावयाचे आहे हेच या क्रिया दाखवीत असतात. शेवाळ्याने भरलेल्या विहिरीत खडा टाकला की, शेवाळे दूर होऊन आतील स्वच्छ पाण्याचे दर्शन थोडावेळ घडते. परंतु शेवाळे एक झाल्यावर पुन्हा दर्शन नाहीसे होते. त्याप्रमाणे क्रियांद्वारा मधून मधून ब्रह्माभिव्यक्ती होत असली तरी जोपर्यंत वासनादि संस्कार दूर होत नाहीत तोपर्यंत ब्रह्मप्राप्ती होत नाही. त्यासाठी श्रीशिवशक्तीचे संमिलन होणे आवश्यक ठरते. जोपर्यंत श्रीशिवशक्तीचे मिलन होत नाही तोपर्यंत नानाविध क्रियांचे व अनुभवांचे अलौकिक आश्चर्य साधक आपल्या अंतरामध्ये अनुभवीत राहतो. साधन हा एक महायज्ञच असतो. त्यामध्ये साधकाच्या वासनांचे, संस्कारांचे व अज्ञानाचे क्रियांद्वारा हवन होत असते. ज्यावेळी या यज्ञात पूर्णाहुती होईल त्यावेळी निर्विकल्प समाधीची अवस्था येऊन **"ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः।"** असे ज्ञान होऊन साधक कृतकृत्य होईल.

या साधनरूप महायज्ञातील हवनाच्या प्रारंभापासून ते पूर्णाहुतीपर्यंत म्हणजे साधन सुरू झाल्यापासून ते शेवटपर्यंत ज्या ज्या घटनांचा साधकाला अनुभव येतो त्या सर्वांचे यथातथ्य वर्णन करणे ही

मनुष्यबुद्धीच्या पलीकडील गोष्ट आहे. प्रत्येक क्रियेचे विश्लेषण करणे व तिची कारणमीमांसा करणे हेही मनुष्यबुद्धीच्या आटोक्यातील नाही. ढोबळ व स्थूल मानाने जेवढी मीमांसा करता येणे शक्य होती तेवढी आतापर्यंत केली. परंतु हे कल्पनातीत साधन असल्याने क्रियांचे विश्वही कल्पनातीत असते. हा जयद्रथ व हा सूर्य याप्रमाणे ह्या क्रिया व हे अनुभव असे दिसून येते. एक आत्मप्राप्ती हेच लक्ष्य येथे अभिप्रेत असते. त्यामुळे विवेचन व विचक्षणा यांना गौणत्व येते व तेच खरे आहे. हे सर्व अनुभव देणारी अंतरशक्ती कुंडलिनी ज्यावेळी ऊर्ध्वगामिनी होईल त्या त्या वेळी आश्चर्यातिरेकाने मन स्तिमित होईल. असे तरतमभावात्मक क्रियानुभूतीचे अपार विश्व साधकापुढे साकार होते. परंतु या क्रियानुभूतींनीच साधक पूर्णपणे कृतार्थ होत नाही. ही क्रियानुभूतींची कथा जेव्हा ब्रह्मांड भेदून पैलाड जाते त्यावेळी ती महाशक्ती श्रीशिवाशी समरसून जाते. त्यामुळे पिंडब्रह्मांडाचा लय होऊन साधक कृतकृत्य होतो. कृतार्थ होतो.

**कर्म, जाती व अवस्थांचे क्रियांना बंधन नाही :-**

मागे लिहिल्याप्रमाणे कुंडलिनी शक्ती भिन्न भिन्न प्रकृतीच्या लोकांमध्ये त्यांच्या त्यांच्या शरीर, मन व प्राणाला अनुकूल होईल त्याप्रमाणे भिन्न भिन्न रूपाने योगशास्त्राने कथन केलेल्या समाधीनिमित्त श्रीशिव-शक्तीच्या ऐक्यासाठी नाना प्रकारच्या क्रिया करते. श्रीसद्गुरुकृपेने दीक्षा झाल्यावर साधक स्त्री, पुरुष, बालक, तरुण, वृद्ध, रोगी, निरोगी, पापी, पुण्यवान्, महामूर्ख, विद्वान्, आस्तिक, नास्तिक यांपैकी कसाही असला तरी उपरोक्त लक्षणांपैकी काही लक्षणे तत्काल अगर क्रमाक्रमाने प्रकट झाल्याशिवाय राहत नाहीत. सिद्धी आपापल्या संस्काराप्रमाणे साधकाला होत असते. मात्र आत्मशक्तीच्या जागृतीमध्ये व क्रियांच्या उद्भूततेमध्ये कर्म, जाती अवस्था अगर आश्रम आड येत नाही. इतकेच काय; देश, काल, परिस्थिती या गोष्टीही क्रियांना बंधनकारक होत नाहीत. मनुष्यमात्र ईश्वरी ज्ञानाचा अधिकारी असल्यामुळे, "**म्हणौनि कुळ जाति वर्ण। हें आघवेंचि गा अकारण।**

**एथ अर्जुना माझेपण। सार्थक एक।।९.४५६।। तेंचि भलतेणें भावें। मन मज आंतु येतें होआवें। आलें तरी आघवें। मागील वावो।।४५७।। तैसें तंवचि वहाळ वोहळ। जंव न पवती गंगाजळ। मग होऊनि ठाकती केवळ। गंगारूप।।४५८।। कां खैर चंदन काष्ठें। हे विवंचना तंवचि घटे। जंव न घापती एकवटे। अग्निमाजीं ।।४५९।।** असे श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीत**" वर्णन केले आहे. प्रज्वलित अग्नीमध्ये चंदनाची अगर खैराची लाकडे टाकली तरी शेवटी अग्नी त्या दोन्ही प्रकारांना आपल्यात सामावून घेतो. त्यांचे वेगळेपण तेथे शिल्लक राहत नाही. त्याचप्रमाणे सिद्ध-महायोगाच्या क्रियांमुळे उत्पन्न झालेल्या अंतराग्नीत जन्मजन्मांतरींच्या सर्व संस्कारादि वासनांचे हवन होऊन साधक ब्रह्मरूप होऊन जातो.

**विचार प्रवाह व एकाग्रता :-**

साधन सुरू झाल्यावर चांगले वाईट नानाप्रकारचे अनंत विचार मनात सतत येतात. पूर्वायुष्यातील अनेक चांगल्या वाईट गोष्टी, संसारातील चिंता व भवितव्याबद्दलचे विचार याच वेळी पुढे दत्त म्हणून उभे राहतात. त्यामुळे मनाची एकाग्रता होत नाही. या जन्मीचे व पूर्व जन्मीचे संस्कार, विकार, वासना, इच्छा, भोगाकांक्षा, सत्त्व-रज-तम हे गुण विचारांच्या रूपाने मनात उसळून येतात. त्यामुळे साधनाच्या प्रारंभीच्या अवस्थेत विचार कमी होत नाहीत व मनाची एकाग्रताही अल्पावकाशात साधत नाही. जोपर्यंत साधकाच्या मनात भोग, इच्छा, आकांक्षा, तृष्णा, संसारवासना, संस्कार इत्यादि गोष्टी शिल्लक राहतात व त्या पूर्णपणे निवृत्त होत नाहीत तोपर्यंत विचार येत राहतात व मनाची एकाग्रता होत नाही.

साधन सुरू झाल्यावर अशा प्रकारे विचार उसळून आल्याने साधक घाबरून जातो. त्याला वाटते मन एकाग्र व्हावे म्हणून साधन घेतले; पण येथे विपरीतच होत आहे. अशा वेळी विचारांना थोपवून धरण्याचा, त्यांच्याशी सामना करून त्यांना बाहेर काढण्याचा किंवा मनन, ध्यान, जप आदि करून त्यांना दूर करण्याचा तो प्रयत्न

करतो. यावेळी साधकाने महायोग हा समर्पणाचा मार्ग आहे हे लक्षात घेऊन विचारांना कोणत्याही प्रकारे अडविता कामा नये. जितके विचार येतील तितके येऊ द्यावेत. विचार येणे हा सुद्धा एक क्रियेचा भाग असू शकतो. विचार उसळून आल्याने अंतःकरणात लपलेले संस्कार, वासना, इच्छा, भोगाकांक्षा इत्यादि बाहेर निघून जाऊन शरीर व मन शुद्ध होत जाते. जेव्हा ही शुद्धिकरणाची क्रिया पूर्ण होते तेव्हा मन आपोआप एकाग्र होते.

शारीरिक रोग, मानसिक जडता, संशय, निरुत्साह, आळस, भोगासक्ती, साधन करूनही उन्नती न होणे, दुःख, मानसिक कष्ट, अज्ञान, अहंकार, जीवनासक्ती, द्वेष, अविवेक, हिंसा, यमनियमांचे व खाण्यापिण्याच्या नियमांचे पालन नीट रीतीने न होणे, स्पर्शास्पर्श दोष, पूर्व जन्माचे तीव्रतम संस्कार उसळून येणे, पापाकडे प्रवृत्ती होणे, नानातऱ्हेच्या वासना, सांसारिक अडचणी इत्यादि अनेक कारणांमुळे साधनात अडथळे येऊन मन एकाग्र होत नाही. साधन नियमित केले म्हणजे ही विघ्ने दूर होऊन शरीर, मन, प्राण व नाडी या सर्वांची शुद्धी होऊन मन आपोआपच एकाग्र होते. जशजशी ही शुद्धी घडून येते तसतसा चित्ताच्या सर्व वृत्तींचा निरोध होऊन मन हळूहळू व क्रमाक्रमाने शांत होत जाते. चित्तवृत्तींचा पूर्ण निरोध, विचाररहित स्थिती व पूर्ण वासनानिवृत्ती ही खूप वरची अवस्था आहे. दीर्घकाल, अखंड व प्रतिदिनी आदरपूर्वक अभ्यास केला म्हणजे ही स्थिती परमेश्वरकृपेने प्राप्त होते.

आज्ञाचक्रापर्यंत इंद्रियांच्या क्रिया कमीअधिक परिमाणात होत असल्याचे दिसून येते. मनाच्या क्रिया तर होत राहतातच. ज्यावेळी आज्ञाचक्राचा भेद होतो त्यावेळी इंद्रियांच्या बाह्य क्रिया सर्वथा थांबतात; परंतु मनाचा व्यापार तेव्हाही बंद होत नाही. जशजशी प्राणशक्तीची गती सहस्राराकडे वाढू लागते त्या त्या प्रमाणात मनही शांत होत जाते. ज्यावेळी सहस्रदलकमलामध्ये मन बांधले जाते त्यावेळी त्याचे चांचल्य पूर्णपणे नाहीसे होते. मन पूर्णपणे तेथे विलीन झाल्याने त्याची कोणत्याही

प्रकारची वेगळी सत्ता किंवा कार्य दृग्गोचर होत नाही. यालाच अमनस्कावस्था म्हणतात. शांभवी मुद्रा ही याची पूर्णता आहे. जोपर्यंत साधकाला ही अवस्था प्राप्त होत नाही तोपर्यंत बाह्यदृष्टीच्या उन्मेषनिमेषाचा व्यापार हा संपुष्टात येत नाही. ज्यावेळी बाह्यदृष्टीचा उन्मेषनिमेषाचा व्यापार थांबेल त्यावेळी अंतर्लक्ष स्थिर झाले आहे, मनावर विजय प्राप्त झाला आहे व आत्मचैतन्याचा प्रकाश उत्पन्न झाला आहे असे साधकाच्या अनुभवाला येते. मानसिक चांचल्य हे वायूच्या स्पंदनामुळे होत असते. यासाठी या अवस्थेत मन, वायू म्हणजे प्राण व दृष्टी ह्या सर्व गोष्टी स्थिर राहतात. या अपूर्व अवस्थेत केवळ आकाशरूपी आत्मचैतन्य प्रकाशमान राहते.

**साधनातील क्रिया व अनुभव :-**

क्रिया का होतात हे आपण पाहिले. आता साधन करताना साधकाला कोणकोणत्या क्रिया होतात व कोणकोणता अनुभव येतो याचा विचार करणे उद्बोधक ठरेल. अगदी प्रथम महायोगाच्या चार अवस्था कोणत्या आहेत त्या पाहू. त्यामुळे साधनातील क्रिया व अनुभव यांचा क्रम व विकास कसा होतो हे कळून येईल.

"**वराहोपनिषदाच्या**" पाचव्या अध्यायात योगाच्या चार अवस्थांचे वर्णन करताना म्हटले आहे की -

**आरम्भश्च घटश्चैव तथा परिचयोऽपिच।**
**निष्पत्तिः सर्वयोगेषुस्यादवस्थाचतुष्टयम्।।७१।।**

चित्तवृत्तींचा निरोध होऊन ज्ञानप्राप्ती होऊन जीव ब्रह्मस्वरूप व्हावा यासाठी प्रवृत्त झालेल्या सर्व योगामध्ये आरंभ, घट, परिचय व निष्पत्ती या चार अवस्था दिसून येतात.

**आरंभ अवस्था :-**

**करणत्रय सम्भूतं बाह्यं कर्म परित्यजन्।**
**आन्तरं कर्म कुरुते यत्रारम्भः स उच्यते।।७२।।**

ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान या साधनत्रयामुळे उत्पन्न होणाऱ्या बाह्य कर्माचा त्याग करून साधक जेव्हा कुंडलिनी शक्ती जागृत होऊन

तिच्या प्रेरणेमुळे होणारे आंतरिक व मानसिक कर्म करू लागतो म्हणजे त्याच्याकडून हे कर्म आपोआप होऊ लागते तेव्हा त्याला आरंभ अवस्था म्हटले जाते.

आरंभ अवस्थेमध्ये योगमाया कुंडलिनी शक्ती प्रथम हठयोगाला आरंभ करते. प्रथम साधनाला सुरुवात झाली की, नानाप्रकारच्या शारीरिक क्रिया होऊ लागतात. आसने, बंध, मुद्रा, प्राणायाम व नाडीशुद्धी होऊ लागते. आसनामुळे शरीराला स्थिरता येते. बंध व मुद्रा झाल्यामुळे शरीर दृढ होते. प्राणायामाने शरीर कृश व लघु होते. नाडीशुद्धीद्वारा शरीरात साम्यता उत्पन्न होते. विषमता नाहीशी होते. अशा प्रकारे आरंभ अवस्थेतील हठयोगाच्या क्रियांमुळे शरीर परिपक्व होते व ते साधकाच्या ताब्यात राहू लागते.

**घटावस्था :-**

**वायुः पश्चिमतो वेधं कुर्वन्नापूर्य सुस्थिरम्।**
**यत्र तिष्ठति सा प्रोक्ता घटाख्या भूमिका बुधैः।।७३।।**

महायोगाच्या दुसऱ्या अवस्थेला घटावस्था असे म्हणतात. या घटावस्थेत शरीर संपूर्णपणे शुद्ध व सत्त्वगुणयुक्त होते. विषयवासनांचा ऱ्हास होऊ लागतो. नेहमी ईश्वराचे स्मरण राहू लागते. हठयोग व लययोग हे सुगम होतात. साधकाचे अंतःकरण पवित्र व प्रसन्न राहू लागते. दिवसेंदिवस वैराग्य चढते वाढते राहते. ईश्वरप्राप्तीसाठी मन उत्साहित व त्याचबरोबर विरहाने व्याकूळ होते. आरंभावस्था व घटावस्था या एकत्रच दिसून येतात.

आरंभ अवस्थेत शरीर व घटावस्थेत मन सदृढ व पक्के होते. या दोन्ही अवस्थांमुळे मन व शरीर शुद्ध आणि स्वस्थ होते. त्यामुळे कुंडलिनी शक्तीचा ब्रह्मरंध्रामध्ये जाण्याचा मार्ग अत्यंत सुगम, सोपा व सरळ होतो. या दोन अवस्थांमुळेच साधकाचा प्राणवायू पश्चिममार्गाने सुषुम्णेमध्ये प्रवेश करतो व हळूहळू तो स्थिर करण्याची क्षमताही साधकाच्या अंगी येऊ लागते. या स्थिरता प्राप्तीच्या अवस्थेलाच शास्त्रकारांनी योगसाधनेतील घटावस्था मानले आहे.

**परिचयावस्था :-**

**न सजीवो न निर्जीवः काये तिष्ठति निश्चलम्।**
**यत्र वायुः स्थिरः खे स्यात्सेयं प्रचयभूमिका।।७४।।**

परिचयावस्थेमध्ये साधकाचे प्राण अंतराकाशातील बोधगगनामध्ये विलीन होतात. प्राणशक्ती कुंडलिनीदेवी हृदयाकाशामध्ये प्राण स्थिर करून सहस्रारामध्ये श्रीशिवाशी एकरूप होते. ज्यावेळी प्राणाचा अशा प्रकारे निरोध होतो त्यावेळी साधकाचे शरीर निष्क्रिय व निर्जीव आहे असे भासू लागते. साधकाचा देह मृतवत् आहे असे वाटते; कारण बाह्य लक्षणांवरून सजीवतेचे एकही चिह्न दिसत नाही. मात्र आतमध्ये तो सजीवच असतो.

परिचयावस्थेमध्ये प्राण व आत्मशक्ती एकत्रित होते. यामुळे महायोगातील परिचयावस्था किंवा सिद्धावस्थेची महती खूप मोठी समजली जाते. या अवस्थेला प्राप्त झालेला साधक सिद्ध होतो. त्याला अलौकिक सामर्थ्य प्राप्त होते. कुंडलिनीदेवीची कृपा व श्रीगुरुदेवांचा परमानुग्रह यामुळे परिचयावस्था प्राप्त होते. या अवस्थेत शरीरामध्ये व्याप्त असलेले प्राण केवळ संकल्पाने सर्व शरीरातून खेचले जाऊन मूलाधारात एकत्र होतात. ज्यावेळी अशा प्रकारे प्राण एकत्र येण्यास सुरुवात होते त्यावेळी साधकयोग्याला अनिर्वचनीय सुखाचा अनुभव येतो. शरीरातून ज्या ज्या ठिकाणांहून प्राण खेचले जातात ते ते ठिकाण मृतवत्, निश्चेष्ट व निष्क्रिय होऊ लागते.

सर्व शरीरात व्याप्त असलेले प्राण एकत्रित, अंगुष्ठमात्र व अतिसूक्ष्म होऊन सुषुम्णा विवरामध्ये प्रवेश करतात. असा प्रवेश झाला की, मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध आणि आज्ञाचक्रांना भेदून प्राण सहस्रारात जातात. यावेळी जठराग्नी व मन प्राणात मिसळून जातात. बिंदूचे म्हणजे वीर्याचे स्वतःच्या ठिकाणीच भस्म होऊन त्याचे ओजामध्ये म्हणजे सामर्थ्यामध्ये रूपांतर होते. असे झाले म्हणजे सर्व ब्रह्मांडाला क्रियाशील करणाऱ्या व सर्वांचे जीवनरूप असलेल्या प्राणाचा परिचय होऊन साधकयोगी

कृतार्थ होतो. या अवस्थेत साधकाच्या बुद्धीमध्ये आत्मतेजाचा प्रकाश उत्पन्न होतो. "**तत्र ऋतंभरा प्रज्ञा**" अशा अवस्थेत सत्य व सम्यक् ज्ञानाचे अवलंबन करणारी जी बुद्धी साधकाला प्राप्त होते तिला ऋतंभरा प्रज्ञा असे म्हणतात. अशा प्रकारच्या सत्यज्ञानाच्या साक्षात्काराने साधक सिद्ध होतो व प्रकृतीवर आपले प्रभुत्व स्थापन करतो. त्याला सर्वत्र शक्तीचे भांडार खुले होते. कुंडलिनी शक्ती सरलता धारण करते व सुषुम्णेमध्ये आपले स्थान स्थापित करते. यामुळेच साधकयोग्याला आत्मज्ञान अत्यंत सहज व सुलभतेने होते.

**निष्पत्ती अवस्था :-**

**यत्रात्मना सृष्टिलयौ जीवन्मुक्तिदशां गतः।**
**सहजः कुरुते योगं सेयं निष्पत्तिभूमिका।।७५।।**

निष्पत्ती अवस्थेमध्ये साधकयोग्याच्या ठिकाणी आत्मज्ञानाचा उदय होतो. त्यामुळे पिंडब्रह्मांडाचा लय होतो. यावेळी साधकयोग्याच्या जीवाचे जीवपण जाऊन त्याला शिवपण प्राप्त होते व कुंडलिनी महाशक्ती आधाररूप परमशिवामध्ये विलीन होते. त्यावेळी योग्याला जीवन्मुक्तदशा प्राप्त होते.

**क्रिया व अनुभव :-**

शक्ती जागृत झाल्यावर साधकाला ज्या क्रिया होतात, जे अनुभव येतात व जी लक्षणे प्रकट होतात ती इतक्या विविध प्रकारची असतात की, त्यांची गणना करणे व वर्गीकरण करणे केवळ अशक्यप्राय आहे. तरीसुद्धा उद्बोधित कुंडलिनीचा आविष्कार पुढील प्रकाराने झालेला दिसून येतो, असे "**श्रीशारदातिलक**" या ग्रंथात स्पष्ट केले आहे.

**चतुर्विधा सा सन्दिष्टा क्रियावत्यादि भेदतः।**
**क्रियावती वर्णमयी कलात्मा वेधमय्यपि।।४.३।।**

आविर्भावलक्षणावरून कुंडलिनीचे क्रियावती, वर्णमयी, कलात्मा व वेधमयी असे चार प्रकार होतात.

विशेषकरून योगाचे आविष्कार पुढील चार प्रकाराने होत असल्याचे दिसून येते.

**मन्त्रो लयो हठो राजयोगान्तर्भूमिकाः क्रमात्।**
**एक एव चतुर्धाऽयं महायोगोऽभिधीयते।।१.१२९।।**
**योगशिखोपनिषत्।**

हठ, मंत्र, लय व राजयोग या एकाच योगाच्या चार अंतर्गत भूमिका आहेत. या चार प्रकाराने विभक्त होऊन क्रिया होताना व निरनिराळे अनुभव येताना दिसले तरी हा एकच योग आहे. सिद्धयोगामध्ये या चारही योगांचा समावेश होत असल्याने त्याला महायोग असे म्हटले आहे.

दीक्षा झाल्याबरोबर साधकाचे शरीर, मन, बुद्धी व वासना यांचे शुद्धीकरण सुरू होऊन भक्ती व ज्ञानाचा उद्रेक व आविष्कार होत असल्याने त्या दृष्टीनेही क्रिया होऊन साधकाला अनुभव येतात.

येथे एक गोष्ट साधकाने विशेष लक्षात ठेवण्यासारखी आहे की, साधन करताना क्रियांचा क्रम एकसारखा राहील असे नाही. त्याचप्रमाणे एक क्रिया चालू असताना दुसरी होणार नाही असेही नाही. एका वेळेस मिश्रस्वरूपात अनेक बाह्य व अंतर्गत क्रिया साधनाच्या वेळी चालू असतात. क्वचित् एक एक क्रिया क्रमाक्रमाने होऊनही प्रगती होत राहते.

**हठयोगाच्या क्रिया :-**

उद्बोधित कुंडलिनी शक्तीचा भौतिक पातळीवर जो आविर्भाव होतो तोच वास्तविक हठयोगात अभिप्रेत आहे. हठ या संस्कृत शब्दात दोनच अक्षरे आहेत "ह" हे सूर्यवाचक व "ठ" हे चंद्रवाचक आहे. अर्थात् हठयोगाचा अर्थ चंद्रसूर्यमिलन असा होतो. म्हणून ज्यात इडापिंगला नाड्या, अपान व प्राणवायू किंवा मनाचा प्राणशक्तीत लय होणे या शारीरीक गोष्टींचा समावेश होतो तो हठयोग होय. महायोगी श्रीगोरक्षनाथांनी "**सिद्धसिद्धान्तपद्धतीत**" या दृष्टीने असे म्हटले आहे की -

**हकारः कीर्तितः सूर्यष्ठकारश्चन्द्र उच्यते।**
**सूर्यचन्द्रमसोर्योगाद्धठयोगो निगद्यते।।**

हठयोगाच्या पातळीवर जेव्हा कुंडलिनी कार्यान्वित होते तेव्हा तिला क्रियावती संबोधणे अगदी युक्त आहे. ह्याच स्थितीत साधकाच्या अनेकानेक हठयोगाच्या क्रिया आपसुखच चालू असतात. तो हेतुपूर्वक काहीही करीत नाही. ह्या त्याच्या क्रिया नूतन जागृत झालेल्या शक्तीच्या प्रभावाने तिच्या दाबाखाली आपोआप सुरू असतात. हठयोगांतर्गत असलेल्या या क्रिया आसने, प्राणायाम, बंध व मुद्रा यांच्या रूपाने उद्बोधित कुंडलिनीच्या प्रभावामुळे घडून येतात. मात्र कोणत्या क्रिया कशाकरिता होत आहेत यासंबधी साधकास त्यावेळी आवाका नसतो. काही क्रिया योगशास्त्राच्या कोठल्याही संदर्भ ग्रंथामध्ये मुळीच आढळून येत नाहीत. कधीकधी या हठयोगाच्या क्रिया इतक्या गुंतागुंतीच्या व कठीण असतात की, त्या साधनाव्यतिरिक्तवेळी करणे केवळ अशक्यप्रायच होय. कुंडलिनी सुप्त असताना आवश्यक त्या पद्धतीने अवयव वाकविणे नेहमी असमर्थतेचे असते. या क्रियांपैकी काही विशिष्ट महत्त्वाच्या क्रिया हठयोगावरील सर्वमान्य ग्रंथात नवीन साधकाने कुंडलिनी शक्ती जागृत करण्याकरिता उपयोजाव्यात असे सांगितले आहे. पण उद्बोधित झालेल्या कुंडलिनी शक्तीकडून याच क्रिया अगदी सरावातल्याप्रमाणे शारीरिक आरोग्य पूर्णपणे सांभाळून महायोग होताना दृष्टोत्पत्तीस येतात.

**नाडीशुद्धीच्या क्रिया :-**

शरीरातील सर्व नाड्या मलाने भरलेल्या असतात. त्यामुळे प्राण सुषुम्णा नाडीमध्ये सहजतेने प्रवेश करू शकत नाही. या कारणाने प्राणायामाची सिद्धी होत नाही व तत्त्वज्ञानही होत नाही. याकरिता साधनाच्या सुरुवातीला नाडीशुद्धी होणे आवश्यक असते. यासाठी श्रीगुरुकृपेने जेव्हा कुंडलिनी शक्ती जागृत होते तेव्हा प्रथम ती साधकाकडून नाडीशुद्धीच्या क्रिया करविते. वातक्रम, व्युत्क्रम, शीतक्रम, भस्त्रा, वायुसार, नौली, कपालभाती इत्यादि क्रिया नेती, धौती, बस्ती, इत्यादि क्रियांचे काम करतात. या क्रिया साधकाला आपोआप वायूच्या द्वाराने रेचक, पूरक व कुंभक प्राणायामाच्या

रूपाने होतात. अर्थात् साधकाच्या मुखातून, नाकातून, गुदद्वारातून व लिंगातून प्राणापान वायूचें सोडणे, ग्रहण करणे व निरोध करणे यांच्यारूपाने या सर्व क्रिया कुंडलिनी शक्तीच्या प्रेरणेने होत राहतात.

नाडीशुद्धी होत असताना अनेक प्रकारे अंगविकृतीच्या क्रिया होतात. चेहऱ्यावर नानाविध भाव उमटतात. देहविक्षोभ, व्यायाम, अंगमर्दन, झोप, घर्षण, डोळ्यातील बुबळे निरनिराळ्या तऱ्हेने व प्रकाराने फिरविणे, हातपाय फेकणे व पसरणे, डोळे लहान मोठे करणे, धावणे, फिरणे, घूर्णा म्हणजे शरीर डावीकडून उजवीकडे किंवा उजवीकडून डावीकडे गोलाकार फिरणे, शरीर मागे अथवा पुढे पडणे, मान गोलाकार फिरणे, घरभर गडबडा लोळणे, नाक, डोके इत्यादि अवयव जमिनीला घासणे, नृत्य करणे, बेडकाप्रमाणे इकडून तिकडे उड्या मारणे व पडणे, नुसत्या उड्या मारणे, ओलांडल्यासारखी उडी मारणे, वेड्याप्रमाणे दारू पिऊन उन्मत्त झालेल्या माणसाप्रमाणे किंवा भूत अंगात आलेल्या माणसाप्रमाणे शारीरिक व मानसिक क्रिया करून त्याप्रमाणे भाव दाखविणे इत्यादि क्रिया प्राणवायूची गती ऊर्ध्व झाली की, साधकाकडून आपोआप होतात. या क्रियांप्रमाणेच आपापल्या प्रकृतीप्रमाणे कितीतरी विविध विकृत क्रिया साधकाकडून होतात. कंप, रोमांच, अंतःस्फुरण, स्पंदन, स्पर्श, जांभया, हसणे, रडणे, पडणे, खांबाप्रमाणे स्थिर होणे, शरीर जड होणे, जमिनीला चिकटून जाणे, श्वासप्रश्वास अत्यंत जोरजोराने होणे, घाम येणे, डोळ्यातून पाणी गळणे, लाळ गळणे, शरीर कृश होणे, मलमूत्र अल्प होणे, कोष्ठकाठिन्य होणे, कमी किंवा जास्त झोप येणे अगर झोप नाहीशी होणे, थंडी वाजणे, ताप आल्यासारखे वाटणे, शरीरात जो सुप्त रोग असेल तो प्रकट होऊन बाहेर पडणे, शरीर दुखू लागणे, पोटात दुखणे, कामवासना उत्तेजित होणे, आत्यंतिक कामेच्छेने वीर्यपात होणे, जुलाब किंवा जास्त लघवी होणे, ताप येणे, उचकी, श्वास, दमा इत्यादि शरीरात मूलतः असलेले रोग वाढणे, भूक वाढणे किंवा कमी होणे इत्यादि साधकांच्या संस्कारानुसार कुंडलिनी शक्ती सर्व दोषांच्या

निवारणार्थ नाना प्रकारच्या क्रिया करविते. या क्रियांमुळे मन बाह्यज्ञानशून्य व निष्क्रिय होते. प्राणकलेचा प्रवाह मूलाधारातून सहस्राराकडे व पुन्हा सहस्राराकडून मूलाधाराकडे वाहत असतो. या प्राणकलेच्या स्रोतामुळे नाना तऱ्हेच्या सुखाचा अनुभव येतो. मेरुदंडात तीव्र कंपन होऊन शरीर शून्य होते. आपल्याला शरीरच नाही अशी प्रतीती येते. सर्वत्र शून्य भासू लागते. डोळे इतके आत ओढले जातात की, कितीही इच्छा केली तरी ते उघडले जात नाहीत. शरीरातून विजेचे प्रवाह चालले आहेत याचा अनुभव येतो. सर्व शरीर इतके आत खेचले जाते की, ते चिमटून लहान होऊन नाहीसे होईल असे वाटते. मन इतके आवेशयुक्त होते की, शरीरात कोणीतरी प्रवेश केला आहे व अष्टौप्रहर आत क्रिया चालू आहेत याची जाणीव होते. जेथे कोठे मन एकाग्र होईल तेथे शरीर झटकन् कापू लागते व अनिच्छेने शरीर हलू लागते. अत्यंत घाणेरड्या, मलीन स्थानामध्ये किंवा संडासामध्ये शौचाला गेल्यावरही मन आनंदमग्न राहते.

कधी कधी रस्त्यावरून चालताना मनात इतका तीव्र आवेश येतो की, साधकाला असे वाटते की, आपण जमिनीवरून चालूच नये. आकाशातून उडत जावे. जोरजोराने पळावे. शरीर इतके हलके होते की, एखादे वाळलेले पान ज्याप्रमाणे हवेवर आपसुख तरंगत राहते तसे शरीर हवेवर तरंगत आहे अशी अनुभूती येते. कितीही चालले तरी शरीर थकत नाही. मन प्रफुल्लित व प्रसन्न राहते. स्वप्नामध्येसुद्धा अप्रसन्नता वाटत नाही. नित्याच्या व्यवहारात काहीही इष्ट किंवा अनिष्ट घडले तरी त्यामुळे मन विचलित होत नाही. सकाळी व संध्याकाळी भुकेची वेळ झाल्यावर ज्याप्रमाणे माणसाचा जीव भुकेने व्याकूळ होतो त्याप्रमाणे साधनाची वेळ झाली की, साधनासाठी जीव व्याकूळ होतो. मग त्यावेळी इच्छा नसली तरी क्रियेचा वेग जाणवू लागतो. त्याला साधनाला बसल्याशिवाय चैनच पडत नाही. शरीर, मन व प्राण हे साधनासाठी इतके विवश होतात की, त्यावरील ताबा नाहीसा होतो. साधकांचे रोग अत्यंत त्वरेने नाहीसे होतात.

साधनात साधकाला सिद्ध, पद्म, भद्र, मुक्त, सिंह, गोमुख, वीर, धनु, मृत, गुप्त, मत्स्य, पश्चिमोत्तान, मत्स्येंद्र, गोरक्ष, उत्कट, मयूर, कुक्कुट, कूर्म, मंडुक, वृक्ष, गरुड, वृषभ, शलभ, मकर, उष्ट्र, भुजंग इत्यादि योगाची नाना प्रकारची आसने होतात. या आसनांनी शरीराला स्थिरता प्राप्त होते व अग्नी प्रदीप्त होऊन पचनक्रिया उत्तमप्रकारे होऊ लागते. त्यामुळे रजोगुण व तमोगुणांचा लोप होत जाऊन शरीर निरोगी राहते.

साधकाला कित्येक योनीतील आसने होतात; कारण जीवाचे कोट्यवधी योनीतून जन्म झालेले असतात. जन्मजन्मांतरी भोगलेल्या योनीतील अति सूक्ष्म संस्कार जीवावर झालेले असतात. कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर उक्त प्रकारच्या नानाविध क्रिया होऊन हे संस्कार स्मृतिपथात येऊन निघून जातात. स्वप्नाप्रमाणे हे संस्कार साधकाला ध्यानावस्थेमध्ये भासमान होतात. या संस्कारांमुळेच साधक स्वाभाविकपणे आसनादि क्रिया करतो. कोणत्या योनीचे कसकसे संस्कार आहेत हे शारीरिक, मानसिक, प्राण व स्वरांच्या क्रियेवरून अनुमानाने साधकाला समजून येतात. किंवा ज्यावेळी शुद्ध स्मृती दृढ होते त्यावेळी साधकाला जन्मजन्मांतरातील संस्कारांचा उत्तमप्रकारे अनुभव येतो असे प्रत्यक्ष दिसते.

सारांश, संस्कारांच्या दृढ परिणामांमुळेच चौऱ्यांशी लाख आसनांपैकी हजारो प्रकारची आसने साधक आपोआप करतो. पद्म, ताल, वृक्ष, इत्यादि उद्भिजयोनींची; कूर्म, मत्स्य, मकर, इत्यादि जलयोनींची; भुजंग, शलभ, वृश्चिक इत्यादि कीटयोनींची; मयूर, गरुड, कुक्कुट, हंस इत्यादि पक्षीयोनींची व सिंह, वृषभ, उष्ट्र इत्यादि पशुयोनींची; आसने तो करतो. साधनाच्या वेळी शक्तीकडून साधकाला उभे करून, बसवून, झोपून, आडवे पाडून, उलटसुलट करून, वाकडे-तिकडे व्हावयास लावून नाना प्रकारांनी आसने करवून घेतली जाताना दिसून येते.

**बंध व मुद्रा :-**

महामुद्रा, नभोमुद्रा, उड्डयान, जालंधर, मूलबंध, महावेध, खेचरी, विपरीत करणी, योनी, वज्रोली, शक्तिचालिनी, ताडागी, मांडुकी, शांभवी, वैश्वानरी, वायवी, आकाशी, पार्थिवी, आंभसी, अश्विनी, पाशिनी, काकी, मातंगी, आणि भुजंगिनी या पंचवीस मुद्रा योग्यांना सिद्धी देणाऱ्या आहेत. साधनात आसनाबरोबरच साधकाला त्याच्या पूर्वसंस्काराप्रमाणे व आवश्यकतेप्रमाणे या होतात. आसनांचे मुख्य कार्य शरीर स्थिर करून दहा वायूंना उत्तमप्रकारे चालविणे हे आहे व मुद्रांचे प्रधान कार्य शरीर दृढ करणे व प्राणवायूला शरीराच्या विशेष भागात स्थिर करणे हे असून त्याच्या योगाने मन धारणा करण्यास समर्थ होते.

साधन होत असताना मुद्रा शरीराच्या कोणत्या स्थानात होतात ते पाहण्यासारखे आहे. मूलाधारात व योनिस्थानामध्ये अश्विनीमुद्रा, मूलबंध व महाबंध होतो. गुदद्वाराचे संकोचन व विकास झाल्याने ह्या क्रिया होतात. बेंबी व पोटाच्या ठिकाणी उड्डयान बंध, ताडागी व सारंगी मुद्रा होतात. यांचे कार्य पोटात वायू भरणे व सोडणे हे आहे. कंठ संकोच झाला की, जालंधरबंध, डोळ्यांच्या ठिकाणी त्राटक व शांभवी मुद्रा होते. कानात नादश्रवण, षण्मुखी मुद्रा व भ्रामरी होते. जिभेच्या ठिकाणी खेचरी, नभोमुद्रा व मांडुकी होते. मुखात भुजंगी, काकी व योनिमुद्रा होते. मस्तकाच्या ठिकाणी विपरीत, करणीमुद्रा आणि सर्वांगाचे ठिकाणी महामुद्रा, महावेध व ताडन परिधानादि क्रिया होतात. याप्रमाणे साधकाला शास्त्रानुसार कुंडलिनी शक्ती आपोआप क्रिया करविते. या मुद्रांच्या साधनाने साधकाचा आनंद व उत्साह वाढतो व त्याचा नित्य अभ्यास होत राहिल्याने जठराग्नी प्रज्ज्वलित होतो. या क्रियांमुळे श्वास, प्लीहा इत्यादि वीस प्रकारचे श्लेष्म रोग दूर होतात.

**प्राणायाम :-**

हठयोगशास्त्रात कुंडलिनी शक्ती जागृत करण्याकरिता प्राणायाम

हेच मुख्य साधन सांगितले आहे. योगशास्त्रानुसार कनिष्ठ प्राणायामात घाम, मध्यमात कंप आणि उत्तमात प्राणाचे उत्थान होऊन कुंडलिनी जागृत होते. मात्र हे प्राणायाम आपल्या इच्छेने परिश्रमपूर्वक करावे लागतात. परंतु श्रीगुरुकृपेने ज्यावेळी कुंडलिनी शक्ती जागृत होऊन क्रिया करू लागते त्यावेळी त्यापेक्षाही उत्तम प्राणायाम अनायासे, अपरिश्रमाने आपोआप स्वतः होतात. त्यांच्या योगाने घूर्णा, योगनिद्रा, रोमांच इत्यादि आनंदाची चिह्ने उत्पन्न होऊन साधक आनंदाच्या आवेशामध्ये ॐकार ध्वनी करू लागतो. अंग मोडणे, कंप, भ्रमण, खूप घाम येणे, नाना तऱ्हेचे उच्चार इत्यादि क्रिया त्याबरोबर होतात. आनंदाचे अश्रू त्याच्या डोळ्यातून ओघळू लागतात व साधकाला ज्ञानयुक्त मूर्च्छा येते. असे घडू लागले म्हणजे खरा योग कशाला म्हणतात याचा अर्थ स्पष्ट होऊ लागतो. हाच उत्तमातील उत्तम प्राणायाम होय. ज्या ज्या वेळी कुंडलिनी शक्तीला सुषुम्णामार्गातून ब्रह्मरंध्रात जाण्याची आवश्यकता उत्पन्न होते त्या त्या वेळी कुंडलिनी महादेवी स्वतः साधकाकडून योगशास्त्रात सांगितल्याप्रमाणे नाना प्रकारच्या क्रियांबरोबर प्राणायाम करविते. त्यामुळे साधकाचे शरीर, मन व प्राण स्वस्थ होऊन त्याला विनासायास आपली अभिष्ट सिद्धी प्राप्त होते.

याचप्रमाणे कुंडलिनी महाशक्ती साधकाकडून कित्येक प्रकारचे प्राणायाम करविते. सूर्यभेदन, उज्जायी, सीत्कारी, शीतली, भस्त्रिका, भ्रामरी, मूर्छा, व प्लाविनी हे आठ प्रकारचे कुंभकप्राणायाम आहेत. याच्यांशिवाय बाह्य, आभ्यंतर, स्तंभवृत्ती व केवल कुंभक हेही प्राणायाम आहेत. हेही आवश्यकतेनुसार साधकाला स्वतः आपोआप होतात. या सर्वांचे प्रत्यक्ष ज्ञान महायोगाचे साधन करण्यानेच होते. याच्याबरोबर साधकाला पंचमहाभूतांच्या तत्त्वसमूहाचे ज्ञान आतून स्फुरू लागते. साधक जन्मजन्मांतरी ज्ञान, योग, भक्ती, मंत्र, जप, देवीदेवतांची पूजा इत्यादि साधने मोक्षप्राप्तीसाठी करीत आलेला असतो. महायोगाच्या साधनात पूर्व जन्मातील संस्कारानुसार साधन

प्रकट होत जाते. जर पूर्वजन्मी ज्ञानाचे साधन केले असेल तर त्याला हे साधन करताना आत्मतत्त्वाच्या एकत्वाचा अनुभव येऊ लागतो. योगसाधनाचे संस्कार यमनियमादि अष्टांग योगातील क्रिया होऊन प्रकट होतात. चित्तचांचल्य, चित्तक्षोभ, भय, त्रास, शंका, संशय, उग्रता, गर्व, प्रफुल्लता, विषाद, स्वप्नयुक्त निद्रा, सुषुप्ती, मूर्छा, भाव इत्यादि भगवत्प्रेमाच्या लक्षणांच्या द्वारा भक्तिसाधनाचा आविष्कार होतो. पूर्वजन्मात मंत्रयोगाचा अभ्यास केलेला असल्यास वरील भक्तिमार्गाच्या लक्षणांबरोबरच साधकाला देवदेवतांची दर्शने होतात. पूर्वजन्मातील विभिन्न साधनाभ्यासामुळे साधकांना एकसारखे अनुभव व एकसारख्या क्रिया होत नाहीत. प्रत्येकाची प्रवृत्ती व प्रकृती भिन्न असते. त्यामुळे साधकांच्या क्रियांमध्ये व अनुभवात वैविध्य व वैचित्र्य दिसून येते. इतके जरी सर्व भिन्न असले तरी साधनाचे अंतिम फल समाधी, ज्ञान, मोक्ष व सामरस्य हे एकच आहे हे अगदी नि:संशय.

**नऊरस :-**

**रौद्रोऽद्भुतश्च श्रृङ्गारो हास्यं वीरो दया तथा।**
**भयानकश्च बीभत्स शान्तः सप्रेम भक्तिकः।।**

रौद्र, अद्भुत, श्रृंगार, हास्य, वीर, दया, भयानक, बीभत्स व शांत हे नऊ भावरस आहेत. तीक्ष्णता, विस्मयजनकता, रतिजनकता, प्रसन्नता, उत्साह, करुणा, भयसूचकता, घृणा व नम्रता हे नऊ रसांचे भाव आहेत. कुंडलिनी शक्ती जागृत झाली की, नाना प्रकारच्या अद्भुत शास्त्रांचे ज्ञान व सर्व प्रकारचे अज्ञात भावसमूह स्वतः क्रमाक्रमाने प्रकाशित होत जातात. या भावावेशामध्ये साधक आत्यंतिक आनंदात निमग्न होऊन जातो. साधनाच्यावेळी त्याच्या मनात ज्या ज्या गोष्टींचे आतून स्फुरण होते त्या त्या गोष्टी क्रियारूपाने आपापल्या संस्कारानुरूप साधकाकडून प्रकट होत जातात. या भावक्रियांचा कोणताही ठराविक क्रम नाही. ज्यावेळी जो भाव किंवा जी वृत्ती येते ती तसे आपले काम करते. अव्यक्त चैतन्यशक्तीमुळे साधकाच्या मनाला सूक्ष्मातिसूक्ष्मापासून कधी कधी तीव्रातितीव्र भावनांच्या

प्रेरणा होत असतात. हे असे का होते व कशासाठी होते याबद्दल साधकाने निष्कारण विचार करण्याचे कारण नाही. आतून उसळून येणाऱ्या भावांना व क्रियांना कोणताही अडथळा न करता व त्यांना न थांबविता साधकाने त्यांना त्यांच्या दृष्टीने योग्य असलेल्या कार्यात परिणत होऊ देण्याची नितांत आवश्यकता असते. अंतिम उद्दिष्टाच्या दृष्टीने साधकाने अत्यंत नि:शंक व निर्भय होऊन आपल्या इच्छाशक्तीला क्रियेमध्ये परिणत होऊ दिले पाहिजे.

ज्यावेळी साधकाच्या ठिकाणी रौद्ररसाचा आविष्कार उत्पन्न होतो त्यावेळी साधनकालात साधक क्रोधाने व कर्कश भाषेने आपले रौद्र रूप प्रकट व प्रकाशित करतो. ज्यावेळी साधकाच्या ठिकाणी अद्भुत रसाच्या क्रिया होतात त्यावेळी तो महाविस्मयता दाखवितो; कारण त्याला तसे विस्मयकारक अनुभव येत असतात. त्याचप्रमाणे साधकाच्या ठिकाणी श्रृंगाररसाचा आविर्भाव झाला की, तो आपल्या उपास्य देवतेला पतिभावनेने पाहतो किंवा आत्मरतीत निमग्न होतो. साधकाच्या ठिकाणी हास्यरसाचा विकास झाला की, साधनकालात स्मित, हसित, विहसित, अवहसित, अपहसित व अतिहसित अशा सहा प्रकारच्या हास्यांपैकी कोणत्याही प्रकारच्या हास्याने साधकाकडून हसण्याची क्रिया होते. इतकेच नव्हे; तर साधक तास तासपर्यंत नानाप्रकारे हसत राहतो. साधकाच्या ठिकाणी क्रिया होत असताना जेव्हा वीररसाचा आविर्भाव होतो त्यावेळी तो उत्स्फूर्त गर्जना, आरडा-ओरड, शरीर इकडे तिकडे फेकणे, तोडणे, वाकविणे, ओरबाडणे, आवेशामध्ये कठिणातले कठीण कामही सहज करणे इत्यादि क्रिया करतो. अथवा त्या अवस्थेत तो बळकटातील बळकट वस्तूही तोडूमोडू शकतो. अर्थात् साधनकालात साधक वीराप्रमाणे उत्साहपूर्ण होतो. साधनाच्या वेळी पुष्कळसे साधक करुणरसाने भरून जातात व अत्यंत कष्टदायक अशा करुणा उत्पन्न करणाऱ्या स्वराने रडू लागतात. त्यामुळे इतरांच्या मनातही करुणा उत्पन्न होऊन त्यांच्या डोळ्यातून अश्रू ओघळू लागतात. पुष्कळशा साधकांना साधन करताना अंत:करणात भयाचा संचार

झाल्याचे अनुभवाला येते. त्यामुळे भयभीत होऊन त्यांच्या तोंडून भयसूचक शब्द बाहेर पडतात. कित्येक साधकांच्या तोंडून साधनकालात निंदा व घृणास्पद शब्द बाहेर पडतात. इतकेच नव्हे; तर तिरस्कार सूचक अशा शरीराच्या चेष्टाही त्यांच्याकडून आपोआप घडून येतात. शांतभाव उत्पन्न झाला की, साधनकालात साधकाच्या मन, प्राण व शरीरातील इतर क्रियांचा रोध होऊन तो स्वस्थ व चुपचाप बसतो. त्यामुळे तो आपोआपच हळूहळू आपल्या अंतरात्म्याशी संलग्न होत जातो. त्यामुळे त्याला परमशांती व महासुखाचा अनुभव येतो.

याप्रमाणे महायोगाच्या साधनात साधकाला अंतरात्म्याच्या प्रेरणेने शरीर, मन व प्राण यांच्या क्रिया होतात. त्यामुळे त्याला सर्व तत्त्वांचे व भौतिक विषयसमूहाचे ज्ञान होते. या रीतीने ही प्राकृतिक तत्त्वे साधकाला अनुकूल होतात. त्यांचे स्थान, कार्य, स्थिती व स्वरूप यांचे ज्ञान साधकाला स्वतः होते. साधक या ज्ञानाच्या जोरावर आवश्यकतेनुसार त्यांच्यापासून आपली भौतिक आणि अध्यात्मिक उन्नती करून घेतो. त्याचबरोबर हे लक्षात येते की, ही भौतिक तत्त्वे साधकाला कधीही प्रतिकूल होत नाहीत.

**मंत्रयोगाच्या क्रिया :-**

कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर वाचेवर जो परिणाम होतो तो मंत्रयोग होय. सिद्धपुरुष आपल्या सिद्धसंकल्पवाणीने स्त्री व पुरुष साधकास एकाक्षरी किंवा अनेकाक्षरी मंत्रोपदेश करतात. त्याने साधकाची सुप्तशक्ती जागृत होते. हे अक्षर किंवा शब्दसमुच्चय काही विशिष्ट मंत्र असतो. त्यांच्या जपाच्या योगाने साधक मायेच्या आवरणातून मुक्त होतो. मंत्र शब्दाची व्याख्या "**मननात् त्रायते इति मन्त्रः।**" अशी आहे. ज्यावेळी जप करता करता मनन सुटते, मन नाहीसे होते, मंत्र थांबतो, त्रिपुटीचा नाश होतो व साधकाला लयावस्था प्राप्त होते तो मंत्रयोग होय.

श्रीगुरूंनी मंत्र दिल्यावर शक्ती जागृत होऊन नाना तऱ्हेच्या क्रियांचे अनुभव साधकाला येतात किंवा मागे सांगितलेल्या चार

प्रकारांपैकी एखाद्या प्रकाराने दीक्षा झाल्यावर साधकाला आतून मंत्र, कविता, ॐकार इत्यादि स्फुरू लागतात. या मंत्राने अनेक क्रिया आविर्भूत होतात.

श्रीभगवंताची प्राप्ती व्हावी म्हणून ब्रह्मर्षी श्रीनारदांच्या सांगण्यावरून ध्रुवाने मधुवनात खूप तपश्चर्या केली. शेवटी ध्रुवाच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन भक्तकामकल्पद्रुम परमेश्वर गरुडावर बसून मधुवनात आला. प्रत्यक्ष परमेश्वर पुढे येऊन उभा राहिला तरी ध्रुवाने आपले डोळे मुळीच उघडले नाहीत; कारण ध्रुव निश्चल अंतःकरणाने हृत्कमलीच सच्चिदानंद प्रभूचे रूप स्पष्टपणे पाहत होता. ध्रुव डोळे उघडत नाही असे पाहून तो पाहत असलेले आपले स्वरूप श्रीभगवंताने त्याच्या हृदयातून गुप्त केले. अशा प्रकारे शुद्धचैतन्य जगदात्मा एकाएकी दिसेनासा झाला आणि हृदयात अंधकार दिसू लागला तेव्हा ध्रुवाने आपले नेत्र उघडले. त्यावेळी हृदयात दिसत असलेले रूप प्रत्यक्ष आपल्यापुढे उभे आहे असे त्याच्या दृष्टीस पडले. ते रूप पाहिल्याबरोबर ध्रुवबाळ अगदी गडबडून गेला. आता काय आणि कसे करावे हे त्याला सुचेना. त्याने ईश्वराच्या चरणी लोळण घेतली, त्याला दृढ आलिंगन दिले आणि हात जोडून तो तटस्थपणे त्याच्याकडे पाहत उभा राहिला.

ईश्वराची आपण पुष्कळ स्तुती करावी अशी ध्रुवाच्या मनाने फार उचल घेतली होती. परंतु स्तुती कशी आणि कोणत्या शब्दांनी करावी हे त्याला कळेना. तसे स्फुरण त्याला होईना. हे स्फुरण आपल्याला कसे होईल? या विवंचनेत तो असताना सर्वांचा अंतरात्मा श्रीभगवान् याने त्याचे मनोगत जाणले. याला शक्तिपात दीक्षा देऊन याची अंतःशक्ती जागृत होऊन हा तिच्या स्फूर्तीने माझी स्तुती आपोआप करू लागेल असे जाणून त्याने आपला शंख ध्रुवाच्या गालाला लावला. त्या शंखाचा स्पर्श होताच "**अनधीतस्य शास्त्रस्य स्वत एव प्रकाशनम्**" असे होऊन ध्रुवाला अद्भुत वाणीची स्फूर्ती झाली व तो परमेश्वराची स्तुती करू लागला.

अशा प्रकारे शक्तिपात झाल्याशिवाय मंत्र चैतन्ययुक्त होत नाही अगर अंतःस्फूर्तीने मंत्र, कविता इत्यादि स्फुरत नाहीत. साधनात मंत्र जप सुरू झाला की, त्याबरोबरच हृत्कंप, ब्रह्मग्रंथी, विष्णुग्रंथी, व रुद्रग्रंथीचा भेद, सर्व अवयवांचे वर्धन म्हणजे वायूने सर्व अंग फुगणे, आनंद, अश्रू, रोमांच, देहामध्ये देवतेचा आवेश, वाचा गदगद होणे ही लक्षणे व क्रिया दिसतात. मनाची प्रसन्नता, संतोष, दुमदुम शब्द ऐकू येणे, सूर्यतेजाप्रमाणे आत्मतेजाचे दर्शन, निद्रा, क्षुधा, जप, रम्यता, आरोग्य, गांभीर्य, क्रोधहीनता, लोभहीनता इत्यादि चिह्ने दिसली तर मंत्रसिद्धी व देवतेची प्रसन्नता झाली असे समजावे. असे **"मंत्रमहोदधीत"** म्हटले आहे.

शक्ती जागृत झाली की, मंत्रयोग कसा सिद्ध होतो ते **"बृहन्नील"** व **"नीलतंत्रात"** पुढीलप्रमाणे सांगितले आहे. "हे देवी ! ऐक. ज्याचा अनुभव आला असता विद्या शीघ्र सिद्ध होते असे सर्वश्रेष्ठ ज्ञान सांगतो. मूलाधारात सर्पाकृती कुंडलिनी शक्ती आहे. ही शक्ती शक्तिपातयोगदीक्षा झाल्यावर संचलित होते. तिच्या संचलनाने प्राणवायूही घुमू लागतो. त्यामुळे ही शक्ती झिन् झिन्, चिन् चिन् शब्द करीत वर उठत ब्रह्मरंध्रात जाते आणि परत मूलाधारात येते. या जाण्यायेण्यात मन लीन झाल्याने मंत्रशिखा म्हणजेच मंत्राची अग्निज्वालेसारखी प्रकाश करणारी शक्ती उपन्न होते. ती सर्व मंत्रांना प्रदीपित व चैतन्यमय करते. अंधकारमय घरात जसे काही दिसत नाही तसे शिखाहीन मंत्राने कोणतीही सिद्धी होत नाही."

**"श्रीशारदातिलकतंत्राच्या"** प्रथम पटलामध्ये दीक्षा झाल्यावर कुंडलिनीच्या जागृतीमुळे मंत्रसृष्टी कशी होते हे सांगताना असे म्हटले आहे की, "श्रीगुरुदीक्षा झाल्यावर जाणीवस्वरूप व स्वप्रकाशणारी अशी ज्ञानशक्ती कुंडलिनीदेवी साधकाला आपल्या स्वरूपाचे ज्ञान करून देण्यासाठी विशेष गुणयुक्त होऊन क्रियाशील झालेली दिसते. त्यावेळी ती आपल्या ब्रह्ममय शक्तीने अनेकानेक गुणवती शक्तींचे चमत्कार करते. ती शक्ती ध्वनी, नाद, निबोधिका, अर्धेंदू, परा,

पश्यंती, मध्यमा व वर्णमालेला प्रकाशित करणारी वैखरीवाणी उत्पन्न करते. ही कुंडलिनी शक्ती तेजोरूप होऊन गुणाचा आश्रय करून इच्छा, ज्ञान व क्रिया या तीन रूपाने प्रकाशित होऊन वर वर्णन केल्याप्रमाणे वाणी व वर्णमालेची सृष्टी करते. या गोष्टींचा अनुभव साधनकालामध्ये साधक शरीरातील होणाऱ्या क्रियांच्या लक्षणावरून घेऊ शकतो.

कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर प्रथम संवित्स्वरूपाची जी अवस्था असते त्यात शरीर, मन व प्राण शक्तिहीन झाले असले तरी ती चेतनामात्र राहिलेली आहे असा साधकाला अनुभव येतो. ज्यावेळी कुंडलिनी शक्ती शक्तिरूपाने प्रकाशयुक्त होते तेव्हा साधकाला आपल्या ठिकाणी मन व प्राणाच्या क्रियाशक्तीचा अनुभव येतो. नंतर ध्वनी उत्पन्न झाल्यावर साधकाला आत अव्यक्त ध्वनी शब्दरूपाने ऐकू येतो. परंतु या नादाचा नेमका निर्देश मात्र करता येत नाही. जेव्हा कुंडलिनी नादाचे रूप धारण करते तेव्हा साधक अंतरंगामध्ये व्यक्त व सूक्ष्मातिसूक्ष्म नाद अगदी स्पष्टपणे ऐकतो. यानंतर साधकाला निबोधिका अवस्थेचा बोध होतो. या अवस्थेतच त्याला ज्योतींचे दर्शन होण्यास आरंभ होतो. त्यानंतर अर्धचंद्राचे दर्शन होऊन बिंदुरूप ज्योती प्रकाशू लागते. त्यामुळे सर्व प्रकारचे नाद सुस्पष्ट होत जातात. हे नाद भिन्न भिन्न शब्द, वीणा, बासरी, भुंगे यांच्या रूपाने परा, पश्यंती व मध्यमा वाणींमध्ये अनुभवाला येतात. शेवटी वैखरीवाणीच्या द्वारे वर्णमालेचे रूप घेऊन नाना प्रकारच्या क्रियांद्वारा नाद शब्दरूपाने व्यक्त होतो.

ती परमदेवतास्वरूपिणी ईश्वरीशक्ती जागृत होऊन उत्तम प्रकारे क्रिया करू लागली म्हणजे साधकाच्या सर्व शरीरात ती व्याप्त होऊन मंत्रमय जगताची रचना करू लागते. त्या योगाने साधनामध्ये वेदादिशास्त्रांचे बीजमंत्र असलेल्या प्रणवाचा ध्वनी साधक आतून करू लागतो. त्याचबरोबर आवेशात नाना प्रकारच्या देवी, देवता, शिव, शक्ती, विष्णू, सूर्य, गणेश, दुर्गा, भैरव, नृसिंह, वराह, वासुदेव,

हयग्रीव, पुरुषोत्तमादि देवतांचे ओम्, ऱ्हीं, श्रीं, क्लीं इत्यादि बीजमंत्रांचे उच्चारण करून जोरजोराने अगर आतल्याआत जपू लागतो. अशा प्रकारे साधकाने न पाहिलेले, न ऐकलेले व न शिकलेले अनेक प्रकारचे विविध मंत्र जागृत झालेली कुंडलिनी शक्ती निश्चयपूर्वक साधकाच्या मुखातून प्रकट करते. यातील काही मंत्र व बीजे साधकाच्या नावाला व राशीला प्रतिकूल व अनिष्ट असले तरी ते आतून शक्तीकडून प्रकट होत असल्याने ते चैतन्यरूप व सिद्धरूप होऊन साधकाचे कल्याणच होते. यामुळे चैतन्य मंत्राने जागृत होणारी कुंडलिनी शक्ती किंवा जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीकडून प्रकट होणारे चैतन्यस्वरूप मंत्र यांची एकताच सिद्ध होते.

याप्रमाणे जागृत कुंडलिनी शक्तीच्या व्यक्त, अव्यक्त अगर व्यापक अवस्थेपासून अगदी प्रथम वेदाचा बीज मंत्र ॐकार प्रकाशित होतो. ॐकारानंतर निरनिराळ्या देवतांच्या मंत्रांची रचना होते. याकरिता कुंडलिनी शक्ती जागृत झाली की, प्रथम ॐकार शब्द ध्वनिरूपाने परावाणीमध्ये होत असल्याची जाणीव होते. याचे कारण असे आहे की, ॐकारापासूनच मंत्रसृष्टीचा आरंभ होतो. हे ॐ अक्षरच ब्रह्म आहे व तेच अत्यंत श्रेष्ठ आहे. हा ॐकार आपल्या अंतःकरणात स्वतःहून आपोआप स्फुरण पावत असल्याचा जो साधक अनुभव घेतो त्याची जी इच्छा असेल ती परिपूर्ण होते. हे ॐ अक्षर अत्यंत श्रेष्ठ आलंबन आहे. योगसाधनाने या परम आश्रयाची जाणीव होऊन साधक त्यात रमून गेला म्हणजे त्याला ब्रह्मलोकाची प्राप्ती होते असे **"कठोपनिषदात"** म्हटले आहे.

ज्यावेळी श्रीगुरुकृपेने कुंडलिनी शक्ती जागृत होऊन महायोग सिद्ध व्हावा म्हणून कार्यरत होते तेव्हा ती योगमाया शक्ती समस्त वैदिक मंत्रांच्या स्वरांचे संपादन करते. त्यावेळी हा ॐकार परावाणीत प्रस्फुरित होऊन पश्यंती व मध्यमा यांच्यातून जाऊन वैखरीने व्यक्त होतो. ॐ प्रत्यक्ष वैखरीतून उच्चारण होण्याच्या क्रियेला आरंभ झाला की, साधकाच्या मूलाधारात कंपनाला प्रारंभ होतो. या कंपनाबरोबरच

षडज्, ऋषभ, गांधार इत्यादि नानाविध स्वरांनी दीर्घ प्रणवाचा उच्चार होऊ लागतो. अशा प्रकारे आतून उच्चारित होणाऱ्या प्रणवाच्या ध्वनीचा अर्थ, स्वर, व्यंजन, वर्ण यांच्याशी कोणताही संबंध राहत नाही. कुंडलिनी शक्तीच्या प्रेरणेमुळे साधकाकडून मूलाधारापासून जेव्हा आपोआप वरीलप्रमाणे उच्चारण होऊ लागते तेव्हा साधक बहुतेक करून संज्ञाशून्य होतो व हृदयाकाशात पुष्कळशा नादांचा गुंजारव ऐकतो. परंतु नादाचा निर्देश मात्र करू शकत नाही. ज्यावेळी साधकाकडून ॐकाराचा आवेशाने उच्चार होत राहतो तेव्हा तो प्लुत होतो. त्यावेळी साधकाला आपण अत्यंत जोरजोराने ॐकार ध्वनीचे उच्चारण करीत असल्याचे ज्ञान राहत नाही. अशा प्रकारचा गगनभेदी ध्वनी रात्रीच्या वेळी खुल्या मैदानात मुद्दाम केला तर, तो तीन मैलापर्यंत ऐकू जातो. साधकाकडून ज्यावेळी कुंडलिनी शक्तीच्या आतील जोराने ॐकाराचे उच्चारण होत राहते त्यावेळी तो आवाज इतका श्रुतिमधुर असतो की, ऐकणाऱ्याचे मन अगदी मुग्ध होऊन जाते. मात्र त्या आवाजाचे स्वर इत्यादि लक्षात येत नाहीत. इतकेच नव्हे; तर तो आवाज निरनिराळ्या स्वरांचे एकत्रित मिश्रण झाल्यामुळे एका विलक्षण अशा अद्भुत स्वराची प्रचीती येते. ज्याप्रमाणे सामवेद म्हणणारा व ऐकणारा श्रोता त्यातील स्वरांच्या एकतेमध्ये तल्लीन होतो त्याप्रमाणे ॐकाराचा आतून उमटणारा ध्वनी साधकाला व ऐकणाऱ्याला अर्थबोधरहित आश्चर्यामध्ये बुडवून टाकतो. यातील स्वरांचा काही भाग हुंकार शब्दांशी मिळून बाहेर पडतो, परंतु तो सर्वस्वी हुंकार असतो किंवा ॐकार पूर्णपणे हुंकाराशी मिसळून बाहेर उमटतो असे म्हणता येणार नाही. याचे खरे कारण असे आहे की, आतून आपोआप उमटणाऱ्या या ॐकारांच्या विचित्रतेचे वर्णन करता येत नाही.

साधनात कुंडलिनी शक्तीच्या जागृतीमुळे वरीलप्रमाणे वैखरीची क्रिया होऊन प्रणवध्वनी उमटतो व त्याचा जप होतो. काही वेळाने तो लय पावतो. परंतु साधन संपल्यावर आपल्या इच्छेने साधकाने साधनात जसा ॐकार होतो तसा आवाज व उच्चार केला तरी

त्याला साधनात आपोआप आतून होणाऱ्या ॐकारामुळे जो आनंद व जे मानसिक समाधान मिळते ते मुद्दाम करण्याने मिळत नाही. दहापाच वेळा अशा रीतीने उच्चारण केल्यावर त्याला असे वाटते की, आता पुरे करावे. दमल्यासारखे वाटून त्याच्या गळ्याचा स्वरभंग होतो. स्वाभाविकपणे होणाऱ्या क्रियेच्या आवेशामध्ये कित्येक साधकांचा महिना महिनापर्यंत दररोज चारचार पाचपाच तास दीर्घ प्रणवाचा जप होतो. या जपाच्या वेळी साधकाचा स्वर अगदी गगनभेदी होतो. प्रणवाच्या इतक्या दीर्घ उच्चारामुळे साधकाचे शरीर स्फूर्तियुक्त होते. महामाया कुंडलिनी शक्तीच्या अद्भुत व अपार सामर्थ्यामुळे होणाऱ्या योगक्रियांच्या कौशल्यांचे सामर्थ्य लिहिणे, सांगणे व समजाविणे हे केवळ अशक्यच आहे. या दीर्घ प्रणवध्वनीच्या नंतर कित्येक भाग्यवान् साधकांचा हा ध्वनी सूक्ष्म होत जातो. महायोग साधनात याला स्वतःप्रणव असे नाव आहे. उक्त दीर्घ प्रणवजपापेक्षा सूक्ष्म जप होण्याने मनाला त्याच्या शतपट सुख अनुभवाला येते. या स्वतःप्रणव जपाची क्रिया साधकाच्या अंतरामध्ये अष्टौप्रहर चालू असते. स्वप्रामध्येही साधकाचे मन क्रियात्मक राहते. या क्रियेच्या आरंभाचा, अवधीचा व शेवटाचा कोणताही नियम सांगता येत नाही. साचेबंदपणा हे याचे स्वरूपच नाही.

सूक्ष्म प्रणवाच्या जपाचा आरंभ झाल्यानंतर योगापासून प्राप्त होणाऱ्या ऐश्वर्याची साधकाच्या मनाला इच्छा होत नाही. या जपामुळे मन अंतर्मुख होऊन राहते व विषय वासनांचा ऱ्हास होत जातो. मन आत्मतत्त्वामध्ये अत्यंत निष्ठावान् होते व मूर्च्छित होऊन राहते. कामक्रोधादि दोषांनी साधक व्यथित होत नाही. प्राणप्रवाहाचे स्पंदन बहुतांशी चालू राहते; परंतु श्वासप्रश्वास दीर्घ होत नाहीत. ही क्रिया चालू झाल्यावर साधकाला साधनाला बसल्यावर दुसऱ्या क्रिया कमी होतात व हीच क्रिया मुख्य राहते. याच्याबरोबर कधी साधकाला अगदी सूक्ष्म असे नाद ऐकू येतात. हे नाद कधीकधी अत्यंत दूर अंतरावरून तर कधीकधी अगदी जवळून ऐकू येत आहेत असे

वाटते. या अवस्थेमध्ये साधकाच्या अंतरामध्ये त्याचे मन शांत, शून्य व एकाग्र होते. हळूहळू मधूनमधून त्याला बाह्यविस्मृती होत जाते परंतु बहुतेक करून या अवस्थेत बाहेरील विषयग्रहण करण्याचे साधकाच्या मनाचे सामर्थ्य राहते. या स्वतःप्रणव जपाच्या अवस्थेमध्ये मन धारणा करण्यास पूर्ण समर्थ होते. याच्या जोरावरच साधक आळस किंवा निद्रा यांना जिंकतो. इतकेच नव्हे; तर साधकाच्या शरीरांत सत्त्वगुणांचा संचार नेहमी असतो.

साधना सुरू झाली की, मंत्रयोग नाना प्रकारच्या स्वरविक्रिया होऊन कसा होतो हे पाहण्यासारखे आहे. साधनाच्या सुरुवातीला साधकाच्या मूखातून निरनिराळे विकृत शब्द बाहेर पडू लागतात. साधक नाकातून किंवा गळ्यातून अनेक प्रकारचे शब्द काढतो. पशू, पक्षी, बेडूक, कुत्रा, मांजर, सिंह, वाघ इत्यादि निरनिराळ्या प्राण्यांचे आवाज आपोआप उमटून स्वरसाधना होऊ लागते. गर्जना, हुंकार, चीत्कार, भयंकर शब्द, बडबडणे, अद्धुत भाषा बोलणे, आक्रंदन, ओरडणे, नानाप्रकारचे सूर काढून रडणे, खदखदून व खळखळून निरनिराळे भाव व्यक्त करीत हास्यध्वनी करणे, गायन व भगवन्नाम संकीर्तन करणे, मुखाने मृदंग, तबला, सनई इत्यादिकांचे शब्द काढणे, नियमबध्द टाळी वाजवून ताल धरणे, गद्य, पद्य, अथवा गीताची रचना करणे, व्याख्यान देणे, आलस्यरहित व उत्साहित राहून अनंत प्रकारच्या स्वतःसिद्ध अशा या क्रिया साधकाकडून होऊन त्यांची आवश्यकता संपली की त्या बंद होतात.

या साधनात साधकाला दिव्य शब्दाची व नादाची उत्पत्ती शरीरात होऊन अनुभूती कशी होते याचे वर्णन "**श्रीरामगीता**" व "**उमासंहितेत**" पुढीलप्रमाणे केले आहे. शक्तिपातयोगाचे साधन करता करता जसजशी नाडीशुद्धी होत जाते तसतसा साधकाच्या अंतरामध्ये ज्योतिस्वरूप आत्म्याचा प्रकाश उदित होऊ लागतो. हा प्रकाश उदित होण्यापूर्वी किंवा नंतर साधकाला नाना प्रकारचे नाद ऐकू येतात. हे नादाचे शब्द व्यक्त व अव्यक्त असे दोन प्रकारचे असतात. ज्या शब्दांना

बाहेरच्या कोणत्याही शब्दाची उपमा देता येत नाही त्यांना अव्यक्त म्हणतात. जे शब्द तास किंवा घंटेप्रमाणे स्पष्ट प्रतीत होतात त्यांना व्यक्त म्हणतात. हे शब्द वर्णात्मक आणि ध्वन्यात्मक असे नाना प्रकारचे असतात. आघाताशिवाय किंवा उच्चाराशिवाय जे शब्द अंतरात स्वतः होतात त्यांना मंगलदायक शब्दब्रह्म असे म्हणतात. शब्दब्रह्मस्वरूप अनाहत नादाचे नऊ प्रकार आहेत असे सांगतात. योगशास्त्रात नाद असंख्य सांगितले आहेत; परंतु योगसाधन करणारे साधक या नादांचा अनुभव नियमित संख्यारूपाने घेतात.

ज्यावेळी साधन करताना मन आकाशतत्त्वामध्ये जाते त्यावेळी सूक्ष्म आकाशापासून नाद उत्पन्न होतो. त्यावेळी साधकाला अंतरामध्ये सूक्ष्म अशा शून्यरूप ज्योतीचे दर्शन होते व शब्द ऐकू येतात. जेव्हा प्राणवायू ब्रह्मरंध्रात जातो तेव्हा मेघध्वनी व शंखनाद ऐकू येतो. अंतराकाशात प्राण गेल्याने हा महान् ध्वनी होऊ लागतो. घंटेप्रमाणे अनेक वाद्ये वाजू लागतात. हे शब्द साधकाच्या प्रगतीचे सूचक आहेत. असा अनुभव येऊ लागला म्हणजे आपला मार्ग बरोबर आहे असे साधकाने निश्चित समजण्यास हरकत नाही.

**नादाचे प्रकार :-**

**"हठयोगप्रदीपिकेच्या"** चतुर्थ उपदेशामध्ये हे दिव्य नाद किती प्रकारचे आहेत हे सांगताना असे म्हटले आहे की, "हे नाद समुद्र, मेघ, धबधबा, गाडी, धडधडता अग्नी, भेरी, काहल, दुंदुभी, मार्दल, मृदंग, शंख, घंटा, किंकिणी, कांस, झांझर, टाळ्या, तंतुवाद्य, वीणा इत्यादि वाद्ययंत्रांप्रमाणे होतात. त्याचप्रमाणे बैल, मोर, भुंगा, मधमाशी, झिन् झिन्, चिण् चिण् आदि पशुपक्षी व किटपतंगांच्या शब्दांप्रमाणे शब्दध्वनी ऐकू येतो. स्त्रियांच्या गीताप्रमाणे किंवा पुष्कळशा लोकांच्या कोलाहलाप्रमाणे घोषयुक्त शब्द ऐकू येतात. या ध्वनिप्रमाणेच अव्यक्त ब्रह्म ॐकाराचा ध्वनी ऐकू येतो. या सर्व नादामध्ये चिण्, चिंचिण, घंटा, शंख, वीणा, टाळ्या, बासरी, मृदुंग, भेरी आणि मेघ हे दहा नाद मुख्य आहेत.

**"हंसोपनिषदामध्ये"** या दिव्य नादश्रवणाचे फल काय मिळते हे सांगितले आहे. "अगदी प्रथम चिण्नाद प्रकट झाल्याने शरीरात झनझनाट होतो. दुसरा चिंचिण नाद झाल्याने शरीर तुटू लागते. तिसऱ्या घंटानादाने खूप घाम येतो. चौथ्या शंखनादाने मस्तक कंप पावू लागते. पाचवा तंत्रीनाद ऐकू येऊ लागल्यावर टाळूपासून अमृत टिपकू लागते. सहाव्या करतालनादामुळे अमृताचे आस्वादन होते. सातव्या बासरीच्या नादाने गूढ विषयांचे ज्ञान होते. आठव्या मृदंगनादाने परावाणीचे ज्ञान होऊन वाक्सिद्धी होते. नवव्या भेरीनादाने शरीराची सुंदरता, अदृश्य सिद्धी व आवरणरहित दिव्यदृष्टी प्राप्त होते आणि दहाव्या मेघनादाच्या श्रवणाने साधकाला समाधीत ब्रह्माशी एकता प्राप्त होऊन तो ब्रह्मरूप होतो.

सिद्धमहायोगांतर्गत मंत्रयोगाचे साधन जेव्हा होऊ लागते तेव्हा त्याचा महिमा कसा अनुभवाला येतो हे **"वायवीय संहितेच्या"** २९ व्या अध्यायात पुढीलप्रमाणे सांगितले आहे.

**सर्ववेदमयी देवी सर्वमन्त्रस्वरूपिणी।**
**सर्वमन्त्रात्मिका विद्या वेदविद्याप्रकाशिनी।।७।।**
**सैव कुण्डलिनी माया शुद्धाध्वपरमासती।**
**सा विभागस्वरूपैव षडध्वात्मा विजृम्भते।**
**तत्र शब्दस्त्रयोऽध्वानस्त्रयश्चार्थाः समीरिताः।।८।।**

अशा प्रकारे कुंडलिनी शक्ती जागृत होऊन क्रियाशील झाली की, वास्तविक योगाला म्हणजे अंतरंग साधनाला आरंभ होतो. हाच मार्ग खरा सिद्धप्रद म्हणजे मोक्षदायक आहे; कारण या स्वाभाविक सिद्धमहायोगाच्या उपायानेच वेदज्ञानमयी, मंत्रस्वरूपिणी, सर्वमंत्रात्मिका विद्येचा व वेदविद्येचा प्रकाश करणारी कुंडलिनी शक्ती साधकाकडून क्रिया करवून घेते. या शक्तीमुळेच सर्व मंत्र व सर्व विद्यांच्या विज्ञानाचा प्रकाश साधकाला प्राप्त होतो. त्याला देवीदेवतांची दर्शने होतात. त्यांच्या अनुग्रहाचा लाभ होतो. मंत्र व वेदादिक शास्त्रांच्या मंत्रांचे विशेष ज्ञान साधकाला होते व वेदांचे गूढ रहस्य त्याला समजू लागते.

साधन करताना भविष्यात होणाऱ्या गोष्टींचे ज्ञान साधकाला होते. कोणत्याही शास्त्राचा थोडासा जरी अभ्यास केला तरी वाचता वाचताच त्याला त्यातील मर्म व भावार्थ समजू लागतो. अभ्यासिलेल्या विषयाची व्याख्या करण्याची विचित्र शक्ती त्याला प्राप्त होते.

**लययोगाच्या क्रिया :-**

शक्तिपातयोगदीक्षा झाल्यावर नाना तऱ्हेच्या क्रिया होऊन नाडीशुद्धी होऊ लागते. नाडीशुद्धी झाली की, साधकाला अनाहत नाद ऐकू येऊ लागतो. कशावरही आघात झाल्याशिवाय किंवा कसलाही उच्चार केल्याशिवाय जो शब्द शरीरात आपोआप होत असताना ऐकू येतो त्याला अनाहत नाद किंवा शब्दब्रह्म असे म्हणतात.

साधन करताना मन ज्यावेळी आकाशतत्त्वामध्ये जाते त्यावेळी सूक्ष्म आकाशापासून नाद प्रवर्तित होतो. ज्यावेळी प्राण ब्रह्मरंध्रामध्ये जातो त्यावेळी मेघ व शंखाचा ध्वनी ऐकू येतो. अंतराकाशात प्राण गेल्याने घंटेसारख्या वाद्याचा महाप्रचंड नाद ऐकू येऊ लागतो. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी आपल्या "**प्रबोधसुधाकर**" या प्रकरण ग्रंथातील "**नादानुसंधानप्रकरणम्**" यात असे म्हटले आहे की, "या नादाच्या अंतर्भागात जे ज्योतिस्वरूपब्रह्म सतत वास करते तेथे जर मनाची एकाग्रता झाली तर ते मन पुन्हा संसारबंधनाला कारणीभूत होत नाही. बऱ्याच वेळपर्यंत या नादानुसंधानामुळे होणाऱ्या श्रेष्ठ आनंदाच्या अनुभवाने जी चित्ताची एकाग्रता होते ती दुसऱ्या अनेक प्रकारांनी होणाऱ्या एकाग्रतेपेक्षा श्रेष्ठ होय."

साधनात समुद्राच्या लाटांचे आदळणे, मेघांच्या गर्जना, झऱ्यांचे झुळझुळणे, धबधब्याचे आदळणे अनाहत नादाच्या रूपाने ऐकू येते. गाडी, जळणारा अग्नी, भेरी, काहील, दुंदुभी, मृदंग, शंख, घंटा, किंकिणी, वीणा, बासरी, नगारा इत्यादि नानावाद्यांचे असंख्य नाद ऐकू येतात. बैल, मोर, भुंगा, मधमाशी इत्यादि निरनिराळ्या पशुपक्ष्यांचे आवाज नादरूपाने ऐकू येतात. स्त्रियांची गाणी, कोलाहलासारखे शब्द, चिण्चिण्, झिन्झिन्, सुईसुई असेही ध्वनी आतून उमटतात.

काही वेळा अत्यंत सूक्ष्म असे नाद ऐकू येतात. काही वेळा जप, मंत्र, श्लोक व भजनेही ऐकू येतात. काही वेळा साधकांना साधनातील काही सूचना स्पष्ट ऐकू येतात. तर काही वेळा इतर माहिती, भविष्य व आप्तमित्रांसंबंधी सूचना ऐकू येतात. या नादाकडे साधकाचे मन आपोआप खेचले जाऊन तेथे मनाचा हळूहळू लय होऊ लागला की, त्याला ब्रह्मभाव प्राप्त होऊ लागतो.

श्रीमदाद्यशंकराचार्य आपल्या "**प्रबोधसुधाकर**" या प्रकरण ग्रंथातील "मनोलय" या प्रकरणात साधकाला नादानुसंधानाने ब्रह्मभाव प्राप्त होऊ लागला की, त्यामुळे त्याची स्थिती कशी होते हे सांगताना असे म्हणतात की, "संसारातील अनेक तापांनी व कष्टांनी श्रमून गेलेले आणि नाना प्रकारच्या योनी फिरण्याने दमून गेलेले अंतःकरण नादानुसंधान होऊ लागले की, परमानंदाची प्राप्ती झाल्यावर कधी कोणत्याही ठिकाणी चंचल होत नाही. त्या ब्रह्मानंदाच्या भरात मी कोण? हे काय? हा कोणाचा? इत्यादि अनेक प्रश्नांची व विचारांची मालिका जरी मनात येत असली तरी नादानुसंधानाने साधकाच्या मनाची व विचाराची गती खुंटते तेव्हा ते मूर्च्छित होते. समुद्रास मिळालेली नदी जशी समुद्ररूप होते त्याप्रमाणे नादात मनाचा लय होऊन पुष्कळ काल आत्मस्वरूपाचा अनुभव घेऊन मन आत्मरूप होते. दुधापासून निराळ्या काढलेल्या तुपाचे ज्याप्रमाणे पुन्हा दूध होत नाही त्याप्रमाणे आत्मस्वरूपात लीन झालेले मन पुन्हा विषयांची इच्छा करीत नाही. आत्मस्वरूपात जेव्हा चित्त लीन होते तेव्हा ते मूर्च्छित होऊन विषयचिंतन करण्यास असमर्थ होते."

क्रियाशक्तीच्या चालनामुळे मनाला जो लय प्राप्त होतो त्यामुळे भांग न पिताही भांग घेतल्याप्रमाणे रात्रंदिवस एका दिव्य नशेत, धुंदीत व मस्तीत साधक निमग्न होतो. चालता, बसता, फिरता, बोलता मन आत खेचले जाऊन मस्तीत निमग्न होते. कोणतेही व्यावहारिक कार्य आपण करू नये व सर्व गोष्टींपासून अलिप्त राहावे असे वाटू लागते. आपण काही ऐकावे, बोलावे, करावे व सांगावे असे वाटतच नाही.

एखादा मद्यपी आपल्या नशेत धुंद होतो तशी अवस्था होते. भांग व मद्य पिणाऱ्याची धुंदी उतरते व मागाहून त्याला ग्लानी येते; परंतु आत्मशक्तीच्या जागृतीमुळे जी दिव्य लयावस्था प्राप्त होते ती रात्रंदिवस टिकून राहते व ती कधीच संपू नये असे वाटते. त्यापासून जो दिव्यानंद प्राप्त होतो त्याचे वर्णन करणे शक्य नाही.

**राजयोगाच्या क्रिया :-**

"ज्या पातळीवर अध्यात्मिक अनुभूतीचे दिव्य दर्शन होते व एका अपरिमित शांतीसुखाचा लाभ होतो तिलाच राजयोग असे म्हटले आहे. राज या संस्कृत शब्दातील राज् या धातूचा अर्थ लकाकणे किंवा चमकणे असा आहे. आपणा स्वतःमध्ये निर्वाणाचा व ईश्वरसाक्षात्काराचा एकमेव प्रत्यय घेणे हाच राजयोग होय. **"ब्रह्माहमस्मि"** हा प्रत्यय येणे म्हणजेच राजयोग किंवा ज्ञानयोगाची परिसमाप्ती होय. जेव्हा अविचार, हीन विचार आणि कामक्रोधासारखा मलिन विकार यांचा ईश्वरीय दिव्य प्रेमाने पूर्ण बीमोड होतो आणि भावनेच्या पातळीवर जागृत कुंडलिनी शक्ती दिव्य भावावेशात परिणत होते तेव्हा तिलाच आह्लादिनी शक्ती असे म्हणतात. हाच भक्तियोग होय." असे राजयोगाचे विवेचन **"देवात्मशक्ती कुंडलिनी"** या ग्रंथात श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराजांनी केले आहे.

**"श्वेताश्वतर उपनिषदामध्ये"** श्रीगुरुकृपेने कुंडलिनी जागृत होऊन ब्रह्माभिव्यक्तीची दिव्य दर्शने कशी होतात हे सांगताना असे म्हटले आहे की -

**नीहारधूमार्कानिलानलानां खद्योतविद्युत्स्फटिकशशीनाम्।**
**एतानि रूपाणि पुरःसराणि ब्रह्मण्यभिव्यक्तिकराणि योगे।।२.११।।**

श्रीसिद्धगुरूंच्या संकल्पाने शक्ती जागृत झाल्यावर जाड प्रतीचे धुके, धूर, सूर्य, वायू, अग्नी, काजवा, विजेची चमक, स्फटिकमणी ही ब्रह्माची अभिव्यक्ती करणारी रूपे प्रकट होतात.

साधकाला दिव्य रूपाची दर्शने कशी होतात याचे **"सूर्यगीता"** व **"उमासंहितेत"** पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे.

**यदा कुण्डलिनी शक्तिराविर्भवति साधके।**
**तदा स पञ्चकोशे मत्तेजोऽनुभूति ध्रुवम्।।१।।**
**ततस्तु तमसि ध्यानी पश्यति ज्योतिरैश्वरम्।**
**श्वेतं रक्तं तथा पीतं कृष्णमिन्द्रायुधप्रभम्।।२।।**
**भ्रुवोर्मध्ये ललाटस्थं बालार्क सम तेजसम्।**
**दर्शनं नाम दिव्यानां दर्शनं चाप्रयत्नतः।।३।।**

जेव्हा कुंडलिनी शक्ती साधकाच्या ठिकाणी क्रियारूपाने प्रकाशित होते त्यावेळी अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय इत्यादि पंचकोशात साधकाला परमेश्वराच्या सूर्यरूप ज्योतिर्मय तेजाचा निश्चयाने अनुभव येतो. ध्यानाच्या वेळी साधकाला अंधकारमय अंतराकाशात ज्योतिरूप ईश्वराचे दर्शन होते. ती ज्योत शुभ्र, तांबडी, काळी व इंद्रधनुष्याप्रमाणे नानाप्रकारच्या रंगांची असते. ती ज्योत ललाट प्रदेशातील भ्रूमध्याच्या ठिकाणी प्रातःकाली उगविणाऱ्या सूर्याप्रमाणे दिसते. यालाच दिव्यदर्शन असे म्हणतात. शक्ती जागृत झाल्यावर असे दर्शन प्रयत्नाशिवाय आपोआप होऊन राजयोगाच्या पूर्णतेकडे साधक वाटचाल करतो.

**"पातंजल योगदर्शनात"** राजयोगाचे साधन कसे होते हे सांगताना समाधिपादात महर्षी श्रीव्यासांनी लिहिलेली पुढील तीन सूत्रे पाहण्यासारखी आहेत.

**विषयवती वा प्रवृत्तिरुत्पन्ना मनसः स्थितिनिबन्धिनी।।१.३५।।**
**विशोका वा ज्योतिष्मती।।३६।।**
**वीतरागविषयं वा चित्तम्।।३७।।**

ज्यावेळी कुंडलिनी शक्तीच्या प्रेरणेने क्रिया करता करता साधकाचे शरीर, मन व प्राण राजयोगाचे उत्कर्ष साधन करतात त्यावेळी विषयवती प्रवृत्ती उत्पन्न होते. या सर्व समाधी अवस्थात इंद्रियविषयांचे अलौकिक अनुभव येतात. त्या अवस्था मनाच्या चिकाटीस कारणीभूत होतात. त्यावेळी साधकाच्या चित्ताच्या स्थिरतेकरिता अंतरामध्ये दिव्य वस्तू अगर ज्योत स्वतः प्रकट होते. त्यामुळे सर्व इंद्रियविषयां-

संबंधीची आसक्ती हृदयातून निघून जाते व चित्त हृदयात मुरून जाते. दिव्यज्योतीच्या दर्शनाने साधकाचे मन स्वाभाविकपणेच तिच्यामध्ये गुंतून जाते व त्याला साधनाचे फल आपल्याला मिळेल किंवा नाही अशी चिंता राहत नाही. प्रकाशमान दिव्यज्योतीचे दर्शन होताच साधकाच्या चित्ताला त्याच्यामध्येच निरतिशय सुखाचा अनुभव येतो.

उपरोक्त दिव्य ज्योतीचे दर्शन विविध प्रकारांनी कसे होते हे "**वायवीय संहितेच्या**" ३८ व्या अध्यायात पुढीलप्रमाणे सांगितले आहे, "या ज्योतीचे दर्शन कित्येक प्रकारांनी होते. विजेची चमक, विजेचा प्रकाश, नक्षत्र दर्शन, चंद्र, सूर्य व अग्नीचे दर्शन, ज्योतीचे दर्शन किंवा कोट्यवधी सूर्यांच्या ज्योतीप्रमाणे उग्रदर्शन व अनुग्रहसूचक महाज्योतीचे दर्शन होते. या ज्योतींचे रंगही नानाप्रकारचे असतात. याशिवाय प्रज्वलित अग्निशिखा, दीपशिखा, बिंदू, काच, स्फटिकमणी, काजवा यांच्याप्रमाणे लहान मोठ्या रूपरंगाचे दर्शन होते. कधीकधी ताऱ्यांनी भरलेले आकाश, नीलाकाश, धूर, अंधकार आणि अत्यंत घोर अशा अंधकाराचे दर्शन होते. साधन करता करता साधकाचे मन जितके सूक्ष्म विषयाचे ग्रहण करण्यास समर्थ होते तितकी तितकी सूक्ष्मातिसूक्ष्म दर्शने साधकाला होतात.

ज्ञान, योग, भक्ती इत्यादि मार्गाने तपस्या करता करता जेव्हा श्रीसद्गुरूंची प्राप्ती होऊन कुंडलिनी शक्ती जागृत होते व ईश्वर-परायणतेमुळे चित्त शुद्ध होते तेव्हा साधकाला कोणत्याही प्रकारचे आवाहन न करता वर वर्णन केलेल्या दर्शनांशिवाय सिद्धपुरुषांचे दर्शन, आपल्या श्रीगुरुदेवांचे दर्शन, ब्रह्मा, विष्णू, महेश किंवा आपल्या इष्टदेवतेचे दर्शन होते. गंधर्व, अप्सरा, विद्याधर, नाग, यज्ञ, राक्षस, किन्नर आदि देवतांचीही दर्शने साधनात होतात. सात्त्विकभावापन्न साधकाला विशेषेकरून संन्यासी, ब्रह्मचारी, शिवलिंग अथवा अन्योन्य देवतांच्या प्रतिमेचे दर्शन ध्यानाच्या वेळी अमनस्क अवस्थेत, जागृतीत किंवा स्वप्नातही होते. विशेष करून साकार उपासक व भक्तिप्रधान साधकांना ही दर्शने अधिकतर प्रमाणात होतात.

जे साधक कामनापूर्वक देवतेच्या चैतन्यमंत्राचा जप किंवा श्रीगुरुप्रदत्त शक्तीची आराधना करतात त्यांना त्यांच्या कामनासिद्धिसूचक अशी वरील दर्शनांप्रमाणेच दर्शने होतात. बालक, कुमारी, छत्र, रथ, दीप, प्रासाद, देवमंदिर, राजगृह, पद्म, नदी, हत्ती, घोडा, बैल, समुद्र, फलभारयुक्त वृक्ष, पर्वत, पेटलेला अग्नी, कच्चे मांस, ग्रह, नक्षत्र, चंद्र, रत्न, सूर्य, अलंकार, सिंहासन, विमान, ध्वज, राज्याभिषेक, सफेत चंदन, शुभ्र वस्त्र, धान्य, कुंकू, मध, पांढरी मोहरी, राजा व स्त्री समुदाय या सर्व मंगलदायक वस्तू स्वप्नात किंवा ध्यानाच्या वेळी स्वप्नासारख्या अवस्थेमध्ये साधकाला दिसतात. ही सर्व दर्शने शुभसूचक व प्रगतीदर्शक असतात.

याशिवाय नवे पात्र, खीर, फळ, शिजविलेले अन्न, दही, दूध, वाद्ययंत्र, सुंदर स्त्रिया, ब्राह्मण, गायी, हंस, कबूतर, नीलकंठ, मोर, मुंगूस, कोल्हा, हरिण, बेडूक, फुले, सद्वाक्य, अंजन, पाण्याने भरलेला कलश, आरसा, मासे व मद्य भक्षण, शव, रडणे, ऊस, वेदध्वनी, वाहन, चाबूक, अंकुश, मंगलगीत, सैनिक, प्रिय व्यक्तीचे दर्शन, सूर्योदय, चंद्रग्रहण, सूर्यग्रहण, मोठमोठी घरे, श्रीमंतांचे वाडे, राजमहाल इत्यादि स्वप्नात दिसतात. त्याचप्रमाणे देवमंदिरात जाण्याचे, हत्तीवर, घोड्यावर किंवा बैलावर बसल्याचे, पर्वतावर चढण्याचे व अग्नीत प्रवेश करण्याचे स्वप्न साधकाला दिसते. याशिवाय कितीतरी भयानक स्वप्नेही साधकाला पडतात. पुष्कळ स्त्रियांसह भोजन करणे, पक्व मांस खाणे, शरीराला कीड लागल्याचे पाहणे, विष्ठेचा लेप करणे, रक्ताने स्नान करणे, रक्तपात किंवा मद्यपान करणे, कच्चे मांस खाणे इत्यादि प्रकारची भयंकर स्वप्नेही पडतात. ही सर्व स्वप्ने सिद्धी व प्रगतीची सूचक असतात. साधकाने अशी किंवा अन्य कोणतीही भयानक स्वप्ने पडली तरी ती सर्व मंगलदायकच समजली पाहिजेत.

याप्रमाणे कुंडलिनी शक्तीच्या जागृतीने साधकाच्या अंतरामध्ये नानातऱ्हेच्या क्रिया सुरू होतात. तेव्हा त्याला स्वप्नामध्ये किंवा साधनामध्ये देवांच्या प्रतिमा, देवतांचे उत्सव, संकीर्तन, शंख, तास व घंटा इत्यादि

वाद्यांचे नाद, उत्तम कथांचे श्रवण, अत्यंत रमणीय, मनोहर व दिव्य स्थानांचे दर्शन होते. आपण आकाशात उडत आहोत किंवा शून्यात गमन करीत आहोत असे साधकाला वाटते. कुंडलिनी शक्तीच्या जागृतीमुळे आतील द्वार मोकळे झाल्यामुळे मन ज्या ज्या वेळी अंतर्मुख होते व अंतरजगात प्रवेश करते त्या त्या वेळी चालताना, फिरताना, बसताना, क्रिया करताना अथवा निद्रेत आपापल्या संस्काराप्रमाणे विशेषत: श्रद्धाभक्तियुक्त साधकांना बहुत करून अशी दर्शने होतात व अनुभव येतात.

**दिव्यस्पर्शज्ञान :-**

कुंडलिनीच्या दिव्य स्पर्शाचा अनुभव साधकाला येऊन त्याच्या ठिकाणी ज्ञानाचा प्रकाश उत्पन्न होऊन राजयोग आपोआप कसा साधला जातो याचे वर्णन **"रुद्रयामल"** तंत्राच्या १५ व्या पटलामध्ये पुढीलप्रमाणे केले आहे.

**अनन्तज्ञाननिलयां यां भजन्ति मुमुक्षवः।**
**सुप्ता सर्पोपमा मौला पाति साधकमीश्वरी।।१।।**
**चैतन्या कुण्डलिशक्तिर्वायवी बलतेजसा।**
**चैतन्या सिद्धिहेतुस्था ज्ञानमात्रं ददाति सा।**
**ज्ञानमात्रेण मोक्षः स्याद्वायवी ज्ञानमाश्रयेत्।।२।।**

मूलाधार हे स्थान अनंत अशा ज्ञानाचे घर आहे. त्या ठिकाणी सुप्त नागिणीप्रमाणे वास करणारी कुंडलिनी शक्ती साधकाचे पालन व रक्षण करते. त्यासाठी मोक्षेच्छू साधक नेहमी तिचेच भजन करतात. ती वायवी शक्ती कुंडलिनी, श्रीसद्गुरूंच्या अहेतुक कृपेने जागृत होते. ही शक्ती जागृत झाली की, क्रियाशील होऊन सिद्धीला म्हणजे मोक्षाला कारण होते. इतकेच नव्हे; तर साधकांना ही शक्ती आनंदस्वरूप आत्मज्ञानाचे दान करते. कारण केवळ ब्रह्मज्ञानानेच मोक्ष होतो म्हणून साधकांनी वायवी शक्ती कुंडलिनीपासून उद्भूत होणाऱ्या ज्ञानाचा आश्रय करावा.

**"योगचूडामणी उपनिषदात"** आपल्या दिव्यस्पर्शाने कुंडलिनी शक्ती

ज्ञानदान करून राजयोग साधन कसे करवून घेते हे सांगताना असे म्हटले आहे की, "या कुंडलिनी शक्तीचा आश्रय केल्यामुळे ती जागृत शक्ती अग्नी, मन आणि प्राणासहित सुषुम्णेत प्रवेश करून वर चढू लागते. ज्याप्रमाणे सुई वस्त्राला स्पर्श व वेध करीत जाते तशी कुंडलिनी शक्ती मूलाधारापासून सुषुम्णेतील चक्रांचा वेध करीत ब्रह्मरंध्रात जाते. त्यावेळी साधकाला तिच्या दिव्य स्पर्शाचा अनुभव येतो. ज्यावेळी जागृत कुंडलिनी शक्ती शरीरामध्ये अशा प्रकारे क्रिया करते त्यावेळी भुंगा जसा कमलावर मृदुमृदू विचरण करतो तसाच मृदू व कोमल अशा महासुखकर दिव्यस्पर्शाचा साधकाला अनुभव येतो. हा स्पर्श आवश्यकतेनुसार कोमल अथवा कठोरही असतो.

**दिव्यरस :-**

"**योगशिखोपनिषदात**" व "**धर्मसंहितेत**" दिव्यरसाची प्राप्ती राजयोगात कशी होते हे सांगताना असे म्हटले आहे की, "ज्यावेळी महायोगाचे साधन करणाऱ्या साधकाला कुंडलिनी शक्तीच्या प्रेरणेने केवलकुंभक होऊन प्राण स्थिर होऊ लागतो त्यावेळी नाना प्रकारचे नाद उत्पन्न होऊन मस्तकातील चंद्रमंडळाकडून अमृतस्राव होऊ लागतो. आत्मशक्तीच्या उद्बोधनानंतर खेचरी क्रिया झाली की, साधकाची जीभ उलट होऊन टाळूत जाऊ लागते व वर खेचली जाते. त्यावेळी गळ्याच्या आणखी क्रिया अशा होतात की, त्यावेळी ही जीभ पडजिभेला वर करून आत जाते. त्यावेळी अकस्मात् सुधारसाचे पान घडते. अथवा हीच जीभ जेव्हा आभ्यंतरिक क्रियाशक्तीच्या योगाने टाळूला घट्ट चिकटून बसते तेव्हा सहस्रारातील शीतल चंद्रामृत पाझरते. त्याच्या सेवनाने साधक नखशिखांत शांत होतो. अशा प्रकारे नित्य अभ्यासाने अमृतपान करीत राहिल्याने साधक अमर होतो.

साधक ज्या दिव्य रसाचे सेवन साधनात करतो त्याचे किती प्रकार असतात ते "**घेरंड**" व "**याज्ञवल्क्यसंहितेत**" पुढीलप्रमाणे सांगितलेले आहेत. या रसाचा स्वाद प्रथम खारट, क्षारयुक्त, कडू, तिखट व कषाय असा असतो. मध्ये तो लोणी, तूप, दूध, दही व ताक यांच्याप्रमाणे

असतो. शेवटी मध व द्राक्षाच्या रसाप्रमाणे अमृतपान होते. सिद्धमहायोगाचे साधन सतत करीत राहिल्याने साधकाचे मन आज्ञाचक्रामध्ये लय पावून ज्यावेळी भ्रूमध्यामध्ये आत्मदर्शन होते त्यावेळी जिभेच्या मुळाशी अमृतस्राव होऊन त्याचे सेवन साधक करतो.

या दिव्यरसपानाचे गुण व महिमा सांगताना **"योगसागर"** ग्रंथामध्ये असे म्हटले आहे की, "निरंतर साधनाभ्यासाने जेव्हा वर वर्णन केलेल्या दिव्य रसाच्या भिन्न भिन्न रसांचे पान साधकाला घडते तेव्हा लवणादि क्षाररसाने त्याच्या रोगांचा नाश होतो. आम्लरसाने शरीराच्या कातडीची शिथिलता नाहीशी होऊन अकाली केस पिकत नाहीत. मधुररसाच्या प्राशनाने शास्त्रज्ञानाचा प्रकाश साधकाच्या ठिकाणी उत्पन्न होतो. ज्यावेळी तुपाच्या स्वादाचे रसपान होते त्यावेळी साधकाला अमरत्व म्हणजे मोक्षप्राप्ती होते.

दिव्यरसाप्रमाणे दिव्य वासही साधकाला साधनात येतात. हे वास विविध प्रकारचे असतात. त्यात साधकाचे मन लीन झाले की, अगदी निःसंदेहपणे स्तंभित होते.

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या पाच सांसारिक प्रबल विषयांमुळे मनुष्याचे मन बलात्काराने बंधनात पडते. या विषयामध्ये आसक्त झाल्याने मनुष्याचे पतन व अधोगमन होऊन सर्वनाश होतो. हे विषय मनुष्याचे मन खेचून घेऊन त्याला नाना तऱ्हेच्या कामभोगवासनेत गुंतवून हतप्रभ करून दुःखी करतात. परंतु ज्यावेळी श्रीसद्गुरुकृपेने शक्तिपातयोगाचे साधन सुरू होते त्यावेळी साधक या पाचही विषयांचा दिव्य अनुभव अंतरामध्येच घेतो. साधकाला स्वतःच्या शरीरातच उपरोक्त पाच विषयांचा अनुभव येत असल्याने त्याचे कधीही पतन न होता उलट ऊर्ध्वगमनच होते. यासाठी श्रीमहेश्वरांनी अनुप्रणित केलेल्या सिद्धमहायोगाच्या आश्रयाने मन अंतर्मुख करून साधक स्वतःमध्येच सर्व विषयांचा उपभोग घेत सुखी होतात.

★★★★★

# - आधार बारावा -

## ★शक्तिपातयोगाची फलनिष्पत्ती★

**१) मनोरूप पट फाटून जातो**
**२) त्रिपुटीचा भेदव्यवहार नाहीसा होतो**
**३) महाभूतांची जवनिका फिटते**
**४) ब्रह्मप्राप्ती**
**५) साम्यावस्थेची प्राप्ती**
**६) जन्ममरणाची निमे कथा**
**७) अविद्येचा नाश**
**८) हृदयग्रंथींचा भेद**
**९) कैवल्यप्राप्ती**

येथपर्यंत आपण शक्तिपातयोगाच्या साधनाचे यावच्छक्य संक्षेपाने विवेचन केले. त्यावरूनच या साधनाचे फल ब्रह्मप्राप्ती आहे याची जाणीव साधकाच्या अंत:करणात बिंबली आहे हे निश्चित आहे. ही ब्रह्मप्राप्ती होते म्हणजे नेमके काय होते याचे विवेचन आपण थोडक्यात पाहू.

**मनोरूप पट फाटून जातो :-**

शक्तिपातयोगाचे साधन करताना मनोरूप पट फाटून साधक सशरीर ब्रह्म कसे होतात हे सांगताना श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज **"श्रीज्ञानेश्वरीच्या"** पाचव्या अध्यायात असे म्हणतात की, "अर्जुना! ज्यावेळेस नियमित साधन साधकाकडून होईल त्यावेळी प्राणांचा निरोध आपोआप होऊन चिदाकाशात मनाचा लय होतो. त्यावेळी साधकाच्या नाना प्रकारच्या वासनांची विवंचना आपोआप थांबते. ज्या मनोरूप पटावर हे संसाररूपी चित्र उमटत असते तो मनोरूपी पट या साधनाने फाटून जातो. ज्याप्रमाणे सरोवर आटल्यावर त्यातील प्रतिबिंब नाहीसे होते त्याप्रमाणे मनोरूप सरोवरातील संसाराचे प्रतिबिंबही नाहीसे होते. अशा प्रकारे साधन करताना जेव्हा मनच नाहीसे होते

तेव्हा अहंकारही विरघळून जातो. अशा प्रकारे ब्रह्मस्वरूपाचा अनुभव घेणारा पुरुष शरीरधारी असतानाच ब्रह्म होतो." **(श्रीज्ञानेश्वरी ५.१५६ ते ५.१६०)**

**त्रिपुटीचा भेदव्यवहार नाहीसा होतो :-**

"जो साधक श्रीसद्गुरूंनी सांगितलेले साधन नियमित करतो त्याचे मन भ्रांतिरहित होते. मग ते आत्मस्वरूपाला सोडून जात नाही. जोपर्यंत समुद्रात मीठ पडत नाही तोपर्यंत ते समुद्रापासून वेगळे व लहान दिसते. परंतु ते जेव्हा समुद्रात मिसळते तेव्हा समुद्राएवढेच व्यापक दिसते. त्याचप्रमाणे ज्याने नित्य साधन करून आपले मन संकल्परहित करून घेतलेले असते त्याचे मनच चैतन्यस्वरूप झालेले असते. त्यामुळे बाह्यतः दिसण्यात साधक एकदेशी व परिच्छिन्न दिसत असला तरी त्याने त्रिभुवन व्यापलेले असते. त्याच्या बाबतीत "मी एक कर्ता," "हे एक कर्म" व "अमुक एक कार्य" असा हा त्रिपुटीचा भेदव्यवहार स्वभावतःच नाहीसा होऊन बंद पडतो. लोकदृष्ट्या त्याने जरी सर्व कर्मे केली तरी तो अकर्ताच असतो." **(श्रीज्ञानेश्वरी ५.३४ ते ३७)**

**महाभूतांची जवनिका फिटते :-**

**"पुरुषार्थशून्यानां गुणानां प्रतिप्रसवः कैवल्यं स्वरूपप्रतिष्ठा वा चितिशक्तिरिति" (महर्षी श्रीपंतजली योगसूत्र, कैवल्यपाद - ४.३४)**

ज्यावेळी शक्ती जागृत होऊन प्रतिप्रसव क्रमाला सुरुवात होते त्यावेळी पिंडब्रह्मांडाची संहारणी होते. उभारणीच्या वेळी चैतन्यशक्तीमुळे व्यक्त झालेले गुण आपल्या कारण महत्-तत्त्वासहित अव्यक्तामध्ये विलीन होतात. म्हणजे चैतन्यशक्ती आपल्या मूळ स्वरूपामध्ये प्रतिष्ठित होते. हेच कैवल्य होय. अशी **"पातंजल-योगसूत्रातील"** कैवल्यपादामध्ये कैवल्याची व्याख्या केली आहे. शक्तिपातयोगसाधनेने या कैवल्यरूप-फलाची निष्पत्ती होते व साधक कृतकृत्य होतो. श्रीसंत-ज्ञानेश्वरमहाराजांनी मोठ्या रसाळ शब्दांमध्ये साधकाला प्राप्त होणाऱ्या या स्थितीचे पुढीलप्रमाणे **"श्रीज्ञानेश्वरीत"** वर्णन केले आहे.

**मग ब्रह्मरंध्रीं स्थिरावोनी। सोऽहंभावाच्या बाह्या पसरुनी।**
**परमात्मलिंगा धांवोनी। आंगा घडे।।६.३०५।।**
**तंव महाभूतांची जवनिका फिटे। मग दोहींसी होय झटे।**
**तेथ गगनासकट आटे। समरसीं तिये।।३०६।।**
**पै मेघाचेनि मुखीं निवडला। समुद्र कां वोघीं पडिला।**
**तो मागुता जैसा आला। आपणपयां।।३०७।।**
**तेवीं पिंडाचेनि मिषें। पदीं पद प्रवेशे।**
**तें एकत्व होय तैसें। पंडुकुमरा।।३०८।।**

ज्यावेळी चैतन्यस्वरूप कुंडलिनी शक्ती मस्तकाच्या पोकळीत सहस्रदलकमलातील ब्रह्मरंध्रात स्थिर होऊन सोऽहं या भावनेच्या बाह्या पसरून परब्रह्मलिंगाला मिठी मारून त्याच्या स्वरूपाशी ऐक्य पावते तेव्हा त्या पंचमहाभूतांचा पडदा नाहीसा होतो व श्रीशिव आणि श्रीशक्ती यांचे ऐक्य होते. ज्याप्रमाणे समुद्राचे पाणी मेघांच्याद्वारा समुद्रापासून वेगळे होऊन पुन्हा तेच पाणी मेघातून जमिनीवर पडून नदीच्या ओघात सापडून समुद्राला मिळते त्याप्रमाणे देहोपाधीच्या निमित्ताने वेगळा भासणारा जीवात्मा जागृत चैतन्यशक्तीच्या साहाय्याने परब्रह्मात प्रविष्ट होतो. हे एकत्वही वरील समुद्राच्या पाण्याप्रमाणेच होय. याप्रमाणेच **"ब्रह्मसूत्रामध्येही"** अध्याय ४ सूत्र ४ मध्ये **"अविभागेन दृष्टत्वात्"** असे सांगून उपरोक्त भाव व्यक्त केला आहे. त्यावर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्य असे म्हणतात की, "जीव हा मुक्त होऊन परमात्म्याशी अविभक्त राहतो; कारण श्रुतीमध्ये तसे दृष्टीस पडते. "ते तू आहेस," "मी ब्रह्म आहे," तेथे तो दुसरे काही पाहत नाही, की जे तो त्या परमात्म्याहून निराळे आणि विभक्त असे पाहील, इत्यादि श्रुती जीवात्मा व परमात्मा यांचे ऐक्यच दाखवितात. ज्याप्रमाणे हे गौतमा! शुद्ध उदक शुद्ध उदकामध्ये मिसळले असता तसेच होते त्याचप्रमाणे ज्ञानी अशा मुनीचा आत्माही तसाच होतो असे **"कठोपनिषदात"** म्हटले आहे."

**"चितितन्मात्रेण तदात्मकत्वादित्यौडुलोमिः।। ब्रह्मसूत्र ४.४.६।।**

म्हणजे जीव हा केवळ चैतन्यस्वरूपाने व्यक्त होतो; कारण ते त्याचा आत्मा आहे असे औडुलोमी म्हणतो, असे **"ब्रह्मसूत्रात"** श्रीव्यासांनी स्पष्ट केले आहे. त्यावर भाष्य करताना आचार्य असे म्हणतात की, "ज्यापासून सकल द्वैत निरस्त झाले आहे, जे प्रसन्न आहे आणि जे कोणत्याही शब्दाने सांगता येत नाही" अशा चैतन्यरूपाने जीव हा व्यक्त होतो.

**ब्रह्मप्राप्ती :-**

शक्तिपातयोगसाधनाने ब्रह्मप्राप्ती कशी होते हे सांगताना श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज **"श्रीज्ञानेश्वरीत"** असे म्हणतात की -

**आम्हीं साधन हें जें सांगितलें। तेंचि शरीरीं जिहीं केलें।**
**ते आमुचेनि पाडें आले। निर्वाळलेया।।६.३२६।।**
**परब्रह्माचेनि रसें। देहाकृतीचिये नि मुसें।**
**वोतींव जाहले तैसे। दिसती आंगें।।३२७।।**
**जरी हे प्रतीती हन अंतरीं फांके। तरी विश्वचि हें अवघे झांके।**
**तंव अर्जुन म्हणे निकें। साचचि जी हें।।३२८।।**
**इये अभ्यासीं जे दृढ होती। ते भरंवसेनि ब्रह्मत्वा येती।।३३०।।**

साधनाने ब्रह्मप्राप्ती होते याचा निर्वाळा या ओव्यातून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी दिला आहे.

**साम्यावस्थेची प्राप्ती :-**

शक्तिपातयोगसाधनामुळे साधकाला एक अपूर्व अशी साम्यावस्थेची प्राप्ती होते. श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज **"श्रीज्ञानेश्वरीत"** असे म्हणतात की, "साधक साधन करून सिद्ध म्हणजे ज्ञानी होतो. तो ज्ञानी झाला म्हणजे सदोदित आपल्यासारखेच आत्मरूपाने सर्व चराचरात्मक जग पाहतो. सुखदु:खांचे विकार व शुभाशुभ कर्मे ही दोन आहेत असे आपल्या मनोवृत्तीने तो समजतच नाही. हे समविषम पदार्थ आणि ज्या ज्या काही चित्रविचित्र वस्तू आहेत त्या त्या सर्व आपले अवयवच आहेत असे तो मानतो. हे संपूर्ण त्रैलोक्यच आपण आहोत असे त्याला सहजच अनुभवाला येते. त्यालाही एक शरीर असते, हे

खरे असले; तरी तो सुखदु:खे भोगतो, असे लोक व्यवहारात म्हणतात. तरीपण आम्हाला तर अशीच अनुभूती आहे की तो "परब्रह्मच आहे." म्हणून हे अर्जुना! आपल्या ठिकाणी सर्व विश्व पाहावे व आपण स्वत: विश्वरूप व्हावे अशा समदृष्टी प्राप्त करून देणाऱ्या शक्तिपातयोगसाधनेचाच साधकाने अभ्यास केला पाहिजे. या मार्गाने प्राप्त होणाऱ्या समदृष्टीच्या लाभापेक्षा या जगात दुसरा मोठा लाभ नाही." **(श्रीज्ञानेश्वरी ६.४०४ ते ४१०)**

"साधक शेकडोशे जन्म भक्तीची वाटचाल करतो. विषयसुखाची आशा तो कधीही धरीत नाही. त्याला फलाचीही इच्छा नसते. असे असले तरी अज्ञान संपत नाही. परंतु ज्यावेळी कर्मक्षय होऊन ज्ञानाची पहाट होण्याची वेळ येते तेव्हा त्याला श्रीसद्गुरूंची गाठ पडून शक्तिपातयोगाचे साधन मिळते व ज्ञानरूपी ब्रह्मात्मैक्यदृष्टीचे ऐश्वर्य त्याच्या दृष्टीस पडते. त्यावेळी तो जिकडे पाहतो तिकडे त्याला मीच एक आहे असा अनुभव येतो. इतकेच नव्हे; तर तो स्वस्थ बसला तरी या अनुभवात फरक पडत नाही. त्याला सर्व ठिकाणी परमेश्वरावाचून दुसरे काहीच दिसत नाही. ज्याप्रमाणे पाण्याच्या डोहात बुडलेल्या घटाच्या आत व बाहेर पाणीच असते त्याप्रमाणे तो माझ्या आत असतो व मी त्याच्या अंतर्बाह्य असतो. शेवटी हे संपूर्ण विश्व श्रीवासुदेवरूपच आहे असा अनुभूतिरूप रसाचा भाव त्याच्या अंत:करणात निश्चित होतो." **(श्रीज्ञानेश्वरी ७.१२९ ते १३६)**

**जन्ममरणाची निमे कथा :-**

"जो साधक जन्मभर श्रीसद्गुरूंनी दिलेले साधन करतो त्याच्या जन्ममरणाच्या फेऱ्याची कथा सदाचीच संपते. या साधनाच्या प्रयत्नामुळेच साधकाला समग्र परब्रह्माच्या प्राप्तीचे फल मिळते. हे फळ पिकले असता त्यातून पूर्णतारूपी रस गळतो. आपण कृतकृत्य झालो आहोत या आनंदाने साधकाला धन्यता वाटते. त्याची आत्मज्ञानाची तीव्रतर इच्छा व हौस पूर्ण होते. कर्माचे सर्व प्रयोजन संपते. त्याचे मन नाहीसे होते. त्यामुळे भेदरूप दैत्याचे अस्तित्वच

संपते. **(श्रीज्ञानेश्वरी ७.१७५ ते १८९)**

**अविद्येचा नाश :-**

चिच्छक्ती जागृत झाल्यावर अविद्येचा नाश होऊन मनुष्य जन्माचे ध्येय जे मोक्ष तो प्राप्त होतो. श्रीसंतज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, "शक्तिपातस्वरूप असंगशास्त्राने जेव्हा साधकाची अंत:शक्ती जागृत होते तेव्हा अविद्येचा नाश होऊन साधक ब्रह्मरूप होतो. या साधनामुळे वर्षाऋतूच्या अखेरीस ज्याप्रमाणे ढग आकाशाला टाकून सोडून जातात त्याप्रमाणे मनाला मोह व अभिमान आपण स्वत: होऊन सोडून जातात. निर्धन व निर्दय अशा मनुष्यास ज्याप्रमाणे त्याचे आप्त व नातेवाईक कंटाळून सोडून जातात त्याप्रमाणे साधक विकारांच्या कचाट्यात सापडत नाही. केळीला केळी आल्यावर ती जशी उन्मळून पडते तशा प्रबल, नि:संदेह व यथार्थ आत्मस्वरूपाच्या लाभामुळे त्या साधकाच्या क्रिया आपोआप हळूहळू सुटत जाऊन बंद पडू लागतात. वृक्षाला आग लागली असे पाहून त्यावर बसणारे पक्षी ज्याप्रमाणे तो वृक्ष सोडून जिकडे रस्ता सापडेल तिकडे पळून जातात त्याप्रमाणे साधकाच्या बाबतीत सर्व विकल्प आपण होऊन सोडून जातात. त्याची भेदबुद्धी नाहीशी होते. सूर्योदय झाल्यावर रात्र जशी आपोआप नाहीशी होते तसा आत्मस्वरूपाचा लाभ झाल्यावर साधकाची देहाहंता व देहविषयक अभिमान अविद्येसह पळून जातो."

**हृदयग्रंथींचा भेद :-**

"**कठोपनिषदाच्या**" अध्याय दोन व तीन मध्ये यमाने नचिकेताला मृत्यूला पार करण्याचा मार्ग सांगताना सुषुम्णेचा आश्रय करणाराच म्हणजे या शक्तिपातयोगाचा स्वीकार करणाऱ्याच्याच हृदयग्रंथींचा भेद होऊन तो अमृतस्वरूप होतो म्हणून सांगितले आहे. ही प्राप्ती कशी असते हे सांगताना ऋषी असे म्हणतात की,-

**यदा पञ्चावतिष्ठन्ते ज्ञानानि मनसा सह।**
**बुद्धिश्च न विचेष्टति तामाहु: परमां गतिम्।।२-३-१०।।**
**तां योगमिति मन्यन्ते स्थिरामिन्द्रियधारणाम्।**

**अप्रमत्तस्तदा भवति योगो हि प्रभवाप्ययौ।।११।।**
**यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः।**
**अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते।।१४।।**
**यदा सर्वे प्रभिद्यन्ते हृदयस्येह ग्रन्थयः।**
**अथ मर्त्योऽमृतो भवत्येतावद्ध्यनुशासनम्।।१५।।**

शक्तिपातयोगाचे साधन नियमित करणाऱ्या साधकाची ज्यावेळी पाचही इंद्रिये मनासहित आत्म्यामध्ये स्थिर होतात आणि बुद्धी आपल्या व्यापारातून निवृत्त होते तेव्हा त्याला अत्यंत श्रेष्ठ गती म्हणतात. अशा प्रकारच्या स्थिर इंद्रियधारणेलाच शक्तिपातयोग असे म्हणतात. जेव्हा इंद्रियांची स्थिर धारणा होते तेव्हा साधक प्रमादरहित होतो. या साधनाच्या अभ्यासाने जेव्हा साधकाच्या हृदयात असणाऱ्या सर्व वासना संपूर्णपणे नाहीशा होतात तेव्हा तो मृत्युरहित होतो व याच देही ब्रह्मरूप होतो. सर्व वेदांचे हेच सार व हाच उपदेश आहे की, ज्यावेळी या शक्तिपातयोगसाधनेने हृदयातील संपूर्ण ग्रंथी छिन्नविच्छिन्न होऊन तुटून जातात व बुद्धीची सर्व बंधने नाहीशी होतात तेव्हा मनुष्य मृत्युरहित म्हणजे अमर होतो.

**"योगकुंडलिनी उपनिषदाच्या"** पहिल्या अध्यायामध्ये ब्रह्म, विष्णू व रुद्र या तीनही ग्रंथींचा भेद होऊन साधकाला परावस्था कशी प्राप्त होते हे सांगताना असे म्हटले आहे की,-

**ज्वलनाघातपवनाघातोरुन्निद्रितोऽहिराट्।**
**ब्रह्मग्रन्थिं ततो भित्त्वा विष्णुग्रन्थिं भिनत्त्यतः।।१.८५।।**
**रुद्रग्रन्थिं च भित्त्वैव कमलानि भिनत्ति षट्।**
**सहस्त्रकमले शक्तिः शिवेन सह मोदते।।८६।।**
**सैवावस्था परा ज्ञेया सैव निर्वृत्तिकारणा।।८७।।**

ज्यावेळी शक्तिपात होऊन अभ्यंतरस्थ अग्नीच्या द्वारा प्राणवायू तप्त होऊन त्याच्या क्रियेमुळे सर्पाकृती कुलकुंडलिनी जागृत होते तेव्हा ती शक्ती ब्रह्म, विष्णू व रुद्र या तीन ग्रंथींचा आणि सहाही चक्रांचा वेध करीत करीत सहस्रारातील परम श्रीशिवाशी एकरूप व

एकरस होते. तेव्हा साधकाला निरतिशय आनंद प्राप्त होतो. हीच साधनाची परावस्था होय. या अवस्थेमध्ये जो आनंद प्राप्त होतो त्याचे वर्णन शब्दात करता येणे शक्य नाही. असा हा आनंद स्वानुभवानेच जाणता येतो.

**कैवल्यप्राप्ती :-**

शक्तिपातयोगाने साधकाला समाधिप्राप्ती व कैवल्यप्राप्ती कशी होते हे सांगताना **"एकनाथी भागवतात"** श्रीनाथ असे म्हणतात की, "मनाची तळमळ नाहीशी होणे हीच खरी समाधी होय. वसिष्ठादि प्राचीन अतिसमर्थज्ञानी चालते बोलते समाधिस्थ होते. देवर्षी श्रीनारदांचा समाधिबोध कधी लीलेनेही भंग पावला नाही. स्वस्वरूपाला पाहून जो मूर्च्छित झाला तो आपला आपणच तरतो. असे महात्मे स्वतः तरून लोकांचा उद्धार करतात. श्रीशुक व श्रीवामदेव यांनीही अशा प्रकारचा बोध प्रगट केला आहे."

"या शक्तिपाताची परिणिती इंद्रियांच्या पलीकडे असलेल्या आत्यंतिक सुखात होते. सुखातच साधक राहतो व तेथून तो कधीही बाहेर येत नाही. स्वस्वरूपाच्या ओळखीबरोबर साधक सुखाच्या साम्राज्यावर आरूढ होतो. शेवटी त्या सुखाशी समरस होऊन विरून जातो. या समरस सुखस्थितीपेक्षा दुसरे काहीही श्रेष्ठ नाही. इंद्रिये या स्थितीला कधीही जाणत नाहीत. या स्थितीपेक्षा इतर कोणताही सुखलाभ साधकाला श्रेष्ठ वाटत नाही. या सुखात निमग्न राहिल्यामुळे अत्यंत भयानक दुःखातही त्याची मनःस्थिती अविचल राहते. मेरू पर्वतापेक्षा मोठ्या अशा दुःखाच्या डोंगराखाली साधक दडपला गेला तरी त्याचे चित्त दुःखाने दडपत नाही."

"शक्तिपातयोगाने ज्ञानबोध झाला की, साधकाला सर्व कर्मे करीत असतानाही देहाचे देहपण स्फुरत नाही. हेच समाधीचे मुख्य लक्षण आहे. परमेश्वरस्वरूपाला साधक प्राप्त होऊन देहभान विसरतो व पूर्ण स्वानंदाचा अनुभव घेतो. सुखानेच त्याची सुखस्वरूपता होते. मग हा ज्ञानी ब्रह्मरस पिऊन परमानंदाने तृप्त होतो."

“केवळ ताठरलेल्या तटस्थ वृत्तीला जर कोणी समाधी समजत असतील तर त्या ज्ञात्यांच्या बुद्धीला भ्रम झाला आहे असे म्हणावे लागेल; कारण ती खरोखर समाधी नसून त्या स्थितीत वृत्ती मूर्च्छित असते. निरंतर निरभिमानालाच अखंड समाधी असे म्हणतात. पण काष्ठासारखे होऊन राहणे ही खरी समाधी नव्हे. जे अशा काष्ठासारख्या तटस्थपणाला समाधी मानतात त्यांना खऱ्या स्वरूपाचे निश्चित ज्ञान नसते. त्यांचे ते केवळ अनुमानाचे बोलणे असते. जोपर्यंत मनात वासना शिल्लक आहे तोपर्यंत समाधी कशी प्राप्त होणार? सगळ्या संकल्पांचा शेवट होणे यालाच निर्विकल्प समाधी असे म्हणतात. सर्व शास्त्रांनी हेच प्रतिपादन केले आहे. हीच खरी समाधी होय. शेळीजवळ साप आला की, तिच्याही वृत्ती भीतीने जागच्या जागी थिजून तटस्थ होतात. पण तशी निश्चेष्ट स्थिती म्हणजे समाधी नव्हे. अकस्मात् व अनपेक्षित एखादे दिव्यस्वरूप दृष्टीस पडताच वृत्ती आश्चर्याने थक्क होते व भान हरपून शरीर तटस्थ होते. पण ती एक वृत्ती आहे. समाधी नव्हे. प्रथमच आत्मस्वरूप दृष्टीस पडताच अनावर झालेला विस्मय दाबून टाकून निश्चल स्थित होणे हीच खरी समाधी होय. जेथे कल्पना पूर्णपणे विरून जाते तेथे विस्मय कोठून स्फुरणार? सूक्ष्म वासना स्थिर झाल्या की, विस्मय आपणच नाहीसा होतो. तेथे बाध्यबाधकता संपते व अहं ही सर्व अविद्या सुटते त्याला सहजसमाधी म्हणतात.” अशी समाधी किंवा कैवल्य शक्तिपातयोगाच्या साधनाने साधकाला प्राप्त होऊन शेवटी तो अनादि जन्ममरणपरंपरेतून सुटून मूलतः संकोचाने स्वतःच प्राप्त केलेल्या जीवदशेचा त्याग करून श्रीशिवशक्तीच्या सामरस्याने अखंड आनंदात निमग्न होतो. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या स्थितीचे वर्णन करताना “**श्रीज्ञानेश्वरीच्या**” ६व्या अध्यायात असे म्हटले आहे की -

**म्हणोनि आसनाचिया गाढिका।**
**जो आम्हीं अभ्यासु सांगितला निका।**
**तेणें होईल तरी हो कां। निरोधु ययां।।६.३६४।।**

**येऱ्हवीं तरी येणें योगें। जैं इंद्रिया विंदाण लागे।**
**तैं चित्त भेटों रिगे। आपणपेयां।।३६५।।**
**परतोनि पाठिमोरें ठाके। आणि आपणियातें आपण देखे।**
**देखतखेंवो वोळखे। म्हणे तत्त्व हें मी।।३६६।।**
**तिये वोळखीचिसरिसें। सुखाचिया साम्राज्यीं बैसे।**
**मग आपणपां समरसें। विरोनि जाय।।३६७।।**
**जयापरतें आणिक नाहीं। जयातें इंद्रिये नेणति कहीं।**
**तें आपणचि आपुल्या ठायीं। होऊनि ठाके।।३६८।।**

येथे शक्तिपातयोगरहस्य अर्थात् सिद्धयोगमहाशास्त्र हा ग्रंथ श्रीगुरुमाउलीच्या कृपेने पूर्ण झाला. त्यांच्या चरणी माथा ठेवून थांबतो.



# ★दैवी शक्तीचे संक्रमण★

**(परमपूजनीय प्रातःस्मरणीय योगिराज सद्गुरू श्रीसंत वामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांच्या "Transmission of Spiritual Power" या मूळ इंग्रजी लेखाचे भाषांतर.)**

खऱ्या अध्यात्मिक गुरूने आपल्या शिष्यामध्ये दिव्य शक्तीचे संक्रमण करण्याची एक विशिष्ट पद्धती आहे. त्याला कृपा अर्थात् शास्त्रीय परिभाषेत "शक्तिपात" किंवा "दिव्य शक्तीचे संक्रमण" असे म्हणतात. असा शक्तिपात करण्याचे सामर्थ्य असलेले श्रीसद्गुरू त्यांच्या जवळचे "सत्या" बद्दलचे ज्ञान किंवा "परमात्म्याशी एकरूप" होण्याचे ज्ञान, सुयोग्य शिष्याला एका क्षणार्धात विशेष कष्ट न करता देऊ शकतात. इतकेच नव्हे; तर ते आपल्या शिष्याला तत्सम म्हणजे आपल्याप्रमाणे बनवू शकतात. या दृष्टीनेच भगवान् श्रीमदाद्य-शंकराचार्य यांनी "**शतश्लोकी**" या आपल्या महान् ग्रंथाच्या पहिल्याच श्लोकात शक्तिपातपूर्वक ज्ञानदान करणाऱ्या श्रीसद्गुरूंचे पुढीलप्रमाणे मोठे सुंदर वर्णन केले आहे.

**दृष्टान्तो नैव दृष्टस्त्रिभुवनजठरे सद्गुरोर्ज्ञानदातुः ।**
**स्पर्शश्चेत्तत्र कल्प्यः स नयति यदहो स्वर्णतामश्मसारम् ।।**
**न स्पर्शत्वं तथापि श्रितचरणयुगे सद्गुरुः स्वीयशिष्ये ।।**
**स्वीयं साम्यं विधत्ते भवति निरुपमस्तेन वालौकिकोपि ।।१।।**

या त्रिभुवनात ज्ञानदात्या श्रीसद्गुरूंना शोभेल असा दृष्टान्तच मिळत नाही. जरी त्यांना परिसाची उपमा दिली तरी तीही योग्य होत नाही; कारण की, परिस लोखंडाचे सोने करीत असला, तरी तो त्याला परिसत्व देत नाही. परंतु श्रीसद्गुरू मात्र त्यांच्या चरण युगुलाचा आश्रय करणाऱ्या आपल्या शिष्याला स्वतःचे साम्य देतात. त्यामुळे श्रीसद्गुरूंना कोणतीही उपमा देता येत नाही अर्थात् ते निरुपम आहेत. याचा अर्थच असा आहे की, श्रीसद्गुरूंना योग्य असा प्रंपचातील कोणताही अलौकिक दृष्टान्त मिळत नाही.

या दृष्टीनेच संतश्रेष्ठ श्रीतुकाराममहाराजांनी आपल्या एका अभंगात

या कल्पनेची पुनरावृत्ती करताना असे म्हटले आहे की -

**सद्गुरुवांचूनि सांपडेना सोय। धरावे ते पाय आधी आधी।।१।।**
**आपणासारिखें करिती तात्काळ। नाहीं काळवेळ तयालागीं।।२।।**
**लोह परिसाची न साहे उपमा। सद्गुरुमहिमा अगाधची।।३।।**
**तुका म्हणे कैसे आंधळें हे जन। गेले विसरोन खऱ्या देवा।।४।।**

या सर्वांवरून हे स्पष्ट होते की, श्रीसद्गुरूंचे माहात्म्य वर्णन करण्यास परिसादि कोणाचीही उपमा पुरी पडू शकत नाही; कारण जगातील सर्व मानदंड श्रीसद्गुरुमहात्म्यापुढे अपुरे पडतात.

"**भावार्थ दीपिका**" या "**श्रीमद्भगवद्गीतेवरील**" भाष्यात सकलसंतशिरोमणी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही श्रीसद्गुरूंचा महिमा वर्णन करताना असे म्हटले आहे की, "खऱ्या श्रीसद्गुरूंची महती एवढी मोठी आहे की, ज्या व्यक्तीवर त्यांची दृष्टी पडते किंवा ज्याच्या मस्तकावर ते आपला कमलहस्त ठेवतात, ती व्यक्ती कितीही कनिष्ठ यःकश्चित् असली; तरी तिला तत्क्षणी जगच्चालक परमेश्वराचा दर्जा प्राप्त होतो. ज्या कोणाला अशा श्रीसद्गुरूंची कृपा प्राप्त करण्याचे भाग्य लाभते तो तत्काळ सर्व द्वंद्वांतून मुक्त होतो आणि त्याला आत्मप्रचीती येते. श्रीसद्गुरू "**तत्त्वमसि, अहं ब्रह्मास्मि, अयमात्माब्रह्म व प्रज्ञानं ब्रह्म**" यापैकी कोणतेही एक "महावाक्य" शक्तिपातपूर्वक शिष्याला देतात व शिष्याने तत्क्षणी त्याचा स्वीकार करताच त्याला त्याचक्षणी आपण महावाक्यातील आशयाचा प्रत्यक्ष अनुभव घेत असल्याची प्रचीती येते. श्रीकृष्णांनी आपल्या परमभक्त अर्जुनाच्या ठिकाणी आपल्या दिव्य अशा शक्तीचे संक्रमण करून त्याला आपल्यासारखे कसे केले, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "**श्रीज्ञानेश्वरीत**" असे म्हटले आहे की, "प्रभूंनी झगझगीत कंकणांनी युक्त असलेला आपला नीलवर्णाचा उजवा हात पुढे केला आणि आपल्या प्रेमळ भक्ताला आलिंगन देऊन हृदयाशी धरले. श्रीभगवंताला त्याच्या शिष्याला प्रत्यक्ष शक्तिपात करून आत्मप्रचीती द्यावयाची होती व त्यासाठीच ते आलिंगन होते. तेथे भाषा किंवा युक्तीवाद

यांना जागा नव्हती. ज्यावेळी श्रीकृष्णांचे व अर्जुनाचे हृदय एकमेकांना भिडले त्यावेळी श्रीकृष्णांनी आपल्या हृदयातील ज्ञान अर्जुनाच्या हृदयात घातले. हे सर्व झाले; तरी दोन व्यक्ती तशाच राहिल्या; पण अर्जुन मात्र श्रीकृष्णरूप झाला अर्थात् श्रीकृष्णांशी तादात्म्य पावला."

ब्रह्माची प्रचीती केवळ शास्त्राभ्यासाने येत नाही; तर ती केवळ श्रीगुरुकृपेनेच येते. श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराज गर्जून असे सांगतात की, "श्रीसद्गुरूंशिवाय खरे ज्ञान मिळणे अशक्य आहे. शास्त्रेही या सिद्धान्ताशी सहमत आहेत. केवळ शब्दाने, तीक्ष्ण बुद्धीने किंवा उपनिषदे व त्यावरील व्याख्याने ऐकून आत्मप्रचीती येऊ शकत नाही. ती फक्त श्रीसद्गुरूंच्या कृपा-प्रसादानेच मिळू शकते." या दृष्टीने श्रीमदाद्यशंकराचार्यांनी श्रीसद्गुरूंच्या अमृतमय दृष्टि-कटाक्षाच्या शक्तीचे जे अपूर्व वर्णन **"शतश्लोकी"** या प्रख्यात ग्रंथात केले आहे, ते पाहण्यासारखे आहे.

**तद् ब्रह्मैवाहमस्मीत्यनुभव उदितो यस्य कस्यापि चेद्वै।**
**पुंसः श्रीसद्गुरुणामतुलितकरुणापूर्णपीयूषदृष्ट्या।**
**जीवन्मुक्तः स एव भ्रमविधुरमना निर्गतेनाद्युपाधौ।**
**नित्यानन्दैकधाम प्रविशति परमं नष्टसन्देहवृत्तिः।।९१।।**

कोणीही एखाद्या पुरुषाला अर्थात् साधकाला श्रीसद्गुरूंच्या अप्रतिम करुणेने पूर्ण अशा अमृत दृष्टीने अर्थात् शक्तिपातपूर्वक केलेल्या शक्तिसंक्रमणाने "ते ब्रह्मच मी आहे" असा जर अनुभव आला तर त्याचे मन भ्रमरहित होते. त्यामुळेच त्याचे सर्व संशय नष्ट होतात व तो जीवन्मुक्त होतो. अशा प्रकारे साधकाची अनादि उपाधी नष्ट झाल्यामुळे तो श्रेष्ठ व नित्य आनंदरूप अशा आत्म्यामध्ये प्रवेश करतो.

अशा रीतीने वेद, पुराणे, तंत्रे आणि सर्व काळातील संतांनी शक्तिसंक्रमणाच्या मार्गाचे स्वानुभव लिहून ठेवले आहेत. **"योगवासिष्ठ"** या ग्रंथात श्रीवसिष्ठ ऋषींनी स्वतः श्रीरामचंद्रांवर केलेल्या शक्तिपाताच्या सत्य परिस्थितीचे वर्णन केले आहे. या शक्तिपाताच्या माहात्म्यामुळेच

श्रीवसिष्ठांना श्रीरामचंद्रांना पूर्ण ब्रह्मस्थितीप्रत नेणे शक्य झाले. श्रीवसिष्ठांचे हे सामर्थ्य जाणूनच श्रीविश्वामित्र महर्षी श्रीवसिष्ठांची स्तुती करताना त्यांना असे म्हणाले की, "हे महात्मन् ब्रह्मपुत्र वसिष्ठ मुनी! आपण खरोखरच अत्यंत श्रेष्ठ आहात. आपण शक्तिपाताच्या द्वारा श्रीरामचंद्रांच्या ठिकाणी शक्तिसंक्रमण करून आपली महती सिद्ध केली आहे."

**"योगवासिष्ठातील"** निर्वाणप्रकरणाच्या पूर्वार्धातील १२८ व्या प्रकरणात शक्तिसंक्रमण करण्याच्या चार पद्धतींने वर्णन करून श्रीसद्गुरूची व्याख्या केली आहे.

**दर्शनात् स्पर्शनात् शब्दात् कृपया शिष्यदेहके।**
**जनयेद्यः समावेशं शाम्भवं स हि देशिकः।।६१।।**

जे दर्शनाने, स्पर्शाने, शब्दाने व कृपापूर्वक शिष्याच्या देहामध्ये शिवभावाची मंगलमय अनुभूती करू शकतात त्यांनाच श्रीसद्गुरू असे म्हणतात.

या दृष्टीने **"श्रीस्कंदपुराणातील"** **"सूतसंहितेमध्ये"** शक्तिसंक्रमणाच्या पद्धतीची सांगोपांग माहिती दिलेली आहे. **"तंत्रग्रंथातही"** शक्तिसंक्रमणाने होणाऱ्या कुंडलिनीजागृतीची विस्तृत वर्णने आढळतात. शक्तिसंक्रमणद्वारा शिष्यातील सुप्त शक्ती जागृत करण्याबद्दल सर्व पंथांमध्ये नाथसंप्रदाय हा अत्यंत प्रसिद्ध आहे. हा पंथ अध्यात्मज्ञान व योगशास्त्र यांच्या इतकाच प्राचीन आहे. अलीकडील काळात अशी महान् शक्ती साधकामध्ये परिणामकारकपणे संक्रमण करणारे श्रीसद्गुरू विरळेच आहेत हे खरे आहे; परंतु ते अजिबात नाहीत असे नाही. अशा प्रकारचे क्वचित् आढळणारे शक्तिसंपन्न व शक्तिपातदीक्षाद्वारा शक्तिसंचार करणारे महात्मे जगामध्ये गुप्तपणे संचार करीत असतात आणि ज्यावेळी त्यांची गाठ एखाद्या लायक शिष्याशी पडते तेव्हा ते त्यांच्या जवळील शक्ती त्या शिष्यामध्ये संक्रमित करतात.

अशा प्रकारचे ज्ञान व शक्ती संक्रमित करून शिष्याची कुंडलिनी जागृत करण्याचे सामर्थ्य असणारे श्रीसद्गुरू हे आम्ही वर म्हटल्याप्रमाणे

क्वचित्काळी व कोठेतरी आढळतात. अशाच एका महात्म्यांशी अर्थात् प.प.श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराज यांच्याशी माझी गाठ पडून मला आलेले अनुभव हेच या लेखास कारणीभूत झाले आहेत. सामान्य वाचकास जरी या गोष्टीचा प्रत्यक्ष फायदा होणार नसला तरी पण अशा तऱ्हेचे पूर्णत्वास गेलेले महात्मे असू शकतात व त्यांच्याकडून शक्तिसंक्रमणद्वारा त्यांची कृपा संपादन करून शिष्याला आपले कल्याण करून घेणे शक्य आहे, इतकी खात्री होऊ शकली; तरी माझ्या या प्रयत्नाचे सार्थक झाले असेच मी मानीन. त्याचे एकमात्र कारण असे आहे की, एखाद्या साधकाची जर एखाद्या अशा महात्म्यांशी गाठ पडली तर आणि तो त्यांची कृपा संपादन करू शकला; तर खरोखर त्याला त्याच्या मानुषी अस्तित्वाचे उद्देश व हेतू साध्य करता येतील.

योगाचा मुख्य हेतू समाधी साधणे हा आहे. ज्या समाधी अवस्थेमध्ये मनाच्या सर्व अवस्था व भाव नाहीसे होऊन ते शांत होते, ती समाधी साध्य होण्याकरिता अनुभवी अशा श्रीसद्गुरूंच्या मार्गदर्शनाखाली शिष्याला अवघड अशा आठ प्रकारच्या हठयोगाच्या पायऱ्यांवरून जावे लागते. या अभ्यासात थोडीशी ज़री चूक झाली तरी साधकाला ती धोकादायक असते. या धोक्याच्या भीतीमुळेच पुष्कळ उत्कट साधक हा मार्ग अवलंबिण्यास धजत नाहीत; कारण त्यामध्ये यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, मुद्रांचा अभ्यास इत्यादि अंगांचा अभ्यास करून कुंडलिनी शक्ती जागृत करावी लागते. अशा रीतीने शक्ती जागृत झाल्यानंतर पृष्ठवंश रज्जूतून जाणाऱ्या मध्यवर्ती सुषुम्णानाडीचे प्रवेशद्वार उघडते व त्यातूनच प्राणरूप शक्तीचा वर सहस्रारात जाण्याचा मार्ग मोकळा होतो. परंतु शक्तिपातयोगमार्गाने वरील सर्व गोष्टी विनासायास लवकर साध्य होऊ शकतात. जो साधक निरोगी व तरुण असून, ज्याचा मन व इंद्रिये यांच्यावर ताबा आहे, जो वर्णाश्रमधर्माचे नियम पाळतो आणि ज्याची देव, ब्राह्मण व गुरू यांच्यावर पूर्ण श्रद्धा आहे, अशा साधकावर शक्तिसंक्रमणाचा परिणाम ताबडतोब होतो. या सर्वांत श्रीसद्गुरूंची

प्रामाणिक सेवा करून त्यांची कृपा संपादन करणे हीच अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे.

श्रीविद्यारण्यस्वामीमहाराजप्रणीत "**जीवन्मुक्तिविवेक**" या ग्रंथावर टीका करताना श्री.अच्युतराय मोडक यांनी आपल्या "**पूर्णानंदकौमुदी-व्याख्येत**" पुढील प्रकारे शक्तिसंक्रमणाच्या चार पद्धती सांगितल्या आहेत.

**विद्धि स्थूलं सूक्ष्मं सूक्ष्मतरं सूक्ष्मतममपि क्रमतः।**
**स्पर्शन-भाषण-दर्शन-सङ्कल्पनजत्व-तश्चतुर्धा तम्।।**

शक्तिपात हा स्पर्श, भाषण, दर्शन व संकल्प या चार कारणाने क्रमशः स्थूल, सूक्ष्म, सूक्ष्मतर व सूक्ष्मतम या चार प्रकारचा जाणावा.

यातील पहिल्या स्थूल अशा स्पर्शदीक्षेची व्याख्या करताना "**कुलार्णवतंत्रात**" श्रीमहादेव श्रीपार्वतीला असे म्हणतात की,

**यथा पक्षी स्वपक्षाभ्यां शिशून् संवर्धयेच्छनैः।**
**स्पर्शदीक्षोपदेशश्च तादृशः कथितः प्रिये।।१४.३५।।**

हे प्रिये पार्वती! ज्याप्रमाणे पक्षी आपल्या पंखांचा स्पर्श करून आपल्या पिल्लांचे लालन, पालन व वर्धन करतो त्याप्रमाणे श्रीसद्गुरू आपल्या स्पर्शाने शिष्याच्या ठिकाणी निद्रिस्थ असलेली शक्ती जागृत करून त्याचे लालन, पालन व वर्धन करतात. याप्रमाणे स्पर्शदीक्षा असते.

दुसऱ्या सूक्ष्म अशा शब्ददीक्षेची व्याख्या करताना शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की-

**निशम्य कोकिलशब्दं कोकिलः काकपालितः।**
**स्वीयां जातिं विजानाति गुरुवाक्यश्रवात्तथा।**
**स्वीयं स्वरूपं विज्ञाय शिष्यो ब्रह्मत्वमश्नुते।।**

हेच दुसऱ्या शब्दात सांगताना त्यांनी असे म्हटले की -

**यथा पिको वायसरक्षितः स्वां श्रुत्वा पिकारावमवैति जातिम्।**
**शिष्यस्तथा देशिकवाक्प्रभावात् परं पदं वेत्त्यचिरादशङ्कम्।।**

ज्याप्रमाणे कावळ्यांच्यामध्ये पाळलेले कोकिळेचे पिल्लू कोकिळेचा शब्द ऐकताच मी कावळा नसून कोकिळ आहे असे ओळखते त्याप्रमाणे "तू ब्रह्म आहेस" असे श्रीसद्गुरू म्हणताच शिष्याच्या ठिकाणी तो भाव उदित होऊन जेव्हा त्याला तसा अनुभव येतो तेव्हा त्याला शब्ददीक्षा असे म्हणतात.

तिसऱ्या सूक्ष्मतर अशा दृग्दीक्षेने अर्थात् श्रीसद्गुरूंच्या नुसत्या दर्शनाने किंवा दृष्टिपाताने शक्तिसंचार कसा होतो हे श्रीपार्वतीला सांगताना श्रीमहादेवांनी "**कुलार्णवतंत्रात**" असे म्हटले आहे की

**स्वापत्यानि यथा कूर्मी वीक्षणेनैव पोषयेत्।**
**दृग्भ्यां दीक्षोपदेशश्च तादृशः परमेश्वरि।।१४.३६।।**

हे पार्वती! कासवी ज्याप्रमाणे आपल्या अपत्यांचे पालन-पोषण केवळ आपल्या प्रेमळ दृष्टीने करते त्याप्रमाणे श्रीसद्गुरूंच्या केवळ कृपाकटाक्षाने शिष्यामध्ये शक्तिसंचार होऊन तो कृतार्थ होतो.

चवथी सूक्ष्मतम अशी संकल्प, कृपा किंवा ध्यानदीक्षा कशी होते हे सांगताना "**कुलार्णवतंत्रात**" असे म्हटले आहे की-

**यथा मत्स्यी स्वतनयान् ध्यानमात्रेण पोषयेत्।**
**वेधदीक्षोपदेशश्च मानसः स्यात् तथाविधः।।१४.३७।।**

ज्याप्रमाणे मत्स्यी केवळ मनाने चिंतन करून आपल्या पिल्लांना वाढविते व त्यांचे पोषण करते त्याप्रमाणे केवळ संकल्पाने श्रीसद्गुरू शक्तिसंचार करून शिष्याची कुंडलिनी शक्ती जागृत करतात. या प्रकाराने जी वेधदीक्षा किंवा शक्तिसंचार होतो त्याला मानसदीक्षा असेही म्हणतात.

आत्तापर्यंत वर्णन केलेल्या चार दीक्षा प्रकारांपैकी कोणत्याही प्रकारे शक्तिपातयोगाची वेधदीक्षा झाली की, शिष्यामध्ये शक्तिसंक्रमण झाल्यामुळे कोणती लक्षणे प्रकट होतात हे "**कुलार्णवतंत्रात**" व "**सूतसंहितेत**" पुढीलप्रमाणे कथन केले आहे.

**आनन्दश्चैव कम्पश्चोद्भवो घूर्णा कुलेश्वरी।**
**निद्रा मूर्च्छा च वेधस्य षडवस्थाः प्रकीर्तिताः।।१४.६४।।**

**देहपातस्तथा कम्पः परमानन्द हर्षणे।**
**स्वेदो रोमाञ्च इत्येतच्छक्तिपातस्य लक्षणम्।।४.३५.२१।।**

श्रीगुरुदेवांच्या अनुग्रहाने जेव्हा शिष्याला वेधदीक्षा प्राप्त होते तेव्हा आनंद, कंप, आसनापासून उत्थान, घुमणे किंवा डोलणे, निद्रा व मूर्च्छा या सहा अवस्था शिष्याच्या ठिकाणी प्रकट होतात.

ज्यावेळी साधकाला शक्तिपातयोगाची दीक्षा मिळते त्यावेळी शिष्याचा देह जमिनीवर आडवा पडतो. त्याला कंप होऊ लागून त्याचे मन प्रसन्न होते व ते परमानंदाने भरून जाते. त्याचप्रमाणे साधकाच्या अंगावर रोमांच उभे राहतात व त्याला घाम येतो. ही सर्व शक्तिपाताची लक्षणे आहेत.

शक्तिपाताच्या वर वर्णन केलेल्या लक्षणांप्रमाणे दीक्षा झाल्यानंतर साधकाच्या ठिकाणी पुढील इतर लक्षणेही प्रकट होतात. साधन सुरू झाल्यावर प्रकाश दिसणे, आतून अनाहतनाद ऐकू येणे, आसनापासून शरीर वर उचलले जाणे इत्यादि गोष्टी होऊ लागतात. त्याप्रमाणे काही कालानंतर निरनिराळ्या बंधांसह प्राणायामाच्या निरनिराळ्या अवस्था आपोआप चालू होतात. काही साधकांना कुंडलिनी शक्ती मूलाधार चक्रापासून ब्रह्मरंध्रापर्यंत वर गेल्याचा अनुभव येतो व त्यांच्या मनाला पूर्ण शांती लाभते. काही साधकांना पहिल्या दिवशी येणारे हे सर्व अनुभव कित्येक तास टिकतात, काहींच्या ठिकाणी ते अर्धा तास तर काहींच्या बाबतीत ते सतत तीन तास टिकून मग थांबतात. साधकाचे साधन चालू असताना जोपर्यंत शक्ती कार्य करीत असते तोपर्यंत साधकाचे डोळे मिटलेले राहतात व ते त्याला उघडावेसे वाटत नाहीत. ते मुद्दाम उघडण्याचा प्रयत्न केला तर त्रास होतो. मात्र शक्तीचे कार्य थांबल्यावर साधकाचे डोळे आपोआप उघडतात. या दृष्टीने डोळ्यांचे मिटणे व उघडणे या गोष्टी शक्तीचे कार्य चालू आहे की, थांबले आहे हे दर्शवितात. साधकाने डोळे मिटल्यावर त्याला त्याच्या शरीरात निरनिराळ्या प्रकारच्या हालचाली सुरू झाल्याचे जाणवते. अशा वेळी त्याने आतून आपोआप होणाऱ्या

हालचालींना विरोध करू नये किंवा त्या क्रियांच्या मार्गात अडचणी आणू नयेत. त्याने फक्त निरीक्षकाची भूमिका घेऊन त्या क्रियांना नियंत्रित करण्याचा प्रयत्न करू नये; कारण की, या क्रिया दैवी शक्तीकडून जीवाचे मल, विक्षेप, आवरणादि सर्व दोष नाहीसे होऊन त्याचे शिवत्व प्रकट व्हावे व त्याला स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती व्हावी म्हणून विवेकबुद्धीने आतून चालविल्या जातात. अशा प्रकारे दैवी शक्तीकडून आपोआप होणाऱ्या क्रियांमुळे साधकाला अतिशय समाधान लाभते आणि त्याचा आत्मस्वरूपप्राप्तीचा अर्थात् ईश्वरप्राप्तीचा विश्वास बळकट होतो.

एकदा का श्रीगुरुकृपेने शिष्याची योगशक्ती जागृत झाली की, त्याच्या दृष्टीने स्वतंत्रपणे हठयोगांतर्गत प्राणायाम, मुद्रा व इतर कोणत्याही योगाचा अभ्यास करण्याला काही महत्त्व राहत नाही. मात्र शक्तिजागृतीमुळे आतून आपोआप होणारी आसने, मुद्रा, प्राणायाम इत्यादि क्रिया प्राणशक्तीला ब्रह्मरंध्राकडे जाण्यास मदत करण्यासाठीच होत असतात. ज्यावेळी सुषुम्णेचे द्वार मोकळे होऊन शक्ती वर सहस्रारात जाऊ लागते त्यावेळी क्रियांची आवश्यकता कमी होत जाते व मनही पायरीपायरीने शांत होत जाते. शेवटी ज्यावेळी मनप्राणरूपी शक्ती सहस्रारात श्रीशिवाशी समरस होते त्यावेळी अद्वैत सिद्धान्ताची सिद्धी होते.

एखाद्या अशिक्षित व ज्याला आसन, प्राणायाम, बंध इत्यादींची काहीही माहिती नाही अशा साधकाला ज्यावेळी शक्तिपातयोगाची दीक्षा होते त्यावेळी तो साधक श्रीसद्गुरूंनी जागृत केलेल्या शक्तीच्या अनुषंगाने, कित्येक वर्षे एखाद्या श्रीगुरूकडे योगाचे शिक्षण घेऊन निष्णात झालेल्या योग्याप्रमाणे, योगातील आसन-मुद्रा-बंध-प्राणायामादि सर्व प्रकार शास्त्रातील वर्णनाबरहुकूम करताना कधी कधी आढळतो. सत्यस्थिती अशी आहे की, या सर्व गोष्टी जागृत कुंडलिनी शक्ती स्वतः साधकाची प्रगती करण्याकरिता त्या त्या साधकाच्या बाबतीत आवश्यकता असेल त्याप्रमाणे साधकाकडून घडवून आणीत असते.

अशा प्रकारे साधन करताना कुंडलिनी शक्तीच्या जागृतीमुळे योगातील कित्येक अवघड क्रिया यत्किंचितही प्रयत्न न करता साधकाकडून केल्या जातात. त्याचप्रमाणे पूरक, रेचक व कुंभक या प्राणायामाच्या क्रिया आपोआप घडतात. साधकाला दोन मिनिटांचा कुंभक एक दोन आठवड्यातच साध्य होतो. या सर्व गोष्टी साधकाला कोणत्याही तऱ्हेचा धोका किंवा त्रास न होता होतात; कारण जागृत शक्ती साधकाला कोणत्याही तऱ्हेची इजा होऊ नये म्हणून काळजी घेत असते. त्यामुळे साधनात आपोआपच होणाऱ्या या क्रियांमुळे साधकाची साधनातील प्रगती बिनधोक चालू राहते.

श्रीसद्गुरूंनी शिष्यावर शक्तिपात करून त्याची कुंडलिनी शक्ती जागृत केल्यावर शिष्यातील शक्तिपाताचे सामर्थ्य वाढते व हळूहळू तोही आपल्या श्रीसद्गुरूप्रमाणेच बनतो. अशा रीतीने शक्तिपात करण्याचा संप्रदाय श्रीसद्गुरूकडून शिष्याकडे अखंड चालूच राहतो. शक्तीचे बीज श्रीसद्गुरूंनी शिष्यामध्ये पेरलेलेच असते. त्यामुळे श्रीसद्गुरूंनी आज्ञा करताच शिष्यही आपण शक्तिपात करून दुसरे शिष्य तयार करू शकतो व या प्रकारे हा संप्रदाय अखंडितपणे चालू राहतो. परंतु ही संधी प्रत्येक शिष्याला मिळत नसते; कारण या बाबतीत **"जीवनमुक्तिविवेक"** या ग्रंथावर श्री.अच्युतराय मोडक यांनी केलेल्या **"पूर्णानन्देन्दुकौमुदी"** व्याख्येत प्रथम प्रकरणात असे म्हटले आहे की -

**तत्रापि चरमयुक्तं साम्यासाम्यप्रदत्वतो द्विविधम्।**
**साम्यं तु शक्तिपाते गुरुवत्स्वस्यापि सामर्थ्यम्।।१०।।**

तथापि चरम म्हणजे श्रेष्ठ असा जो चौथा कृपायुक्त किंवा संकल्पात्मक प्रकार आहे तो साम्य व असाम्य प्रदान करणारा असा दोन प्रकारचा आहे. साम्यात शिष्याला शक्तिपाताने गुरुसाम्यता व स्वत:प्रमाणे इतरांना शक्तिपात दीक्षेने तारण्याचे सामर्थ्य येते. मात्र स्थूल, सूक्ष्म व सूक्ष्मतर शक्तिपाताचेही असेच दोन दोन भेद आहेत असे समजावे. आता चारही प्रकारच्या शक्तिपातात साम्यासाम्यभेदाने

दोन प्रकार कसे घडतात हे सांगतो. साम्यासाम्यभेदाचा अर्थ असा आहे की, शक्तिपातदीक्षा मिळालेल्या शिष्यांमधील काही असे असतात की, जे स्वतःही ज्ञानप्राप्तीने कृतार्थ झालेले असतात व इतरांनाही दीक्षा देऊन ते कृतार्थ करू शकतात. याला साम्यभेद किंवा प्रकार असे म्हणतात. मात्र ज्यांना असाम्य प्रकारची शक्तिपातदीक्षा प्राप्त झालेली असते ते शिष्य स्वतः कृतार्थ झाले तरी दुसऱ्यांना दीक्षा देऊन कृतार्थ करण्याचे सामर्थ्य त्यांच्यात असत नाही. प्रथम स्पर्शपूर्वक होणाऱ्या शक्तिपातदीक्षेच्या स्थूल प्रकारच्या श्रीगुरुसाम्यासाम्यतेचे वर्णन करतो.

**स्थूलं ज्ञानं द्विविधं गुरुसाम्यासाम्यदत्वभेदेन।**
**दीपप्रस्तरयोरिव संस्पर्शात्स्निग्धवर्त्ययसोः।।११।।**

ज्याप्रमाणे एखादा जळणारा दिवा तेलात अगर तुपात भिजविलेल्या दुसऱ्या दिव्याच्या वातीला स्पर्श करून पेटवितो व आपल्यासारखे रूप व शक्ती म्हणजे साम्यत्व देतो आणि परिस लोहाला स्पर्श करून सुवर्णरूप म्हणजे आपल्यापेक्षा निराळे असे रूप देतो म्हणजे असाम्यत्व देतो त्याप्रमाणे स्पर्शरूप शक्तिपाताने होणारे स्थूल ज्ञान श्रीगुरुसाम्यासाम्यभेदाने दोन प्रकारचे असते. एका दिव्याने पेटविलेली दुसरी वात आणखी दुसऱ्या कोणत्याही वातीला आपल्या स्पर्शाने प्रज्वलित करू शकते. स्वतः प्रज्वलित होण्याची व दुसऱ्या वातींना प्रज्ज्वलित करण्याची ही शक्ती जशी एका दिव्याला प्राप्त झाली तशी ती सर्व प्रज्वलितदीपांना प्राप्त झालेली असते. याप्रमाणेच श्रीसद्गुरू काही शिष्यांना साम्यत्व म्हणजे स्पर्शदीक्षा देऊन स्वतःसारखे ज्ञान व इतरांना तारण्याचे अर्थात् शक्तिपात करण्याचे सामर्थ्य देतात. यालाच परंपरा म्हणतात व श्रीसद्गुरुकृपा अशीच होण्याचे समाजात चालत राहते. दुसरे उदाहरण परिसाचे आहे. परिसाच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने होते; परंतु या सोन्यामध्ये आपल्या स्पर्शाने दुसऱ्या लोखंडाचे सोने बनविण्याचे सामर्थ्य असत नाही. साम्यदान करण्याची शक्ती त्या सोन्यात नसते. त्याप्रमाणेच बहुतेक शिष्य श्रीसद्गुरुकृपेने

स्वतः कृतार्थ होतात; पण या शिष्यांच्या जवळ इतरांना तारण्याचे, प्रदीप्त करण्याचे किंवा शक्तिपात करण्याचे सामर्थ्य नसते. त्यामुळे परंपरा पुढे चालू शकत नाही.

सूक्ष्म शक्तिपाताने अर्थात् शब्ददीक्षेने श्रीगुरुसाम्यासाम्यभेद पुढीलप्रमाणे दोन प्रकारचा होतो.

**तद्वद् द्विविधं सूक्ष्मं शब्दश्रवणेन कोकिलाम्बुदयोः ।**
**तत्सुतमयुरयोरिव तद्विज्ञेयं यथासंख्यम् ।।१२।।**

कोकिळेच्या शब्दाच्या श्रवणाने कावळ्याने पोसलेल्या कोकिळेच्या पिल्लाला "मी कोकिळ आहे" असे साम्यप्रद ज्ञान होते व मेघाचा गडगडाट ऐकून मोर आनंदाने नाचू लागतो. हे असाम्यरूप ज्ञान आहे. या दृष्टान्ताप्रमाणेच सूक्ष्म शक्तिपाताचे शिष्यांमध्ये दोन प्रकार दिसून येतात. कोकिळेच्या पिल्लाला आपल्या आईचा शब्द ऐकून आपण स्वतः कोण आहोत याचे ज्ञान होते व कालांतराने हे पिल्लू मोठे झाले की, आपल्या पिल्लाला बोध देण्याची शक्तीपण त्याच्यात येते. त्याचप्रमाणे काही शिष्यांच्या ठिकाणी "तत्त्वमस्यादि" महा-वाक्याच्या, मंत्राच्या अगर भगवन्नामाच्या म्हणजे शब्दाच्या आधाराने श्रीसद्गुरू आपली शक्ती संक्रांत करून त्यांना स्वसंवेद्य आत्मस्वरूपाचे ज्ञान देतात व कालांतराने या शिष्यांच्या ठिकाणीही उपरोक्त प्रकारच्या कोणत्याही शब्दाच्या आधाराने आपल्या गुरूप्रमाणेच शक्ती संक्रांत करण्याचे किंवा इतरांना देण्याचे सामर्थ्य येते. या प्रकारालाच सूक्ष्म शब्ददीक्षा असे नाव असून अनवच्छिन्न परंपरेचा द्योतक असा हा साम्यज्ञानदानप्रकार आहे. मात्र मोर जेव्हा मेघाचा गडगडाट ऐकतो तेव्हा फक्त त्याला स्वतःलाच आनंद होतो. मोराला मेघसाम्य प्राप्त होत नसल्याने तसा गडगडाट करून, आपल्याला झाला तसा आनंद, त्याला इतरांना देता येत नाही. याचा अर्थ असा की, बहुतेक शिष्यांना श्रीसद्गुरूंकडून होणाऱ्या शक्तिपात दीक्षेमुळे मोराप्रमाणे स्वतःला आनंदप्राप्ती होते; परंतु या शिष्यांना श्रीसद्गुरुसाम्याने आपल्या शब्दाने इतरांना तो आनंद देण्याचे सामर्थ्य प्राप्त झालेले नसल्याने, इतरांना

आपला आनंद ते शब्दाने अगर भाषणाने प्रदान करू शकत नाहीत. यालाच असाम्यदानकारक सूक्ष्मदीक्षा असे नाव असून ती विच्छिन्न-परंपरा द्योतक आहे.

सूक्ष्मतर शक्तिपाताने अर्थात् दृष्टिदीक्षेने श्रीगुरुसाम्यासाम्यत्व कसे प्रस्थापित होते हे दृष्टान्ताने स्पष्ट करताना शास्त्रकार असे म्हणतात की -

**इत्थं सूक्ष्मतरमपि द्विविधं कूर्म्या निरीक्षणात्तस्याः।**
**पुत्र्यास्तथैव सवितुर्निरीक्षणात्कोकमिथुनस्य।।१३।।**

कासवीच्या केवळ निरीक्षणाने म्हणजे पाहण्यानेच तिच्या पिल्लांचे पोट भरते किंवा ती सुदृढ होतात व सूर्य उगवल्यानंतर रात्रभर एका पानाच्या आड येण्याने एकमेकांच्या भेटीला पारखी झालेली चकोर व चकोरी यांची भेट झाल्याने त्यांना अत्यंत आनंद होतो. या दृष्टान्ताप्रमाणे सूक्ष्मतर शक्तिपात दोन प्रकारचा आहे. याचा अर्थ असा आहे की, ज्याप्रमाणे कासवीच्या केवळ दृष्टिसंचारानेच तिची पिल्ले तृप्त होतात त्याप्रमाणेच श्रीसद्गुरूंच्या कृपादृष्टिसंचाररूप शक्तिपाताने अर्थात् दयार्द्र दृष्टिपाताने शिष्यामध्ये ज्ञानाचा उदय होतो. यातील विशेष असा की, कालांतराने केवळ स्वकृपादृष्टिसंचाराने इतर अधिकारी शिष्यांमध्येही ज्ञानाचा उदय करण्याची शक्ती किंवा ज्ञान-जननशक्तिसाम्य प्रकट करण्याचे सामर्थ्य त्याच्यात येते अर्थात् कासवीचे पिल्लू ज्याप्रमाणे मोठे झाल्यावर त्याच्या ठिकाणी केवळ आपल्या दृष्टिसंचाराने आपल्या पिल्लांना तृप्त करण्याचे सामर्थ्य येते; त्याप्रमाणे निरीक्षणात्मक चाक्षुषदीक्षाशक्तिपाताने उत्पन्न होणारे ज्ञान अधिकारी शिष्याला जरी दीक्षासमयीच प्राप्त होत असले तरी कालौघात ते प्रकट होते, असा याचा भाव आहे. यालाच साम्यदानप्रदायक अशी सूक्ष्मतर दृष्टिदीक्षा असे म्हणतात. मात्र चकोर पक्षांच्या जोडप्याला भेटीचा जो आनंद सूर्यदर्शनामुळे प्राप्त होतो तो आनंद आपल्या दर्शनाने ते दुसऱ्या चकोर चकोरीच्या जोडप्याला देऊ शकत नाहीत. त्याप्रमाणेच काही शिष्यांना श्रीसद्गुरूंच्या कृपेने सूक्ष्मतर अशी दृष्टिदीक्षा

प्राप्त होऊन जीवशिव भेटीचा ब्रह्मानंद स्वतःला प्राप्त होतो; मात्र हा आपला आनंद ते दुसऱ्या जीवांना, सूक्ष्मतर दृष्टिदीक्षा प्रदानाचे सामर्थ्य नसल्याने, देऊ शकत नाहीत. यालाच असाम्यप्रदायक अशी सूक्ष्मतर दृष्टिदीक्षा असे म्हणतात.

सूक्ष्मतम अर्थात् संकल्पजनित शक्तिपाताने किंवा श्रीसद्गुरूंच्या केवळ मनःसकंल्पाने कृपा होऊन शिष्याच्या ठिकाणी श्रीगुरु-साम्यासाम्यत्व कसे उत्पन्न होते हे दृष्टान्त देऊन विशद करताना शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की -

**सूक्ष्मतममपि द्विविधं मत्स्याः सङ्कल्पतस्तु तद्दुहितुः ।**
**तृप्तिर्नगरादिजनिर्मान्त्रिकसङ्कल्पतश्च भुवि तद्वत् ।।१४।।**

मत्स्यीच्या केवळ स्मरणाने, संकल्पाने किंवा चिंतनानेच तिच्या पिल्लांचे पोट भरते व एखाद्या मांत्रिक किंवा जादूगार स्वतःच्या संकल्पाने नगर इत्यादि विविध प्रकार दाखवितो त्याप्रमाणे सूक्ष्मतम शक्तिपात हा दोन प्रकारचा आहे. ज्याप्रमाणे मत्स्यीच्या नुसत्या स्मरणाने तिच्या पिल्लांचे पोट भरते व ही पिल्ले मोठी झाल्यावर त्यांनाही ही शक्ती प्राप्त होते त्याप्रमाणे श्रीसद्गुरूंच्या केवळ संकल्पाने शिष्याच्या ठिकाणी शक्ती संक्रांत होऊन शक्तिपातजन्य ज्ञान उत्पन्न होते व पुढे त्या अधिकारी शिष्याच्या ठिकाणीही ही संकल्पजज्ञानशक्ती उपस्थित होते. याला सूक्ष्मतम साम्यप्रदायक संकल्पदीक्षा असे म्हणतात. मांत्रिक किंवा जादूगार आपल्या संकल्पाने नगरे, झाडे, रस्ते, विहिरी, वाडे इत्यादि निर्माण करतो; परंतु या वस्तूंच्या ठिकाणी त्या मांत्रिकाच्या संकल्पशक्तीचे कोणतेही सामर्थ्य असत नाही. त्याप्रमाणे श्रीसद्गुरुकृपेने अर्थात् संकल्पाने काही शिष्यांच्या ठिकाणी शक्तिपातजन्य ज्ञान प्रकट होते; परंतु त्यांच्याजवळ हे ज्ञान दुसऱ्यांना देण्याचे सामर्थ्य असत नाही.

वरील सर्व विवेचनावरून हे स्पष्ट होते की, ज्या शिष्यांच्या ठिकाणी स्थूल, सूक्ष्म, सूक्ष्मतर व सूक्ष्मतम अर्थात् स्पर्श, शब्द, दृष्टी व संकल्प या चारांपैकी कोणत्याही प्रकाराने साम्यत्वोपादक

शक्तिपातदीक्षा अर्थात् श्रीसद्गुरुकृपा झाली असेल ते आपल्याला स्वभावतःच प्राप्त होणाऱ्या सामर्थ्याच्या जोरावर गुर्वाज्ञेने संप्रदाय परंपरा पुढे चालू ठेवतात व ज्यांना असाम्यत्वोपादक अशी शक्तिपातदीक्षा झाली असेल ते संप्रदाय परंपरा पुढे चालू ठेवू शकत नाहीत. श्रीगुरुकृपा कशी होते व संप्रदायपरंपरा अविच्छिन्नपणे कशी चालू राहते हे या विवेचनावरून स्पष्ट होईल.

अशा रीतीने वर वर्णन केलेल्या सर्व उदाहरणांमध्ये नवीन पिढी उत्पन्न करून संप्रदाय चालू ठेवण्याची शक्ती ही मातेमध्येच निसर्गाने अंतर्निहित करून ठेवल्याचे दिसून येते. यामुळेच श्रीसद्गुरूंना "माउली" असे सार्थ नाव प्राप्त झाले आहे.

एकदा का श्रीसद्गुरूंनी आपल्या शिष्यावर शक्तिपात करून दैवी शक्ती संक्रमित केली की, शिष्याला आपोआप आसन, प्राणायाम, मुद्रा, प्रत्याहार, धारणा, ध्यान इत्यादि गोष्टी सहज होत राहतात व त्या तो आत्मसातही करतो. हे करण्याकरिता साधकाला कोणाचेही मार्गदर्शन घ्यावे लागत नाही. त्याचप्रमाणे त्याला कोणत्याही प्रकारची विशिष्ट मेहनत किंवा त्रास करून घ्यावा लागत नाही; कारण जागृत शक्ती स्वतःच साधकाला वरील गोष्टी घडवून आणण्यास आतून मार्गदर्शन करीत असते.

शक्तिपातयोगदीक्षेद्वारा आतून सहजतेने होणाऱ्या या साधनाच्या बाबातीत सर्वात उपकारक वैशिष्ट्य म्हणजे या साधनामुळे साधकाला कोणत्याही प्रकारची दुखापत किंवा इजा अगर त्रास होण्याची भीती नसते हे होय. मात्र हठयोगांतर्गत आसने, प्राणायाम इत्यादींचे योग्य अशा श्रीगुरूंकडून शिक्षण न घेतल्यास "**अयुक्ताभ्यासयोगेन सर्वरोग-समुद्भवः ।।२.१६।।**" या "**हठयोगप्रदिपिकेत**" "श्रीस्वात्मारामयोगीन्द्र" यांनी सांगितलेल्या न्यायाने अभ्यासातील चुकांमुळे साधकाला वाटेल त्या तऱ्हेच्या शारीरिक व्याधी उत्पन्न होण्याचा धोका असतो. परंतु शक्तिपात संप्रदायातील साधना ही एक नैसर्गिक साधना आहे. ही साधना साधकाचा देह सर्वप्रकारच्या व्याधींपासून मुक्त करून शुद्ध

करते. इतकेच नव्हे; तर असाध्य रोगही नाहीसे करते. संसारी मनुष्य या साधनेपासून मिळणाऱ्या लाभांनी आपले कल्याण करून घेऊ शकतो. हठयोगाच्या क्लिष्ट व खडतर अभ्यासाच्या द्वारा परमानंद व मन:शांती हे दोन महान् लाभ मिळविण्याचे साधकाचे ध्येय या शक्तिपातयोगसाधनेतून सहजपणे साध्य होते. जो साधक अन्य प्रकारच्या साधनाद्वारे योगाचा अभ्यास करतो त्याला निरनिराळ्या आपत्तींना तोंड द्यावे लागते व शेवटी आपले परम कल्याण होईल अशा आशेने त्याला अतिशय शिस्तबद्ध असे खडतर जीवन जगावे लागते. परंतु शक्तिपातयोगसाधनाद्वारे परमानंद तर प्राप्त होतोच शिवाय साधकातील कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यामुळे ती त्याला आत्मप्रचीतीप्रत घेऊन जाते. साधक परमोच्च ब्राह्मीस्थितीस पोहोचेपर्यंत शक्तीचे कार्य अव्याहत चालूच असते. मध्यंतरी जरी साधकाला अपवादात्मक परिस्थितीत अनेक जन्मातून जावे लागले तरी जागृत झालेली शक्ती झोपी न जाता तशीच जागृत राहते व आपले अंतिम उद्दिष्ट पूर्ण करते. शक्तिपातयोगमार्गाच्या या साधनमार्गासंबंधी अशा प्रकारची खात्री श्रीसद्गुरूंनी व शास्त्रकारांनी दिलेली आहे. सारांश, येथपर्यंत केलेल्या सर्व विवेचनावरून श्रीसद्गुरूकडून शक्तिपात-योगदीक्षेद्वारा आत्मशक्ती कुंडलिनी जागृत करून घेण्याचे महत्त्व साधकांना पटेल अशी खात्री आहे.

शक्तिपातयोगमार्गाद्वारे साधकाला एकदा दीक्षा मिळाली की, मग तो साधक स्वत: योगाच्या कोणत्याही मार्गाचा अवलंब करू शकत नाही किंवा तसे करण्यात त्याला सुखही लाभत नाही. तो फक्त आतून मिळणाऱ्या शक्तीचे आदेशच पाळू शकतो. अशा आदेशांची जर तो अवज्ञा करील तर त्याच्यावर आपत्ती कोसळल्या-शिवाय राहणार नाही. ज्याप्रमाणे माणसाला झोप येऊ लागली म्हणजे त्याला झोपी गेल्याशिवाय गत्यंतर नसते; कारण की, जर तो नैसर्गिक प्रकृतीच्या विरुद्ध गेला तर अस्वस्थ व दु:खी होत असल्यामुळे त्याला अशा परिस्थितीत फक्त झोपल्यानेच शांती व सुख मिळते.

त्याचप्रमाणे जेव्हा साधक साधन करण्यासाठी आसनावर बसतो तेव्हा त्याला आतून शक्तीचे असे आदेश मिळू लागतात की, त्याने अमूक एक गोष्ट करावी किंवा अमूक तऱ्हेची क्रिया किंवा हालचाल करावी आणि त्याप्रमाणे त्याला वागावेच लागते. अशा वेळी जर त्या साधकाने तसे केले नाही तर त्याला अस्वस्थता येते व त्रास होतो. परंतु जर साधकाने मोकळेपणाने आतून मिळणारे आदेश पाळले तर त्याला शांती व सौख्य लाभते. मात्र ज्या साधकांची स्वतःच्या प्रयत्नांवरच श्रद्धा असते असे साधक शक्तिपातयोगमार्गाचा अवलंब करण्याची शक्यता कमीच असते; कारण ते सर्वस्वी स्वतःच्या शक्तीबाहेरच्या शक्तीवर अवलंबून राहतात. परंतु शक्तिसंक्रमणाने प्राप्त होणारा शक्तिपातयोगाचा मार्ग हा संपूर्ण शरणागतीचा व आतील जागृत शक्तीवर अवलंबून राहण्याचा मार्ग आहे. ज्याला अशा प्रकारे दीक्षा मिळाली असेल त्याला या जन्मात आपली किती व कशी प्रगती होईल याचा विचार करण्याचे कारण नाही. शक्तिपातयोगमार्गाचा साधक शक्ती जेथे नेईल तेथे जाण्यास तयार असतो आणि शक्ती सर्व प्रकारच्या आपत्तींपासून त्याचे रक्षण करीत असते. अशा प्रकारे ही जागृत शक्तीच साधकाला परमोच्चपदाला नेऊन पोहोचविते. ज्यांना हल्लीच्या युगात योगाबद्दल कुतूहल असेल त्यांना शक्तिपातयोग-मार्गासारखा दुसरा सोपा मार्ग नाही. जो कोणी साधक शक्तिसंक्रमण करण्याचा अधिकार असलेल्या महात्म्यांच्या सान्निध्यात येईल त्याने त्यांची मर्जी संपादन करून आपल्या आयुष्याचे सार्थक करून घेण्याची संधी दवडू नये. या कलियुगामध्ये हा शक्तिपातयोगाचा सांप्रदाय म्हणजे मृत्युलोकातील माणसांकरिता स्वर्गातून आणलेल्या अमृतासारखाच आहे. यापेक्षा सोपे व अधिक परिणामकारी असे दुसरे साधन या भूतलावर नाही; कारण हे साधनच साधकांची सर्व दुःखातून आणि क्षुद्र व दूषित मनाच्या सर्व दुष्ट प्रवृत्तीतून मुक्तता करून त्याला परम शांती देते.

शेवटी आपण श्रीमदाआद्यशंकराचार्यांच्या **“शिवानन्द लहरीतील”**

पुढील श्लोक म्हणून परमेश्वराची प्रार्थना करू.

**त्वत्पादाम्बुजमर्चयामि परमं त्वां चिन्तयाम्यन्वहं।**
**त्वामीशं शरणं व्रजामि वचसा त्वामेव याचे विभो।।**
**दीक्षां मे दिश चाक्षुषीं सकरुणां दिव्यैश्चिरं प्रार्थितां।**
**शम्भो लोकगुरो मदीय-मनसः सौख्योपदेशं कुरु।।२९।।**

हे सर्वश्रेष्ठ शंकरा! मी तुमच्या चरणकमलांची पूजा करीत आहे. सर्वश्रेष्ठ अशा तुमचे मी रोजच्या रोज चिंतन करीत असतो. हे विश्वेशा! मी माझ्या वाणीने तुमच्याजवळ अशी याचना करीत आहे की, आपण माझा स्वीकार करून अत्यंत करुणेने माझ्यावर कृपापूर्ण दृष्टी टाकून मला शक्तिपातयोगदीक्षा द्या. आपल्या अशा प्रकारच्या कृपापूर्ण दृष्टीची द्युलोकामध्ये वास्तव्य करणाऱ्या देवांनी देखील चिरकाल प्रार्थना म्हणजे याचना केलेली आहे. हे जगद्गुरो शंकरा! माझ्या मनाला आपण नित्य सौख्याचा लाभ होईल असा उपदेश करा अर्थात् साधनमार्ग शिकवा.

**।। ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।।**



## ❋ सूची क्रमांक १ ❋
## -: ग्रंथ, विविध लेख व टीका :-

## ❋ सूची क्रमांक २ ❋
## -: ग्रंथकार :-

## ❋ सूची क्रमांक ३ ❋
## -: विशेष शब्द व विशेष व्यक्तींची नावे :-

# ❋ सूची क्रमांक ४ ❋

## -: विषय सूची :-

## साररूप विषय :-

शक्तिपाताशिवाय म्हणजे भगवंताची कृपा झाल्याशिवाय कोणताही जीव पूर्णत्व प्राप्त करू शकत नाही. इतकेच काय; तो पूर्णत्व प्राप्त करण्याच्या मार्गात प्रवेश देखील करू शकत नाही. जीवाच्या आधारशक्तीच्या अर्थात् धारणाशक्तीच्या भेदानुसार शक्तिपाताचे कमीजास्त प्रमाण किंवा भिन्नता दिसून येते. मात्र हेही तितकेच खरे आहे की, जीव कितीही सामान्य कोटीतील असला आणि भोग, वासना, आकांक्षा इत्यादिंनी कितीही गुरफटलेला असला, तरी एकदा त्याच्यावर शक्तिपात झाला की, तो श्रेष्ठ अशा ब्रह्मपदाला अवश्य पोहोचतो. मात्र भोगाकांक्षादि विक्षेपांमुळे जीवाच्या परमपदाला जाण्याच्या गतीत अडथळा उत्पन्न होतो. जर शक्तिपाताची मात्रा तीव्रातितीव्र असेल व आडवे येणारे विक्षेप जर नसतील तर अत्यंत शीघ्र गतीने म्हणजे क्षणभरातसुद्धा जीव परमपदाला जाऊन पोहोचतो. शक्तिपात दीक्षेच्या वेळी योग्यायोग्यतेचा विचार केला जात नाही. मात्र (जीवाच्या) मुळातील योग्यतेनुसारच शक्तिपाताचे प्रमाण स्वाभाविकपणे निश्चित होत जाते. परंतु प्रमाण काहीही असले तरी भगवंताच्या शक्तीचा महिमा इतका मोठा आहे की, एकदा का होईना, (श्रीसिद्धगुरूंकडून) ही शक्ती साधकात संक्रमित झाली की ती त्या जीवाला भगवंताच्या घरी (ब्रह्मपदाला) पोहोचविल्याशिवाय शांत होत नाही, हे अगदी निःसंशय सत्य आहे.

म.म. श्रीगोपीनाथ कविराज